# मराठीचें अंतरंगदर्शन

अथवा

कालिकांतून वेळोवेळीं प्रसिद्ध झालेल्या भाषाचिकित्सा-
विषयक विविध लेखांचा संग्रह.

लेखक

गोविंद कृष्ण मोडक, संस्कृताध्यापक.
न्यू इंग्लिश स्कूल, पुणें

सन १९३२

किंमत दीड रुपया.

लेखक व प्रकाशक— रा. रा. गोविंद कृष्ण मोडक
७७६ सदाशिव, पुणें



मुद्रक— पुणें पेठ भांबुर्डा घ. नं. १३६।२ येथें आर्यभूषण छापखान्यांत
रा. रा. अनंत विनायक पटवर्धन यांनीं छापिलें.

पुस्तकें मिळण्याचीं ठिकाणें—

१ गोविंद कृष्ण मोडक, ७७६ सदाशिव, पुणें.
२ नवीन किताबखाना, बुधवार, पुणें.
३ पुण्यांतील इतर सर्व प्रसिद्ध ग्रंथापणिक.

श्री

# यशोदा-चिंतामणी-ग्रंथमाला

पुष्प १ लें

आपल्या मातुःश्री व वडील याच्या
स्मारकभूत ग्रंथमालेचें प्रथम
पुष्प होण्याचा मान प्रस्तुत
पुस्तकाला देऊन त्यास विद्व-
त्कंठगत होण्याचें भाग्य
जोडून दिल्याबद्दल लेखक,
रा. नरसिंह चिंतामण
केळकर याचा, अत्यंत
आभारी आहे.

गो. कृ. मोडक.

# प्रस्तावना.

ज्याच्या हृत्कासारीं होय गुणस्नेह बिंदुही फार।
सारज्ञ असूयोज्झित त्यांना माझा असो नमस्कार ॥ मोरोपंत.

**उपक्रम**—पुढील लेखसंग्रह आज मी जनतेपुढें ठेवीत आहे यांत वेळोवेळीं नियतकालिकांत प्रसिद्ध झालेले माझे मुख्य-मुख्य लेख दिले आहेत. या लेखांतील पहिला १९१३ या वर्षी प्रकाशित झाला व यांतील शेवटचा लेख या संग्रहाचें प्रकाशन चालू असतांना प्रसिद्ध झालेला आहे अलीकडील कांहीं लेख यांत दिले नाहींत, कारण माझ्या मतें त्यांतील विषय अजून स्थिर स्वरूपांत छापण्याइतके विचारपूर्ण ठरले नाहींत प्रायः वर्तमानपत्री लेख कांहीं काळ गेल्यावरच संगृहीत करावे, म्हणजे मधल्या वेळांत, इष्ट असल्यास, त्यांत फरक करितां येतो असो. या लेखांचा काळ जसा दीर्घ (म्हणजे २० वर्षांचा) असल्यामुळें विविध आहे, तसेच यांतील प्रतिपाद्य विषयही विविध आहेत. अनुक्रमणिकेवरून दिसून येईल कीं या संग्रहांत काव्यार्थांची चर्चा, शब्दांच्या व्युत्पत्तीचा खल, व्याकरणाचें निरूपण, पर्यायशब्दांचें समीक्षण, इत्यादि विषय आले आहेत त्यांतून कोणत्याही विषयावरील लेखाची पूर्वकल्पना यावी म्हणून, विषयाचे नावाखालीं त्यांतील मुद्देही दिले आहेत यांच्या योगानें नुसत्या नांवापेक्षा, लेखांतील प्रतिपाद्य विषयाची विशिष्ट माहिती वाचकांस आधिक्यानें व सुखानें होईल

**विविध ज्ञान**—या विषयाच्या वाचनापासून तत्तद्विषयक माहिती तर वाचकांस मिळेलच, पण त्या-त्या विषयाच्या कक्षेबाहेरीलही मधून-मधून मिळेल माहेर हा शब्द हल्लीं आपण मराठींत वापरितों, तर संस्कृतकालीं तदर्थ पितृसद्मन्-सारखे शब्द वापरीत होते. सांप्रत या सज्ञांत, पित्यास खो मिळून, मातेचा प्रवेश झाला आहे, यावरून कुटुंबातील अधिकार आपल्या समाजांत कोणत्या वळणानें वहात आहे याच कांहींसे अनुमान होतें अर्थात्, असें एकटें अनुमान स्वयमेव कांहीं सिद्ध करूं शकत नाहीं, तरी त्याच्या समवायाला महत्त्व आहे.

---

* **पद्यार्थ**—ज्यांच्या हृदयरूपी तळ्यांत परक्याचा गुण हेंच कोणी तेल, तें थेंबभर असलें तरी, विस्तार पावतें, जे (परक्याचे कृतीची) किंमत जाणूं शकतात, व जे मत्सरास थारा देत नाहींत, अशा सज्जनांना माझा नमस्कार असो!

म्हणूनच अशा अनुमापक गोष्टींचें निवेशन वाङ्मयात करणें इष्ट असते. अशा प्रकारच्या अनुमापक गोष्टी 'स्त्रियाची चढाई' (पान २१०), चित्पावन (पान ४६), उदन्त (पान ४०) इत्यादि लेखात वाचकास सापडतील अशा रीतीनें व्युत्पत्ति हा विषयही सर्वस्वी रूक्ष नाही असें दिसून येईल काव्यार्थाची चर्चा हा कोणासही मनोहर असाच विषय आहे व्याकरणाचे चिंतन हें तर भाषेच्या अभ्यासात प्रधानतम मानिलें आहेच विशिष्ट वस्तूस तत्सदृश वस्तूहून भेददर्शक अशी कोणती संज्ञा द्यावी, एतदर्थ पर्यायाचे परीक्षण हें तर व्यवहारोपयुक्त आहेच एवंच या संग्रहातील विषय, या ना त्या कारणाकरिता, वाचकास वाचनीय वाटतील असा मला भरंसा आहे

**स्वाहित**—या लेखांच्या वाचनापासून फायदा जसा जनतेस आहे तसाच याच्या लेखनापासून मलाही झाला आहे एखाद्या विषयावर व्याख्यान देणें, लेख लिहिणें, पुस्तक रचणें इत्यादि उत्तरोत्तर गोष्टींकरिता त्या विषयाचा व्यासंग अधिकाधिक व सचिकित्स करावा लागतो अशा प्रयत्नानी मनातील विचार निश्चित व व्यवस्थित होऊन यावच्छक्य निर्दोष होतात

**अनुभव**—लेख लिहिल्यानंतर प्रकाशित होईपर्यंत बहुविध अनुभव लेखकास घ्यावे लागतात याचें निवेदन येथें अस्थानी होणार नाही माझ्या लेखाचे विषय रस्त्यातील माणसास सहज रुचणारे नसल्यामुळें, हे लेख प्रकाशित करणें फार कठीण जातें. जें विकेल तेंच पिकवावयाचें, हें व्यवहारपाटव केव्हाही स्वीकार्यच असल्यामुळें, नियत्कालिकात अशा लेखास जागा मिळणें सुलभ असत नाही तरीपण अशा नियतकालिकातही ज्ञानप्रकाश–सारखे काही अपवाद आहेत, हें निवेशित करणें जरूर आहे नियतकालिकानें द्रव्यदृष्ट्या जसें जनरुचीप्रमाणें स्वतः वहावें, तसेच मधून-मधून कर्तव्यदृष्ट्या जनरुचीसही, इष्ट अशा लेखाच्या प्रकाशनानें योग्य त्या वळणानें, आपल्याबरोबर वाहण्यास लावावें आता सागितल्याप्रमाणें नियतकालिकात स्थान मिळणें हें तर कठीणच; पण तें मिळतें तेव्हाही विलंबानें मिळतें असाही माझा अनुभव आहे.

**प्रतिपक्षांचे प्रकार**—प्रकाशकानतर प्रतिपक्षी लेखकाचा विचार येतो. याच्यामध्येंही अनेक प्रकार आढळतात कोणी युक्ति वगैरे न पाहता केवळ टीकेकरिताच टीका करीत सुटतो व वशिल्यामुळें आपली टीका प्रकाशित झालेली पाहतो. कोण्या प्रतिपक्ष्यास आपल्या लेखावरील टीका न आवडून

तो केवळ हातचलाखीनें तिचे खडन सजवून आपली बाजू रगवितो व वाचकाची दिशाभूल करितो. कोणी प्रतिपक्षी आपल्या लेखाची सदोषता उत्तरामध्यें अनुदार भाषा योजून झाकू पाहतो कोणी विरुद्ध लेखाविषयी केवळ गजनिमीलिका धारण करितो. असे विविध खारट–तुरट अनुभव मला आले आहेत. उलट–काही उदार मनाचेही प्रतिपक्षी आढळतात. याचा नामनिर्देश करण्यास हरकत नाही, इतराचा मात्र तसा करू नये का ? सत्य ब्रूयात् प्रिय ब्रूयान्न ब्रूयात् सत्यमप्रियम् । रा केशव लक्ष्मण ओगले या्ऱ्या काही विधानाचें खंडन मी प्रकाशित केले असताना त्यानी 'शेष कोपेन पूरयेत्' याचा अवलंब न करिता तें खंडन मान्य केलें ही गोष्ट (जी मला माझ्या एका भूतपूर्व शिष्याकडून कळली ) त्याच्या मानसौदार्याची द्योतक आहे पण असे लोक थोडे. असो येथें पुढील पद्य उदाहरावेंसे वाटतें

***कटु क्वणन्तो मलदायकाः खलास्तुदन्त्यलं बन्धनशृङ्खला इव ।**
**मनस्तु साधुध्वनिभिः पदेपदे हरन्ति सन्तो मणिनूपुरा इव ॥** 'बाण'

वाचकासबधी अनुभवही सागण्यासारखा आहे मात्र याची एकच बाजू मजजवळ आहे. माझ्या लेखाबद्दल समतिबोधक पत्रे मला आलेली आहेत लेख ज्याना पसत नाहीत असेही पुष्कळ असतील, पण अर्थात् नागरिकत्वामुळें त्यानीं आपली विमति मला कळविली नसावी यावरून त्याचाही थोरपणा दिसून येतो. हा झाला सामान्य अनुभव विशिष्ट विषयासबधीच्या लेखकाविषयी आलेला अनुभवही निवेदनीय आहे

**लेखकांची विचारसरणी**—भाषेंत विशेषेंकरून व्याकरणपुस्तकात बदल करणें तो जनतेच्या संमतीनेंच झाला पाहिजे, असें लोकमान्याचें स्पष्ट मत होतें ( पान १६० ) व तदनुरूप ते वेळोवेळी खटपटही करीत असत. परतु अलीकडे जनदृष्ट्या राजकीय विषयास दिवसानुदिवस सर्वातिशायी महत्त्व येऊं लागल्यामुळें व्याकरण– विषयाकडे जनतेचें व परपरेनें कालिकाचें लक्ष्य कमी होऊं लागलें आहे त्यामुळें (क) **विद्याधिकाऱ्यांना** रान मोकळें सापडून ते स्वैर वर्तू लागले आहेत. ते जनतेच्या मताची पर्वा मुळींच करीत नाहीत.

---

***अर्थ**—अप्रिय शब्द काढणारे व दूषण देणारे खल, कठोर आवाज करणाऱ्या व काळें लावणाऱ्या हातांतील बेड्याप्रमाणें, फार पीडा देतात उलट वाजणाऱ्याच्या तोरड्याप्रमाणें साधुजन पदोपदीं गोड शब्दांनी मनास रमवितात.

एखादा प्रश्न त्याना सुटला नाही म्हणजे त्याला तोंड न देता **बगल देऊन पुढें** जातात. उदाहरणार्थ–I have to go एतदर्थक ' मला जावयाचें आहे ' या वाक्यात **जावयाचें** हें पद नीट विवरिता न आल्यामुळें **जावयाचें आहे** असली क्रियापदें संयुक्त मानावी असे त्याचें म्हणणें आहे समासाच्या वर्गीकरणात भिन्नभिन्न तत्त्वावर अधिष्ठित असलेल्या समासभेदाची एकत्र खिचडी केली आहे याच्या विरुद्ध लिहिलेल्या लेखाकडे लक्ष्य देण्याचें ते मनावरच घेत नाहीत, कारण आपलेंच मत जनतेवर लादण्याची अधिकारद्वारा शक्ति, व स्वभावानुसारे इच्छा, दोन्ही त्याचे ठिकाणी दिसत आहेत. हा झाला शाळाखात्याचा अनुभव ( ख ) **परपरेचा दाबही** ज्ञानवृद्धीला विरोधी दिसतो, मग ती परपरा देशी असो वा विदेशी असो ज्ञानेश्वरीतील ओव्याचा अर्थ डोळसपणें न लाविता केवळ परपरेनेच लावण्यात येतो, मग तो युक्तीला प्रतिकूल का असेना ! ही परपरा इतकी शिरजोर ठरते की ती दिलेल्या दाखल्याकरिता मूळ प्रस्तुतही बदलण्यास कचरत नाही (पान २५). ही परपरेची अरेरावी सस्कृतातही काव्येतर वाङ्मयात आढळते ' प्राशनात् ' यासारख्या रूपाचा अर्थ शास्त्री प्रथमेसारखा करितील, पण तत्स्थानी प्रथमायुक्त पाठातराचा विचारही करणार नाहीत(पान२९) (ग) आधुनिक व्याकरणाभिज्ञही परंपरा व युक्तायुक्तता याचा विरोध आल्यास परपरेलाच चिकटून बसतात. अनादि–सारख्या शब्दाची पदें अन् आणि आदि अशी स्वाभाविक न घेता, अ आणि नादि अशीच आग्रहाने पाडितात ( पान १७६ ) (घ) इंग्रजी शिकलेले लोक इग्रजी भाषेच्या पकडीत अडकून बसलेले दिसतात To like हा धातु इग्लिश-मध्यें सकर्मक असल्यानें,त्याच्या भाषान्तरात येणारा **आवड** हा धातूही सकर्मकच मानितात व लेखातही तसा प्रतिपादितात (पान२३८) (ङ) सामान्य जनतेकडे पाहिल्यास तिचेंही लक्ष्य कालिकातील लेखाकडे विशेष उत्सुकतेनें लागलेले दिसत नाही एकदा कालिकात आलेला लेख काही वर्षानी फिरून कालिकात आल्यास, तो जनतेला नवाच वाटतो येथें सागितलेल्या या सर्व गोष्टी जरी अनुचित दिसल्या तरी एकदरीनें पाहता आपल्या भाषेविषयी, तिच्या विविध अगाविषयी, जनतेमध्यें पूर्वी–पेक्षा जागृति व उत्साह खास वाढत असल्यानें भाषेचा भविष्यकाळ उज्वल असाच दिसतो.

**कांहीं उणीवा**—येथपर्यंत या लेखातील प्रतिपाद्य विषयांविषयी

जें पूर्वकथनीय तें कथन झाले आता अशा विविधकालीन लेखसंग्रहाबद्दल एकदोन गोष्टींचा उल्लेख कर्तव्य आहे. या संग्रहात एकाच विषयावरील भिन्न भिन्न लेखात क्वचित् काही विसंवाद आढळेल एकाच वस्तूच्या संज्ञा भिन्न ठिकाणी भिन्न आढळतील. कोठें-कोठे पुनरुक्तीही दिसेल तरी असले दोष विविधकालीन लेखसमुच्चयात दुष्परिहर आहेत हें लक्षात आणून त्याबद्दल मी क्षमेस पात्र आहें विशेषेंकरून गाव ( ग्राम ),पोंच इत्यादि शब्दातील,एका मतानें आहे व एका मताने नाही अशा प्रकारचा म्हणजे,-सदसत्संशयगोचर असलेला नासिक्योच्चार दर्शविण्यास अनेक संज्ञा मूळ लेखात येऊन गेल्या आहेत पण आता प्रकृतार्थबोधक संज्ञा उपनासिक्य ही विद्वज्जनसंमत झाली असल्यानें तीच या संग्रहात अनेक ठिकाणी योजिली आहे, तरी एकसूत्रतेकरिता बाकीच्या ठिकाणी हीच संज्ञा वाचकानी समजावी या उच्चाराच्या संज्ञेप्रमाणें त्यान्च्या व इतर नासिक्य लेखाकाराच्या संज्ञातही घरसोड झाली आहे. पुष्कळ ठिकाणी एकसूत्रीपणा आणण्याचा यत्न केला आहे, त्याचे स्वरूप असे – श्राव्य तो **अनुस्वार** व त्याचें लेखन **बिंदू** म्हणजे भरीव टिंब–जसे पंकज. स्पष्ट **अनुनासिक** स्वर **चंद्रबिंदूने** दर्शवावा, जसें–यॅव या दोहोहून निराळा म्हणजे वरील सदसत्संशयगोचर असा नासिक्य उच्चार **उपनासिक्य** म्हणावा, व त्याचं चिन्ह म्हणून पोकळ **शून्य** योजावें, जसें–कोंवळा.

या वरील सर्व गोष्टी ध्यानात वागवून लोकानी हा लेखसंग्रह वाचावा व त्याचा आदर करावा अशी त्यास प्रार्थना आहे त्यानी आदर केल्यानेंच या माझ्या श्रमाचें चीज होणार आहे

**कृतज्ञता**—ज्या थोर गृहस्थानी हा लेखसंग्रह मजकडून छापविला त्याचे उपकार तर फारच मोठे आहेत. या मोठेपणाची आगंतुक कारणें अनेक आहेत. एक तर व्याकरण हा विषय त्याचा आवडता नसूनही त्यानी हा लेखसंग्रह, व्याकरणप्रचुर असलेला, मजकडून छापविला दुसरें–एतदर्थ धनव्ययही त्यानीच केला. तिसरे या पुस्तकान्च्या विक्रीपासून तोटा झाल्यास त्याचें धनीपण स्वताकडे घेण्याचें व फायदा झाल्यास त्याचें धनीपण मजकडे देण्याचेंही त्यानी आपलें स्पष्ट मत मागितलें. हें त्याचें म्हणणें मी सर्वथा स्वीकारिलें नाही, ही गोष्ट निराळी खोगिराला मागें तर तोबऱ्यालाच तेवढा पुढें कसा होऊं ! असो.–या उपकाराच्या महत्वाचें एकच गमक येथें देतों की त्यान्च्या भरीव

प्रोत्साहनाचे अभावी हा लेखसंग्रह जन्मच पावला नसता. येथेंच या संग्रहातलि लेखास ज्या ज्या संपादकानी आपल्या कालिकात स्थान दिलें त्याचेही उपकार मानणें अवश्य आहे याची कारणे दोन, त्यानी लेखास प्रसिद्धी दिली हें एक व अशा प्रसिद्धींच्या अभावी इतके मजकडून लेख लिहूनच झाले नसते हें दुसरें. लिहिलेला लेख छापून हातावेगळा झाल्यानेंच नवीन लेख लिहिण्यास लेखक उत्साहित होतो अशा रीतीनें हा लेखसंग्रह प्रसिद्ध होण्याचें श्रेय वरील संपादकासच आहे आता, या लेखाचे एकत्र प्रकाशनास त्याची अनुमती अवश्य आहे; ही अनुमती मी न मागताच घेतो कारण अशी अनुमती प्रत्यक्ष मागणं म्हणजे त्याच्या सौजन्याचा एक प्रकारचा उपमर्दच होय. ज्यानी लेख लिहून त्याच्या संग्रहाची शक्यता सिद्ध केली ते त्याच संग्रहाच्या प्रकाशनास अनुमती देण्यास विमुख कसे होतील ?

**शाश्वत उपकार**—या लेखसंग्रहानें बराच कालावधि आक्रमिला आहे. तदनुसार बऱ्याच लोकाबद्दल कृतज्ञताबुद्धिही, मला वाटत असलेली, येथेंच निवेशित करणें मला उचित दिसतें. इतर एखाद्या विशिष्टकालीन पुस्तकाच्या प्रस्तावनेंत ही चिरकालीन उपकर्तांची जाणीव व्यक्त करणें प्रशस्त होणार नाही. ज्याच्या विषयी मला सदैव कृतज्ञता वाटते त्यातलि मुख्य—मुख्य पुढील गुरुवर्य होत. दिवंगत रंगोपत गोगटे, गोविंदराव धारप व रामभाऊ पटवर्धन आणि विद्यमान रा. बापूजी रामचंद्र लोहोकरे, व परशुराम रावजी गडबोले. या सर्वांनीं माझ्या बुद्धीच्या चिकित्सक प्रवृत्तीस वेळावेळी उत्तेजन दिल्यानेंच मी या संग्रहातील लेख लिहूं शकलों माझ्या चिकित्सक बुद्धीस पटुत्व देण्यास दिवगत शिवराम महादेव म्हणजेच ‘ अण्णा ’ पराजपे याचेंही अमूल्य असें साह्य झालें आहे. याचा शिष्य होण्याचें भाग्य जरी मला विद्यार्थिदशेत लाभलें नाही, तरी मयूरमंडळांत होणाऱ्या साप्ताहिक काव्यचर्चेंत त्याची सहृदय, तर्कशुद्ध, कवित्वानुविद्ध, रहस्यस्पर्शी अशी अर्थप्रतिपादनाची सरणी ऐकावयास मिळाल्यानें, मला आनंदाबरोबर सूक्ष्मार्थदर्शितेचाही लाभ झाला विभक्तिविचाराचे संबंधात मला दिवगत रामचंद्र भिकाजी गुजीकर याच्या विविधज्ञानविस्तारातील लेखाचें अमूल्य साहाय्य झालें अशा कारणानी या लेखसंग्रहाचें कर्तृत्व एक प्रकारें या विद्वत्समूहाकडेच जातें म्हणून त्याच्याच चरणी मी हा संग्रह सविनय अर्पितों.

न्यू इंग्लिश स्कूल, पुणें
ता. १७।२।३२

**गोविंद कृष्ण मोडक,**
संस्कृत शिक्षक.

# एक महत्त्वाचा अभिप्राय.

रा मोडक ( संस्कृत शिक्षक, न्यू इंग्लिश स्कूल, पुणें ) यांची चिकित्सक-पणाची बुद्धि अनेक वर्षांपूर्वी, रामरक्षेवरील चर्चेच्या त्यांच्या एका टिपणा-वरून, माझे लक्षात प्रथम आली आणि तेव्हापासून, त्यांजकडून लिहून प्रसिद्ध झालेली अशीच इतर अनेक टिपणं मी मधून मधून वाचली त्यावरून मी अशी अपेक्षा व आशा करून होतो की, मोडकशास्त्री यांच्या अनेक टिपणांचा समग्र ग्रंथ छापून निघेल व त्यामुळें मराठी भाषाविषयक चिकित्साग्रंथांत एक चांगली भर पडेल म्हणून हल्लींचा हा ग्रंथ प्रसिद्ध होत असलेला पाहून मला खरोखर फार आनंद झाला. प्रस्तुत ग्रंथातील चिकित्सा-विषयांत किती विविधता व वैचित्र्य आलें आहे हे ग्रंथाची पानें नुसती चाळली असताही सहज लक्षांत येईल.

महाराष्ट्रांतील सर्वच लोक मराठी भाषा बोलतात त्यांतील काही लेखक या नात्यानें प्रबंध लिहितात आणि फिरून त्यांतील काही कसलेले नामांकित असे ग्रंथकार असतात तथापि या सर्व लोकांची मराठी भाषेकडे पाहण्याची दृष्टी फार ढोबळ असते किंबहुना विद्वान व नामांकित अशाही लेखकांना मराठी व्याकरणशास्त्र फारसे माहीत नसतें असें म्हटलें असता त्यांचा उपमर्द होतो असें मानण्याचें कारण नाही कारण व्याकरण, शब्दसिद्धि व शब्द-चिकित्सा हे विषय असे आहेत की, त्यांच्याकडे दुर्लक्ष झाल्यामुळें निचळ वाङ्मय स्वरूपाच्या लेखनाची प्रगती किंवा उत्कर्ष ही थांबत नाहीत. पण वरील विषयांचा अभ्यास करणारे लोक, एकदरीनें भाषेच्या प्रगतीच्या दृष्टीनें व तिच्यातील स्थायीभावाच्या दृष्टीनें, आवश्यक आहेत. निरुक्ति व व्याकरण यांच्या परिचयाशिवाय उत्कृष्ट संस्कृत वाङ्मयाचें रससेवन होऊं शकतें, परंतु निरुक्ति व व्याकरण यांच्या साहाय्यानें संस्कृत भाषेवर जो प्रकाश पडतो त्याचें महत्त्व ऐतिहासिक दृष्ट्या व सामाजिक दृष्ट्या फारच मोठें आहे. सुप्र-सिद्ध ग्रंथकार रा राजवाडे यांचें महत्त्व त्यांच्या लेखनशैलीपेक्षां त्यांच्या संशोधक बुद्धीतच अधिक साठविलेलें होतें रा राजवाडे यांच्यापेक्षां अधिक हृदयस्पर्शी भाषा लिहिणारे मराठी लेखक झाले व आहेत. पण त्यांनीं लिहि-लेली व्याकरणविषयक व शब्दसिद्धिविषयक टाचणें यांनी मराठी भाषेच्या

इतिहासावर व महाराष्ट्री समाजाच्या इतिहासावर जो प्रकाश पाडला तो उपरि-निर्दिष्ट-गुणविशिष्ट लेखकाच्या लेखानी किंवा ग्रथानी पडणें शक्य नाही. मोडकशास्त्री यान्या टिपणसंग्रहवजा ग्रथाचीहि गोष्ट अशीच आहे

काव्यार्थचर्चा असो, व्युत्पत्ती असो, शुद्धलेखन असो, व्याकरण असो, कोणच्याहि बाबतीत मराठी भाषेतील शब्द, वाक्प्रचार आणि त्याचे प्रयोग व उपयोग याकडे मोडकशास्त्री यानी चालविलेली चिकित्सक बुद्धी पाहून, अधान्या रात्री आपल्या सूक्ष्म व प्रखर तेजान्या किरणानी सभोवार सर्वत्र टेहेळणी करीत फिरणान्या विजेन्या सर्चलाइटची आठवण होते आणि केव्हा साडलेली मौल्यवान् वस्त त्या प्रकाशात अचानक सापडेल, तर केव्हा उद्वेग वाटणारे अज्ञानाचे किंवा दुरुपयोगाचे प्रकार दृष्टीस पडतील म्हणून असे वाटते की, साधा पोशाख घालून हातात छुपा कॅमेरा घेऊन हिंडणारा मोडकशास्त्र्यासारखा एखादा गुप्त पोलीस मराठीभाषाव्यवहाराच्या बाजारात नेहमी हिंडत असला तर तो फार चागला

हल्ली वर्तमानपत्राचा प्रसार झपाट्याने वाढत असल्यामुळ मोडकशास्त्र्याचा चिकित्सेचा उद्योग सफळ होण्याला बरीच मदत झालेली आहे एरवी, मासिक पुस्तकातून असले विषय प्रसिद्ध होण्याला आधी जागा थोडी व वाचकहि थोडे त्यामुळ त्यान्यासारख्या चिकित्सक सशोधकाचे चीज चागलें झालें नसतें पण त्याचे लेख वर्तमानपत्रात येऊनहि जे एरवी वाचून विसरून गेले असते तेच आता पुस्तकरूपानें सगृहीत झाल्यामुळें, त्याना सार्वजनिक ग्रथसग्रहालयातून व खाजगी ग्रथसग्रहातून कायमचे स्थान मिळेल इतकेंच नव्हे, तर अभ्यासकाच्या पुढील पिढीला त्याच्या टिपणाची फार मदत होईल. जें विकेल तेच पिकवावें असा सामान्य नियम असला तरी, वर्तमानपत्रे व मासिक पुस्तके यानी मोडकशास्त्री याची चिकित्सेची हौस अगदीच फुकट घालविली असें म्हणता येणार नाही. आणि तसें होण्याचें खरें कारण शास्त्री-बोवाना वाटतें तितका चिकित्साविषय रुक्ष नसतो, व ती वाचणाऱ्याची सख्याहि अगदीच थोडी आहे असें म्हणता येणार नाही यामुळें अशा प्रकारची चिकित्साही चित्ताकर्षक होत नाही असें नाही

असो अशा लेखाच्या पुस्तकांना लोकाश्रय मिळावा तसा मिळत नाही ही गोष्ट मात्र निश्चित आहे असा प्रकार असताही, पुस्तकरूपानें एकत्र करून

छापण्याचा योग मोडकशास्त्री यांच्या लेखामध्यानें आला ही गोष्ट अत्यंत अभिनंदनीय होय आणि त्यामुळें मोडकशास्त्री यांना आपल्या चिकित्सा-बुद्धीचें कार्य हल्लीप्रमाणें पुढेंहि चालविण्यास सहजच उत्तेजन येईल याजबद्दल आनंद वाटतो

१२।३।३२ न चिं केळकर.

---

## ( २ ) प्रोफेसरांनीं केलेलें अभिनंदन.

माझे बहुश्रुत व विद्वान मित्र श्रीयुत गोविंद कृष्ण मोडक, पुणे येथील न्यू इंग्लिश स्कूलमधील मुख्य संस्कृताध्यापक, यांनी गेल्या वीस वर्षांमध्यें कित्येक वर्तमानपत्रांत व नियतकालिकांत अनेक व विविध विषयांवर लेख लिहिले त्यांतील कांहीं महत्त्वाच्या लेखांचा संग्रह रा मोडक यांनी प्रस्तुत पुस्तकांत केला आहे हे लेख प्रायः शब्दव्युत्पत्ति, शब्दशक्ति, शब्देतिहास अशा स्वरूपाचे आहेत कांहीं थोड्या लेखांत रा मोडक यांनी काव्यपाठ, काव्यार्थ, शब्दमहति, शब्दार्थपरिवर्तन, संप्रदाय अलंकार यांचीही चर्चा केलेली आहे मराठी भाषेचें मार्मिक ज्ञान व्हावयाला हे चिकित्सक बुद्धीनें व सूक्ष्म दृष्टीनें लिहिलेले लेख अत्यंत उपयोगी आहेत रा मोडक यांची लेखनपद्धति व्यवस्थित, सुसंस्कृत, सप्रमाण व तर्कशुद्ध आहे ती कोठें कोठें विनोदगर्भही आढळते. प्रतिपक्षाविषयीं रा मोडक नेहमीच योग्य तो आदर आपल्या टीकालेखांत दर्शवितात, यामुळे त्यांच्या विचारगांभीर्याची व युक्तियुक्त कोटिक्रमाची छाप वाचकांवर चटकन् बसते रा मोडक यांनी या संग्रहांत प्रतिपादिलेल्या विषयांचे स्वरूप विशेषसे आकर्षक नसल्यामुळें त्यांचा वाचकवर्ग साहजिकपणेंच मर्यादित असणार तथापि यामुळें त्यांच्या लेखांचें महत्त्व यत्किंचित् सुद्धां कमी होत नाहीं मराठी वाङ्मयाच्या उच्च प्रतीच्या विद्यार्थ्यांना, तसेंच मराठीचा मोठ्या आवडीनें सर्वाङ्गीण अभ्यास करणाऱ्या गृहस्थांसही, प्रस्तुत लेखसंग्रह संग्राह्य व लाभदायक होईल यांत शंका नाहीं प्रस्तुतचा प्रयत्न ग्रंथकारास अर्थप्रद झाला नाहीं तरी तो त्यास प्रतिष्ठावह खचित आहे मोडकशास्त्री यांच्या प्रतिपक्षांत कांहीं 'सारज्ञ' व 'असंयोज्झित' आहेत हे मला माहीत आहे असे गृहस्थ माझ्याप्रमाणेंच प्रस्तुत लेखसंग्रहाचें मनःपूर्वक व सानन्द अभिनन्दन करीत आहेत

पुणें, ( लक्ष्मीरोड )
फाल्गुन शुद्ध पूर्णिमा शके १८५३

लक्ष्मण गणेश शास्त्री लेले
( प्रोफेसर, एस पी कॉलेज )

---

# ( ३ ) तज्ज्ञ काय म्हणतात.

रा. मोडक यास—

आपलें "मराठीचें अंतरंगदर्शन" हें पुस्तक वाचलें आपला कोणताही लेख ज्या वेळेस मी वाचतों त्या वेळेस आपल्या सूक्ष्म, मार्मिक, चिकित्सक, व संशोधनपर अशा विवेचनपद्धतीबद्दल मला आदर वाटतो वादात उत्तर पक्ष करण्यात आपला हातखंडा आहे. आपल्या म्हणण्यास पूर्वीच्या शास्त्रातील आधार आणि त्याला पोषक अशी वर्तमानबोलीतील उदाहरणें देऊन आपण आपल्या प्रतिपक्षास त्यांच्या भुसभुशीत विचारसरणीबद्दल लाजवितां

या पुस्तकांत आलेले आपले लेख मी पूर्वीच वाचले होते त्या वेळेसच हें शास्त्रीय विवेचन त्या त्या वृत्तपत्राबरोबर नष्ट होणार की काय अशी भीति मला वाटत होती परंतु आपण ते सर्व विखुरलेले लेख एकत्रित करून त्यांना स्थैर्य आणून दिलें व अशा रीतीनें मराठी भाषेचें अंतरंग विशद केलें, ह्याबद्दल मराठीचे साक्षेपी अभ्यासक आपले ऋणी राहतील मराठीच्या सूक्ष्म अभ्यासाच्या या वाढत्या काळांत असल्या प्रकारच्या पुस्तकाची अत्यंत जरूर होती. भाषाविषय रूक्ष व कष्टसाध्य असल्यामुळें लोकांचें लक्ष व आस्था याकडे फार कमी दिसून येतात, अशा प्रतिकूल परिस्थितीत मराठी भाषेचा उलगडा करून मराठीतील भाषिक ग्रंथांत आपण एक बहुमोल अशी भर घातली आहे वर्ण, व्युत्पत्ति, प्रत्यय, प्रयोग व वाग्विशेष इत्यादि भाषेच्या अन्तःस्वरूपाच्या ज्या प्रधान बाबी व ज्यांच्यामध्यें प्रक्रिया विशेष घडून येते त्या घेऊन, सांग व संपूर्ण विवेचून व त्यांना संस्कृतमधील जरूर तो आधार देऊन, आपण त्यांना एक प्रकारचें ऐतिहासिक स्वरूप दिलें आहे. पुस्तकांत प्रतिपादिलेली मतेंही प्रगमनशील स्वरूपाची असल्यामुळें मराठी भाषेच्या विकासास ती पोषक झाल्यावाचून राहणार नाहींत मराठीचा विशेष चिकित्सक अभ्यास करणाऱ्यास व विशेषतः कॉलेजातील वरच्या वर्गातील विद्यार्थ्यांस आपलें हें पुस्तक उपयोगी होईल अशी माझी खात्री आहे.

पुणें ता. २०।३।३२ कृ. पां कुलकर्णी.

---

# अनुक्रमणी.

## भाग–१. काव्यार्थचर्चा.

### १. एका आर्येचा अर्थ



### २ मोरोपंती वाग्विशेष.



### ३ कालिदासीय शब्दव्युत्पत्ति व कोट्या ( टीकात्मक )

## ४ ज्ञानेश्वरींतील एक शंका, अथवा –टिटवी समुद्र उपसणारी कीं भरणारी ?

खंड १

**बोधसूत्र**—पूर्वापर ओव्यांचा विचार सूर्यापुढे तेजात भर टाकणारा काजवा, अथवा समुद्रापुढे टिटवी, तसा भगवान् कृष्णापुढें (मी) ज्ञानेश्वर. माप सूये=परिमित पाणी घाली **पाने** २१–२७

ज्ञानप्रकाश २०।२।२९

खंड २ (आक्षेपखंडन)

अथवा, माप **सूये** सागरी इ०–चा अर्थ.

**बोधसूत्र**—शब्दबंध व लोककथा यांचे सापेक्ष बलाबल **पाने** २७–२८

°प्रकाश—२६–४–२८

## ५ एक उपयुक्त सूचना.

**यथा फलानां पक्कानां नित्यं प्रपतनाद्भयम् ।**
**एवं नरस्य जातस्य नित्यं मरणतो भयम् ॥ १ ॥**

**बोधसूत्र**—दसरथजातक व रामायण या दोहोंमध्यें एकाच श्लोकाचे पाठभेद याच्या सापेक्ष रचनाकालाविषयी अनुमान **पाने** २७–२९

मुमुक्षु—६।५।१५

## ६ पंचगव्यप्राशनमंत्र. (पाठांतर)

(समर्थन)

**बोधसूत्र**—वरील मंत्रात प्राशनात्-चे स्थानी प्राशनम् सुचविलेलें योग्य असून, आणखी दहति–चे स्थानी 'दहतु' पाहिजे **पान** २९

केसरी—८।१३

## ७ भगवद्गीतेंतील एक पाठभेद.

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ १ ॥**
किंवा **ध्रुवाणीति मतिर्मम** ॥

**बोधसूत्र**—पूर्वपाठ प्रशस्त. नीति ही श्री–इत्यादिकांना आधार. ध्रुवाणि-चें नपुंसकलिंग व्याकरणविरुद्ध ध्रुवा-चें विशेष्य कोणतें—भूति की नीति ?

भुषाः असेंही विसर्गान्त पद सम्भवेल अर्थविवक्षा विरुद्ध रचना. **पानें** ३०–३२
केसरी १।८।३१

---

# भाग–२ व्युत्पत्ति

## १. अकरा व सत्तर. ( खंडनपर )

**बोधसूत्र—पूर्वपक्ष** ( भारतइतिहाससंशोधक मंडळ, केसरी २६-८-१३ ) एकापरदशन्—अकरा, सप्त-सत्तर **खंडन**—एकादशन्-अकरा, व सप्तदश-सत्तर **पाने** ३३–३४

केसरी १९१३

## २. आटपाट. ( खंडनपर )

**बोधसूत्र—पूर्वपक्ष** ( रा. साने, विविधज्ञानविस्तार २।१८ ) अट्टाश्च पट्टाश्च यस्मिन् तद् **खंडन**—अट्टविशिष्ट पट्टम् **पाने** ३४–३६

विविधज्ञानविस्तार ३।१४

## ३ आठवडा. ( खंड पर )

**बोधसूत्र—पूर्वपक्ष** ( रा. राजवाडे, लोकशिक्षण ) अष्टावर्त—आठवडा. **खंडन**—अष्टवार—आठवडा. **पाने** ३६–३७

केसरी ८।१३

## ४. आठवडा, बाजारहाट, हरताळ. ( खंडनपर )

**बोधसूत्र—पूर्वपक्ष** ( गं. वि. प्र. लिमये, केसरी ११।१०।३१ ) ( १ ) सप्तन्–सात–हाट–आठ. **खंडन**—महाप्राण ( मराठीत ) प्रत्यक्प्रवण ( = मागें सरणारा ) असतो म्हणून हाट–चें आठ अशक्य ( २ ) **पू.** सप्तन्–हाट ( बाजारहाट शब्दातील ). **खंडन**—हट्ट–हाट. ( ३ ) हाट–तालु–पासून हरताळ. **खंडन**—हरताळ ( एक रंगद्रव्य ) फाडण्यानें जसें अक्षर, तसा ( लक्षणेनें ) बाजारातील व्यवहार नाहीसा होतो **पानें** ३८–४०

**केसरी** १८।१०।३०

## ५ आपणा आर्यांच्या मूलस्थानाची जिज्ञासा.

( व्युत्पत्तिदृष्ट्या )

**बोधसूत्र**—उच देशाकडे जाणे = उदच् = उत्तरदिशा, सखल देशाकडे जाणें = अवाच् = दक्षिणदिशा असे मूळस्थान की, ज्याच्या उत्तरेस चढण व दक्षिणेस उतरण आहे, म्हणजेच प्रयाग व त्याचेजवळचा प्रदेश **पानें** ४०-४२

विविधज्ञान-विस्तार १२।१४

## ६ कातकरी. [ खंडनपर ]

**बोधसूत्र—पूर्वपक्ष**-काथकर-कातकरी ( ज्ञानप्रकाश ७-१४ )

**खंडन**-कृत्तिकर-कातकरी **पानें** ४२-४३

ज्ञानप्रकाश, २४।७।१८

## ७ दोन द्विमूल शब्द ( Homonyms )

**बोधसूत्र**—काचकार-वा कांस्यकार-**कासार** वाधते-वा वाद्यते-**वाजतें**

**पानें** ४४-४६

ज्ञानप्रकाश २८।८।२३

## ८ चित्पावन. [ खंडनपर ]

**बोधसूत्र—पूर्वपक्ष**-( १ ) रा. चिपळूणकर, बडोदें, केसरी

चित्तपावन ( = चित्तास शुद्ध करणारा )

( २ ) रा. राजवाडे, केसरी

चित्तपावन ( = देशवाचक किंवा ग्रामवाचक )

( ३ ) रा. साने

चित्तपावन ( = ज्ञानानें पावन करणारा )

**खंडन**—क्षितिपावन ( = भूमि निवासाई होण्याजोगी साफ करणारा ,

**पानें** ४६-५०

केरळकोकिळ ९।१४

## ९ ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति ।

## ( अथवा ) नोकरशाही--ची व्युत्पत्ति. [ खंडनपर ]

**बोधसूत्र**—नृकर-नोकर, आणि शासक-शाह **पानें** ५०-५७

केसरी, ५।१०।२९

## १० बाबा व भाकर.

**बोधसूत्र**—बाबा स्वयंसिद्ध अथवा **वप्र**–पासून, **भास्कर**–भास्करी–भाकरी. **पानें** ५१–५४

मुमुक्षु २१।७।१६

## ११ बुंदीचा लाडू कोठून आला ?

**बोधसूत्र**—लाडूची कृति. बिंदु–बुंदी–बुद ( हिंदी ), थेंब ( मराठी ) हिंदी भाषेचे प्रांतात अर्थात् दोआबात उत्पत्ति दोआबाता धान्य व गव्य यांची म्हणजेच हरबरा, साखर, तूप इ–ची समृद्धि प्रांताप्रांतातील दळणवळण **पाने** ५४–५६

ज्ञानप्रकाश ५।६।३१

## १२ ज्ञानेश्वरींतील एक शंका,-अथवा, दोष अंगीं वाजों पाहति–चा अर्थ.

( ओवी २४१, अध्याय १ )

**बोधसूत्र**—वाजते या शब्दाचें मूळ काय,वाद्यते की बाधते ? **पाने** ५६–५७

ज्ञानप्रकाश २६।४।२९

## १३ मोठेंच शतकृत्य !

**बोधसूत्र**—शतक्रतु–शतकृत्य शतक्रतु–चा यौगिक अर्थ व शतकृत्य–चा रूढ अर्थ समान. दोन्ही शब्द रूपदृष्ट्या तुल्यप्राय **पाने** ५८–५९

संदेश २५।१२।१५

## १४ सरोवर.

**बोधसूत्र**—अर्थ यौगिक व रूढ मनस्–चे मन, तसें सरस्–चें सर व्हावें सामान्यार्थत्व. शब्दात क्षेत्रविभजन अर्थाच्या विशदतेकरिता रूपांतर व अर्थांतर. **पाने** ५९–६१

प्राथमिक शिक्षण, मार्च २९

## १५ मराठींतील ही अव्यय.

**बोधसूत्र**—अपि--बी--भी -ही **पानें** ६१–६२

नवयुग १२–२९.

---

# भाग ३ शुद्धलेखन.



## १ अव्यय च कसें लिहावें,—सलग कीं विलग ?

### खंड १ [ खंडनपर ]

**बोधसूत्र— पूर्वपक्ष**( इतिहासमंडळाचा उपक्रम ) **च** मागील शब्दापासून तोडून लिहिणें तें सर्वनाम आहे **खंडन** च—चें उपजीव्य अथवा आधार. विशेषणाचा आधार नाम, व क्रियाविशेषणाचा क्रियापद, च-चे आधार दोन्ही, म्हणून तें उभयभिन्न च-चा आधार कोणतीही, शब्दजाती, म्हणून त्याची शुद्धशब्दयोगी ही स्वतन्त्र सज्ञा वाक्यातील पदाचा अन्वय पुरोगामी, तर च-चा प्रतिगामी. शब्दजातीचा निर्णायक वर्तमान उपयोग, भूत उपयोग नव्हे. 'अन्य' (सर्वनाम),तर तद्भव 'आणि' (अव्यय) च-मधील अ अनुच्चारित म्हणून च-चा उच्चार व अर्थात् लेखनही मागील स्वराबरोबर येनोच्चारण तेन सह लेखनम्. **पाने** ६३-६७.

ज्ञानप्रकाश १५।७।२३

### खंड २ [ खंडनपर ]

**बोधसूत्र—पूर्वपक्ष** ( रा रामभाऊ जोशी, ज्ञानप्रकाश ) **च** विलग लिहावा, कारण ( क ) च उभयान्वयी अव्यय म्हणजेच स्वतन्त्र शब्द आहे. **खंडन** ( १ ) च, शुद्ध **शब्दयोगी** अव्यय असल्यानें पूर्व शब्दाशी अवश्य योग पावणार लेखनात तें स्वतन्त्र शब्द नाही. ( २ ) च उभयान्वयी अव्यय नाही, कारण ते वाक्यें जोडीत नाही. **पूर्वपक्ष** ( ख ) शब्दयोगी अव्ययें केवळ विभक्त्यर्थवाचक असल्यानें स्वतन्त्र शब्द नसून प्रत्यय आहेत. **खंडन**-शब्दयोगी अव्ययें स्वतन्त्र शब्द नसल्यास अष्टविध शब्दजातींत कशी गणिली जातात ! शब्दयोगी अव्ययें ( रामभाऊचे मतें ) पदाचे प्रत्यय, अर्थात् **अवयव**, असल्यानें मागील शब्दास जोडून येणारच, तर **च** दोहोंचेमध्यें ( त्याच्या-च-पलीकडे अशा ठिकाणी ) घुसत असल्यानें **अवयवतर** ठरणार. मागील शब्दास **च** जोडल्याशिवाय पुढील शब्दयोगी अव्यय कसें जोडणार ! **पानें** ६७-७१

ज्ञानप्रकाश ५।८।२३

## २ मराठींतील संयोगकल्प अथवा दिखाऊ जोडाक्षरें.

**बोधसूत्र**—मराठीतील काही जोडाक्षराचे द्विविध उच्चार उद्या आणि उद्यान. सयोगकल्प म्हणजे दिखाऊ जोडाक्षर य-कारान्त सयोगकल्प पद्-जन्य विकारानें उत्पन्न होतात. दत्यतालव्याचा ( तालुप्रवण म्हणजेच ) यकारोत्तर सयोगकल्प शुद्धतालव्य वण होतो, आणि स-चा श होतो सयोगाचे आभास सयोगाहून भिन्न प्रकारें लिहावे तालुप्रवण २४ व प्राणप्रवण ६ मिळून ३० सयोगकल्प मराठीत आढळतात **पाने** ७१-७७

ज्ञानप्रकाश १२।१।२४

## ३ मोरोपंती व आजकालचें शुद्धलेखन.

**बोधसूत्र**—शुद्धलेखनातील उणीवा, या उणीवा व मोरोपती लेखन, मोरोपंती शुद्धलेखनाचें सामान्य स्वरूप, मोरोपती व वर्तमानकालीन शुद्धलेखनाची तुलना, या तुलनेचा प्रत्यग (=तपशीलवार ) विचार. ( दत्यतालव्य ) च, ज, झ, य आणि स याचे बाराखडीतील काही अक्षर, च, ही याचे लेखन, उद्याचें शुद्धलेखन. **पाने** ७७-९५

विविधज्ञानविस्तार १० २५

## ४ अनुस्वार लेखन. ( भरीव व पोकळ पूज्य )

**बोधसूत्र**—बिंदु ( भरीव ) कर्णग्राह्य अनुस्वाराचा दर्शक, शन्य (पोकळ) केवळ नासाजन्य आनुनासिक्याचा दर्शक, दोहोंची सामान्य सज्ञा **पाने** ९५ ९८

साहित्य १७-५-२५

## ५ अनुनासिक, अनुस्वार व विसर्ग

**बोधसूत्र**—अनुस्वारामुळें मागील स्वरास गुरुत्व येतें अनुनासिक हा स्वराचा प्रकार अनुनासिक उच्चार कोठें सभवतो ? अनुस्वार व विसर्ग दोन्ही व्यजनें आहेत **पाने** ९८-१०१

ज्ञानप्रकाश

## ६ अनुस्वारांची अडगळ ( खंडनपर )

**बोधसूत्र**—प्रास्ताविक-अनुस्वार व उपनासिक्य उपनासिक्याचे प्रकार, समूल, भेदक व स्वैर उच्चार विरुद्ध लेख त्याज्यात्याज्य. उपनासिक्य.

कोश व व्याकरण **पूर्वपक्ष** ( रा कृ पा कुळकर्णी )—( क ) उपनासिक्य राखण्यानें शब्दाचें स्वरूप शुद्ध राहते **खंडन**-शुद्ध म्हणजे तत्तत्कालीन शिष्टादृत, मग ते मूळाशी संनिहित असो वा नसो ( ख ) शास्त्रीय व लौकिक लिखाणे भिन्नभिन्न ठेवावी. **खंडन**—असे दोन प्रकार ठेविल्यानें लौकिक लिखाण स्वैर बनून आपणाबरोबर शास्त्रीयासही भ्रष्ट करील. **पानें** १०१-१०६

विद्यासेवक १०-२६

## ७ मराठी भाषेचें शुद्धलेखन.

**बोधसूत्र**—उपनासिक्याचे भेद-भेदक, स्वैर, कौशिक व वैयाकरण. काळाचें धोरण सक्षेपप्रवण सुबोधतेकरिता उपनासिक्यलेखन वैयाकरण उपनासिक्य रक्षणार्ह नस्यभेददर्शन **पाने** १०६-११०

ज्ञानप्रकाश २-४-२८

## ८ टिळकचरित्रांतील शुद्धलेखन.

### खड १ यथोच्चार लेखन.

**बोधसूत्र**—अगोदर उच्चार, नतर लेख रूढि आणि शिष्टाचें कर्तव्य रूढीचें स्थैर्य यावच्छक्य राखणें रूढि बदलण्याचा क्रम-जनप्रवृत्ति, शिष्टसमति, वैयाकरणमान्यता व जनतादर सोयसाधन की मानरक्षण ? यथोच्चार लेख की, यथालेख उच्चार ? **पाने** ११०-११५

ज्ञानप्रकाश २१-६-२८

### खड २ शब्दरूप व व्युत्पत्ति

**बोधसूत्र**—' जगी बोलण्यामार्गें चाल बापा ' शब्दरूपाने करावयाचा बोध विवक्षित अर्थाचा की मुळाचा ? **पाने** ११५-११७

ज्ञानप्रकाश ४-७-२८

### खंड ३
### लेखनानें अर्थाचें आणि लिंगादिधर्माचें बोधन.

**बोधसूत्र**—कौशिक व वैयाकरण उपनासिक्य कौशिक पचविध,-पैकी मौलिक असून भेदक असणारें रक्षणार्ह. वैयाकरण उपनासिक्य चतुर्विध-पुरुषार्थलिंगवचनापेक्ष. पैकी लिंगवचनापेक्ष रक्षणार्ह, इतर त्याज्य सदर्भाचें मूर्धन्यत्व. **पानें** ११७-१२२.

ज्ञानप्रकाश २८-७-२८.

खंड ४ (निभृत) उपनासिक्यांचा क्षेत्रपरिच्छेद.

**बोधसूत्र**—क्षेत्रपरिच्छेदाची आवश्यकता. अनुस्वारार्थ बिंदु, अनुनासिकार्थ चंद्रबिंदु, उपनासिक्यार्थ शून्य काळाचा ओघ पचमवायाची पद्धति, शून्यवायाची पद्धति. शिक्षितातील एक भ्रांति उपनासिक्याचें परिगणन.

**पानें** १२२–१२८.

ज्ञानप्रकाश १४–१०–२८.

## ९ मराठीचें शुद्धलेखन ( खंडनपर )

**बोधसूत्र—पूर्वपक्ष** ( रु. पा कुळकर्णी, लोकशिक्षण, जून १९२८ ) उच्चारितपूर्व उपनासिक्याच्या लोपाचे शास्त्रधारराहितत्व **खंडन**—लेखाचें उच्चारानुगत्व हाच शास्त्राधार **पूर्वपक्ष**—वर्णप्रक्रिया व परंपरा एतज्जन्य उपनासिक्यें रक्षणार्ह. **खडन**–( नाम्–) ला हा प्रत्यय वर्णप्रक्रियादृष्ट्या सोपनासिक्य लिहिणें प्राप्त असूनही नसा लिहीत नाहीत **पू** अनुच्चारित उपनासिक्यें कवी मोरोपत लिहितात **खंडन**–मोरोपत-लिखित उपनासिक्यें अनुच्चारित होती हे विधान अपुष्ट एतएव अग्राह्य **पू** प्राकृतात अनुच्चारित उपनासिक्यें लेखात होती **खंडन**–निराधारत्वात् त्याज्य उलट -भ्रमणो या उदाहरणातील नस्य मळमळीत उपनासिक्य नसून ठणठणीत अनुस्वारच असलें पाहिजे ( भ-चे पूर्वी उपनासिक्याचा उच्चारच सभवत नाही ) **पू**.–उपनासिक्यधारण म्हणजे पूर्वजाभिमाननिर्वहण **खंडन**–पूर्वजाभिमान बाळगणें तें उपनासिक्यापुरतेच का ? स्चय—( साचा ) यातील य गाळिता, मग उपनासिक्याचे लोपास मात्र पूर्वजाभिमान का आड यावा ? **पू**०—लेखनशुद्धि संस्कृतीचे मापक **खंडन**—मान्य, पण शुद्धलेखन म्हणजे वर्तमान शिष्टोच्चारास अनुसरणारें, भूतपूर्वास अनुसरणारे नव्हे ममेन ( ? ) = शी, तव्य ( ? )=एँ. तैः ( ? ) =ते उपसहार **पाने** १२८–१३६

लोकशिक्षण ११।२८

## १० मराठींतील अनुनासिक उच्चार (टीकात्मक)

**बोधसूत्र**—अनुनासिक उच्चाराचें कालक्रमागत धोरण, आनुनासिक्याचे लेखन, लेखनात आनुनासिक्य राखल्यानें त्यांच्या उच्चारप्रवृत्तीची आशा (?), यथोच्चार लेखन, आनुनासिक्याचे लेखनाच्या अभावी अर्थाचा अनर्थ (!),

संदर्भाचें महत्त्व, दन्त्यतालव्य व शुद्धतालव्य च, ज, झ, चिन्ह एक व उच्चार अनेक, बिंदूचें स्थानिक मूल्य, बिंदु व शून्य, उपसंहार **पानें** १३६–१४५

रत्नाकर ८–२९

## ११ उपनासिक्य अथवा अनुच्चारित आनुनासिक्य.

[ टीकात्मक ]

**बोधसूत्र**—उपनासिक्य,–समूल–रूढ रुढि विरुद्ध उच्चार इतर विकार उच्चारानुसारे लेखांत होतात, तसाच उपनासिक्यलोप व्हावा जात्यें–चें जातें कोणी केलें उच्चारानेंच की नाही ? यथोच्चार लेखनभेद उपनासिक्याचें मूळ नसल्येतरही असू शकतें काही नस्याचें परीक्षण–पाखरू, मांजर, कांत, सोंवळें, फेंस, सवय, वाचणें **पानें** १४५–१४९

ज्ञानप्रकाश ७।२।३०

## १२ मराठींतील संस्कृतागत इ–उ–कारान्त नामें.

**बोधसूत्र**—अन्त्य ( ऱ्हस्व ) इकार व उकार मराठी टाळिते यथोच्चार लेखन संस्कृतांत सुद्धा ओषधि इत्यादि शब्द विकल्पानें दीर्घान्त होतात. संस्कृतातील प्रथमैकवचन ( मराठी ) तद्भवास आधारभूत इ–वर्णान्त मराठी शब्द त्रिविध अव्ययाचा दाखला. मराठीचें सामान्य धोरण अन्त्य इ–उ–वर्ण ऱ्हस्व राखण्याबद्दल अस्थानी आग्रह उपसंहार **पानें** १४९–१५३

साहित्यपत्रिका १–२९

## १३ केसरी व मराठीचें शुद्धलेखन.

**बोधसूत्र**—शुद्धलेखनाचें महत्त्व इंग्रजी व मराठी शुद्धलेखनचर्चेचा उपक्रम सुधारसमिति समितीचे नियम, केसरीची दुराग्रहशून्यता, सुधारणेचें पाऊल मंद असावें, अध्यापनविषयक ( सरकारी= ) शासकीय धोरण–पूर्वीचें उदार व सांप्रतचें उद्दाम. लोकसंग्रह, महाराष्ट्रांतील शिक्षणपर्वें–अग्रवर्णीय, अनुवर्णीय, व उपप्रांतीय. संग्राहक धोरणाची इष्टता. व्युत्पत्ति व सोय विरुद्ध उच्चार उपसंहार. **पानें** १५४–१६४

केसरी–प्रबोध १९३१

---

# भाग ४ व्याकरण.

## १ गुण आणि वृद्धि.

**बोधसूत्र**—गुणाचे म्हणजे दोरीचे घटक दोन सुते ए या स्वराचे घटक दोन स्वर म्हणून दुसुती दोरीशी साम्य ( अ + ए = ) ऐ-चे साम्य तिसऱ्या सुतानें जाडी वाढलेल्या दोरीशी म्हणून ए--ऐ इ स्वराच्या गुण वृद्धि या संज्ञा **पान** १६५

महाराष्ट्रसाहित्य-पत्रिका आषाढ १८५२

## २ य-व-र-ल यांचा क्रम.

**बोधसूत्र**—व्यंजनाच्या क्रमानुसार यरलव पाहिजे स्वराच्या क्रमानुसार यवरल पाहिजे प्रत्याहारसूत्राच्या रचनाक्रमाचा हेतु—उपयुक्ततेची दृष्टि **पानें** १६५-१६७

महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, आषाढ १८५२

## ३ अनुस्वार, विसर्ग व अनुनासिक यांचा क्रम.

**बोधसूत्र**—अनुस्वार व विसर्ग दोन्ही व्यंजनें यांची स्थानें व्यंजनांत शेवटीं ( अननुनासिक = ) साध्या स्वरानंतर अनुनासिक स्वर म्हणून वरील क्रमाची प्राप्ती **पाने** १६७-१६८

महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका आषाढ १८५२

## ४ पाहिजे—चें व्याकरण

**बोधसूत्र**—पाह—धातूपासून व्युत्पत्ति गुजराथीची पुष्टि मला (पाहिजे) ही अधिकरणार्थी चतुर्थी विशेषण धातुसाधितत्वाचे नामत्व **पाने** १६९—१७१

महाराष्ट्रसाहित्यपत्रिका आषाढ १८५२.

## ५ श्रवण—चा पदसंमर्श ( Parsing ).

**बोधसूत्र**—( कथा श्रवण केली—अशा वाक्यातील. )—

कर्म द्विविध,—रूपतः व अर्थतः—संस्कृताचा दाखला. कथा ( सान्तर ) **कर्म, श्रवण भूतपूर्व कर्म.** **पानें** १७१—१७४

मराठी शिक्षक

## ६ हें या सर्वनामाचा प्रयोग. [ खंडनपर ]

**बोधसूत्र— पूर्वपक्ष**—( रा. रामभाऊ जोशी-कृत व्याकरण ) क्षमा **हें** शूरास भूषण आहे. अशा ठिकाणी ही पाहिजे **खंडन**-संस्कृताचा आधार व मराठीतील द्विविध प्रयोग अन्यतर प्रयोग विवक्षाधीन नामापुढें येणारें हें दर्शक नसून अनुवादक सर्वनाम असतें. **पानें** १७४-१७५

ज्ञानप्रकाश

## ७ अनादि=अन्+आदि, कीं अ+नादि ? [ खंडनपर ]

**बोधसूत्र—पूर्वपक्ष** ( रा पावशे, ज्ञानप्रकाश ) अनादि = अ + नादि. **खंडन**—अन् + आदि व्यवहारदृष्टि, निसर्ग व शास्त्र अन्य भाषाचा दाखला, पाणिनि लाघवपरवश, म्हणून निसर्गनिरपेक्ष **पानें** १७६-१७८

ज्ञानप्रकाश ८-११--२९

## ८ संस्कृत भाषा व संधीची उपयुक्तता. [ खंडनपर ]

**बोधसूत्र-पूर्वपक्ष**-( रा. ल द जोशी, ज्ञानप्रकाश २५-९-३१ ) सध्याचे संस्कृत वाङ्मयातील सर्वी अनैसर्गिक व कृत्रिम, उच्चारसौकर्यास बाधक, व वर्णाचा पाल्हाळ करणारे **खंडन**—सुगण्णु या ठिकाणची टकाराची भर,-running, gender, तुबळ इत्यादि ठिकाणच्या अन्य भाषातील वर्णाच्या भरतीनी तुल्यत्वानें समर्थित होते, अत एव ही भरती नैसर्गिक व्याकरणविहित उच्चार कठीण वाटणे हे परिस्थितिभेदमूलक कृष्ण हा उच्चार काही लोकास साधत नाही. sub+port=support-येथील वर्णविकार संधिनियम पाहून बनविला नसूनही संधिनियमाशी मिळता आहे यावरून सर्वी नैसर्गिक ठरतात अनादि यातील न्-प्रमाणें anarchy, an ear यातही नकार-प्रवेश संधि नूतनाभ्यासकासाठीच न करणें क्षम्य. **पानें** १७८-१८६

ज्ञानप्रकाश ९।१०।३१

## 9 What is the case in grammar, the form or the sense ?

PAGES 186-189

Progress of Education May 29

## १० द्वितीयावाद.

**बोधसूत्र**—वादाचें स्वरूप संस्कृतांतील विभक्तींची वाटणी, अर्थविचार. व्यवस्था-सूत्र. मराठीतील विभक्तिरूपाचें परिगणन. प्रत्ययविशेष-ऊन-हून-आत-शी प्रथमा व द्वितीया ( रूपदृष्ट्या ) पंचविध सामान्यरूप पद व सामान्यरूप चतुर्थी सामान्य विभक्ति निगमन-उक्ति व कृति व्युत्पत्ति लोपलीच तर कोणती विभक्ति-द्वितीया की चतुर्थी ? विभक्तीचा आश्रय कोण-अर्थ की रूप ? प्रथम कोण-विभक्ति की वचन ? वादाचे सार **पानें** १८९-२१०

मराठी शिक्षक, ५।६।२६

## ११ आपल्या स्त्रियांची चढाई.

**बोधसूत्र**—सं० राजा राज्ञी चोभौ ( पुलिंग ) = म० राजा व राणी ही दोघें ( न० लिं० )-म्हणजेच पुरुषाच्या वर्चस्वाविषयी स्त्रियाची मराठीकालीन असहिष्णुता. **पानें** २१०-२११

महाराष्ट्र साहित्य-पत्रिका, चैत्र १८५२

## १२ मराठींतील संयुक्त क्रियापदें.

**बोधसूत्र**—वादाचें स्वरूप, वादांतील पक्ष, यौगिक व रूढ अर्थ व रचना. काही शब्दयोगाचें परीक्षण, सहाय धातूचें प्रयोजन, सहाय धातूचे प्रकार अपूर्णादि काळ का मानावें ? अस, हो, कर, इ० धातू संयुक्तक्रियापद या संज्ञेचा अर्थ. संयुक्तक्रियापदाची कसोटी, संस्कृतांत संयुक्त क्रियापदाचें अन्वेषण, निगमन. सारांश. **पानें** २११-२२३

विद्यासेवक ६।२६

## 13 Parenthesis in Sanskrit

Page 223-224

F. C Quarterly 9-14

## १४ प्रो. बनहट्टी यांचा व्याकरणविषयक लेख. (खंडन)

### खंड १.

**बोधसूत्र**—विभक्ति म्हणजे रूप, संस्कृतांतील विभक्तिव्यवस्था, अव्यय, सव्यय विरुद्ध विकारी. प्रयोग विरुद्ध वाच्य **पानें** २२४-२३०

**खंड २**

पद्समर्श ( =Parsing ) विरुद्ध वाक्यविमर्श ( =Analysis )

वाच्य-चे संस्कृतातील व हिंदीतील निरनिराळे अर्थ. जातिनाम विरुद्ध सामान्यनाम. पद्समर्शांची तीन अंगें विभक्ति विरुद्ध कारक. **पानें** २३०-२३३

**खंड ३.**

प्रयोग-विचार. प्रयोगदृष्ट्या भाषात्रयतुलना

कर्मणि विरुद्ध कर्मकर्तरि निमित्तार्थी तृतीया, शक्त्यर्थी चतुर्थी शब्दजाति आवड हा धातू कमा-सकर्मक की अकर्मक ? कर्त्याची कसोटी

**पानें** २३४-२३९.

ज्ञानप्रकाश १६।१९।२९-४।३०

## १५ व्याकरणसमितीची योजना. ( खंडनपर )

**बोधसूत्र-पूर्वपक्ष**—( प्राथमिक शिक्षण, मार्च, १९२९ ) मुलगा अबा खातो,-यातील अबा ही द्वितीया, ( मला ) जावयाचें आहे-हें संयुक्त क्रियापद, नामाचे वर्गीकरण, काळाचे अपूर्ण-पूर्णादि पोटभेद, मध्यमपदलोपी तत्पुरुषाशी तुल्यकक्ष, प्रयोग अर्थावरून ठरविणे, रूढि विरुद्ध शास्त्र, क्रियापद इत्यादि संज्ञा. **खंडन**— भजे शंभोश्चरणयोः येथे चरणयोः अर्थतः कर्म असून रूपतः षष्ठीच मानितात. As a poet he is sublimer than me येथे me ही रूपावरून द्वितीयाच मानितात जावयाचें हे मूळचें विशेषण असून, विशेष्याभावीच नाम बनते क्रियापदाचे धर्माचा बोध करणें हेंच सहाय धातूचें कार्य, धात्वर्थात भर टाकणें नव्हे संस्कृताचा व इंग्रजीचा दाखला 'गेला होता' याशी 'जाणार होता' हें तुल्यकक्ष असल्यानें तादृश संज्ञेस पात्र आहे कातरविडा तत्पुरुष कीं मध्यमपदलोपी ? प्रयोगाचे व्याख्येंत अर्थास अनवकाश शिष्ट-प्रयोग विरुद्ध ( सापवाद ) शास्त्र, सहाय विरुद्ध साहाय्य इ **पानें** २३९-२४८

महाराष्ट्रसाहित्यपत्रिका ३-५१

---

# भाग ५. पर्यायसमीक्षण

## १ आजन्म कीं आजीव ?

**बोधसूत्र**—विवक्षित अर्थ जन्म विरुद्ध जीव प्राथमिक व लाक्षणिक अर्थ. आजीव प्रशस्त **पानें** २४९

महाराष्ट्रसाहित्यपत्रिका, चैत्र, ५२

## २ एकमत व ऐकमत्य.

**बोधसूत्र**—एकमत-चे दोन अर्थ एकमत की एक मत? एकमत व ऐकमत्य यांचा क्षेत्रविभाग. (अधिक) एक मत अशा अर्थी 'एक मत'-चा प्रयोग. **पानें** २४९–२५१

ज्ञानप्रकाश २४।७।३१

## ३ Cultured (Pearl)–चा मराठी पर्याय.

**बोधसूत्र**—सज्ञायुग्में, सज्ञाश्रित धर्म, निवडीचें धोरण, निवड सागरी विरुद्ध आगरी. **पाने** २५१–२५४

केसरी २६।८।३०

## ४ उत्तरदाई, जबाबदार व धूर्वह. (पर्यायतुलना)

### खंड १

**बोधसूत्र**—एकच स्थूल कल्पना भिन्नभिन्न अगानी निरनिराळ्या भाषात व्यक्त होते. राज्याभिषेक Coronation, Holiday सुट्टी इ० प्रस्तुत कल्पनेंतील अंगें विशिष्ट अंगाची निवड परपरेनुसार पर्याय-निर्माण, नुसत्या भाषातरानें नव्हे तर, यथापेक्ष अगातरानेंही करणें. Sympathy–चे पर्याय महानुभूति-अनुकंपा-अनुक्रोश पर्याय-कल्पनेचें धोरण **पाने** २५४–२५७

ज्ञानप्रकाश–१७।७।३१

### खंड २

**बोधसूत्र**—या कामाबद्दल बाबा तुला **विचारतील**, म्हणून तू **प्रष्टव्य**. या कामाचा आधार तू म्हणून तू **धूर्वह.** **पाने** २५७–२५८

ज्ञानप्रकाश ३१।७।३१

## ५ परांजपे कीं परांजप्ये? (तारतम्य)

### (पोषक)

**बोधसूत्र**—पराजपे ग्राह्य. पराजप्ये कर्णकटु म्हणून त्याज्य.

**पाने** २५८–२६२

ज्ञानप्रकाश १३।२।१४

### ६ शालीय कीं शालेय ? ( खंडनपर )

**बोधसूत्र—पूर्वपक्ष** ( रा. पावशे, ज्ञानप्रकाश ) शालीय शुद्ध, शालेय चूक. **खंडन**-मिरा-मैरेय, तसें शाला-शालेय ( अर्थ 'शाला-संबधी' ) मिरा-शब्द नद्यादि गणांत पठित नसूनही तद्गणकार्य पावतो, म्हणून नद्यादिचें आकृतिगणत्व. अर्थात् शाला-चा त्या गणात अंतर्भाव. भाषेचें वळण शालेय याच रूपास अनुकूल. **पानें** २६२-२६५

ज्ञानप्रकाश ७।१०।३०

---

## भाग ६ मराठी भाषा.

### १ मराठी भाषेचें शुद्धीकरण [ टीकात्मक ]

**बोधसूत्र**— भाषा म्हणजे संकेत, त्रिविधसंप्रदायानुसरण, वर्णलेखनाची शुद्धि. यथोच्चार लेखनभेद, लेखनातील उणीवा, परदेशी वस्तू व त्याच्या संज्ञा, पर्यायाचें बाहुल्य क्षेत्रविभागास पोषक, भाषा मृत व जीवन्त, पर्यायव्यवस्था, व्युत्पत्ति अनिश्चित, अम्ब-आम्र, श्वेत-सफेद, शब्दनिर्मिति Dairy दुधाळें, Waggon वाघीण, Governor सत्रप. नियतकालिकाचें कर्तव्य, पूर्वजाचा दाखला, संस्कृतीकरण, Diametron जामित्र (जायामित्र), Hora अहोरात्र, शुद्धिभ्रम, धिक्कार, वैयाकरण इ सत्य व वहिवाट, जपणें व काळजी घेणें, प्रमाणात व प्रमाणावर, पदक्रम निर्बाध, शुद्धीकरणाचें उपायचतुष्टय **पानें** २६६-२८१

केसरी-मे २६, जून २६।१९२५

### २ मराठींतील शुद्धिभ्रम.

**बोधसूत्र**—पठितमन्य ( = चुकीनें बुध्द्या शुद्ध म्हणून बनविलेली ) रूपें, अंधकार वि० अधःकार, चरित-चरित्र, दुष्ट-द्रुष्ट, मशहूर महशूर, लाजहोम-लज्जाहोम, रेफ-रफार, वैयाकरण-वैय्याकरण, पुलिंग-पुल्लिंग, लागलेंच-लागलीच, कमिटीत नेमणे-कमिटीवर नेमणें, लोण्याहून जास्त ( ! ) मऊ, हस्तामलक-हातचा मळ, धातु व क्रियापद इ० **पानें** २८२-२८८

महाराष्ट्रसाहित्यपत्रिका, आश्विन ५१

## ३ मराठी व कानडी ( खंडनपर ).

**बोधसूत्र—पूर्वपक्ष** ( रा वि. रा शिंदे, ज्ञानप्रकाश ) ( क ) भूतविशेषणाचा मराठी प्रत्यय **ल** हा कानडी **द**—वरून आला असावा ( ख ) मराठी क्रियापदाचें लिंग कानडीवरून आलें असावे ( ग ) सत्तर-चें स्थानी अशिक्षित लोकाचें म्हणणें 'तीन विसा अन् दहा' हें कानडीचें अज्ञात अनुकरण असावे

**खंडन** ( क ) जसा बंगालीत तसा मराठीतही संस्कृत त–प्रत्ययाचा ल झाला असावा ( ख ) जी मराठी क्रियापदें संस्कृत ( participle = ) उपाख्यातावरून बनली आहेत तीं अर्थातच सलिंग असणार, म्हणून त्याच्याशी संवाद राखण्याकरिता इतरही क्रियापदें लिंगान्वित मानिली आहेत ( ग ) कानडी कुणब्याप्रमाणें मराठ्यासहि दहाच बोटें ( जी उलटमुलट मोजल्यानें वीस संख्या भरते ) असल्यानें विसाचे माप दोघासही स्वाभाविक आहे. **प्रासंगिक विचार** एखाद्या स्थानाच्या बाजूस असलेल्या देशाच्या ठेवणीवरून तेथील दिशेची संज्ञा कधी–कधी प्रवृत्त होते

**पानें** २८८–२९०

ज्ञानप्रकाश १६।१२।२३

---

# भाग ७ विविध

## १ कानाडोळा करणें

**बोधसूत्र**—कांण म्हणजे आंधळा. मनुष्याचा **आंधळा डोळा** जिकडे वळलेला असतो तिकडलें तो कांहीच पाहू शकत नाही, अर्थात् तिकडे त्याचें **दुर्लक्ष्य होतें** तेव्हा कानाडोळा करणें =( न पाहणें = ) दुर्लक्ष्य करणें

**पानें** २९१–२९२

महाराष्ट्रसाहित्यपत्रिका, चैत्र ५२

## २ तक्रं शक्रस्य दुर्लभम् ( चुकीचा अर्थ )

**बोधसूत्र**—गरीब दुर्दैवी ब्राम्हणाचा परान्नभोजनातील अनुभव.

**पानें** २९२–२९४.

ज्ञानप्रकाश

## ३ रामरक्षेविषयीं अधिक विज्ञान ( =माहिती )

**बोधसूत्र** — स्तोत्रमंत्रातील देवतेची विशेषणें साभिप्राय योजिलेली असतात.

**पाने** २९४–२९५

मुमुक्षु १९.२.१४

## ४ New Poona College–चें नामांतर, अथवा श्री-परशुराम-भाऊ-कॉलेज

**बोधसूत्र**—Sir =(स् or श् + इ × र = श् + र + इ or ई ) श्री, ( उभयथा–रूपतः व अर्थतः )

सर परशुरामभाऊ कॉलेज = श्री-परशुराम-भाऊ कॉलेज **पाने** २९५।२९७

ज्ञानप्रकाश ९।६।२८.

## ५ समाजाचे बाळपणचे अनुभव. ( पर्याय–परीक्षण )

**बोधसूत्र**—ऋषिऋण, नीर–जल–सलिल-सर्वतोमुख–उदक–भुवन–पानीय जीवन–अमृत,–हे पाण्याचे पर्याय **पाने** २९७–३००

F C Quarterly, 9–14

## ६ स्कन्द ब्रम्हचारी कीं गृहस्थ ? म्हणजेच

स्कन्दपत्नी देवसेना वास्तविक की लाक्षणिक ?

**बोधसूत्र-शंका**-( ग नी शं. नवरे, ९।१०।३१ ) देवसेना ही स्कन्द ब्रम्हचारी असून त्याची पत्नी कशी ?

**समाधान**-मूर्तास अमूर्तांची उपमा. कवीचे दर्शननैपुण्य तीन पिते. वज्रप्रहारापासून पुत्रोत्पत्ति. मानीव पिता वरापेक्षा वधू वयानें अधिक साक्षात्पदाचे कार्य. निगमन. **पाने** ३०१–३०३

ज्ञानप्रकाश ३०।१०।३१

## ७ हरिहरांचें ऐक्य

**बोधसूत्र**—हरि भिक्षुक झाल्यास हरभट, गृहस्थ बनल्यास हरिपत महादेव व माधव दोन्ही नावाचे विकार अविशेषतः महादेवभट व माधवराव असे वृत्तीस अनुसरून होतात. **पानें** ३०३–३०४

महाराष्ट्रसाहित्यपत्रिका, आषाढ १८५२.

---

# वाग्विहार.

## भाग १.

## काव्यार्थचर्चा.

### १. एका आर्येचा अर्थ.

**राधाबुधानुराधा साधा हा योग माधवाराधा, ।**
**भक्तिसुधारस रांधा, द्या, सख्यांनो कधीं नव्हे बाधा ॥**

या पद्याच्या अर्थाविषयी आपल्या पत्रात पृच्छा करण्यात आली आहे. तिचें उत्तर यथामति येथे देतों.

**१ शब्दांचे अर्थ**—राधा=वैशाखी पौर्णिमा आराध=आराधना.

**२ सामान्य अर्थ**—बुधवार व अनुराधा नक्षत्र यानी युक्त अशी वैशाखी पौर्णिमा साधून त्या दिवशी विष्णूचें पूजन करा या वेळी एकमेकींच्या सहकार्यानें भजनात यथेच्छ रगून जा. यातील भक्तीचा अतिरेक तुम्हास हितकरच होईल.

**३ विशेष विचार**—बुधवारी अनुराधा नक्षत्र आल्यानें अमृतसिद्धि योग घडतो. आ–राध् या धातूवरून आराधन, आराधना असले शब्द व्हावे. प्रस्तुतासारखा अ–प्रत्ययान्त शब्द परिचित दिसत नाही तरी 'स्थितस्य गतिश्चिन्तनीया' या न्यायानें बाध् धातूच्या बाध या शब्दाच्या साम्यान आराध हा शब्द शुद्ध मानावा. एवढ्यानें पूर्वार्धाचा अर्थ कोणासही आकलन होईल. 'कधी बाधा होणार नाही' या नकारार्थी विधानावरून, या प्रसंगी बाधेची प्राप्ति संभवते. कारण (निषेधः प्राप्तिपूर्वकः) एखाद्या गोष्टीचा संभव

असल्याशिवाय तिच्या निषेधाचें प्रयोजन काय ? तेव्हां येथें बाधा संभवते, ती कशानें ? अतिमात्र खाण्यानें खावयाचें काय ? विष्णूस समर्पण करून त्याचा प्रसाद म्हणून स्वीकारलेलें भोज्य येथें भोज्य कोणते ? सुधारस. प्रस्तुत प्रसगी ईश्वरास काय अर्पावयाचें आहे ? भक्ति यावरून असें ठरतें की भक्ति (म्हणजे आदरातिशय) देवास समर्पण करून, सुधारस हें पक्वान्न सर्वांनी सेवावयाचें जें अर्पावयाचे तेच प्रसाद म्हणून सेवण्यात येणार. करितां येथें भक्ति आणि सुधारस ही एकच ठरतात भक्ति ईश्वराचे ठिकाणी आपण करितों व भजनाचा आनद आस्वादितों अर्पित आणि सेवित दोन्ही वस्तू एकच असणार करिता येथें भजनानद असा अर्थ भक्तीचा केला पाहिजे. तदर्थ कार्यकारणाचें ऐक्य मानिलें पाहिजे यावरून उत्तरार्धाचा अर्थ पुढीलप्रमाणें बसतो.

ईश्वराविषयी दृढभक्ति मनात आणा व भक्ति हेंच कोणी गोड पक्वान्न नैवेद्य म्हणून ईश्वरास अर्पा व भजनाचा आनद हाच कोणी प्रसाद त्याचा आस्वाद घ्या. या भजनरसाचा आस्वाद तुम्ही कितीही घेतला तरी त्यापासून तुमचें अकल्याण मुळीच होणार नाही

४ **अन्वय**—सखयानो, माधवाराधा राधाबुधानुराधा हा योग साधा भक्ति-सुधारस राधा. (प्रसाद म्हणून तो) घ्या. कधी बाधा नव्हे.

[ प्रस्तुत पद्याचे अर्थ इतरही लोकाकडून आले आहेत परंतु त्यात रा. मोडक याचा अर्थ विशेष समर्पक आढळल्याने तोच येथें दिला आहे. ]

**के. संपादक.**

---

## २ मोरोपंती वाग्विशेष. *

१ **मथळ्याचा अर्थ**—बहुधा प्रत्येक लेखकाच्या लेखात अर्थ व्यक्त करण्याच्या रीतीत काही विशेष म्हणजे अनन्यसामान्य असा प्रकार असतो. अशा विशेषाचा बोध, इंग्रजींत त्या त्या लेखकाचे नांवापुढें—ism हा प्रत्यय लावून करितात, जसें Johnsonism, Baconism. या प्रत्ययाच्या अर्थी मीं येथें वाग्विशेष हा शब्द योजिला आहे. तेव्हां प्रस्तुत लेखांत मोरोपंती

* मोरोपंतांचे पुण्यतिथीनिमित्त वार्षिक समारंभात वाचलेला निबंध.

भाषेची अशी वळणें सांगण्यात येतील की, जी इतर कवीत किंवा प्रस्तुत भाषेंत प्राय. आढळत नाहीत.

**२ कंसवाक्य**- हा शब्द इंग्रजीतील Parenthesis या अर्थी वापरिला आहे. यानें अशा वाक्याचा बोध होतो की, व्याकरणान्वयाने (म्हणजे syntaxचे द्वारा) जें पुढें-मागें जोडिलेले नसतें, वाक्यार्थाविषयी वक्त्याचें मनोगत किंवा अवांतर काही माहिती त्याच वाक्यामध्यें सांगणें व तद्द्वारा एक वाक्य वांचविणे, हा कंसवाक्ययोजनेंत हेतु असतो. Then Emily, *for that was the name of the girl*, ran her fingers over the leaves. येथें वक्राक्षर वाक्य कंसवाक्य आहे तें पुढील व मागील भागापासून सुटें आहे. अशी वाक्यें संस्कृतातही मधून मधून आढळतात. सर्वांस परिचित असें उदाहरण म्हणजे—

**अकरिष्यदसौ पापम्-'अतिनिष्करुणैव सा।'**
**नाभविष्यमहं तत्र यदि तत्परिपन्थिनी ॥१॥**

—मालतीमाधव

या श्लोकातील 'अतिनिष्करुणैव सा' हें कंसवाक्य आहे, संस्कृत पंडित तें तसें मानोत वा न मानोत, पण तें तसे स्वीकारल्याशिवाय अर्थ समर्पक लागत नाही, असें मला वाटतें

**समेष्यसि च दारैस्त्वम्-'मा स्म शोके मनः कृथाः।'**
**राज्येन तनयाभ्यां च सत्यमेतद्ब्रवीमि ते ॥**

—महाभारत

या पद्यातील 'मा स्म शोके मनः कृथाः' हें कंसवाक्य मानिल्याशिवाय याचा येथें प्रवेश समर्थित होत नाही. आणखीही उदाहरणें चांगल्या अभिजात अशा कविकृतीतून देता येतील, पण दिलेल्या उदाहरणांवरून संस्कृतात कंस-वाक्याचें अस्तित्व वाचकास पटेल असें वाटल्यानें येथेंच हात आखडतों.

**तों 'दक्षिणायनीं वपु न त्यागावें बुधें '-असें कवण।**
**सांगेल या बुधवराप्रति-ऐसें होय दिव्य-वाक्श्रवण ॥**

प्रस्तुत आर्या पुढील प्रसंगीची आहे-अर्जुनाचे बाणानीं विद्ध होऊन, भीष्म पृथ्वीवर पतन पावला असतांना, त्यानें तत्काळ प्राण सोडूं नयेत, ते उत्तरायणा-

पर्यंत राखून ठेवावे, ही गोष्ट त्याचे हितार्थ इष्ट होती. हें कवि सांगत आहे. प्रस्तुत आर्येत, "इतक्यात, 'दक्षिणायनी वपु न त्यागावें' ऐसें दिव्यवाक्श्रवण होय,"–या गोष्टीबद्दल–म्हणजे मनुष्यानें न सागता, ही गोष्ट देववाणीसच का सांगावी लागली ? याचे उत्तरादाखल–कवीचा अभिप्राय याच वाक्याचे पोटांत कवीनें प्रविष्ट केला आहे. सामान्य पडितानें पडितप्रवर असलेल्या भीष्मास ही गोष्ट सागण्यानें त्याचा अपमान करण्यासारखे होईल, तेव्हां कोण पडित पुढें होणार ? तेव्हा, ही आपत्ति पाहून देववाणीच ही गोष्ट करिती झाली. हा सर्व अभिप्राय कवीने 'असें या बुधवराप्रति कवण सागेल ?' अशा कंस-वाक्यानें व्यक्त केला आहे. "दक्षिणायनी वपु न त्यागावे"—ऐसें दिव्य-वाक्श्रवण होय,–हा सरळ अर्थप्रवाह होय याचे पोटात बाह्य शब्द कसवाक्य-रूपानें घुसले आहेत. असे हें वाक्य कंसवाक्य म्हणून न स्वीकारल्यास, प्रस्तुत ठिकाणीं अर्थच लागत नाही

**३. शाब्द व आर्थ कथन**—(Direct व Indirect construction)-संस्कृतातल्याप्रमाणें मराठीतही आर्थकथन प्रायः आढळत नाही. तरी पण मराठींत असा एक प्रकार वारंवार आढळतो की, त्यात या दोन्ही प्रकाराचें मिश्रण आढळतें मुला, '**मला** उद्या भेटा' असे आपल्या वडिलास साग येथें कोणी गुंडोपत मित्राचे मुलाजवळ निरोप सागत आहेत, अशाकरिता की, त्या मुलाचे बापानें गुडोपतास भेटावें येथें निरोप सागणाऱ्या मुलास गुडोपंत माहीत असल्यानें, प्रत्यक्ष निरोप सागताना मी-चे स्थानी गुडोपत हा शब्द मुलगा घालील, अशी गुंडोपतास खात्री आहे कोणास भेटावयाचें–हे सागताना, प्रत्यक्ष गुडोपत हा शब्द गुडोपताचे तोंडून निघणें हें लाघव व शालीनता यास विरुद्ध असल्यानें मी या सर्वनामानेंच गुंडोपत कार्य भागवीत आहे

अशा रीतीनें येथें शाब्दकथनात पुरुष–सर्वनामाच्या जागी नामाचें कथन अभिप्रेत असता, आर्थकथनातल्याप्रमाणें येथें पुरुषवाचक सर्वनाम प्रयुक्त आहे, ज्यामुळें प्रस्तुतासारखें कथन हें केवळ शाब्द किंवा आर्थ यांपैकी कोण-त्याही सदरांत पूर्णांशानें पडत नाही, तरी पण तें बाहुल्यानें शाब्द ठरतें, मात्र त्यात थोडेंसें शब्दांतर जरूर असतें.

अशा प्रकारचे नामाचे स्थानी पुरुषसर्वनामाचा प्रयोग करणारें शाब्दकथन मोरोपंतात मधूनमधून आढळतें. नमुना म्हणून पुढील आर्या पहावी—

**हा सूतात्मज आधीं वदला कीं 'मी करीन अर्यन्त'।**
**आतां म्हणतो 'संगर न करीन मदन्त-कालपर्यंत'॥**

ही आर्या भीष्मोक्त आहे येथें कर्णाचे भाषणातील करीन-चा कर्ता **मी** म्ह. नेहमीचे प्रथमपुरुषाचे उपयोगाप्रमाणें कर्ण आहे, तर मदन्त-मधील **मद्**-यानें भीष्म विवक्षित आहे बोलणार कर्ण, पण त्याचे तोंडचा (मद् =) मी हा शब्द दुसऱ्याचा—भीष्माचा—बोधक, असा येथे विपरीत प्रकार आढळतो. पण तो शिष्टादृत असल्यानें अर्थात् ग्राह्यच आहे, फक्त तत्समर्थनार्थ व्याकरणातील पुरुष सर्वनामाचा उपयोग वेळी कसा विकृत करावा लागतो, याची व्याकरणात नोंद केली पाहिजे

८ **क्रियाविशेषणाचें साधर्म्य**—जे क्रियाविशेषण लिंगविकार्य असेल—अर्थात् आकारान्त असेल—ते कोणाप्रमाणे चालणार ? याचे उत्तर-तें क्रियावाचक शब्द म्हणजे क्रियापद, त्याप्रमाणें चालणार, जसें—

(१) मुलानी '**चांगलें** वागावें' अशी वडिलाची इच्छा असते (भावे)

(२) गरुडानें '**जसा**' अमृतघट '**उचलिला**,' तशीच फार्दीही 'उचलिली' (कर्मणी)

(३) '**जसा वर्ततो** लोककल्याण**कारी**'। (अकर्मक कर्तरी)

(४) शेष **जसा** पृथ्वी '**धरितो**,' 'तशी' पृथ्वी प्राणी 'धरिते'. (सकर्मक कर्तरी).

या वाक्यात भावे प्रयोगात क्रियापद नित्य न लिं असल्याने, क्रियाविशेषण तसेंच आहे कर्मणि प्रयोगात क्रियापदाचे द्वारें ते कर्माशी सधर्म आहे; तर कर्तरि प्रयोगात तें कर्त्याशी सधर्म आहे पण कर्तरि प्रयोगात कर्मगत विशेष प्राधान्येंकरून सांगणें असेल तर क्रियाविशेषण कर्मगामी आढळतें. हें पुढील अंत्य उदाहरणावरून दिसून येईल एव वर्तमान मराठीत सकर्मक कर्तरी प्रयोगांत क्रियाविशेषण कधी कर्त्याशी तर कधी कर्माशी सधर्म असतें

(१) तो जसा (क्रियावि०) कुस्ती करतो, तसाच मलखांबही करतो
(२) तो चांगली (विशेषण) कुस्ती करितो
(३) तो कुस्ती चांगली (क्रियावि०) करितो.

येथील अंतोक्त प्रकार सोडून दिल्यास, क्रियेचें विशेषण क्रियाशब्दाशी साधर्म्य बाळगतें. हें प्रस्तुत भाषासरणीस मान्य आहे. परतु मोरोपतांत कधी कधी एतद्विरुद्ध प्रकार आढळतो.

**( १ ) कर्णावरि कर ठेवुनि ' शिव शिव हर हर ' असें म्हणे नर तो।**
**' माते, हा पुत्र रतो भजनीं, परि म्हणसि तूं ' तसें ' न रतो। '॥**

**( २ ) तूं जविं देवकीला भेटासि, ' तैसेंचि ' भेट आतेला।**
**आम्हांहुनि तूंचि अधिक, घृत टाकुनि कोण करिल आ तेला !॥**

या दोन्ही ठिकाणी कर्तरि प्रयोग असून, कर्ता पुलिग आहे, अर्थात् वर दिसून आलेल्या नियमाप्रमाणे, तसा किंवा तैसा असें पुलिगरूप उभयत्र पाहिजे, पण तें मोरोपतानी तसें वापरिलें नाही, हें विचारणीय आहे. पहिल्या उदाहरणातील ' तसे ' या रूपातील एकार कदाचित् यमकाधीनतेमुळें प्राप्त झाला असेल, पण दुसऱ्या उदाहरणात हेंही कारण विद्यमान नाही साराश— क्रियाविशेषण क्रियापदरूपनिरपेक्ष नपुसकलिगात मोरोपतानी योजिलें असल्यास अर्थ करिताना, जरूर तर, त्याचें लिगातर कल्पावें.

**५ विशेष्यविशेषण-विपर्यय**— विशेषण लिगविकार्य असल्यास, व पद्यात क्वचित् तसें नसल्यासही, त्यानें सामान्यरूप धारण करावें, व विभक्तिग्रहण विशेष्यानें करावें, या नियमाचा विपर्यय मोरोपतात कधी कधी आढळतो

**कीं दुर्दोनें दूषूं पाहे ' श्रीनायका पवित्राशीं '**

येथे शूर्पणखा पवित्र अशा लक्ष्मीरमण रामचद्रास भ्रष्ट करू पहात होती ही गोष्ट वर्ण्य आहे यात पवित्र हें विशेषण व श्रीनायक हें विशेष्य आहे, पण पद्यरचनासौकर्यार्थ मोरोपतानी हें त्या शब्दाचें नातें रूपविकारदृष्ट्या विपर्यस्त केलें आहे.

**६. ती-प्रत्ययान्त स्त्रीलिंगी एकवचनी क्रियापद.**

**मग गुणवंताचीही सदधिक्षेपीं प्रवर्तती बुद्धी।**

इत्यादि ठिकाणी आपण जेथें 'प्रवर्तते' असें म्हणू, तेथे मोरोपत प्रवर्तती असें म्हणतात. गुणवताची बुद्धि हा कर्ता असल्यानें तदनुगामी प्रवर्तती हें रूप एकवचनी आहे हें उघड आहे तो करी, ते करिती इत्यादि ठिकाणी आढळणारें जुन्या मराठीतील करिती हें रूपही प्रसिद्धच आहे, हें कवितेंत वारवार आढळतें, मात्र

हें तिन्ही लिंगांस सामान्य असून अनेकवचनी असतें. यामुळें असें होतें की, 'नदी वाहती' (मोरोपंती), व 'नद्या वाहती (पुराणकालीन)-अशा ठिकाणी स्त्रीलिंगाचे दोन्ही वचनात वाहती हेंच रूप आढळतें, त्यामुळें, वाचक वारवार घोटाळ्यात पडतात. करिता त्यानी हे लक्ष्यात वागवावें की, वाहती हें रूप कधी कधी वाहते याचे तोडीचें असतें. नदी वाहते असा आधुनिक सर्वमान्य प्रयोगही मोरोपतात आहेच.

**७ तां-प्रत्ययान्त धातुसाधित अव्यय**—'येता जाता हारेनाम घ्यावें' इत्यादि वाक्यात ता-अव्यय वर्तमान किंवा सहचारी काळ सुचवितें. "दशरथानें रामास राज्य दिलें तर, तूं सवतीची बटीक होशिल" यातील क्रिया-विशेषण वाक्याचें रूपातर, आधुनिक मराठीत "दशरथानें रामास राज्य दिलें असता (किंवा दिल्यास)" अशा वाक्याशानें करिता येईल येथें दा धातूचें पूर्णवर्तमानकालीन धातुसाधित आहे. परतु मोरोपत अशा ठिकाणी वारवार शुद्ध-वर्तमानसाधितच, तृतीयान्त कर्त्यासह, योजितात. वरील वाक्यार्थ मोरोपतानी व्यक्त केला आहे, तो असा—

**होशिल विपक्ष-दासी, 'देतां' रामासि राज्यभर 'तातें'।**

यावरून उघड होते की, कर्मणि पूर्णवर्तमानसाधिताचे जागी मोरोपंत कर्तरि शुद्ध-वर्तमानसाधित योजितात. अर्थात् अशा ठिकाणी अर्थ करिताना यथापेक्ष कर्मणि पूर्णवर्तमानसाधित आधुनिक मराठीचे दृष्टीनें कल्पिलें पाहिजे. **तातें राज्यभर देतां** म्हणजे तातानें राज्यभर दिला असता, ज्यावरून "देता=दिला असता" असें समीकरण सिद्ध होतें.

**८ वें प्रत्ययान्त धातुसाधित**—'सागावयाचें होतें' याचे जागी दिवंगत रा रा. भागवताचे लेखात 'सागावें होते' असे प्रयोग वारवार दृग्गोचर होतात. असा प्रयोग मोरोपतातही क्वचित् आढळतो, जसें—

**'सांगावें होतें' त्वां कीं साधूंचा धरूनि संग रहा।**

साराश, अशा ठिकाणी अर्थ करिताना सागावे होतें=सागावयाचें होतें.

**९. णार-प्रत्ययान्त धातुसाधित**—'देतो तो' **देणार** किंवा **देणारा** अशा दोन्ही रूपांनी ओळखिला जातो, मात्र विभक्तिप्रत्यय लागून रूपें होतात ती आधिक्यानें **देणारा** याचीच होतात. त्यामुळें देणारानें इत्यादि रूपें कानास जरा चमत्कारिक भासतात. मोरोपंतात अशी रूपें-आकारांत सामान्य रूप धारण करणारी—नैकशः आढळतात.

**युक्ताचि 'मरणाराला' हितपरिणामहि न सोसवे काढा।**

'मारणाराचा हात धरता येतो, पण बोलणाराचें तोंड धरिता येत नाही' या येथल्यासारखे प्रयोग प्रचारांतही सभवनीय आहेत. साराश मोरोपंत वाचताना **देणाराला** इत्यादि रूपें **देणाऱ्याला** इत्यादिकांच्या इतकीच शुद्ध समजावी.

१० **अध्याहार**—संबधी आणि सबद्ध अशा शब्दद्वद्वापैकी मोरोपंत कधी एकाचा तर कधी दुसऱ्याचा अध्याहार करितात, जसें—

(१) **सत्पुत्रांनीं भवनीं, सुरतरुनीं न सुख नंदनवनीं तें।**
(२) **भीमा भी कौरव-बल बहु, जैसें पाप रामनामरसा।**

येथें प्रथम पक्तीत '**जें**' अध्याहृत आहे, तर द्वितीय पक्तीत **तैसें** हें अध्याहृत आहे साराश–मोरोपतामध्यें अर्थनिर्वाहाकरिता सबधी व संबद्ध अशा शब्दातून यथापेक्ष अन्यतर शब्दाची भरती कधी कधी करावी लागते

**११. शब्दविशेष**-(१) **आदि**—या शब्दाचा अर्थ मराठीला प्रायः एकच माहीत आहे, व तो **पहिला** हा होय, **जसें-इंद्रादि** देव म्हणजे ते देव की, ज्यात इद्र पहिला आहे, इद्र इत्यादि देव, इद्र वगैरे देव. आता, जेथें **पहिला** आहे तेथें इतरही असलेच पाहिजेत, निदान दुसरा तरी असणारच, एरव्ही पहिला या अर्थाचा निर्वाहच होणे नाही यामुळें आदि–शब्दान्त समास नित्य अनेकवचनी असणें आवश्यक ठरतें, पण ते एकवचनीही आढळतात त्याची सगति **पहिला** या अर्थानें लागत नाही. रामादि म्हणजे असे दोन किंवा अधिक पुरुष की ज्यात राम आरभी कथिला जातो, अर्थात् त्याच्यामागून कोणी तरी येणारच. यामुळे रामादि व्यक्ति एकाधिक ठरत असल्यानें, रामादि–चे एकवचन शक्यच नाही करिता असे समास एकवचनी आढळल्यास त्यामध्यें **आदि**-चें अर्थातर अपरिहार्य आहे

सस्कृतात आदि–चा अर्थ **प्रकार** असाही दिला आहे प्रकार म्हणजे नमुना. घटामाघ हा समास शाकपार्थिवादि आहे, म्हणजे शाकपार्थिवाचे धर्तीवर बनला आहे शाकपार्थिव हा अशा समासाचा 'नमुना' होय.

**भव बुडवी म्हणुनिच तव भजनीं सनकादि जाणता रमला।**

'**सनकादि** जाणता' याचा अर्थ **सनकासारखा** ज्ञाता, सनक आहे आदि म्हणजे **उपमान** ज्याचें असा पडित

( २ ) **आपण विरुद्ध आम्ही**–पाडव कृष्णास बोलताना केवळ स्वतः-बद्दल ' आम्ही ' म्हणतील, पण कृष्णाला आपल्यात अतर्भूत करणें असल्यास **आपण** म्हणतील; जसें—

[ १ ] हे कृष्णा, **आम्ही** सर्वथा तुझे आश्रित आहों

[ २ ] हे कृष्णा, **आपण** (=आम्ही व तू) भीष्माकडे जाऊं **आम्ही**=वक्ता+सहकारी, आपण=वक्ता+श्रोता–हा भेद कोंकणात, विशेषेकरून कुलाबा जिल्ह्यात पाळितात पुणेंप्राती तो नियमानें पाळिला जात नाही, तर कोल्हापूरचे बाजूस–जिकडे मोरोपतानी बरेंच आयुष्य घालविलें तिकडे–हा भेद मुळी ज्ञातच नाही, यामुळें कोंकणातील मनुष्यास मोरोपतकृत आम्ही–चा प्रयोग वारंवार बुचकळ्यात पाडितो कोल्हापुरी शिक्षक दुसऱ्या सहशिक्षकास म्हणेल

' आमच्या शाळेला उद्या सुटी आहे ' हाच अभिप्राय कोंकणातील शिक्षक ' आपल्या शाळेला उद्या सुटी आहे ' अशा रूपाने व्यक्त करील

यावर कोणी असा उपन्यास करील की, ' आपण ' व 'आम्ही' यात भेद मानूंच नये, दोन्ही शब्द अविशेषत. सारखेच वापरावे, कारण काही प्रदेशात वरील भेद पाळीत नाहीत यास उत्तर–जर भेद काही प्रदेशात पाळला जातो, व भेददर्शनाने भाषेतील शब्दास नियतार्थता व तद्द्वारा सूक्ष्मबोधकता प्राप्त होते, तर असे भेद काढून टाकण्यापेक्षा, ते विस्तारण्याकडेच जास्त लक्ष्य देणें इष्ट आहे असो प्रस्तुत भेद मोरोपतात वारंवार दृष्टीआड केलेला आढळतो, तरी अशा ठिकाणी **आम्ही** याचे जागी यथापेक्ष ' आपण ' हा शब्द योजून अर्थ करावा

**मंत्र पुसाया ' आम्ही ' साजण जाऊं, चला, उठा राया ।**

या अर्धात धर्म कृष्णास ' राया ' असें संबोधून म्हणत आहे की, ' आपण सहाजण ( = १ कृष्ण + ५ पाडव ) भीष्मास मसलत विचारणेस जाऊ येथे प्रथम पुरुषात श्रोत्याचा अंतर्भाव इष्ट असल्यामुळें, आपण हें सर्वनाम उचित दिसतें, पण येथें मोरोपंतानी ' आम्ही ' हेंच प्रयोजिलें आहे.

( ३ ) ' न .... ही '

*** तावत्कोकिल विरसान्यापय दिवसान्वनान्तरे निवसन् ।**
**यावन्मिलदलिमालः कोऽपि रसालः समुल्लसति ॥ १ ॥**

या ( Complex= ) मिश्र वाक्यातील क्रियाविशेषण वाक्यात 'न' प्रविष्ट करून सुद्धा मूलार्थ कायम राखिता येतो, मात्र 'यावत्' याचें अर्थांतर करावें लागतें, म्हणजे अशा वाक्यात न-चा भावाभाव एका दृष्टीनें उपेक्षणीय ठरतो यावत्-सारखाच काहीसा प्रकार मोरोपतात ही-सबधानें आढळतो

**जालीं महेन्द्रनयनें, अहिपतिनयनें 'हि' ऐकतां हिंवशीं ।**
**गमला शमला, 'न' मला, सर्वांस 'हि', दव दवांत पेटोन ।**

पूर्वोक्त वाक्याचा अभिप्राय-'इद्राचे **आणि** शेषाचे डोळे निवाले.' उत्तरोक्त वाक्याचा अभिप्राय-' मला **आणि** इतर सर्वांना तो विझलेल्या वणव्यासारखा भासला ' समुच्चय हा अर्थ पूर्वत्र **हि** यानें व उत्तरत्र **न हि** यानें दर्शविला आहे. अर्थ वैशद्याकरिता प्रस्तुतातील द्वितीय ठिकाणी, 'न केवळ . हि ' अशी योजना असावी, अशी मोरोपतात प्रायः मिळत नाही. त्यामुळें न-नें सहित वा रहित ही-चा अर्थ समुच्चय असा अनेकशः सापडतो पुढे ही योजिलें असल्यास मागील न-चे पुढें **केवळ** या शब्दाचा अध्याहार मानावा लागतो, न=न केवळ हें अशा ठिकाणचें समीकरण मोरोपत वाचताना लक्षणीय आहे. तद्भावी विवक्षित समुच्चयाचे जागी निषेधच प्राप्त सभवायाचा

**( ४ ) मानवणें व मान्य—**

मानवली न सुरलता, दुर्गाहि विजय-धनुष्य-वल्लीला ।

( रमाबाईला ) हवा मानवली, याचा आधुनिक मराठीत अर्थ हवा गुणावह झाली व पसत पडली, ज्यावरून मानवणे म्हणजे इष्ट वाटणें हा वर्तमानकालीन अर्थ ठरतो, परतु वरील आर्यार्धात 'मानवली' याचा अर्थ पसत करिती झाली, मान डोलविती झाली असा आहे, म्हणजे मानवणें=प्रशसा करणें. या दोन अर्थांत विरोध आहे, मानवणें-चा कर्ता आधुनिक मराठीत इष्ट **वस्तु** होतो, तर तो मोरोपतात पसत करणारी **व्यक्ति** असतो.

---

* हे कोकिला, ज्यावर भुग्याचे थवे जमत आहेत असा एखादा आम्रवृक्ष फुलेपर्यंत आनदरहित असे ( आपले ) दिवस अरण्याच्या ( अगदी गाढ ) अन्तर्भागी काढ. यावत् समुल्लसति=फुलेपर्यंत यावन्न समुल्लसति=जोपर्यंत फुलला नाही तोंपर्यंत=फुलेपर्यंत

मानवर्णे याच धातूशी सगोत्र असलेला मान्य हा शब्दही उपयोगाचे संबधात अवधारणीय आहे आधुनिक मराठीत तो कर्मणि असतो, तर मोरोपंतात तो कर्मणि वा कर्तरि असतो, म्हणजे मान्य = ( १ ) प्रशंसेचा विषय, किंवा ( २ ) प्रशंसा करणारा, स्वीकारणारा

**भ्याले म्हणेल, 'मान्य' न अवमानाला कुलीन होतात।**
**पूर्वागत तूं जैसा, तैसा मज पूर्वदृष्ट हा मान्य।**

येथें पूर्वत्र मान्य याचा अर्थ 'पतकरणारे' असा कर्तृपर आहे, तर उत्तरत्र तो पसंत असा कर्मपर आहे

( ५ ) **सख**–संस्कृतातील नियमाप्रमाणें तत्पुरुषान्ती सखि–चे रूपांतर सख असे होणें मराठीत सखि हा शब्द प्रायः सर्वत्रच सखा या (त्याचे प्रथमैकवचनाचे) रूपानें प्रवृत्त होतो त्यामुळें प्रस्तुत शब्दाचें सामान्यरूप, सख या मुळावरून **सखा** असे व सखा या मुळावरून **सख्या** असे होते यातील पहिलें रूप मोरोपंतात वारवार सापडते, यावर वाचक बहुधा ठेचाळतात.

**ते व्यसन तिचे रोदन तच्छ्वशुरसखा जटायुला कळवी।**

सासऱ्याचा मित्र म्हणजे श्वशुरसख, तेव्हा सासऱ्याचे मित्राला म्हणजे श्वशुरसखा 'केशव केशवा (ला)' या धर्तीवर श्वशुरसखा हे सामान्यरूप (चतुर्थ्यर्थक) नियमप्राप्तच आहे करिता अशा रूपास कोणा अभ्यासकानें नित्य प्रथमान्तच मानण्याचे कारण नाही

( ६ ) **सह**–हा शब्द शब्दयोगी अव्यय गणिला जातो, तसाच तो बहुधा व्याकरणात व भाषेत आढळतोही, पण मोरोपंतात बऱ्याच ठिकाणी त्याचा उपयोग समासाचें उत्तरपद म्हणून केला जातो.

**जातां पुरास, यावें सामोरे 'भरतसह' अनीकांहीं।**

या ठिकाणी संस्कृतात सहभरत किंवा सभरत–असा प्रयोग होईल, सामान्य मराठीत भरतासह असा होईल भरत–सह या प्रयोगात 'सह' सामान्यरूपोत्तर नसल्यानें, तें शब्दयोगी अव्यय होत नाही, तें पूर्वपद नसल्यानें येथें सहबहुव्रीहि समासही नाही मग भरतसह या रूपाची संगति कशी लागणार? वृक्षोपरि या रूपाचे धर्तीवर, तो तत्पुरुष समास मानिला पाहिजे. त्यात सह हें तृतीया अनुरुप्ट करिते, तेव्हा हा तृतीया तत्पुरुष समास होय. किंवा शब्दयोगी

अव्ययापूर्वी सामान्यरूप वापरिलें नाही, मूळरूपच ठेविलें आहे, असे **येथें** मानावें

( ७ ) **स्तव—**

**उघडी पहावया 'स्तव,' जाणो, लज्ज 'स्तव' प्रभा नुघडी ।**

**स्तव** या शब्दाचा अर्थ हल्ली सामान्यतः **करितां** असा होतो अर्थात् तो शब्द उद्देश्यार्थी शब्दापुढें लावण्यात येतो लज्जेस्तव याचा अर्थ या धर्तीवर 'लज्जेसाठी' असा होईल, 'लज्जेमुळें' असा होणार नाही प्रस्तुत आर्यार्धात स्तव हा शब्द या दोन्ही अर्थी योजिलेला आहे, तो उद्देश्य व कारण या दोहोंच्या वाचक शब्दास पृथक् लावण्यात आला आहे आता या दोहोंचा समावेश **हेतु** या शब्दात होत असल्याने, असें म्हणता येईल की, मोरोपता-मध्ये स्तव हा शब्द हेतुबोधकापुढें जोडण्यात येतो, तो हेतु पुरोगामी (=कारण-रूप ) असो वा अनुगामी ( =उद्देश्यरूप ) असो.

इंग्रजी भाषेंतही उद्देश्याला लागणारें शब्दयोगी अव्यय कधी कधी कारणाला लावण्यात येते, जसे—( १ ) The school is closed *for* the May vacation ( २ ) *for* the out--break of plague

येथे for पूर्वत्र उद्देश्यवाचकाला, तर उत्तरत्र कारणबोधकाला लाविले आहे. साराश स्तव=( १ ) करिता ( २ ) मुळें

( ८ ) **स्व**—हा शब्द सामान्यतः वाक्यगत **कर्त्याचा** बोध करितो, जसें

**'स्व' बलक्षय पाहुनि द्रोण करी क्षत्रियान्त भार्गवसा ।**

येथें द्रोणानें द्रोणाच्या सैन्याचा क्षय पाहिला स्वबलक्षय या शब्दाचा पुरोगामीसबध 'पाहणें' या क्रियेकडे आहे पाहणे–चा कर्ता द्रोण आहे, त्याचाच बोध 'स्व' हा शब्द येथें करीत आहे अशा रीतीनें पुरः–**संनिकृष्ट क्रियेचा कर्ता स्व–नें दर्शित होतो**–असा नियम दिसतो

पण मोरोपतात एतद्न्य प्रकारानीही 'स्व' योजिलेला दिसतो.

( क ) **बोले असें, हरी जो 'स्व' पद स्मरतांचि आशु पतनातें ।**

येथे स्वपद याशी संसृष्ट क्रिया स्मरणें ही आहे, तेव्हा स्मरणें–चा कर्ता भक्त हा स्व–नें दर्शित व्हावा पण येथें स्व–ने स्मरणेचा नव्हे, तर त्याचे पलीकडील हरणें या क्रियेचा कर्ता दर्शित होतो. म्हणजे असें

ठरतें की, स्व-नें पुरः-संनिकृष्टच नव्हे, तर कधी कधी विप्रकृष्ट क्रियेचाही कर्ता बोधित होतो.

**( ख ) 'यावत् 'स्व'-कथा तावज्जीव' असा पावला सुवर दास।**

' जोंपर्यंत ' माझी ' कथा लोकात आहे तोंपर्यंत तू जगशील ' असा रामानें मारुतीस वर दिला येथे ' **स्वकथाची** ' संसृष्ट क्रिया राहणें किंवा जगणें ही आहे पण **स्व** हा शब्द येथें तिच्या–कर्त्याचा मारुतीचा बोध करीत नसून, तो वक्त्याचा–रामाचा–बोध करीत आहे साराश–' स्व ' हा शब्द कधी कधी वक्तृबोधक असतो.

**( ग ) . भेटे दुर्योधना असेव्याही ।**
**कीं तो स्वसुता ' स्व ' सुता देउनियां जाहला असे व्याही ॥**

येथें दुर्योधनानें आपली मुलगी आपल्या (=कृष्णाच्या) मुलास दिली असल्यानें, कृष्ण त्यास भेटला, असा अर्थ आहे या वाक्यात एकाच क्रियेशी ससृष्ट असलेला **स्व** हा शब्द भिन्नभिन्न व्यक्ति दर्शवीत आहे पैकी दुर्योधनाचा बोध–तो त्या क्रियेचा कर्ता असल्यानें-योग्यच आहे, पण कृष्णाचा बोध दुरुपपाद्य आहे कृष्णकर्तृक क्रिया **भेटणें**; ही स्वसुता या पदाशी केवळ यथाकथचित् ससृष्ट आहे यावरून असें दिसतें की, मोरोपतात स्व हा शब्द सनिकृष्ट वा विप्रकृष्ट कर्त्याचा, वक्त्याचा, किंवा यथाकथाचित्-संसृष्ट अशा क्रियेच्या कर्त्याचा, बोध करितो

( ९ ) **ही**-हा शब्द समुच्चय सुचवितो,–**मग** तो समुच्चय सभव किंवा अपेक्षा यांचे विरुद्ध असो वा नसो, जसें—

**राम व लक्ष्मणही वनास गेला**

येथें रामानें वनास जाणें हें दशरथाज्ञेवरून सभवनीय होतें, पण लक्ष्मणाचें गमन संभवाभावी घडलें तेव्हा येथें रामाचे गमनात लक्ष्मणाचे गमनाची भर **संभवाचे विरुद्ध** पडली आहे

**ऊन, उष्ण असूनही, हिंवाळ्यांत माणसास भाजीत नाहीं** येथें **ही** विरोध सुचविते. **थंड असतांना** न भाजणें, यात **उष्ण असतांना** न भाजणें ही भर पडली आहे विरोध तर येथें आहेच, ' तो मॅट्रिक व स्कूल फायनलही पास झाला ' या वाक्यात मुलगा हुषार असल्यास, केवळ

समुच्चय किंवा समावेश सूचित होतो अशा रीतीनें त्रिविध समुच्चय शुद्ध, असंभवगर्भ व विरोधगर्भ ही-चे प्रयोगावरून सूचित होतात.

या ही-चे विरुद्ध उपयोग च-चा प्रायः होतो. अन्यव्यावृत्ति-असंभव-व विरोध यानी युक्त वा अयुक्त-च-नें सूचित होते पण मोरोपतात कधी कधी च ही याचे उपयोग परस्पराचे अर्थानें केलेले आढळतात,-म्हणजे प्रचाराचे बरोबर विरुद्ध त्याचे प्रयोग होतात, जसें—

**देव म्हणे ' बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचा हि राग मला ।**

येथें दोघात जास्त राग येणें तर, तो स्वपक्षीय अर्जुनाहून परपक्षीय भीष्माचा यावा, पण आला आहे अर्जुनाचा, हा **विरोध,** व क्रोधाधिक्याचे विषयातून भीष्माची **व्यावृत्ति,** अशा दोन गोष्टी येथें विवक्षित आहेत. अर्थात् या दोन गोष्टीचा बोध करणें हा च-चा विषय आहे करिता ' जिष्णु-चाचि ' असा प्रयोग येथें हवा, पण तो **जिष्णुचाहि** असा आहे यातील च-स्थानी हि यमकासाठीही आलेला नाही. कारण वरील अर्धाचा अंत

**' ......तरणिसा गमला '**

असा असल्यानें, **चि** चे जागी हि ठेविल्यानें, यमकाचा परिपोष अधिक मुळीच होत नाही. साराश-च-चे जागी मोरोपतात हि-चा प्रयोग कधी कधी आढळतो, याचे उलटही प्रकार-म्हणजे हि-चे स्थानी च-मोरोपत क्वचित् योजितात, जसें—

**द्यावें शीलचि, द्यावें केवल व्हाया न घात वसु तातें ।**

येथें, लोकात मुलास धन ठेवून देणें हें क्रमप्राप्त मानितात, या गोष्टीत शीलाची **भर** घालावी असा अर्थ विवक्षित असल्यानें, शीलहि अशी पद-योजना इष्ट ठरते, पण तशी ती येथे नाही. साराश—मोरोपतात चि व हि याचे अर्थ कधी कधी यथापेक्ष, प्रचारदृष्टाहून विपरीत करावे लागतात.

(१०) हो—

(क) **युद्धांत पांच-पांडव-पारिभव हो मत्करें असेंच वदे ।** ( होवो )

(ख) **हो मशकमक्षिकाहर, गरुडा नाशी असें नसे चवर** (होईनाका)

(ग) **जातिकडे काय! गुणें तूं बहुमत शतमखा; न वानर 'हो'**(आहेस)

(घ) **पाशुपताद्यस्त्रांचा लाभ स्वर्गी वरासनाचा 'हो'** ( झाला )

(ड) **त्यजितां उटज, म्हणे वनदेवी 'हो'** (अहो)

(च) **जानकीस रक्षा 'हो'** (बरें)

असे हो-चे सहा अर्थ मोरोपतात सापडतात.

(११) **यमक**—'अति सर्वत्र वर्जयेत्' या म्हणीची सत्यता मोरोपताच्या यमकप्रियतेत चागलीच निदर्शित होते यमक साधण्याकरिता अथवा त्याचा विस्तार साधण्याकरिता-अनेकविध अतिक्रम त्याचे हातून होतात, जणूं काय यमकाचे बाबतीत, त्यानी वाग्देवीपासून 'चार खून माफ' अशी सवलतच मिळविली आहे. नीति, व्याकरण, अलकार, औचिती इत्यादि गोष्टीकडे, यमकाचे नादात मोरोपंत वारवार दुर्लक्ष्य करितात.

१ श्रीकृष्णपरमात्म्यास-ज्यास शेंकडों नव्हे हजारो ठिकाणी मोरोपत परब्रह्म म्हणून उल्लेखितात-'शिनळ' असेंही म्हणण्यास ते कचरले नाहीत "Temptation to say fine things" वाग्वैचित्र्याभिरुचीमुळें जसे वाग्दोष विद्वानाचे हातून प्रसगी होतात, तसेच यमकाभिलाषपारवश्यामुळें मोरोपतांचे हातून घडतात.

२ 'येकोपा, आजवळ' इत्यादि रूपें क्रमानें एकोपा, आजोळ याचे जागी योजून अशुद्ध भाषेचा दोष ते पत्करितात

बाप याचे जागी 'बा' हें रूप योजून ते ग्राम्य शब्दप्रयोगाचा दोष स्वीकारतात. अशा अनेक प्रकारानी भाषाशास्त्राचें उल्लंघन, त्याचे हातून, घडतें.

३ **धांवूनि पाय धरितां, आशीःसूक्तें 'सुखें' वदे, हातें।**
**स्पर्शे माथां, मद्गुरु निववाया दे सुखेंव देहातें॥**

येथें यमकविस्ताराकरिता पूर्वार्धात **मुखें**-चे ठिकाणी **सुखें** योजिलेलें दिसतें. मुखें वदे, हातें स्पर्शे—अशी रम्यबध कल्पना येथे साधली असती; पण यमकपक्षपातापुढें कल्पनासौंदर्याचा बळी दिलेला येथें प्रतीत होतो। ( येथें सुखेंव = आलिंगन )

**बुडातिल बाहुबळमदें भट या रत्नाकरांत शतकोटी।**

येथें योद्धे बुडून जाण्याला सागराचें गंभीरत्व, दुस्तरत्व, इत्यादि रौद्रगुण विवक्षित असल्यानें, श्रीमत्त्वद्योतक 'रत्नाकर' हा शब्द येथे अगदीच अप्रयोजक ठरतो, येथें 'मकरालय' यासारखा भीषणत्वसूचक शब्द इष्ट आहे. पण केवळ—

**..चित्तीं यत्ना, करांत शतकोटी ।**

या पूर्वार्धाशी दीर्घ यमक साधण्यासाठी अनुचित शब्दाची निवड येथें झालेली दिसते

४ पद्य हें लिहिलेलें डोळ्यानी पाहण्याकरिता नसून, गाइलेलें **कानांनीं ऐकण्याकरितां** आहे, पण हा विचार सोडून, मोरोपत वारवार अक्षराच्या मिथ्या आकारसाम्यावर विसबून, यमक सिद्ध मानितात.

**...महाक'थें' 'बानें'** । याशी यमक **अतितैलपाक 'थेंबानें'** ।

असें साधिलें आहे पण हें यमक कर्णास कसे खपणार? दोन्ही ठिकाणी **थें**–चा उच्चार एकविध नाही पूर्वत्र केवळ **अनुनासिक स्वर थें**–मध्यें आहे, तर उत्तरत्र थे-पुढें अनुस्वार आहे बद्द रुपया व खणखणीत रुपया याचे किमतीत व्यवहारात जितके अतर आहे, तितकेंच या दोहोंचे उच्चारात आहे. करिता या दोहोचे यमक सहृदय–ग्राह्य कधीच होणें नाही

अशीच गोष्ट सत्य व मिथ्या सयोगाचे संबधात आहे.

**. रविप्रभा 'वात्या'। . कविप्रभा 'वा त्या'।**

येथें वात्या-मध्यें पूर्वत्र सत्यसंयोग आहे, तर उत्तरत्र केवळ भासमान संयोग आहे कवितेचा अर्थ **लावण्यांत** व शकुतलेचे **लावण्यांत** येथील 'लावण्यात' या सारख्याच लिहिलेल्या रूपद्वयात उच्चाराचे दृष्टीनें भेद आहे अर्थात् ही रूपें मिथः यमकोपयुक्त नाहीत. अशीच स्थिति ( वाताना समूहः= ) वात्या व ( प्रभा ) वा त्या, या अक्षरद्वयाची आहे पूर्वत्र वा साघात आहे, तर उत्तरत्र तो निराघात आहे. साराश, सत्यमिथ्यासयोगाचें यमक दुर्घट आहे.

असाच प्रकार तालव्य व दत्यतालव्य च-वर्गासबधाने आढळतो

**.... इतरा क्षुधिता पदार्थ हा 'चारा'।**
**साचा रामचि समरीं जो तो मद्वत्स पार्थ पाचारा॥**

येथे '**चारा**' या द्व्यक्षराचें यमक दृष्टीला पटलें, तरी तें भ्रातच आहे, तें श्रुतीला मुळीच संमत नाही. यमक–जें श्रुतिपूत असावे तें केवळ दृष्टिपूत साधून समाधान मानिताना मोरोपत वारवार आढळतात. करितां ही गोष्ट लक्ष्यात ठेवून यमकगत शब्दाचा अर्थ लावावा; त्या शब्दाचा उच्चारभेद शक्य आहे, ही गोष्ट मनात वागवावी एरवी अनेक ठिकाणी अर्थ लागणार नाही.

उत्तरार्धांत 'पाचारा' याचा उच्चार वरील चारा याशी सरूप करूं गेल्यास, तसा शब्दच मराठींत नसल्यानें, कांहींच अर्थनिष्पत्ति होणार नाहीं.

अशा रीतीनें यमकाचे संबंधात जरी मोरोपंतांचे प्रमाद आढळतात, तरी ते त्यांच्या काव्याचे गुणोदधीपुढें केवळ खसखशीसारखे दुर्लक्ष्यच आहेत. ते येथें सांगितले ते दोषदर्शनार्थ म्हणून नव्हे, तर त्याचे अभावीं कवीच। गुणोदधि जितका रम्यतर दिसला असता, तितका तो वर्तमानस्थितींत दिसत नाहीं हें सांगण्याकरिता, चंदनाचे वर्णनात, त्यास फूल नाहीं हें विधान तत्सौभाग्यविलोपि होत नाहीं, तर तें केवळ फुलामुळें संभवणारा चंदनोत्कर्ष तदभावीं सिद्ध होत नाहीं, एतद्विषयक मनाच्या हळहळीचेंच केवळ द्योतक होय. पुष्पाभाव हें तोट्याचें कलम नसून, केवळ फायद्याच्या किंचित् कमी वाढीचें गमक आहे. त्याप्रमाणें यमकासंबंधीं येथें उल्लेखिलेले दोषलेश नसते, तर केवढी बहार झाली असती, हेंच मनोगत दर्शविण्याचा येथें हेतु आहे

अशा रीतीने मोरोपंती काव्याचा अर्थ लाविताना अर्थप्रकटीकरणाच्या त्याच्या विशेष वळणामुळें येणाऱ्या ठळक ठळक अडचणी, व त्यांचे परिहारमार्ग येथें मांडिले आहेत. त्यावर यथायोग्य विचार करून विद्वानानी त्यात न्यूनाधिक्य सुचवावें, एवढी त्याची प्रार्थना करून हा लेख संपवितो

---

## ३. कालिदासीय शब्दव्युत्पत्ति व कोट्या

या सदराखाली महाराष्ट्र–साहित्य–पत्रिकेच्या गेल्या अंकीं आलेल्या मजकुरात मला कांहीं दोष आढळले, ते केवळ नजरचुकीनें झाले असले तरी लोकांचे वाचनांत तसे राहू देणं मला इष्ट वाटत नसल्यानें, त्यांची दुरुस्ती मी सुचवीत आहें.

( १ ) **राजन्**—या शब्दाची **राजति सः राजा** अशी व्युत्पत्ति आहे. एका शब्दावरून दुसरा शब्द निघाला आहे हें ठरविण्याची प्रमाणें दोन—**घटना–साद्दश्य** म्हणजे वर्णांचा यावच्छक्य मेळ, व **अर्थसंगति**. यापैकी प्रभव–प्रभूत शब्दाच्या वर्णांत फरक होईल तो काही हिशेबीच होईल. शिवाय हा बदल प्रत्यक्ष डोळ्यास दिसत असल्यानें, त्यास प्रमाणांतराची जरूर तादृश नाहीं. सं. गच्छति म्ह० जातो. येथें अर्थसादृश्य असल्यानें गम् ( किंवा गच्छ् )

वरून जा निघाला असे कोणी म्हणाल्यास तें पटण्यासारखें नाही. गम् व जा याचे वर्णसंघात मेळ मुळीच नाही हें उघड आहे करिता जा-चें मूळ दुसरेंच असलें पाहिजे तें संस्कृत या हें होय. या मुळाशी दुहेरी मेळ बसतो,- वर्णतः व अर्थतः संस्कृत य-चे जागी मराठीत ज वारंवार येतो. यादव, युग, यत्र, यूथिका, युवन् व यष्टिमल्ल याचे तद्भव जाधव, जूग, जेथें, जुई, जवान व जेठमल यात हाच आदेश सापडतो अर्थतः दोघांचें ऐक्य आहेच. सारांश, प्रभव व प्रभूत अशा शब्दांमध्यें नुसतें अर्थसाम्य पुरें पडत नसून, त्याच्या पुष्टीस वर्णसाम्यही पाहिजे

उलट वर्णसाम्याचे पुष्टीसही अर्थसाम्य पाहिजे स. घास ( गवत ), मराठी घास ( तोंडांत टाकिलेला खाद्याचा भाग ) या दोन शब्दांत वर्णसाम्य जरी पूर्णतः असलें तरी अर्थसाम्य मुळीच नाही म्हणून हे शब्द प्रभव-प्रभूत नाहीत. मराठीतील ( तोंडात टाकावयाचा ) घास हा शब्द स ग्रासवरून आला आहे. सारांश वर्ण व अर्थ या दोन्ही दृष्टींनी साम्य सांपडलें म्हणजे व्युत्पत्ति सिद्ध झाली असें समजावें.

कधी कधी यापैकी एखादें अंग लंगडें असल्यास चालेल की नाही ! मुळीच नाही मात्र येथें हें लक्ष्यात ठेवावें की, रूपसाम्य जसें चक्षुर्ग्राह्य आहे, तसें अर्थसाम्य नाही रूपात किती बदल झाला, तो प्रमाणांत आहे की नाही, इत्यादि गोष्टी स्वतःचे बुद्धिबलानें आपण ठरवू शकतो, कारण रूपातील बदल आपणास पूर्णतः बुद्धिगोचर असतो, तशी स्थिति अर्थाविषयी नाही. प्रभूताचा ( म्हणजे निघालेल्या शब्दाचा ) अर्थ जरी सर्वतः प्रत्यक्ष असला, तरी प्रभवाचा ( म्हणजे मूळ शब्दाचा ) अर्थ तसा नेहमीच नसतो. कोशात किंवा आपल्या वाचनात न आलेला अर्थही प्रभवाचा असणें शक्य आहे. कोशांत अनुपलब्ध व वाचनात अदृष्ट अशा अर्थानें प्रभवाचा उपयोग कवीनें केला असल्यास, त्या प्रभवाचें प्रभूताशी अर्थसाम्य, आपणास प्रतीत होत नसूनही, असणें शक्य आहे करिता, कधी कधी अर्थतः साम्य आपणास दिसत नसूनही रूपतः साम्याचे बलावरच कविकृत शब्दसिद्धि आपण प्रमाण मानिली पाहिजे. अर्थात् हा कवि प्रमाणांतरावरून प्रमाणभूत गणला गेला असला पाहिजे. आपणास अर्थसाम्य आपल्या तुटपुंज्या ज्ञानामुळें न दिसलें म्हणून तेवढ्यावरून कवीचा प्रमाद मानूं नये. **कोशांत धातूंच सर्व अर्थ वेळीं नसतात,** हीच गोष्ट ‘ धातूनामनेकार्थत्वम् ’ अशा शब्दांतरांनी वैयाकरण सांगतात.

या वरील तत्त्वाप्रमाणें राजन् शब्दाची पारख केल्यास असें दिसतें की, हा शब्द राज् ( प्रकाशणें ) या धातूवरून आला असावा, वृष्-वृषन्, उक्ष्-उक्षन् ही असलीच उदाहरणें होत. एवढा रूपतः विचार झाला, आतां अर्थतः करूं. रञ्ज् म्हणजे संतुष्ट करणें; राजन् म्हणजे तो, की जो संतुष्ट करितो. अशा रीतीनें 'राजन् शब्द आपलें अपत्य आहे' असें स्वत्व राज्-धातु रूपाचे जोरावर, व रञ्ज् धातु अर्थाचे जोरावर सांगत आहे येथें वरवर पाहतां दोघांचा हक्क समसमान वाटतो; पण तशी स्थिति नाही. रूपतः तुझें साम्य नाही, ही गोष्ट रञ्ज् धातूस आपण आपल्या धूर्वहत्वावर सांगू शकतों. तशी गोष्ट राज् धातूसंबंधी नाही त्याचें रूपतः साम्य स्पष्टच आहे अर्थतः साम्यही कदाचित् असूं शकेल, तें नाहीच असें आपण म्हणू शकत नाही; कारण अर्थाचे बाबतींत आपण सर्वज्ञ नाही आंधळ्यांनी आपल्या स्पर्शज्ञानानें मिळविलेलें हत्तीचें ज्ञान जसें अपुरें, तसेंच धातूचे अर्थासंबंधांत आपलें ज्ञान. करितां जर कोणी राज्-धातूचा अर्थ रंजविणें आहे असें म्हणेल, तर तें आपणास नाकारतां यावयाचें नाही अर्थात् हा अर्थवादी इतरथा प्रमाणभूत म्हणून सिद्ध झाला असला पाहिजे. कालिदास-कवि हा अशा उच्च कोटींतील शाब्दिक आहे, ही गोष्ट प्रमाणांतरांनीं प्रश्नातीत आहे. करितां त्याचे सांगण्यावरून राज्-चा अर्थ रंजविणें मानणें प्राप्त आहे येथें राज्-च्या प्रचलित अर्थानेंही निर्वाह होईल. युक्तीचीही पुष्टी देतां येईल. **राजयति स. राजा, प्रजांना** ( संतुष्ट, आनंदित किंवा ) **आनंदानें विराजित** करितो तो. राजयति म्हणजे 'विराजित करणें' अशा रीतीनें वाटल्यास प्रयोजक रूपाचा अवलंब केल्यास अर्थतः सुद्धां राजन्-शब्दाची सिद्धी राज्-पासून होते

कवीस अभिप्रेत असलेला राज्-धातूचा रञ्जन हा अर्थ कदाचित् कोणास दिसणार नाही व तो राज् धातू टाकून रञ्ज्-पासून राजन् शब्द व्युत्पादील; ही आपत्ति निवारण्याकरितां, टीकाकार मल्लिनाथानें मुद्दाम बजाविलें आहे की, 'यद्यपि राज-शब्दो दीप्त्यर्थात् **राजतेः** कनिन् प्रत्ययान्तः, **नतु रञ्जेः**, तथापि धातूनामनेकार्थत्वात् 'रञ्जनाद् राजा' इति उक्त कविना' राजन् शब्दाचे अर्थांत रञ्जन ही कल्पना आहे; एतदर्थ भागवतकार, भवभूति इत्यादिकांचा आधार लेखकानें दिला आहे, तो बरोबर आहे. पण प्रश्न आहे तो अर्थाबद्दल नव्हे, **राजा प्रकृतिरञ्जनात्** असें कवीच कंठरवानें

लागत आहे, तर हा अर्थ रञ्ज्-पासून की राज्-पासून येथें उत्पन्न झाला आहे, अशाविषयी. या बाबतीत वरील आधारावरून काहीच मदत मिळत नाही. करिता निष्कर्ष हाच की, राजन् शब्द रूपतः राज्-वरून बनला आहे, आणि कवीचे सांगण्याप्रमाणें त्यांत असलेला रञ्जन हा अर्थ राज्-धातूत आहे असें स्विकारून अर्थतःही राज्-वरूनच व्युत्पादिला पाहिजे. सारांश, राज्-धातु मूळ आहे असें मानण्यास ( डोळे सांगतात म्हणून ) रूपाचा व कवीचे सांगण्या-वरून अर्थाचाही आधार आहे, पण रञ्ज् धातूस फक्त अर्थाचाच आधार आहे, रूपाचा नाही. करिता कमजोर म्हणून, राजन्-चें मूळ या दृष्टीने रञ्ज् धातु त्याज्य ठरतो. मराठीतील राजी ( = संतुष्ट ) शब्द राज्-धातूत्पन्न मानिल्यास, रंजविणे हा राज्-चा अर्थ आहे, ह्या विधानासही पुष्टी मिळते.

[ २ ] **ककुत्स्थ**—हें टोपण नांव रघूचे एका पूर्वजास-पुरंजय नावाचे राजास-मिळालेलें कालिदासानें ( रघु० ६, ७१ ) वर्णित आहे. ककुद् म्हणजे बैलाचे वशिंड (किंवा कोळू). मोरास जशी पिसाऱ्यानें, सापास फणेने, किंवा सिंहास आयाळीनें शोभा येते, तशी बैलास वशिंडानें. यावरून वशिंड याचा अर्थ लक्षणेनें भूषणभूत, मुख्य, अग्रस्थान असा जरी होत असला-व तसा तो होतोही ( ककुदं वेदविदाम् असा ककुद्-चा सहजात शब्द ककुद याचा प्रयोग प्रसिद्धच आहे ),-तरी तशा अर्थानें कालिदासाने ककुत्स्थ याची व्युत्पत्ति दिली नाही. पुढीलच ( म्हणजे रघु० ६।७२ ) श्लोकांत कवीने हा शब्द 'वशिंडाजवळ बसणारा' अशा अर्थानें व्युत्पादिला आहे, ही गोष्ट त्या श्लोकाचे अवलोकनाने कोणासही पटेल. आतां प्रश्न एवढाच की, या ककुत्स्थ संज्ञेशी ककुद्-चे लाक्षणिक अर्थाचा कांही संबंध नसल्यास प्रस्तुत ( ७१ ) श्लोकांत 'ककुदं नृपाणां' हें वर्णन किंप्रयोजन? अर्थात्-व्युत्पत्तिनिरपेक्ष अनुप्राससाधनार्थ. अनुप्रास साधण्याची प्रवृत्ति कालिदासामध्यें वारंवार आढळते.

**गुरोर्नियोगाद्वनितां वनान्ते साध्वीं सुमित्रातनयो विहास्यन् ।**

इत्यादि असंख्य ठिकाणी ही प्रवृत्ति सांपडेल. असो. ककुदि ( म्हणजे बैलाचे वशिंडाजवळ ) तिष्ठति ( बसतो ) सः ककुत्स्थः अशीच व्युत्पत्ति कविसंमत दिसते.

[ ३ ] **गोप्रतर**—* **यद्गोप्रतरकल्पोऽभूत्संमर्दस्तत्र मज्जताम् ।**
**अतस्तदाख्यया तीर्थं पावनं भुवि पप्रथे ॥**

१०१, १५ रघु०

---

* ज्याअर्थी तेथें बुडी मारणाऱ्या लोकांची गर्दी पाण्यांत उतरणाऱ्या गुरांच्या गर्दी-सारखी म्हणजेच गोप्रतरासारखी झाली त्याअर्थी त्याच नावानें तें तीर्थ प्रसिद्धी पावलें.

या पद्यांत रामचद्रनिर्याणानतर अयोध्यावासी जनानी शरयूंत बुड्या मारल्या ही गोष्ट वर्णिली आहे त्याची बुडी मारण्याची उत्कंठा किती होती ! याचें माप म्हणून कवीने त्याचे गर्दीस 'गोप्रतर' ही उपमा दिली आहे, अभिप्राय असा की, गुरें पाण्यात पिण्यास व पोहण्यास उतरताना जशी एकमेकाचे अंगास अंग घाशीत पुढें घुसतात, तसे लोक शरयूंत एकमेकात रेटारेटी करीत उतरले ग ओगले म्हणतात, या लोकांचे उतरण्यामुळे शरयूचें पाणी (क) उथळ झाले, किती ? तर (ख) गाईना उतरून जाता येईल इतकें. दोन्हीही विधाने प्रामादिकच

(क) Backbay मध्यें काही भागात भर घालून तो उथळ केला (व पुढें तो भरून काढिला), तशी लोकाचे शरीराची भर शरयूंत घातली काय ? प्रयागी एखाद्या पर्वणीचे वेळी असख्य लोक स्नानाला उतरल्यामुळें तेथील पाणी उथळ होतें काय ! (ख) गुरांना खोल पाण्यातून पोहून पलीकडे जाता येत नाही काय ! शिवाय (ग) गोप्रतरकल्प हें विशेषण कवीने लोकांचे गर्दीस लाविलें आहे, जलाशयास नाही. अशा त्रिविध दोषानी दूषित असा प्रस्तुत श्लोकाचा अर्थ लेखकानें केलेला दिसतो. गोप्रतर म्हणजे नदीत पाणी पिण्यास व पोहण्यास उतरताना होणारी गुरांची खेचाखेच हा अर्थ येथें विवक्षित आहे.

---

## ४ ज्ञानेश्वरींतील एक शंका

### अथवा

## टिटवी समुद्र उपसणारी कीं भरणारी ?

### लेख १

### चर्चोपकारक ओव्या

अहो अर्जुनाचिये पांती । जे परिसणया योग्य होती ।
तिहीं कृपा करूनि संतीं । अवधान द्यावें ॥ ६२ ॥
हें सलगी म्यां म्हणितलें । चरणा लागोनि विनविलें ।
प्रभू सखोल हृदय आपुलें । म्हणऊनियां ॥ ६३ ॥
तैसा तुम्हीं मी अंगिकारिला । सज्जनीं आपुला म्हणितला
तरी उणें सहजें उपसाहला । प्रार्थू कायी ॥ ६४ ॥

परी अपराधु तो आणिक आहे। जें मी गीतार्थ कवळूं पाहें।
ते अवधारा विनवूं लाहे। म्हणऊनियां ॥ ६६ ॥

हे अनावर न विचारितां। वायांचि धिंवसा उपनला चित्ता।
येऱ्हवीं भानुतेजीं काय खद्योता। शोभा आथी ? ॥ ६७ ॥

की टीटिभू चांचूवरी। माप सूये सागरीं।
मीं नेणतु त्यापरी। प्रवर्ते येथ ॥ ६८ ॥

ऐसें जें अगाध। जेथ वेडावती वेद।
तेथें अल्प मी मतिमंद। काय होय ? ॥ ७३ ॥

( २ ) वरील ओव्यांचा सारांश—

**ज्ञानेश्वर म्हणतात**—अशा साधु लोकांनी, की जे अर्जुनासारखे श्रद्धाळू आहेत त्यांनी माझें म्हणणे ऐकावें संतजनहो, ही विनंति मी आपणास नम्रपणें करीत आहें ॥ कारण तुम्ही अत्यंत क्षमाशील असल्याने, माझें अज्ञाचेंही बोलणें ऐकाल ( बालादपि सुभाषितं ग्राह्यम्–हा न्याय प्रसिद्धच आहे ) ॥ तुम्ही मला ' आपला ' असें म्हटल्यावर, मला संभाळून घ्यालच, त्याकरितां तुम्हास विनवावयास नकोच ॥ मी अज्ञ, तुम्ही तज्ज्ञ, अशा स्थितीत मी तुम्हास ( एक प्रकारें ) शिकवूं पहाणे, हा माझा पहिला अपराध **दुसरा** असा की, मी तुम्हास सामान्य गोष्टी शिकवीत नाही, तर भगवानानी गीतेंत जें प्रतिपादिलें तें मी सांगू पाहातो, हा दुसरा व मोठा अपराध ॥ भगवानानी आपल्या दिव्य वाणीनें व्याख्यान केल्यावर, त्याच विषयावर मी प्राकृत मनुष्यानें व्याख्यान करूं पाहणे, यापासून भगवत्कृत प्रतिपादनाला मदत ती काय होणार ? तें प्रतिपादन स्वयंपूर्ण मत्कृत ( व्याख्यान )–निरपेक्ष असेंच आहे करितां तें भगवद्वचन म्या विवरून सांगणें हें सागरात टिटवीनें आपल्या चोंचीनें पाण्याची भर टाकण्यासारखेच, निरर्थक आहे जो विषय भगवानानी प्रतिपादिला, तो मी प्रतिपादून काय सोपा करणार ? ( नगाऱ्यापुढें टिमकी ती काय ? ) नगाऱ्याने लोकांचे लक्ष्य वेधावें तेथें टिमकीनें त्या लक्ष्य वेधण्यात काय साह्य होणार ? ) सूर्य जगाला प्रकाशित करितो, तेथें खद्योतानें त्या सूर्याचे तेजात भर टाकली काय, न टाकली काय, सारखेंच जें काम सूर्याकडून केलें जातें तें आपण करूं पाहणें हें खद्योताचें धाडस, जें ज्ञान भगवानानीं

जगास दिलें, तेंच मी काय देऊ शकणार ? साराश, एखादा महासमर्थ मनुष्य जें काम पूर्णतः करीत आहे, त्याला अत्यत दुर्बलाने आपली शक्ति खर्चून साह्य करणें व्यर्थ कृष्णाने गोवर्धन पर्वत उचलून धरिला असता, तेच कार्य साधण्यास गोपाळानी आपल्या काठ्या लावल्या, त्या व्यर्थ होत तद्वत् भगवानानी प्रतिपादिल्यावर मी तोच विषय आणखी सोपा तो काय करणार ! त्याच्या प्रतिपादनापुढे माझें प्रतिपादन ते काय ? वेदानाही ज्या गीताप्रतिपाद्य तत्त्वाचें आकलन झालें नाही, त्याचें आकलन मला अज्ञाला कसें होणार ?

( ३ ) विशिष्ट शब्दादिकाचा अर्थ—

ओवी ६६—पण विशेष अपराध तो हा की, मी इतर एखादी 'गोष्ट तुम्हास शिकवीत नसून गहन असा गीतार्थ उकलून तुम्हास ऐकवू पहात आहें' हा होय इतर एखादी गोष्ट सागणे यात अपराध एकच तो हा की, लहानानें मोठ्यास शिकविणे. मनुष्य लहानाविषयीचे कौतुकानें वेळेस, तें प्रियच मानील. पण 'गीतार्थ उकलून दाखवितों' ही हाव मात्र शुद्ध वेडेपण आहे लाडकें मूल सुद्धा एखादी भलतीच गोष्ट करू पाहील, तर वडिलास पसत पडणार नाही.

६७–अनावर—म्ह०–शक्तीचे पलीकडील ज्ञानेश्वर म्हणतात-गीतार्थाकलन मला दुःसाध्य आहे, हे लक्ष्यात न आणिता, उगीच वेडेपणानें मला भलती हाव सुटली आहे, म्हणून मी गीतार्थ–विवरणास तयार झालों आहे, एरवी झालो नसतों, कारण हे माझें कृत्य सूर्यतेजापुढे काजव्यानें आपले तेज मिरविण्यासारखे आहे. व्यर्थ हाव मनात नसेल तर अशा आचरट कृत्यास कोण तयार होणार ?

६८ –किंवा टिटव्याने आपली चोंच भरून पाण्याचें माप (प्रमाण) सागरात टाकावे, त्याप्रमाणे अज्ञानानें मी या कामात पडू पाहत आहें **चांचूवरी**=चचूभर किंवा चोचीनें. **सूये**=घालितो

**४ मतभेद**—वरील प्रतिपादनावरून ज्ञानेश्वराचें असे म्हणणे दिसते की, भगवानाचे व्याख्यानात भर घालू पाहणें, म्हणजे टिटव्यानें चोचभर पाण्याने समुद्राचे पाण्यात भर घालू पाहण्यासारखेंच आहे. टिटवीनें समुद्र आटविण्याचा खटाटोप केल्याबद्दल प्रसिद्ध असलेल्या कथेशी येथें मुळीच सबध नाही त्या कथेंत समुद्राचा एक प्रकारें प्रतीकार कर्तव्य होता. येथें भगवदुक्तीचा एक

प्रकारें सहकार आहे विजेचा दिवा लागला असता, तेथें कंमिटींचे कंदिलाची जी किंमत, तीच भगवद्गीता असताना ज्ञानेश्वरीची; असा अभिप्राय ग्रंथकाराचा दिसत आहे प्रस्तुत ओवीचे भाषांतरात बहुतेक प्रतीत 'समुद्र अटविणें' असा अर्थ ग्रथित आहे, तो कितपत उपपन्न होतो, हें सुज्ञानीच ठरवावें.

५ **विनंति**—सुज्ञाना उपदेशणे, ज्ञान सागणें हा एक अपराध व गीतार्थ विवरू पाहणें हा दुसरा. या दुसऱ्याला अनुलक्षूनच टिटव्याची उपमा आली आहे, करिता प्रस्तुतातील भगवान, गीता, ज्ञानदेव व **ज्ञानेश्वरी** याची उपमानें क्रमानें सागर, सागरोदक, टिटवा, **चोचभर पाणी** ही आहेत. येथें सागराचें उपमेय साधुजन हें बरोबर दिसत नाही, हें उघडच आहे. या येथें दिलेल्या अर्थाचा विचार सुज्ञ सहृदयपणें करून आपलें यथास्थित मत कळवितील अशा आशेनें हा लेख सपवितों.

---

## लेख २

# ज्ञानेश्वरींतील माझ्या शंकेवरील आक्षेपास उत्तर.

### १ चर्चोपयुक्त ओव्या.

**हें अनावर न विचारितां । वायांचि धिंवसा उपनला चित्ता ।**
**एरवीं भानूतेजीं काय खद्योता । शोभा आथी ? ॥**
**कीं टीटिभू चांचूवरी । माप सूये सागरीं ।**
**मी नेणतु त्यावरी । प्रवर्तें येथ ॥ ६८ ॥** अध्याय १

२ **पूर्वानुसधान**—( १ ) माप सूये सागरी याचा अर्थ समुद्रात पाणी टाकी, असा आहे, व ( २ ) टिटव्याची गोष्ट येथें लक्षित नाही रा. कानिटकर लिहितात—( १ ) टिटव्याची गोष्ट येथें लक्षित असलीच पाहिजे, व ( २ ) आप सूये सागरी । असा पाठ असता तरच मदरहू गोष्ट लक्षित नाही, असें म्हणता आलें असतें.

**प्रास्ताविक**— येथें तीन गोष्टीचा विचार कर्तव्य आहे, त्या ह्या, सदर्भ, शब्दबंध ( wording ) व लोककथा पैकी ( १ ) संदर्भ मी गीतार्थ विशद करूं पहात आहें, पण हें कृत्य सूयप्रकाशात काजव्यानें चमकू पहाणें यासारखें

आहे, ( २ ) शब्दबंध–टिटिभू चोंचभर माप (=चोंचीनें परिमित पाणी) समुद्रात टाकितो; (३) लोककथा–टिटव्यानें समुद्र आटविण्याचा प्रयत्न केला.

**४ संदर्भ व लोककथा**— येथें संदर्भ व शब्दबंध याची एकवाक्यता आहे. पण लोककथा निराळीच आहे. अशा स्थितीत बदल झाला तर तो कशात होईल ? अर्थात् लोककथेंत प्रस्तुताचें विशदीकरण किंवा पोषण करण्याकरिता दृष्टात येणार. अर्थात् तो प्रस्तुताशी संवादीच असणार तसाच त्याचा अर्थ असला पाहिजे. सूर्य व खद्योत या दृष्टातानें, भगवतानी केलेल्या कर्मयोगाचे व्याख्येंत माझ्यासारख्यानें भर टाकूं पहाण्याचा वेडेपणा–या प्रस्तुतार्थाचें पोषण होतें. तसेंच टिटवा–समुद्र या दृष्टातानें झाले पाहिजे. गीतारूप व्याख्येंत मी भर टाकणार कसा ? जसा टिटवा ( आपल्या चोंचभर पाण्याने ) समुद्रात भर टाकणार तसा. माझा प्रयत्न वृथापोषक किंवा पुनरुक्त आहे, विरोधी नव्हे. काजवा सूर्यास विरोध करीत नाही, त्याच्या तेजाचे वृथापोषण करू पहातो. तसा टिटवा समुद्राशी विरोध करीत नाही, त्याचे पाण्यात वृथा भर टाकू पहातो. येथें प्रस्तुत प्रयत्न पुनरुक्त, तसाच काजव्याचा व टिटव्याचाही घेतला पाहिजे ही पुनरुक्तता समुद्राचें पाणी आटवूं पाहण्यानें साधणार की त्यात भर टाकूं पहाण्यानें साधणार ? अर्थात् भर टाकूं पाहण्यानें

**५ शब्दबंध व लोककथा**–‘चाचूवरी माप मागरा सूये’ याचा स्पष्ट अर्थ चोंचीनें पाणी समुद्रात टाकितो, असा असताना केवळ लोककथा विरुद्ध म्हणून शब्दबंधाचा अर्थ लोककथानुवर्ती करावा काय ? शब्दबंधाकरिता लोककथा किंवा दृष्टान्त पोषक होईल असा घ्यावा, की लोककथा कायम ठेवून तदर्थ शब्दबंधार्थच निराळा करावा ? छत्रीनें डोक्याचें रक्षण करण्याकरिता त्याचेवर रहावें, की छत्री वाऱ्यानें जाईल तिकडे डोक्यानें जावें ! प्रस्तुत व शब्दबंध याकरिता दृष्टात की दृष्टान्ताकरिता प्रस्तुत व शब्दबंध ? कोणीही दुराग्रहशून्य मनुष्य शब्दबंधानुरूपच दृष्टात घेईल हें उघड आहे.

**६ कवीवर दोषाची आपत्ति**—लोककथेचा दृष्टात द्यावयाचा तर त्या दृष्टान्ताचा शब्दबंध प्रस्तुतार्थाचे पोषणास अनुकूल असाच पाहिजे पाणी समुद्रातून काढी, अशा अर्थाचे शब्द इष्ट असताना, कवीनें ‘पाणी समुद्रात

टाकी ' अशी शब्दरचना केली,-असे म्हणण्याचा अर्थ काय होतो ? कवीचे पदरी याने अप्रयोजकपणा येत नाही काय ? तसा दोष कवींचे पदरी बाधण्यापेक्षा संपादकानें लोककथाच निराळी घेणे इष्ट नाही काय ? चाचूवरी आप सूये सागरी-याचा अर्थ रा. कानिटकर ' पाणी टाकिते ' असा कबूल करतात, मग आपचे जागी माप घेतल्याने सूये म्हणजे काढी व सागरी म्हणजे सागरातून अशी अर्थान्तरे कशी संभवणार ? ' सागरी माप सूये ' याचा अर्थ सांगण्यास जर ज्ञानेश्वर येत नाहीत, तर त्याचा विवक्षित अर्थ संदर्भ व शब्दबंध यावरूनच निघणार, तोच त्यानाही विवक्षित असणार निराळी विवक्षा त्याची असती, तर तशी रचना करण्यास ते समर्थ होते. अर्थात् त्याची शब्दरचना जो अर्थ सांगते तोच आपण मान्य केला पाहिजे कारितां सागरी म्हणजे समुद्रात, सूये म्हणजे टाकी, असाच अर्थ प्राप्त होतो

**७ लोककथेचीं रूपांतरें**—( १ ) पंचतंत्रात टिटवा समुद्राचें पाणी आटविण्यास तयार झाला, पण गरुडाचे मध्यस्थीनेंच त्यास शेवटीं पिलें मिळाली अशी कथा आहे, ( २ ) रा. कानिटकर सांगतात समुद्र आटविता आटविता टिटवा मेला. यापैकी, घेणेच तर कोणते रूपांतर घ्यावें ? ' मला गुरूचे कृपेनें अंगीकृत गीताव्याख्येंत यश येणार, की, मी प्रयत्नात अपेशीच मरणार ?' या दोहोंतून ज्ञानेश्वराचा अजमास काय असणार ? त्याची मनीषा काय असेल बरें ! गीताव्याख्या सुदुष्कर असली तरी मला गुरुकृपेनें तीत यश येणार असाच त्याचा विश्वास असला पाहिजे अशा स्थितीत दृष्टान्ताला कथा घेतलीच तर ती पंचतंत्रगत घेणे उचित, की रा. कानिटकर यानी दिलेली घेणें उचित, याचा विचार सुज्ञानीच करावा रा. कानिटकर आपल्या कथारूपास ग्रंथाधार दाखवितील काय ?

**८. लोककथा व लोकसमज**—लोककथा असेल तसाच लोकसमज किंवा लोकसमज असेल तशीच लोककथा असली पाहिजे, अशी अपेक्षा करणेंही योग्य नाही. ग्रंथकार आपले सोईप्रमाणें दृष्टातास किंवा प्रकृतपोषणास एखादी कथा घेईल, लोकसमज घेईल किंवा दुसरें काही स्वयंसत्यही घेईल. ' मुंगी उचली ब्रह्मांडगोळा ' इत्यादि ठिकाणी एखादी कथा मानण्याचें कारण नाही. ' मुंगीनें जग उचलल्याचें कोणत्या कथेत वर्णिलें आहे ! ' असा प्रश्न योग्य नाही. मुंगीचा प्रयत्न उघड उघड वेडगळ आहे. ही नुसती कल्पनाच

प्रकृतपोषणास पुरेशी आहे टिटव्याने समुद्रात भर टाकणें, ही गोष्टही याच न्यायानें पुनरुक्त अथवा वेडगळपणाची आहे तिचा एखाद्या कथेशी संबध असलाच पाहिजे असा आग्रह धरण्याचें कारण नाही असली विधाने ( SELF-EVIDENT ) स्वयंसिद्ध म्हणून घेण्यास हरकत नाही, उलट, त्यात एखाद्यास कथेचा समर्पक आधार सापडल्यास ती कथाही दृष्टांतभूत होण्यास हरकत नाही. साराश, स्वयंसिद्ध गोष्टीस कथा पाहिजेच असा आग्रह धरू नये कथा कधी कधी लोकसमजाचे विरुद्धही असते

* **कृतमपि महापकारं फणीव पीत्वा निरातङ्कः।**
**प्रत्युत हन्तुं यतते काकोदरसोदरः खलो जगति ॥**

या लोकसमाजात सर्प दूध पाजणारावरही उलटतो असें आहे; तर ब्राह्मणभुजगमयो. या कथेत सापानें प्रत्युपकारार्थ दूध पाजणाऱ्या ब्राह्मणास रत्नें दिल्याचे सागितलें आहे साराश, लोककथा, लोकसमज व स्वयंसिद्ध गोष्टी यापैकी वाटेल त्याचा उपयोग कवी आपल्या ईप्सिताप्रमाणें स्वमतप्रतिपादनार्थ करण्यास स्वतंत्र आहे करिता त्याचें मनोगत त्याचे शब्द-बंधातच पाहिले पाहिजे, त्यास लोककथेचा लगाम घालण्याचें कारण नाही.

---

## ५. एक उपयुक्त पाठभेद.

( १ ) रा. भाडारकराचे पहिले संस्कृतपुस्तकात पुढील श्लोक आढळतो.

**यथा फलानां पक्वानां नान्यत्र पतनाद्भयम् ।**
**एवं नरस्य जातस्य नान्यत्र मरणाद्भयम् ॥ १ ॥**

—रामायण २–१०५–१७.

हा श्लोक रामायणात आहे. रा वैद्य यानी आपल्या ग्रथात निवडक सुभाषितातही घेतला आहे. याचा अर्थ मात्र चागला लागत नाही, असे मला वाटतें.

( २ ) पिकलेल्या फळाला नासण्याचे, पक्ष्याकडून टोचले जाण्याचे, कीड लागण्याचे, मुलाचें हातून दगडाचा प्रहार सोसण्याचे, अशी अनेक भयें असतात त्याप्रमाणेच मनुष्यासही रोग, अपकीर्ति, द्रव्यनाश, आप्ताचा शोक

---

* केलेला मोठाही उपकार सापाप्रमाणें पचवून, सापाचा भाऊच असलेला दुष्ट मनुष्य उपकार करणारास उलट निःशंक मनाने मारूं पाहतो.

इत्यादि अनेक प्रकारचें भय नित्य सनिहित असतें. एवच मरणाशिवाय इतर भयें मनुष्यास नाहीत, असें नाही

एवढेंच नव्हे–दुर्लौकिकाचे भयाने अनेक वेळा मरणही मनुष्यास इष्ट वाटतें. वचनभग टाळण्याकरिता दशरथानें प्रिय पुत्रास वनात पाठवून मरण पत्करिलें.

साराश–मरणावाचून दुसरे भयच नाही, किंवा मोठे भय नाही, हें म्हणणें व्यवहारविरुद्ध आहे. पुढील श्लोकातही या व्यवहाराचा अनुवाद आहे

**उत्थायोत्थाय बोद्धव्यं महद्भयमुपस्थितम्**
**मरणव्याधिशोकानां किमद्य निपतिष्यति ?॥** हितोपदश.

या श्लोकात मरणाचे पक्तीस रोग व आप्तनाश यास बसविलें आहे, तेव्हा रामायणातील उपमानविधान व उपमेयविधान ही दोन्ही अवास्तव आहेत हें उघड आहे

( ३ ) वरील श्लोक पाठभेदानें पालीभाषेंत 'दसरथजातकात' पुढील-प्रमाणें आढळतो—

**फलानमिव पक्कान**
**निच्चं पपतना भयम् ।**
**एवं जातानं मच्चानं**
**निच्चं मरणतो भयम् ॥**

या श्लोकात पिकलेल्या फळाला झाडापासून तुटून पडण्याचा, व मनुष्यास मृत्युवश होण्याचा, प्रसग केव्हा येईल याचा नेम नाही, ही सर्वसमत गोष्ट सागितली आहे. हा श्लोक अर्थाचे बाबतीत सर्वास तेव्हाच पटण्यासारखा आहे पालीभाषेच्या व्याकरणातील अव्यवस्थितपणाप्रमाणें, वरील श्लोकात छंदःशास्त्राचा अव्यवस्थितपणा दिसून येतो 'सर्वत्र लघु पंचमम्' हा अनुष्टुभ् श्लोकाचे लक्षणातील भाग तृतीय चरणात उल्लंघित आहे, त्यात विशेषतः तो चरण नीट म्हणताही येत नाही.

( ४ ) असो, वरील प्रतिपादनावरून रामायणातून, किंवा ( संस्कृत श्लोक मूळ दुसऱ्या ग्रथातील असेल तर ) दुसऱ्या एखाद्या संस्कृत ग्रंथातून 'दसरथजातकात' वरील श्लोक घेतला असावा, कारण एका श्लोकावरून दुसरा श्लोक ग्रथित करिताना भ्रांतिमूलक अर्थाचे जागी सर्वसमत अर्थ येणेचा जास्त

संभव आहे रामायणातील अर्थापेक्षा दसरथजातकातील अर्थ शिष्टसमत सास आहे. यावरून रामायणानंतर 'दसरथजातक' लिहिले असावें असे अनुमान निघतें.

(५) स्वतन्त्ररीत्या प्रस्तुत पद्याचा योग्य पाठ साधणें तर तो जातकातील पाठानुसार असा साधावा—

**यथा फलानां पक्कानां नित्यं प्रपतनाद्भयम् ।**
**तथा नरस्य जातस्य नित्यं मरणतो भयम् ॥**

---

## ६. पंचगव्यप्राशनमंत्र.

आपले पत्री माझे मित्र रा पोतदार यानी एका श्लोकाचा अर्थ, शुद्ध पाठ सुचवून, दिला आहे त्यानी केलेली दुरुस्ती तर इष्ट आहेच, पण त्यात आणखीही एक जरुर आहे 'यत्त्वगस्थि' या श्लोकात 'दहति' हें क्रियापद आहे. हें वर्तमानकालवाचक आहे अशा रूपानें दोन प्रकारचा काल लक्षित होतो (१) तत्काल, वा (२) सर्वकाल पैकी 'तत्काल' हा अर्थ घेणें वस्तुस्थितीचे विरुद्ध आहे, कारण दोषाचें शोधन होणें हें प्राशनानतर सभवनीय आहे, व हा श्लोक प्राशनाचे पूर्वी म्हणतात दुसरा 'सर्वकाल' हाही अर्थ येथें समर्पक नाही, कारण पचगव्यप्राशनानें होणारी शुद्धि, केवळ प्रस्तुत प्राशकाचेच पुरती नसून, ती जो कोणी पचगव्य पिईल त्यासही साधारण आहे; व श्लोकात तर 'मामके देहे' ही पदे विद्यमान आहेत सर्वसाधारण सिद्धांत असून तो एकाचेच शरीरापुरता ग्राह्य धरण्यानें विधानाचा अवास्तव सकोच होतो, म्हणजे विधान अव्याप्तिदोषास पात्र होते करिता येथे वर्तमानकालाचा प्रयोग न करिता, आज्ञार्थाचा प्रयोग करणें इष्ट आहे. (१) यानें छदोभग तर होत नाही, शिवाय (२) प्रार्थित व्यक्त करण्याकडे याचा उपयोग सर्वसमत आहेच "..तन्मे रोगाश्च शोकाश्च नुद गोमय सर्वदा ।" यातील गोमयास उद्देशून केलेला 'नुद' हा प्रयोग प्रार्थनेचा वाचक आहे. "अपक्रामन्तु भूतानि" इत्यादि या मन्त्रातील पहिल्या पदात इच्छा प्रदर्शित आहे, व तें पद आज्ञार्थी क्रियापद आहे अशा रीतीनें प्रस्तुत श्लोक—

**"यत्त्वगस्थिगतं पाप देहे तिष्ठति मामके ।**
**प्राशनं पंचगव्यस्य दहत्वग्निरिवेन्धनम् ॥ १ ॥**

असा म्हणणें योग्य दिसले.

# ७. गीतेंतील एक पाठभेद.

भगवद्गीतेंतील अंतिम श्लोक १८–७८ याचा पाठ शंकराचार्यांच्या मतें

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥**

असा आहे, तर काही इतर लोकांच्या मतें यांतील उत्तरार्ध

**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवाणीति मतिर्मम ।**

असा आहे डॉ बेल्वलकर यांनीही उत्तरोक्त पाठच स्वीकारला आहे हें त्यांच्या भाषांतरावरून स्पष्ट दिसतें

प्रस्तुत दोन पाठांची तुलना—

( १ ) **वस्तुदृष्ट्या**—कृष्ण व अर्जुन यांचा म्हणजे पर्यायानें युक्ति व शक्ति यांचा जेथें संगम होईल तेथें नीति ( म्हणजे व्यवहारपाटव ), पैसा, विजय ( किंवा यश ), व ऐश्वर्य ही असणार हे उघड आहे येथील चार वस्तूंपैकी इतर तीन वस्तू नीतीवर अवलंबून असणार, हें स्पष्ट दिसतें. ऐश्वर्य अस्थिर असतें, तें नीतीच्या बंधनानेंच स्थिर होतें. सारांश शक्ति–युक्तीच्या संगमानें लाभणाऱ्या वस्तुसमुच्चयांत अपेक्षित वस्तूस आधारभूत म्हणून नीतीस स्थान अवश्य आहे. यावरून ध्रुवाणीति याचे स्थानी ध्रुवा नीतिः हाच पाठ युक्त दिसतो.

( २ ) **व्याकरणदृष्ट्या** - उत्तरार्धामध्यें उत्तरोक्त पाठ घेतल्यास 'ध्रुवाणि' हें विशेषण आढळतें याचें विशेष्य कोण ? श्रीः विजयः व भूतिः ही विशेष्यें व्हावी. येथें प्रश्न असा की, विशेष्य व विशेषण यामध्यें साधर्म्य कां नसावें ! विशेषण नपुंसकलिंगी तर विशेष्यें तद्भिन्नलिंगी आहेत. वचनाची गोष्टही अशीच. विशेषणाचें बहुवचन, तर विशेष्याचें एकवचन. यांतील उघड दिसणारा वचनविसंवाद विशेष्याकडे समुच्चयानें पाहिल्यास परिहृत होतो. ध्रुवाणि हें श्री इत्यादि कोण्या एकट्या नामाचें विशेषण नसून त्याच्या समुच्चयाचें आहे. या समुच्चयांत दोहोंहून अधिक घटक असल्यानें त्याच्या विशेषणाचें बहुवचन युक्तच आहे.

परंतु लिंगाची गोष्ट अशी नाही येथें विशेष्यें भिन्न लिंगाची आहेत. पण त्यांत नपुंसकलिंग एकही नाही. व्याकरण असें सांगतें की, भिन्नलिंगी नामाचा

समन्वय असल्यास, अशा नामाचें विशेषण पुलिंगी असावें; मात्र या समन्वयात नपुंसकलिंगी नाम मुळीच नसेल तर अशीच स्थिति येथें आहे श्री, भूति स्त्रीलिंगी, तर विजय पुंलिंगी यामुळें या तिहींचें विशेषण पुलिंगीच पाहिजे. ध्रुवाणि असें नपुंसकलिंगी शुद्ध नाही या नामात नपुंसकलिंगी नाम नसल्यानें 'एक Neuter, सब Neuter' हा नियम येथे प्रवृत्त होत नाही.

यावरून वस्तुदृष्ट्या सामान्यतः, व व्याकरणदृष्ट्या विशेषतः, ध्रुवा नीतिः हाच पाठ योग्य दिसतो

थोडा अवांतर विचार—

( ३ ) ध्रुवा याचे विशेष्य भूति. व नीति. यापैकी कोणतें समजावें ? या दोहोंचा विचार केल्यास भूतिः किंवा श्री चचल दिसते, नीति तशी नाही. एखादा मनुष्य कालपर्यंत नीतिमान् होता, तेव्हां तो आजहि तसाच असणार; असें आपण समजतों नीति ही वारंवार बदलत नसते. याच्या उलट जो मनुष्य काल सपन्न असेल तोच आज निधनही असूं शकेल धनाच्या जाण्या-येण्यास अवधि फारच थोडा पुरतो साराश युक्तिशक्तीनी संपन्न असलेला मनुष्य नीतिमान् व श्रीमान् आहे असें कळल्यावर ऐकणारास शंका आलीच तर त्याच्या संपत्तीच्या शाश्वतीविषयी येईल, नीतीच्या शाश्वतीविषयी येणार नाही करिता येथील ध्रुवा हें विशेषण ऐश्वर्यालाच म्हणजे भूति या पदाला विशेष आवश्यक आहे यावरून ध्रुवा हें विशेषण नीति याशी न जोडितां भूतिः या पूर्वपदाशीच जोडावें

( ४ ) कदाचित् कोणी आग्रहच धरिल्यास, प्रस्तुत विशेषण मध्यगत असल्यानें तें दोन्ही पदाबरोबर घ्यावें. आणखीही एक सोय येथें शक्य आहे. प्रस्तुत भागाचा पदच्छेद ' ध्रुवाः नीति. ' असाही सभवेल असा घेतल्यास चारी नामाचे ध्रुवाः हें सामुदायिक विशेषण होईल

( ५ ) ध्रुवा हें विशेषण जर भूतिः पदाबरोबर घेणें योग्य, तर पद्यरचना तद्विरुद्ध का ? ' ध्रुवानीतिर्मतिर्मम ' असा चतुर्थ चरण असल्यानें रचनादृष्ट्या नीति हें विशेष्य उचित दिसतें.

या शंकेचें समाधान—पद्यरचना, संस्कृतातील असल्यामुळें ती कितीही सोपी झाली तरी, कृत्रिम आहे, हें अमान्य करितां येत नाही.

या पद्यदोषामुळें कवीला वृत्तरचना कधी कधी आपल्या मताविरुद्ध करावी लागते यासंबधात हें पद्य पहा—

**आपदर्थे धनं रक्षेत् दारान्रक्षेत् धनैरपि ।**
**आत्मानं सततं रक्षेत् दारैरपि धनैरपि ॥**

यात पूर्वार्धात स्त्रीची महती धनाहून अधिक सांगितली आहे. अर्थात् उत्तरार्धामध्येंही तिचा भंग करणें उचित नाही असे असून पद्यरचना सांगते की, स्वताच्या प्राणाकरिता प्रथम स्त्रीचा बळी द्यावा, त्यानें न भागल्यास मग पैसा सोडावा. हें मत पूर्वांशी विरुद्ध असल्यानें मुळीच कविसंमत नाही हें उघड आहे येथें कवीच्या हातून स्वतास अनभिमत अशी शब्दरचना केवळ वृत्तबध साधण्याकरिता झालेली आहे या उदाहरणावरून 'ध्रुवा नीतिः' यातील विशेषणही पूर्वचरणगत भूति. याला लावण्यात काही दोष नाही सारांश, वस्तुस्थिति, व्याकरण व पद्यरचना याचा साकल्यानें विचार केल्यास ध्रुवा नीतिः हाच पाठ योग्य ठरतो

---

# भाग २

## व्युत्पत्ति.

### १. अकरा व सत्तर ( व्युत्पत्ति ).

१ **भारत**-इतिहास-सशोधक मडळाचे काही निबध सागश रूपानें केसरीत दिले आहेत त्यातील काही मुद्द्यांच्या ग्राह्यत्वाविषयी सशय येतो तो विद्वानापुढें निरसनार्थ माडीत आहे निबधातील मुद्दे ( १ ) अकरा हा शब्द 'एकापरदशन्' यावरून निघाला आहे ( २ ) तो 'एकादशन्' पासून निघतच नाही ( ३ ) सत्तर हा शब्द 'सप्तृ' या ( काल्पनिक ) शब्दापासून बनला आहे

२ या मुद्द्याचा विचार ( १ ) 'एकापरदशन्' हा शब्द कधी काळी रूढ होता काय? का केवळ मराठी शब्द बनविण्याकरिता उत्पन्न केला? ( २ ) ( वसु-द्वादशी ) वसुबारस, ( धनत्रयोदशी ) धनतेरस, हे शब्द अनक्षर लोकांचे प्रचारात आहेत. यात, उघड उघड, द्वादशी यावरून बारस, व त्रयोदशी यावरून 'तेरस'-हे अवयव साधले आहेत 'रस' हा भाग दशी,-दश याचा अपभ्रश आहे ( उद्धृत ) उद्धट, ( स्थानन् ) ठाणे, ( दश ) डास, इत्यादि शब्दावरून तोष्टु. म्हणजे त-वर्गाचे जागी मराठीत ट-वर्ग येतो, असा नियम निघतो यावरूनच **दश** याचे जागी '**डस**' होतें कोकणात शूद्रलोक घोगडी याचा उच्चार घोगरी असा करितात, घोडा हा शब्द घोरा असा उच्चारलेला अनेक वेळा ऐकू येतो अशाच उच्चारप्रवृत्तीनें ( दश ) 'डस'-याचे जागी '**रस**' येणे असभवनीय नाही सारांश, 'एकादश' सारख्या शब्दात 'दश' चे स्थानी 'रस' हे सिद्ध होतें. ( लोहकार ) लोहार, ( भाडागार ) भाडार, ( सूचि ) सुई, ( कुटज ) कुडा वगैरे शब्दाचे साधनिकेवरून 'अनुष्मणोऽनादौ लोपः' म्हणजे शब्दारभी नसलेल्या श-ष-स-ह-भिन्न व्यजनाचा लोप होतो, या नियमाने स लोपून 'रस'-चे जागी 'रा' येणें शक्य आहे 'पारद' यातील 'रद' याचे जागी 'रा' येऊन पारा शब्द झालेला आहेच या सरणीनें ( 'एका' चे जागी

'अक' येऊन व जग, मन वगैरे शब्दावरून सिद्ध होणाऱ्या अंत्य व्यजन लोपाऱ्या बहुतर प्रचारावरून ) एकादशन् यावरून अकरा शब्द झाला, असें मानिता येणार नाही काय? कदाचित् कोणी शूद्रानें एखाद्या शास्त्र्यापासून 'वसु–द्वि--अपर--दशी' सारखा कृत्रिम शब्द मिळवून, त्यावरून वसु--बारस हा साधिला असल्यास माझे काहीच म्हणणें नाही

३ त्रि+दशन् या सयोगाने जसा '१३' चा वाचक त्रयोदशन् हा शब्द होतो, तसाच '३०' चा वाचक त्रिदश हाही होतो याचप्रमाणें सप्त+दशन सयोगावरून सतरा व सत्तर या दोघाचेही पर्याय का निघू नयेत? आता 'सत्तर' याची व्युत्पत्ति बाजूचे दशक--साठ व ऐशी--याच्याहून भिन्न आहे, पण असा पंक्तिभेद काही अपूर्व नाही. इग्रजी-तही First, Second व Third या शब्दापैकी मधला लॅटिन् भाषेतून आला आहे व कडेचे देशज आहेत करिता 'सत्तर' याचे व्युत्पत्तीसाठी काल्पनिक शब्द बनविण्याची जरूरी दिसत नाही

---

## २. "आटपाट" शब्दाची व्युत्पत्ति.

**१ प्रस्ताव**—विविधज्ञानविस्ताराचे जानेवारीचे अंकात 'अट्टपट्ट' या सामासिक पदाचा 'अट्टाश्च पट्टाश्च यस्मिन् तद्' असा विग्रह करून त्याचा अपभ्रंश 'आटपाट' मानिला आहे, व त्याचा अर्थ "विस्तृत आणि सपन्न, टोलेजग" असा दिला आहे या व्युत्पत्तीत पुढील दोष आढळतात—

( १ ) प्रथम ऐकताक्षणीच 'आटपाट' हे विशेषनाम, अर्थात् विशेषण नसून नाम, असावे असे वाटतें पण येथें विशेषण मानिले आहे

( २ ) 'आणि' ह्या अध्याहृत अव्ययानें दोन शब्द जोडून, त्या दोहोंनी विशिष्ट वस्तु, असा तद्घटित समासाचा अर्थ मानावा लागतो, पण असा समास व्याकरणात तर नाहीच, पण रूढीतही नाही उदाहरणार्थ—'झारा कलथा' म्हणजे आचारी, 'मीठमिरची' म्हणजे वाणी, दगडमाती म्हणजे इमारत, असे अर्थ आढळत नाहीत 'तांबोळी' ह्यास 'पान–तबाखू' हा शब्द न लाविता 'पानतबाखूवाला' असा लाविता येईल

साराश, जो शब्द मूळचा द्वन्द्व समास असेल त्याचा अर्थ बहुव्रीहीसारखा केलेला आढळत नाही. बहुव्रीहि समासाची उदाहरणें पहाता 'नीलकंठ'

'मूषकवाहन,' इत्यादिकामध्यें दोन पदाचा संबंध 'विशेषण-विशेष्य' किंवा 'उद्देश्य-विधेय' असा उपलब्ध होतो, परंतु समुच्चयसहघटक असा आढळत नाही करिता याची व्युत्पत्ति निराळी असून ती पुढीलप्रमाणें असावी असें मला वाटतें

**२ व्युत्पादन**—'अट्टविशिष्ट पट्टम् = अट्टपट्टम्' असा उत्तरपदलोपिन् तत्पुरुष समास मानून, तो नाम समजावा, व त्याचा अर्थ अट्ट म्हणजे 'माड्या' यानी युक्त नगर असा करावा. यांतील पूर्वपद वस्तूचा बोध करिते, उत्तरपद ग्राम इ. स्थानाचा वाचक आहे, तर संपूर्ण शब्द 'पूर्वपदाने बोधित वस्तूने विशिष्ट गाव' असा अर्थ व्यक्त करितें

'अट्ट' याचा अर्थ 'माडी' असा 'नरेंद्रमार्गाट्ट इव प्रपेदे विवर्णभावं स स भूमिपालः' (रघुवंश ६-६७) इत्यादि ठिकाणी आहेच. 'पट्ट' याचा अर्थ नगर असा आहे हा आपटे याचे कोशात असून शिवाय 'नागपाडा,' 'जांभुळपाडा,' इत्यादि नावांतील उत्तरावयव या 'पट्ट' शब्दाचा अपभ्रंश दिसतो. यावरून 'मोठमोठ्या हवेल्या असलेले नगर' असा अट्टपट्ट या शब्दाचा अर्थ ठरतो अशाच धर्तीवर 'मच्छलीपट्टण' 'फत्तेपूर' 'अंबेगाव' 'श्रीनगर' इत्यादि विशेषनामें बनली आहेत 'पाट' या उत्तरावयवाचा अर्थ नगर असल्यानें 'आटपाट नगर' या शब्दसंघातील 'नगर' पदानें त्याची द्विरुक्ति होत असली तरी ती दोषास्पद नाही 'P E परीक्षा,' 'सह्याद्रि पर्वत,' 'नागपूर शहर' इत्यादि शब्दप्रयोगांत अशी द्विरुक्ति आढळते. हल्लीच्या काळीही पुष्कळ आख्यायिका 'भोजराज व कालिदास' याचे नावावर लादण्याचा किंवा 'रामदासाचे' माथी मारण्याचा त्या विभूतींच्या आदरातिशयामुळे प्रचार आहे उज्जयिनी शहराचे नावावरही पुष्कळ दंतकथा विकतात अशाच धर्तीवर काहण्यातून अट्टपट्ट या नगराची योजना झाली असल्याचा संभव आहे तसें असल्यास तें विशेषनामच मानिता येईल. 'लोहगड किल्ला होता, त्यावर एक सरदार होता' इत्यादि प्रकारानें आजही एकादी गोष्ट आरंभिता येईल. या ठिकाणी 'लोहगड' हें विशेषनाम आहे, तसें 'आटपाट' हेंही असेल 'मनी' म्हणजे मांजरी, 'राघू' म्हणजे म्हणजे पोपट, 'Bruin' अस्वल, इत्यादि ठिकाणी विशेषनामे सामान्यनामत्व पावली आहेत. याच धर्तीवर आटपाट हें नावही वाटल्यास सामान्यनाम मानावें.

'सज्ज' याचें रूपांतर 'साज', 'घट्ट' याचें 'घाट', या धर्तीवर 'अट्टपट्ट' याचें 'आटपाट' हें रूपांतर उघड आहे

---

## ३. 'आठवडा' शब्दाची व्युत्पत्ति.

'आठवडा' शब्दाचे व्युत्पत्तीसंबंधानें 'लोकशिक्षण' मध्यें चर्चा चालू आहे माझे मत 'आठवडा' हा शब्द अष्टवार यापासून साधण्याचा प्रकार प्रथमोपस्थित, स्वाभाविक व यथार्थही आहे तो येणेंप्रमाणें—

( १ ) **वर्णदृष्ट्या विचार**—

'अष्टवार' यातील अक्षरांचे जागी 'आठवडा' ही अक्षरें आली आहेत.

( अ ) 'मशरः खयो द्वितीय.' म्हणजे श्, ष्, स् यांपैकीं कोणाचाही प्रथम किंवा द्वितीय वर्ग्याशीं संयोग झाला असल्यास, त्या संयोगाचे जागीं द्वितीय वर्ग्य येतो, जसे पश्चात्–पिच्छा, शुष्क–सुखा, स्थान–ठाणें, बाष्प–वाफ, स्तर–थर, याप्रमाणे 'ष्ट' चे 'जागी 'ठ' आला

( क ) 'संयोगावयवलोपे पूर्वस्य दीर्घः' संयोगातील म्हणजे जोडाक्षरातील अवयवाचा लोप झाल्यास पूर्वस्वरास दीर्घत्व येतें, जसें पर्ण–पान, चक्र–चाक, पिच्छ–पीस, कुड्य–कूड या नियमानुसारें 'अ' चा 'आ' होऊन 'अष्ट' चें 'आठ' झालें

( ख ) 'डलौ रस्यानादौ' प्रथमेतर अक्षरांतील 'र' चे जागी 'ड' किंवा 'ळ' येतो, जसे—अन्त्र–आतडें, शिरस्–शीड, हरिद्रा–हळद, संभार–सांभाळ यावरून 'र' चे स्थानीं 'ड' येतो 'मोडी' ( लिपी ) हा शब्दही 'मत्स्य' चें 'मत्सी' या धर्तीवर, 'मौर्य' चे 'मौरी' असें रूप होऊन, पुढे मोरी–मोडी अशा क्रमानें साधला आहे

( ग ) संस्कृतांत 'वाट' हा शब्द 'आळी' ह्या अर्थी आहे. 'प्राच्यवाट-कुक्कुट' ( पूर्वेच्या मोहोल्यातील कोंबडा ) असा उल्लेख 'दशकुमारचरितात' चरणायुधाच्या झुंजीसंबंधानें आला आहे हा 'वाट' शब्द 'महार–वडा' या शब्दांत 'वडा' या रूपानें मराठींत आढळतो, त्याचेच धर्तीवर 'वार' चे जागी वाड–वडा असें रूप प्राप्त होतें

अशा रीतीनें वर्णदृष्ट्या 'अष्टवार' याचें रूपान्तर 'आठवडा' हें सिद्ध होतें.

**( २ ) अर्थदृष्ट्या विचार—**

संस्कृतांत ' दोला ' शब्द झोपाळ्याचा वाचक आहे, जसें--' अनुभवन्नवदोलमृतूत्सवम् ' ( रघु० ९--४४ ) हा शब्द मराठीत 'ताबुताचे ' अर्थी ' डोला ' या रूपानें प्रचारात आला आहे. तेव्हा मूळ अर्थ ' झोपाळा ' हा व्यक्त करण्याकरिता ( आदोलः- )--हिंदोळा, ( झंपा--झोप ) -झोपाळा हे शब्द रूढ झाले. असाच प्रकार प्रस्तुत प्रकरणी झाला आहे.

' सप्ताह ' हा सस्कृत शब्द मराठीत " सारखे सात दिवस भजन, पठण " इत्यादि अर्थी ' सप्ता ' या रूपानें धार्मिक गोष्टीत प्रविष्ट झाल्यानें मूळचा अर्थ ' सात दिवसाचा अवधि,' किंवा साधारणतः ' महिन्याचा चतुर्थांश,' हा व्यक्त करण्याकरिता निराळ्या शब्दाची जरूर भासली तेव्हा, सस्कृत भाषा ग्रथैकवृत्ति झाल्यावर, ' अष्ट+वार ' यावरून ' आठवडा ' हा शब्द–विशेषेकरून स्त्रियाच्या–प्रचारात आला 'वारः सूर्यादि दिवसे, वारोऽवसरवृन्दयोः ' ( अमर० ३–३–१६१ ) या महेश्वरोद्धृत कोशावरून ' वार ' याचा अर्थ दिवस असा आहे

बायका मोजताना आदि व अंत या दोहोंचेही ग्रहण करीत असल्यानें त्याच्या मोजण्यात ' सोमवार सोमवार आठ ' असे येत, अर्थात् त्याचे दृष्टीनें आठवडा याचा अर्थ आठ दिवस असा होऊं लागला. तसंच 'सोमवार सोमवार आठ, आणखी सोमवार पधरा ' अशाही त्याच्या मोजण्याच्या पद्धतीवरून ' पधरवडा ' हा शब्दही रूढ झाला, त्याचे अर्थ, ' आठ व पधरा दिवस' असे जरी मूळ असले तरी, हल्ली सामान्यतः महिन्याचे चतुर्थ व द्वितीय विभाग या दृष्टीनें 'सात दिवस' व 'पधरा दिवस' एतदर्थी ते प्रचारात आहेत.

वर दिलेला ' डोला ' हा शब्द म्लेन्छप्रभव नाही, कारण म्लेच्छ भाषेतून वस्तूबरोबर तद्वाचक ' ताबूत ' हा शब्द आला असल्यानें त्या भाषेतून त्याच अर्थी दुसरा येण्याचें कारण दिसत नाही. अशाच दृष्टीने वर आलेला ( शिरस् ) ' शीड ' हा शब्दही अवजाराशी समानार्थक असल्यानें, सस्कृतप्रभव नसेलच असें म्हणता येत नाही.

( ३ ) रा. राजवाडे यानी दिलेला ' अष्टावर्त ' हा शब्द संस्कृतांत प्रस्तुत अर्थानें कोठें प्रचारात असल्याचें दिसत नाही. शिवाय यातील समासाच्या अर्थसरणीचें आकलन विशेष दुर्घट भासतें.

# ४. आठवडा, बाजारहाट, हरताळ.

या तीनहि शब्दात सप्त किंवा सात हा शब्द अनुस्यूत आहे असें राजश्री लिमये आपल्या पत्री म्हणतात त्याचा विचार येथें करू.

१ **आठवडा** हा शब्द अष्टवार या शब्दापासून किंवा आठ व वार या शब्द-द्वयापासून उद्भवला आहे असे मी मागें १९१३ साली लिहिले होतें, तेच बरोबर आहे असें अजून मला वाटतें रा लिमये याच्या लेखात लिहिल्याप्रमाणें 'शुक्रवार–शुक्रवार आठ' या मोजणीप्रमाणे 'वाराच्या सख्येचा आठपणा' काहीशा अडाणी लोकाच्या भाषेंत सिद्ध होतो याच गोष्टीमुळे आठवडा हा शब्द सप्तदिनात्मक कालाचा वाचक बनला आहे रा लिमये याचे मत निराळें आहे सप्तन्-पासून वर्णविकाराच्या परपरेने ते हाटपर्यंत येऊन, पुढें 'आठ' वर उतरतात पण ही त्याची सरणी प्रामादिक आहे सप्तन्-पासून निष्पन्न म्हणून हाट हे रूप जरी वेळेस आपण पत्करिले, तरी त्याचें आठ हें पुढील रूपातर संभाव्य दिसत नाही कसे तें पहा

२ उत्तर–हिंदुस्थानातील लोक, अर्थात् हिंदी भाषा बोलणारे, लब्या लब्या बाता मारण्यात व तोंडाची वाफ दवडण्यात स्वभावतः पटाईत असतात हें आपण पाहतों याच्या उलट आपण महाराष्ट्रीय लोक मितभाषी असल्यानें फुढ्न तोंडाची वाफ दवडीत नाही मराठीत महाप्राणोच्चार म्हणजेच एक प्रकारचा हकारोच्चार शब्दाच्या आरभाकडे खेचला जातो, तर हिंदीमध्यें हा हकाराचा फवारा शब्दाच्या अताकडे ओढला जातो प्रस्तर, एकार्ध, सघटन या सस्कृत शब्दाची रूपातरे हिंदीत क्रमाने पत्थर, एकाध, सगठण अशी होतात. याचीच मराठी रूपातरें पाहिल्यास ती फत्तर, एखादा, सघटण अशी आढळतात. याची तुलना केल्यास असे दिसते की, हिंदी शब्दात हकारोच्चार पुढील अक्षरात आढळतो, तर मराठीत मागील अक्षरात ही ऊष्मत्वाची पश्चात्प्रवणता अथवा पीछेहाट आणखीहि पुष्कळ मराठी शब्दात आढळते

**आस्तरण**–अथरूण याचें रूपातर मुलें हतरूण असें करितात वाघ शब्द 'वहाग' असा उच्चारतात येथेंहि ऊष्मत्व मागेच जातें. कुठक, महत्, कक्षा, स्कध, युद्ध, पाश या शब्दाची मराठी रूपातरें हीच प्रवृत्ति दर्शवितात ती रूपातरें अशी–खुंटा, म्होटा (अशिक्षित लोकाच्या भाषेंत), खाक, खादा, झुंज, फास मराठी फटाका, तर हिंदी पटाखा, अशी रूपें आढळतात. या सर्व

रूपाचा विचार करता मराठीतील उष्मत्वाची प्रत्यकप्रवणता सिद्ध होते. ही प्रवृत्ति हाट याचें रूपांतर आठ असें होण्यास सर्वस्वी विरुद्ध आहे झाल्यास आठ-चें हाट असें रूप वेळेस होईल, पण हाट-चें आठ कदापि होणार नाही ओष्ठ–ओठ--होट ही परंपरा आपण पाहतोंच हाट व आठ याचा परस्परसंबंध मानला तरी त्यातील क्रम निश्चित आहे माडीवर निजलेला मनुष्य वेळेस जिन्यावरून गडगडत तळमजल्यावर येईल, पण तळमजल्यावर निजलेला पाहुणा झोंपेंत लोळत वरती माडीवर जाणार नाही साराश, आठवडा या शब्दातील आठ हें पद सप्तन् या शब्दावरून साधिता येत नाही (२) बाजारहाट या शब्दातील उत्तरावयव सप्तन् शब्दावरून उत्पादणें शक्य नाही. पट्ट–पाट या धर्तीवर बाजारवाचक हट्ट शब्दावरून हाट हा शब्द प्रवृत्त झाला आहे. क्वचित् काव्येतर संस्कृतवाङ्मयात हाट असेंहि रूप आढळतें हट्टविलासिनी हा शब्द वेश्या शब्दाचा पर्याय संस्कृतात आहे या जोडीसंबधीहि असें म्हणता येईल की, हट्ट यावरून हाट हें रूप बनले आहे, हाट-वरून हट्ट बनले नाही साराश येथेंहि हाट हा शब्द सप्तन्–वरून साधला नाही

३ (क) **हरताळ** हा शब्द रा लिमये हाट--तालु या शब्दावरून निष्पादितात, पण हाहि भ्रमच आहे 'बाजारास कुलूप' असा अर्थ या शब्दाचा असता तर तदनुरूप लावणें, ठोकणे, घालणें असें एखादें क्रियापद हरताळाचे पुढें आलं असतें तसें न येता,पाडणे हेच क्रियापद मुख्यत: येतें, निदान आरंभी तरी येत होतें हस्तलिखित पोथीतील ज्या अक्षराचा लोप करावयाचा त्याच्यावर हरताळ पाडीत असत या गोष्टीला अनुलक्षून कामधंद्याचा लोप करणें, एतदर्थक हरताळ पाडणें हा शब्दयोग मराठीत रूढ झाला आहे याच कृत्याला अलीकडे गंभीर रूप प्राप्त झालें असल्याने तदुचित पाळणें हें क्रियापदही आपण योजितों लोपावयाच्या अक्षरावर हरताळ पाडीत, व फाशतिही पैकी फासणें हे रूप लाक्षणिक अर्थानें आपण योजित नाही. गांधीदिनानिमित्त हरताळ पाडणें किंवा पाळणें, हें कानास रुचतें, तर हरताळ फासणें हें रुचत नाही. येथे कारण उघड आहे. पाडणें या धातूचा अर्थ लक्षणेच्या योगानें बदलण्यासारखा लवचीक आहे, तसा फासणें याचा नाही पाडणें यातील प्राथमिक अर्थ सहज दृष्टीआड होऊ शकेल. तसा प्रकार फासणें याचा नाही, त्याचा अर्थ लक्षणेनें बदलण्यास अनुकूल दिसत नाही यावरून दिसतें की, अक्षरलोपार्थ 'हरताळ पाडणें'

याच शब्दयोगाचा प्रयोग हल्ली आपण राजकीय कारणास्तव व्यापार ‘ बंद करणें ’ या अर्थी करितों.

( ख ) एखाद्या नामापुढें येणारा धातू त्याच्या मूळ अर्थास अनुसरूनच येतो प्रत्यक्ष क्रियेचा बोध त्यात थोडाफार दिसून येतो जोर व नमस्कार दोनही व्यायामाचेच प्रकार पण जोरास आरंभ आपण जमिनी-वरून करतो, व डोकें जोराने खाली घालून वर काढणें ही क्रिया त्यात मुख्य असते हिलाच अनुलक्षून **जोर काढणे** असा शब्दयोग आपण योजितों. उलट सूर्यनमस्कारास आरंभ आपण उभे राहून करतों, व आपली पहिली क्रिया म्हणजे शरीर जमिनीवर घालणें ही असल्याने, तदनुसार **नमस्कार घालणें** असे आपण म्हणतों या दाखल्यावरून कुलूप घालणे ही क्रिया हरताळ पाडण्यात मुळात असती तर हरताळ याच्यापुढे यथापूर्वोक्त घालणे, लावणे इत्यादि धातु आला असता. पण तो तसा येत नाही यावरूनच हरताळ या शब्दाचा हाट–तालु या सामासिक शब्दाशी काहीच संबंध नाही असे सिद्ध होतें

४ सारांश, मथळ्यातील कोणत्याच शब्दाच्या उगमात सप्तन्–सात हें रूप आढळत नाही. आठवडा हा शब्द आठवार या रूपावरून, बाजारहाट यातील हाट हें पद हट्ट या शब्दावरून व हरताळ हा हरिताल अशा द्रव्यवाचक शब्दा-वरून निष्पन्न झाला आहे हें सुज्ञ वाचकाच्या बुद्धीस पटेल बाजारहाट यातील अर्थाची पुनरुक्ति अशिक्षित लोकाच्या तोंडी असलेल्या पाणीउदक या शब्दातही आढळते ब्याडबाजा हें रूपहि असेंच पुनरुक्तिगर्भ आहे

---

## ५. आपणा आर्यांच्या मूलस्थानाची जिज्ञासा ( उत्पत्तिदृष्ट्या ).

१ काही स्थानाचे नामात दिशावाचक शब्दाचा समावेश झालेला आपण पाहतों. ‘ वायव्येकडील प्रांत ’ ही संज्ञा हिंदुस्थानचे ज्या भागास आज ‘ संयुक्त–प्रांत ’ असें म्हणतात त्यास लावण्यात येत होती ही संज्ञा इंग्रजानीच दिली होती; त्याची वसाहत प्रथम बंगाल प्रांतात होती, त्यावेळी, त्याच्या वायव्यभागी असलेल्या या प्रांतास त्यानी ही संज्ञा दिली. त्यावेळी ती अन्वर्थ होती तशी ती आज नाही. कारण आज इंग्रजाचा अमल सर्व हिंदुस्थानभर पसरला आहे. हल्ली जरी या प्रांतास नवें नाव मिळालें आहे, तरी पूर्वीच्या

लेखात उपलब्ध होणारें ' वाव्यवेकडील प्रांत ' हें नाव पूर्वेतिहास केव्हांही सांगेल,किंवा निदान विचारशील मनांत त्याविषयी जिज्ञासा तरी उत्पन्न करील. सारांश, कारण जरी कधीं कधीं लुप्त झालें तरी त्याचें ज्ञान कार्यावरून होतें

२ एकाद्या मुलीचें नाव ठकूबाई आहे व तिला सांप्रत बहिणी नाहीत. अशा स्थितीत एवढें अनुमान काढितां येईल की तिला पूर्वी लागोपाठ जन्मलेल्या दोन तीन बहिणी होत्या, कारण एकुलत्या एक मुलीला किंवा मुलानंतर जन्मलेल्या पहिल्याच मुलीला हें नाव ठेवण्याचा प्रघात नाही

३ याच न्यायानें आज 'उदच्' व 'अवाच्' या दिग्वाचक संज्ञाचें आपण परीक्षण करूं

प्राच् ( प्र=आरंभ, पुढें, +अञ्च्=जाणें ), व प्रत्यच् ( प्रति=परत, उलट,+ अञ्च् )-या शब्दांत पुढे येणें व परत जाणे हे अर्थ अनुक्रमें भरलेले आहेत. सूर्याचे गतागतास अनुलक्षूनच या संज्ञा आपण 'पूर्व-पश्चिम' या अर्थी योजितो. जिकडून सूर्य येतो त्या दिशेस प्राच् व जिकडे तो नाहीसा होतो तीस प्रत्यच् अशी नावें आपण देतो

४. उदच् ( उद्=वर ) यामध्यें 'वर जाणे' व अवाच् ( अव=खाली ) यामध्यें 'खाली जाणें' असा अर्थ विद्यमान आहे यावरून हे अनुमित होतें की या संज्ञा ज्या ठिकाणी दिशास लावण्यांत आल्या त्या ठिकाणी उत्तर दिशेला उंचवटा असला पाहिजे, व दक्षिणेस सखल प्रदेश असला पाहिजे या संज्ञा स्थानिक नाहीत, तर सार्वत्रिक असून भूरिप्रयुक्त आहेत. यावरून वरील उंचवटा किंवा खळगा हा लहानसा नसून मोठा अगडबंब व जगजाहिर असाच असला पाहिजे

५. Mediterranean ( भूमध्य-समुद्र ) ही संज्ञा रोमन लोकांनी प्रवृत्त केली. त्यावेळी खरोखरीच त्यांची सत्ता या जलाशयाचे सर्व बाजूस पसरली होती. तसेंच-उदच् व अवाच् या संज्ञा प्रचारांत आणणारे लोक अशा स्थानी रहात असले पाहिजेत की त्यांचे उत्तरेस एकादा उंच पर्वत असावा, मग अर्थात् उलट दिशेस उतार असणारच

६. या संज्ञा संस्कृत भाषेंतील असून आपल्या पूर्वजांनी उत्पन्न केल्या आहेत. त्यांची वसतिस्थानें दोन सांगण्यांत येतात. एक सैबीरियामध्यें, व

दुसरें गंगायमुनाचे काठी यापैकी वरील संज्ञास अनुगुण असें उत्तरोक्त स्थान होय, कारण त्याचे उत्तरेस त्या नद्यांचा जनक हिमालय हा विद्यमान आहे, व दक्षिणेस त्याचा पति बंगालचा उपसागर आहे सैबीरियाचे उत्तरेस उचवटा तर नाहीच, उलट तेथें नद्या वाहत जाऊन समुद्रास मिळाल्या आहेत सारांश, वरील दोन संज्ञावरून आपला अभिजन, किंवा निदान वरील संज्ञा प्रचारात आल्या त्या वेळचें वसतिस्थान, याच भरतखंडात आर्यावर्तात असलें पाहिजे

७. वरील व्युत्पत्तिचर्चा ही जलताडनवत् अनुपयुक्त नसून—वस्तुत. कोणत्याही शब्दाची व्युत्पत्ति अनुपयुक्त नसतेच—तिचा आपल्या आकांक्षाशी फार निकट संबंध आहे सैबीरिया ही आपली मूलभूमि ठरल्यास, इंग्रज लोक य देशात आज आले, मुसलमान काल आले, व आम्ही- पर्वा नव्हे, तेर्वा नव्हे, फार फार मागें• दीर्घ कालापूर्वी आलो, एवढेच ठरेल, तरी पण **आलों** हें सुटत नाही आता बाहेरून येऊन काबीज केलेल्या देशाचे ठिकाणी ममत्वबुद्धि किती उत्कट व जागरूक असू शकते, याची उदाहरणें युरोपातील देशाचे इतिहासात असंख्य आहेत तरी पण वास दीर्घकाल असणे, व तो आरंभापासून असणें यात अंतर आहे करिता आपण या देशात मुळापासून आहो असें सिद्ध झाल्यास तें आपणास प्रोत्साहनपर नाही काय ?

असेंच अनुमान उदञ्च् व अवाञ्च् या उत्तर–दक्षिण-चे पर्याय म्हणून योजलेल्या शब्दावरून निघतें म्हणजे शब्दाचे प्रयोगास आरंभ झाला तेव्हापासून म्हणजे फार पुरातन कालापासून आपण गंगायमुनातीरीच रहात आलो आहो ही गोष्ट उघड होते ('मराठी आणि कानडी' लेख ३, भाग ६ पहा)

---

## ६. कातकरी शब्दाची व्युत्पत्ति.

ज्ञानप्रकाशच्या (२३–७–१८) अंकात ' कातकरी ' या कोंकणातील एका जंगली जातीच्या नावाची व्युत्पत्ति दिली आहे तीत मुळासंबंधी दोन पक्ष आहेत–( १ ) क्काथ ( = कात ) करः व ( २ ) कारस्करः हे दोन्हीही भ्रांतिमूलक असावे, असें मला वाटतें पुढील व्युत्पत्ति या ठिकाणी जास्त सयुक्तिक दिसते

१ **वस्तुस्थिति**—( अ ) काही कातकरी हल्लीही शिकारीवर आपली उपजीविका करितात. आसपासच्या सुधारणेमुळें ते जरी हल्ली कपडा वापरितात,

तरी फार प्राचीन काळी ते मारिलेल्या सावजाची कातडी सोलून, तिने शरीराच्छादन करीत असावे, असें दिसतें पुराणातून शंकराची राहणी वर्णिली आहे, तीवरून या कातकऱ्याचा जीवनक्रम काहीसा ध्यानात येईल

**आर्द्रनागाजिनेच्छाम्** ( मेघदूत ) (ओल्या हत्तीच्या कातड्याची इच्छा)

**गजाजिनं शोणितबिन्दुवर्षि च** ( कुमारसंभव ) ( रक्ताचे थेंब स्रवणारें हत्तीचे कातडें )

इ० ठिकाणी वर्णिल्याप्रमाणे शंकर हत्ती, वाघ, वगैरे जनावरांचें चिनकमावलेलें कातडे वस्त्राचे ऐवजी वापरीत असत. याचाच प्रत्यय चिपळूणकर कंपनीचे भारताचे मराठी भाषांतरात गंगावतरणाचे 'चित्रात दिसून येतो मृगयेवर जीवन करणारे लोकही जनावराची कातडी स्वताच सोलीत असावे त्यास हें साधें काम करण्यास दुसऱ्या जातीची अपेक्षा असण्याचे कारण नाही

साराश, कातकरी या शब्दाने बोधित जातीचे लोक मृगयावृत्ती असल्यामुळें अंगावर घेण्याची कातडी स्वताच तयार करीत हे सिद्ध होते

आता कातकरी हा शब्द कसा बनला हें पाहू

२ **रूपविचार**—( आ ) कृत्ति करोति स. कृत्तिकरः, यथा चर्मकारः, लोहकारः, लिपिकरः इत्यादि कृत्तिकर म्हणजे कातडें सोलून ते पांघरण्यास लायक करणारा संयोगपूर्व 'ऋ' चा 'आ' बनतो व पुढील संयोगातील आद्यघटक लुप्त होतो हें नृत्य–नाच, वृद्धि–वाढ, पृष्ठ–पाठ इ० उदाहरणावरून व्यक्त होतें यावरून 'कृत्ति' चे 'काति' हे रूप झाले शब्दाच्या अंतीचे इकार–उकार याचे स्थानी अकार येतो, जसे वृद्धि–वाढ, गीति–गीत, वितस्ति–वीत, मधु–मध, वस्तु–वस्त इ० यावरून ( कृत्ति ) काति–कात असें रूपांतर झालें फार कशाला ? 'सापाची कात ' हा शब्दप्रयोग सर्वांस परिचित आहेच

याप्रमाणें कृत्तिकर ह्याचें कातकर हें रूप झाल्यावर, डोंचारी, लोणारी इ० शब्दाचे धर्तीवर शेवटील अकराचा ई बनून 'कातकरी ' हें रूप सिद्ध झालें

अशा रीतीनें अर्थतः व रूपतः कृत्तिकर या शब्दापासून कातकरी हा शब्द साधला आहे हें स्पष्ट होतें

---

# ७. दोन द्विमूल शब्द ( कासार व वाजतें. )

( १ ) **कासार** हा शब्द आपण तांबे–पितळेची भांडीं घडविणारा, विकणारा अशा अर्थी वापरितों बांगड्या विकणारास व बायकांना भरणारासही हा शब्द लावण्यात येतो हे भिन्न धंदा करणारे लोकही भिन्न असतात, एका धंद्याचा जसा दुसऱ्याशी काही संबंध नाही, तसाच एका धंदेवाल्याचाही दुसऱ्याशी संबंध नाही मग हें शब्दैक्य का असावें ? हें शब्दैक्य केवळ दिखाऊ आहे. कासार हा शब्द दोन प्रकारचा आहे एक कांस्यकार यापासून व दुसरा काचकार यापासून साधलेला आहे

( २ ) एकावरून दुसरा शब्द साधिताना द्विविध विचार करावा लागतो, अर्थैक्य व रूपसादृश्य पैकी कांस्यकार म्हणजे कांस्य ( इत्यादि ) धातूची भांडी घडविणारा, विकणारा, व काचकार म्हणजे ( बांगडी इत्यादि ) काचकाम करणारा, असा अर्थ आहे या शब्दाचे उत्पत्तीचा व हल्लीचा काळ यामध्ये दीर्घांतर पडले असल्यानें, त्याचे पुरातन व वर्तमान अर्थांतील अंतर क्षम्य आहे, म्हणून या अर्थांतील भेदामुळें ते संस्कृत शब्द हल्लीच्या मराठी शब्दाचे जनक ठरण्यास नालायक होत नाहीत. करिता वर गृहीत धरलेल्या व्युत्पत्तीस अर्थदृष्ट्या बाध येत नाही. आता रूपांतराचा विचार करू.

( ३ ) प्रस्तुत रूपांतरास पोषक अशीं सर्वसंमत उदाहरणें पाहूं सं योग्य, लोहकार, याची मराठी रूपांतरें जोगे, लोहार अशी झाली आहेत. येथे जोड-व्यंजनांतील यचा लोप, व ‘ कार ’ प्रत्ययाची ‘ आर ’ रूपानें विकृति दिसून येते. या विकार–द्वयावरून कांस्यकार याचें कासार हें रूपांतर संमत ठरते. कांस्यकार यातील अनुस्वाराचा, तद्भव कासार शब्दामध्यें, मागमूसही नाही, याला विशेषसं महत्त्व नाही. विंशति, त्रिंशत् याची निरनुनासिक वीस, तीस ही रूपांतरें सर्वश्रुत आहेतच. अशा रीतीनें कांस्यकार याचें कासार हें रूपांतर निर्बाध ठरतें

( ४ ) सं. चमसः, म. चमचा,–या युग्मावरून सं. स-चे जागीं कधी कधीं मराठीत च येतो असे दिसतें. काचकार,–कासार या रूपांतरात प्रस्तुत च–ला विलोम विकार झाला आहे. सं च–चे स्थानी मराठीत स प्रवृत्त झाला आहे. रूपांतराचे बाबतीतील ही अर्धवट संमति, अर्थाचे अभिन्नप्रायत्वामुळें प्रभावी

ठरते. रूपातर जरी अन्य उदाहरणानी निश्चायक रीतीनें सिद्ध होत नाही, तरी अर्थैक्याचा विचार केल्यास, काचकार--कासार हें शब्दयुग्म जनक-जन्य-रूप मानण्यास हरकत दिसत नाही सारांश-कासार हा एकच शब्द अन्योन्यभिन्न कास्यकार व काचकार या दोन भिन्नार्थक शब्दापासून प्रवृत्त झाला असल्यानें तो द्विमूल ठरतो, यावर पुढील शका सभाव्य दिसते

( ५ ) कोणी व्युत्पत्तिशास्त्री कदाचित् असा आग्रह धरितील की, प्रस्तुत शब्द कास्यकार या अर्थी कासार व अन्य अर्थी कासार असा लिहावा पण या म्हणण्यात काही तथ्य नाही अशा शास्त्रकाराचे म्हणण्यास विचारतो कोण ? जनता उच्चार कसा करते ? तो उच्चार जर अभिन्न आहे तर लेखन-भेद हा व्यर्थ होय दोन्ही अर्थात शब्दरूप कोणतें उच्चारतात ? कासार हें एकच, मग त्यात अर्थभेदाकरिता लेखभेद करणे अप्रयोजक होय लेखभेद अर्थभेदाबरोबर तुल्यगति होणें इष्ट व शक्य नाही जितके भिन्न अर्थ तितके भिन्न लेखन-प्रकार कोठून आणणार ? स हरि या शब्दाचे १०।१२ अर्थ आहेत, पण या सर्व अर्थाचा निश्चय करणे हें सदर्भावर सोडणे प्राप्त आहे भात काल-विताना ' **सैन्धव**मानय ' हें वाक्य जेवणाराने उच्चारिल्यास त्यास **मीठ** वाढितात, व त्यानें जेऊन परगावी जाण्याचे तयारीला लागून हेंच वाक्य उच्चारल्यास त्यापुढें **घोडा** आणून उभा करितात हा सैन्धव शब्दाचा अर्थ-भेद केवळ प्रसगावर, सदर्भावर अवलबित आहे तेव्हा उच्चारभेदाचे अभावी, केवळ अर्थभेदासाठी लेखनभेद अवश्य ठरत नाही करिता कासार या निरनुस्वार रूपाच्या द्विमूलत्वास बाध येत नाही लेख उच्चारानुग, उच्चार प्रयोगानुग, प्रयोग शिष्टानुग, ही सबधपरपरा लक्ष्यात ठेविली पाहिजे अन्य शब्दात सागणे म्हणजे ' प्रयोगशरणा वैयाकरणा. ' या तत्त्वास मान दिला पाहिजे. तरी अजून पुढील शका निघण्याचा सभव आहे

( ६ ) Dear व Deer हे दोन शब्द उच्चाराने अभिन्न, पण अर्थानें भिन्न आहेत त्याचे लेखनही भिन्न आहे तसेंच मराठीत करावे. या म्हणण्यातही काही तथ्य नाही प्रस्तुत शब्द आरभी भिन्नोच्चार असावे पुढे कालगतीने उच्चारभेद नष्ट झाला तरी लेखनभेद कायम राहिला हा भाषेंतील दोष आहे उच्चार एकीकडे व लेख भलतीकडे, हा विसवाद शिष्ट-दृष्ट्या प्रशस्त नाही ज्या भाषेत एकाच

वर्णांचे उच्चार अनेक होतात व अनेक उच्चारही एकाच वर्णानें बोधित होतात ती भाषा,--जिच्यात लेख व पाठ यात सगति नाही, जी 'मनस्यन्यत् वचस्यन्यत् कर्मण्यन्यत् दुरात्मनाम्' या कोटीत पडते,--ती भाषा लेखनशुद्धीचे बाबतीत आदर्श होऊं शकत नाही. तेव्हा अर्थभेदाकरितां कासार हा शब्द निरनिराळ्या रीतीनें लिहिणे इष्ट नाही

## वाजते ( थंडी व शिटी )

( १ ) पुढ्या गुड्यास म्हणतो, 'मला थडी वाजते' गुड्या शेगडीजवळ चहा पीत म्हणतो, 'खोटें, थडी वाजते तर ऐकू कशी येत नाही? जें वाजेल ते ऐकू येईलच.' अशा रीतीने गुड्याने निषेध केला तरी पुढ्याला थंडी वाजतेच वाजते तरी हा भासमान विरोध कसा मिटावा?

( २ ) स. मध्यगृह, वध्यः म्ह० क्रमानें मराठी माजघर, वाझा--या शब्दाचे परस्पर--तुलनेनें अनुमित होतें की ध-चा ज, ब-चा व होतो या आधारानें बाधते याचें वाजते असें व्हावे शीतं मा **बाधते** = थडी मला **वाजते**. या तुल्यार्थक वाक्यावरून अर्थैक्यही स्पष्ट आहे साराश, अर्थैक्य व रूपसादृश्य या द्विविध दृष्टीनें वाजतें हें बाधते याचे रूपातर ठरतें

( ३ ) मराठी बाजा हा शब्द स वाद्य या शब्दावरून आला आहे, हें वरील द्विविध दृष्टीने सहज पटेल म्हणजे 'शृग वाद्यते' याचेच 'शिग वाजतें' हें मराठी प्रतिबिंब होय साराश वाजतें हा शब्द भिन्नार्थक 'बाधते' व 'वाद्यते' या मूलावरून भिन्नभिन्न अर्थ पावला आहे

[ द्विमूल शब्दास इग्रजीत Homonym म्हणतात याचें प्रसिद्ध उदाहरण a bear ( स० भल्ल--अस्वल ) व to bear ( स. भृ-भरणे ) हे होय. ]

---

## ८. चित्पावन ( व्युत्पत्ति ).

१ परशुराम व कोंकणस्थ याचे सबधाने पुढील गोष्ट सर्वमान्य आहे ती ही की, परशुरामानें समुद्रालगत नवीन मुलूख कमाविला, व तेथे कोंकणस्थाची वसति केली. यास थोडासा आधार पुढील पक्तीत आहे

**' रामास्त्रोत्सारितोऽप्यासीत् सह्यलग्न इवार्णवः '** ( रघुवंश )

**अर्थ—**समुद्र परशुरामाच्या बाणानें मागें हटविला असूनही सह्याद्रीला जसा काही चिकटलेलाच होता

२ ही नविन वसाहत करण्याचें कारण असे होतें की, त्यानें राजाची कत्तल केल्यामुळें, त्यास शत्रु फार पैदा झाले होते, व त्यापासून उपद्रव न पोंचावा म्हणून लाबच्या अवघड जागी वस्ती करणें इष्ट होते यासाठी त्यानें, आपल्या जातिबधूस प्रार्थना केली. त्यातील म्हणजे ब्राह्मणातील जे शूर व धाडसी होते, त्यानी ती मान्य केली नविन वसाहतीत पुष्कळ अडचणी सोसाव्या लागण्याचा व परशुरामाबरोबर स्वताचे जीवासही धोका होण्याचा सभव होता. जे ब्राह्मण परशुरामाबरोबर गेले, त्यास अर्थातच तेथील जमीन साफ करावी लागली तीतील झाडे-झुडपे कापून, दगडगोटे काढून, उचवटे पाडून, खड्डे भरून, पाणी काढून लावून, इत्यादि अनेक प्रकारचे कष्ट करून, त्यास जमीन वसाहतीस लायक करावयाची होती हे कृत्य या ब्राह्मणानी स्वता व तेथील रहिवाशी शूद्रादिलोक याचे साह्याने केले

३ या गोष्टीचा स्पष्ट उल्लेख जीत आहे, अशा प्रकारचे नाव या ब्राह्मणास लावले असणें संभवनीय आहे, व अशा दृष्टीनें ' क्षितिपावन ' हा शब्द मी सुचवितों आता हा वरील परिस्थितीस कसा लागू पडतो, व त्याचे रूपातर चित्पावन हें कसें होते या दोन गोष्टी पाहणे आहे

४ **अर्थसाधन** ( अ )

**' युद्धे चक्रधरं देव, पावके जलशायिनम् '** (विष्णु-षोडश-नामस्तोत्र )

**' .. विश्वामित्रप्रियः श्रुती । घ्राणं पातु मखत्राता .** ( रामरक्षास्तोत्र )

या स्तोत्रात विष्णूचे चितन करण्यास व रामाचे साह्य मागण्यास सागितलें आहे यात त्या-त्या प्रसंगानुरूप असलेल्या विष्णूचे व रामाचे कृत्याचा उल्लेख करणारी नावें मुद्दाम ग्रथित केली आहेत साराश-एखादे वस्तूला अनेक नांवें असली तरी, त्यातील इष्टधर्मद्योतक नाव प्रसंगानुरूप योजण्यात येते, अशा दृष्टीनें प्रस्तुत प्रसगी भूमीला ' क्षिति ' याहून उचिततर दुसरा शब्द सापडणें

कठीण आहे. ' क्षियन्ति जना यस्यां सा ' असा ' क्षि निवासें ' या धातूवरून ' क्षिति ' हा शब्द साधला आहे

( आ ) वर घेतलेल्या ' क्षितिपावन ' या शब्दाचा उत्तरावयव ' पू ' धातूपासून निघाला आहे

आता ' पू ' धातूचा अर्थ सामान्यत. पवित्र करणें, सस्कृत करणें,असा आहे तसाच तो विशिष्ट प्रकारानें सस्कृत करणें, असाही आहे 'पूत तु बहुलीकृतम्' (अमरकोश) यात"कोंडा वगैरे काढून साफ करणें "असा या धातूचा अर्थ आहे पण नवीन जमीन वसाहतीस व लागवडीस योग्य करण्यास नुसते, ' केरकचरा काढून निर्दोष करणें ' एवढ्यानें भागत नाही, कुद्ळीनं खणणेही उपयोगी पडत नाही, तर नागराचाही उपयोग करावा लागतो या क्रियेचाही बोध पू धातूचे अर्थात आहे ' मुखाग्रे क्रोडहलयोः पोत्रम् ।' ( अमरकोश ) या ठिकाणी डुकराचें मुसकट व नागराचा फळ, असे पोत्र ( पुनाति अनेन तत् ) शब्दाचे अर्थ आहेत, व यावरून डुकरास ' पोत्रिन् ' अशी सज्ञा आहे सदृशार्थद्योतक ' भूदार ' हें नावही डुकरास आहे याचा अर्थ भुव दारयति स. असा आहे तेव्हा जमीन उकरणें, खणणें वगैरे क्रियाचा समावेश 'पू' या धातूचे अर्थात आहे, हें निश्चित होय तेव्हा वसाहतीकरता जरूर असलेले ' क्षितिसस्कार करणारा ' अशा अर्थी ' पवते सः पवनः ' किंवा 'पावयति सः पावनः' असा शब्द सिद्ध होतो पैकी उत्तराचें ग्रहण करावें याचे मुळाशी असलेलें ' पावयति ' हें रूप दशमगणाचें मानावें, किंवा प्रयोजक मानिल्यास दुसऱ्याच्या हातून जमीन साफ करण्याचे काम करविणे असा हा अर्थ सहजच होईल दशम गणाचा ' पू ' धातू मानिला तरी ' दुसऱ्याकडून खणण्याचे वगैरे काम करवून घेणे ' हा अर्थ बाधित होत नाही ' नाना फडणिसानी बेलबाग बाधिला ' या उदाहरणातही ' बाध ' धातूचा अर्थ उघड-उघड प्रयोजक असूनही शब्दप्रयोग प्रकृतार्थी आहे असा प्रकृतार्थ धातूचा प्रयोजकार्थी उपयोग नेहमीचे प्रचारातीलच आहे साराश " पावयति ( = पुनाति = गुल्मच्छेदसमीकरणादिना निवासयोग्या करोति ) सः पावनः क्षितेः ( = भूमेः = सागरतः अधिगतायाः स्थल्याः = समुद्र मागे हटवून नविन पैदा केलेल्या जमिनीचा ) पावनः = क्षितिपावनः अशा रीतीनें ' क्षितिपावन ' हा शब्द इष्ट अर्थाचे द्योतन करण्यास सर्वस्वी समर्थ आहे

५ **रूपसाधन**—क्षितिपावन = ( क ) छितिपावन = ( ख ) चितिपावन = ( ग ) चितपावन अशा परपरेनें ( घ ) चित्पावन हें रूप पैदा होतें

( क ) ' नाडीपरीच्छा वेद ' मक्षिका = मच्छर, कक्षा = कच्छ, कासोटा, इक्षु = इच्छु (= ऊस ), क्षुरिका = छुरिका( = सुरी, ) या ठिकाणी ' क्ष ' चा ' छ ' झाला आहे यावरून क्षिति = छिति.

( ख ) भुजबध = बाजुबंद, छोटिका = चुटकी, ढक्का = डका, अतिथि = अतीत वगैरे ठिकाणी महाप्राणाबद्दल अल्पप्राण येतो यावरून छिति = चिति

( ग ) प्रतिच्छाया = पडछाया, मणिग्रथि = मनगट, हरिभट = हरभट, यष्टिमल्ल – जेठमल इत्यादि अनेक ठिकाणी समासाचे पूर्वावयवाच्या अतीं असलेल्या इकाराचा अकार होतो यावरून चितिपावन = चितपावन

( घ ) गळपट्टा, लवकर, देवधर वगैरे ठिकाणी पूर्व भागाचे अती जरी लेखनात अकार दिसला, तरी तो उच्चारात नाहीच 'चितपावन' उच्चारानुरूप लिहिल्यास ' चित्पावन हेंच रूप प्राप्त होतें

साराश क्षितिपावन, यापासून ' चित्पावन ' हें रूप सरळपणें सिद्ध होतें. तेव्हा इष्ट असलेला अर्थ प्रकाशित करणारे व चित्पावन यास रूपतः अनुरूप असणारें ' क्षितिपावन ' हेंच ' चित्पावन ' याचें मूळ ठरतें

६ **मतांतरें**—आजपर्यंत या शब्दाच्या विशेष आग्रहानें पुढें आलेल्या व्युत्पत्त्या—

( अ ) रा. चिपळूणकर, बडोदें, यानी केसरीत मागें हा शब्द चित्त-पावन ( चित्तास शुद्ध करणारा ) या शब्दापासून साधिला होता ' सुश्लोक-लाघव ' यातही विठोबा अण्णानी हाच शब्द योजिला आहे पण तो श्लेष-मूलक असल्यानें या बाबनीत तादृश महत्त्वाचा नाही.

( आ ) रा राजवाडे यानीही, केसरीत मागें प्रसिद्ध झालेल्या एका पत्रात हा शब्द ' चित्तपावन ' या ( त्याचे मतें ) देशवाचक किवा ग्रामवाचक शब्दावरून व्युत्पादिला आहे.

( इ ) रा. साने यानी चित् म्हणजे ज्ञान, बुद्धि, विचार, व त्या योगानें पावन पवित्र असा,–चित्पावन हा शब्द मुळांतच संस्कृत समास मानिला आहे.

या मुख्य व्युत्पत्तीशिवाय तीनचार व्युत्पत्तीमध्यें रा. राजवाडे यानी 'पृथ्वीवर सर्वांना पावन करणारा' क्षितिपावन अशी एक अर्थभ्रममूलक व्युत्पत्ति सुचविली,

आहे. रा. राजवाडे याचा अर्थ फाजील आत्मश्लाघापर आहे असें रा. साने याचें म्हणणें आहे खुद्द रा राजवाडे हेही या व्युत्पत्तीविषयी साशक आहेत, म्हणून तर त्यानी ती गौणात गणिली आहे

७ असो वर प्रतिपादिल्याप्रमाणें क्षितिपावन = चित्पावन याचा अर्थ काहीसा प्रशस्तिपर,-म्हणजे बिनीवाला, Pioneer ( प्रष्ठः, ) असा आहे तथापि हा शब्द प्रथम लावण्यात आला तो उपहासपर म्हणूनच होय पण साप्रतच्या विचारातील कार्तीने या अर्थात प्रशस्तीचा प्रवेश झाला आहे तेव्हां लोकानी ' मन्द. ' म्हणून एखाद्याची निदा केली असता, जसें त्याने ' किन्तु ध्रुवयशाः ' अशा आनुषगिक गुणाच्या प्रकाशनानें, ती निदा प्रशसारूपानें परिणत करावी, तशीच ' क्षितिपावन ' याचे अर्थात, अनायासेंच कालाच्या ओघानें प्राप्त झालेल्या प्रशसापरत्वास साजेसे आपले वर्तन ठेवून, ' Fools who came to scoff remained to pray ' या न्यायानें, चित्पावनाने निदकाचे मुखातूनही, त्यानी निदापरत्वानें लाविलेल्या चित्पावन या शब्दाचे द्वारा, आपली प्रशसाच वदविली आहे असें ठरते आजपर्यंतचा महाराष्ट्राचा इतिहास काय सागतो बरें ?

---

## ९. ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति । अथवा नोकरशाही—ची व्युत्पत्ति.

हल्ली चालू असलेल्या विदर्भ-साहित्य-समेलनात स्वागताध्यक्षाचे भाषणात एक अभिनदनीय गोष्ट आढळते की, नवीन शब्द मराठीत बनविणे ते सस्कृतावरून बनवावे, परकी भाषेंतून घेतले जाऊ नयेत, अशा परकी भाषेंतील, अतएव अयोग्य, शब्दाचे नमुने म्हणून त्यानी ( केसरी ता. ५-१२-२९ ) सागितलेल्या शब्दात पुढील दोन आहेत. नोकरशाही व बेडर ( जहाज ) हे दोनही शब्द मराठी भाषेंत सर्वमान्य होऊन शाश्वत स्थान पावले आहेत. एवढेंच नव्हे, तर त्यातील पूर्वोक्त शब्द तर, माझे माहितीप्रमाणें साक्षात् लोकमान्याचे मुखातून प्रथम अवतीर्ण झाला आहे. दुसरा शब्द महायुद्धाचे वेळी केसरीनेंच बनविलेला आहे. हे दोन्ही शब्द केवळ त्याज्य, पण फक्त ' पदरी पडले, पवित्र झाले ' या नात्यानें त्यास राहू द्यावें, असें स्वागताध्यक्ष म्हणतात. पण ही त्यांची मेहेरबानी सदर शब्दास नकोच आहे. ते स्वयमेव शुद्धमूल

आहेत तें असें–नोकर हा शब्द दिवंगत स्थापत्यविशारद वझे यांनी आपल्या पुण्यातलि व्याख्यानमालेंत 'नृकर' या जुन्या स्वस्कृत शब्दावरून व्युत्पादिला आहे शहा म्हणजे राजा–हा यवनी शब्द 'शास्' म्हणजे राज्य करणें, या सस्कृत धातूवरूनच साधला असल्यानें, शुद्ध करून परत घेण्यास सर्वस्वी योग्य आहे अशीच स्थिति बे या अवयवाची 'वि'–चेंच यवनी रूपातर बे असे आहे दर (म्हणजे डर, भय) हा शब्द तर सस्कृतात सर्वथा समत असाच आहे 'न जातहार्देन न विद्विषादरः' * (किरात) अशा रीतीने प्रस्तुत दोनही शब्द सस्कृतोत्पन्नच ठरतात पूर्वोक्त शब्द बनविताना लोकमान्यानी तो सस्कृतोत्पन्नच म्हणून बनविला की नाही, सागता येत नाही तशा रीतीने बनविला नसल्यास असे म्हणणें प्राप्त होतें की "वचासि लोकमान्याना मूल-शुद्धिः प्रधावति"

---

## १०. 'बाबा' व 'भाकर' या शब्दांची व्युत्पत्ति.

१ आपण नित्य खातों अशा पदार्थापैकीं **भाकर** हा एक होय हा अनेक धान्याचा बनवितात याचा वाचक शब्द कसा प्रचारात आला, हें पाहू जाता त्याचे मुळाशी एखादा धान्यविशेषवाचक शब्द दिसत नाही केवळ वस्तूचे आकारावरून हा शब्द निघाला असावा असें वाटते. हा विचारही भाकर ह्या एकट्याच शब्दावरून लवकर लक्ष्यात येत नाही, तर तिची धाकटी बहीण जी 'चादकी' इचे नावावरून लवकर सुचतो चादकी म्हणताक्षणी चद्राची कल्पना वर्णसाम्याने मनात उभी रहाते, व साहचर्यानें भाकरी हा शब्दही 'भास्कर' या सूर्याचे पर्यायावरून निघाला असावा हे ठरतें चादकीचे किवा भाकरीचे भागास (चत–नित) कोर हा शब्द लावितात, व 'चद्राची कोर' हा शब्दप्रयोग प्रसिद्धच आहे. उभयत्र कोर या शब्दाचे अस्तित्व वरील तर्कास दार्ढ्य आणितें.

साराश 'भाकर' हा शब्द 'भास्कर' या शब्दावरून निघाला असावा. वर्तुलत्व दोघासहि–सूर्यास व भाकरीस साधारण आहेच.

२. 'विविधज्ञानविस्ताराचे' ह्या महिन्याचे अंकात माझे मित्र रा. आपटे यानी 'भव' किंवा 'भव्य' या शब्दापासून 'बाप, बाबा, बिबी, बापू,

---

* त्यानें प्रेम केल्यानें आदर वाटत नाही, द्वेष केल्यानें भय वाटत नाही.

बाबू, बोवा' वगैरे अनेक संबंधवाचक बकारादि शब्द साधिले आहेत असें करण्यात दोन दोष आहेत असे मला वाटतें

( १ ) वर्णदृष्ट्या वरील व्युत्पत्ति उपपन्न दिसत नाही, व

( २ ) या विविध शब्दाचे अर्थात प्रवृत्तिक्षेत्रात ( Province ) व भाषा-भेदात ( Dialect ) फार वैरूप्य आहे

३. या दोषद्वयाकडे कानाडोळा केल्यास 'लल्' या सस्कृत धातूवरून जसं 'रलयोः सावर्ण्यम्' या नियमानें 'लाड' हा शब्द निघाला आहे, तसे 'लोड' ( लाडका मुलगा त्यावर लोळतो म्हणून ), 'लाडू' ( तो मुलगा वारवार मागतो म्हणून ), Lad ( मुलगा याचा इग्रजी पर्याय म्हणून ), वगैरे अनेक शब्द रूपतः व अर्थतः तादृश सुसबद्ध नसलेले बनविता येतील

४. माझ्या मतें वरील काही शब्दाची व्युत्पत्ति तरी खास निराळी आहे. अर्भकाचे तोंडातील वर्णोच्चारस्थानें जसजशी कार्यक्षम होत जातात, तसतशी त्याची वर्णोच्चारशक्ति विकसित व विशद होत जाते मूल ओष्ठ्यवर्ण सर्वांत प्रथम उच्चारितें, व चवर्गीय, र वगैरे वर्ण पुढें पुढें उच्चारितें त्यातही प्रथम 'म', नतर 'ब', नतर 'प' असा क्रम आढळून येतो खाणें वगैरेचा वाचक 'माम् माम्' हा अर्भक-भाषेतील शब्द प्रसिद्धच आहे. आईचे वाचक शब्द पुष्कळ भाषात मकारादि आहेत पित्याचे वाचक शब्द 'ब' किंवा 'प' यानें आरभिलेले आढळतात इग्रजी 'Baby' या शब्दाचा अर्थ ही 'बा–बा' किंवा 'पा–पा' असें नुकतेंच उच्चारू लागलेलें मूल–अशी आहे. बालखाद्य वस्तूला पापा हा शब्द लावण्यात येतो लहानपणी मुलास खाणें, आई व बाप या तीन गोष्टी ठाऊक असणार, व तिहींचे बोधक शब्द प, ब, किंवा म यानी आरब्ध आढळतात.

सारांश बाबा हा शब्द एकादे संस्कृत शब्दावरून न साधिता तो मुलाच्या अचिर–प्रवृत्त वर्णोच्चारप्रयत्नाचें एक फल असावें असें दिसतें.

५ 'गोस्वामिब्रुव' याचा मूळ अर्थ 'इंद्रियावर माझा ताबा चालतो' असें ढोंग करणारा पुरुष–असा आहे 'ब्रुव' या शब्दाचा अर्थ 'नाममात्रास अधिकारी, नावाचा, ढोंगी' असा आहे. कालातरानें यातील निद्य अर्थाचा लोप झाला ब्रुव शब्दावरून 'बोवा' हा शब्द झाला असावा याचेंच 'बुवा' असेंही रूप प्रचारांत आहे. या रूपानें वरील व्युत्पत्तीस बळकटी येते.

६. रा आपटे यानी दिलेले बाकीचे बहुतेक शब्द बाबा या शब्दा-प्रमाणेंच मुलाच्या वर्णोच्चाराभ्यासाचें फल असावें असें वाटतें. यातील वर्ण-सादृश्य निसर्गसाम्यावरून आलें असावें उत्तरेकडील काय किंवा दाक्षिणेकडील काय, हिंदुस्थानातील काय किंवा विलायतेंतील काय, मुलांचा नैसर्गिक शब्दोच्चारप्रयत्न प्रायः सारखाच असावयाचा. तेव्हा वरील शब्दसाम्याचे मुळाशी एखादा सस्कृत शब्द कारण असावा असे मानण्याचें कारण नाही. शिवाय या शब्दाचा परस्पराशी विशेष सबध दिसत नाही ज्या त्या प्रातात साहजिकपणें प्रवृत्त होऊन यदृच्छेनें त्यास अर्थ प्राप्त झाला आहे, म्हणूनच बगाल प्रातात 'बाबू' या शब्दात गौरव असेल तर या महाराष्ट्रात काहीशी निंदा आहे बाबू हा शब्द एकादे लाडावलेल्या मूर्ख अजाण मुलास (मुलगा लहान असल्यास प्रेमानें व मोठा असल्यास चेष्टेनें) लावण्यात येतो 'बाबू सुरेंद्रनाथ' यात समान आहे, तर 'शंकर—बाबू' यात काहीशी अप्रशस्ति आहे एखादे गृहस्थास नुमतें बाबू म्हटल्यास महाराष्ट्रात तर रागच येईल

वरील शब्दमालिकेंत काहीचा तर केवळ बादरायण सबध दिसतो या मालेत बिबीचा अतर्भाव कसा करावा, हे केवळ, मला वाटतें, मिया—साहेबच साग शकतील 'बाप' हा शब्द काही लोक 'वप्तृ' या शब्दापासून साधितात, पण ते अशास्त्र आहे 'प्त' या संयोगाचा एकशेष 'त' असा होईल, 'प' असा होणे अशक्य आहे 'सप्तन्'—'सात' या धर्तीवर 'वात' असें रूप व्हावें, वाप असे होणार नाही "माझ्या बाबा, ऊठ लवकर जेवायला, रुसू नको" असे शब्द मुलाला उद्देशून वापरल्यास त्यातील 'बाबा' या शब्दात तन्मूल मानिलेल्या 'भव' या शब्दातील गौरव आहे, असें रा. आपटे म्हणतात, पण तसा प्रकार नाही मुलाचे मन वळवावयाचे असल्यास 'बाबा' 'माझे आई,' वगैरे शब्दप्रयोग प्रचारात आहेत सस्कृतातही 'तात चद्रापीड' असें सबोधन शुकनासानें पुत्रकल्प असलेल्या राजकुमारास लाविलें आहे. साराश, पितृवाचक शब्द काकुळतीचे समयी मुलाना लावण्याचा संप्रदायच आहे. याचे मुळाशी तत्तच्छब्दातर्गत गौरवाचा संबध पोंचत नाही नैसर्गिक उच्चारसौकर्याचें फळ 'बाबा' हा शब्द आहे, हें ज्यास पटत नसेल, त्यानी तो शब्द पितृवाचक 'वप्र' शब्दापासून साधावा '**वप्रस्ताते** स्त्रिया क्षेत्रे चये रेणौ च रोधसि' (त्रिकाण्डशेषः) 'क्षेत्रे **ताते** चये रेणौ वप्रः प्राकाररोधसोः' (हेमः) असा कोशाधार आहे. तक्र-चें ताक व चक्र-चें चाक

होणें, त्याप्रमाणें ' वप्र ' याचें वप्प, वाप–बाप, व नंतर बाबा होणें शक्य आहे. उत्तरावयव अर्धस्वर असल्यानें, तो गळून ' प्र ' या जोडाक्षराचा एकशेष ' प् ' असा होतो, ' र् ' असा होत नाही सप्त ( न् ) या शब्दात ' प्त ' या जोडाक्षराचा उत्तरावयव **अननुनासिक स्पर्श** असल्यानें त् राहून प् गळतो. जोडाक्षरातील कोणता अवयव गळणे हे जोडाक्षराचे घटनेवर अवलंबून असते

---

# ११. बुंदीचा लाडू कोठून आला ?

१ जिलबी हें पक्वान्न यवन लोकापासून आपल्या देशात प्रवृत्त झाले पण तिचा भाऊ बुंदीचा लाडू हा उत्तर हिंदुस्थानात जन्म पावून दक्षिणेमध्ये आला आहे ही गोष्ट एकदम कोणी मान्य करणार नाही. तदर्थ पुढील ओळी लिहीत आहे या लाडूस ' बुंदीचा लाडू ' का म्हणतात ? तो बुंदीचा करतात म्हणून. ' बुंदी ' म्हणजे काय ? बुंदी म्हणजे ' कळी ' असा अर्थ असावा पण गुलाब इत्यादि फुलाच्या कळीला आपण बुंदी म्हणत नाही यावरून कळी हा अर्थ बुंदीचा प्राथमिक नसून केवळ लाक्षणिक असावा या लाडवाचा घटक अथवा बुंदी काहीशी कळीसारखी दिसत असल्यानें तिला लोक कळी असे म्हणत असावे. तर मग बुंदीचा मूळ अर्थ काय असावा ? एतदर्थ आपण बुंदीची कृति पाहू

२ बुंदी पाडतात ती हरभऱ्याच्या डाळीच्या पिठाचे थेंब उकळणाऱ्या तुपात पाडून. हे थेंबच बुंदी होत यावरून असे अनुमान डोकावू पाहतें की बुंदी म्हणजे थेंब. हा अर्थ मराठीत तर नाही मराठीची जननी संस्कृत हिच्यात तर मुळात बुंदीला शब्दच नाही. म्हणजे बुंदी हा शब्द संस्कृत नाही,–नसेल पण थेंब याचे वाचक संस्कृत शब्द तरी कोणते ? निस्यन्द, लव, विप्रुष्, बिंदु इ० ' गंगाजललवकणिका पीता ' इत्यादि ठिकाणी लव शब्दही एतदर्थक आहे या शब्दात असा एखादा शब्द आहे का, की ज्याचा तद्भव शब्द बुंदी होईल ? मूळ शब्द व त्याचा तद्भव यामध्यें वर्णसाम्य अवश्य पाहिजे या दृष्टीनें विचार करिता बिंदु हा शब्द मनात येतो.

३ बिंदु शब्दाचें रूप बुंदी बनण्यास त्याच्या स्वरांमध्यें आलटापालट होणें जरूर आहे. पहिल्या इ-च्या स्थानी उ व दुसऱ्या ऊ-च्या स्थानी इ

आला पाहिजे. अशानें बुंदी हा तद्भव बनेल. पण अशी घडामोड तद्भवात होते काय? होत असल्यास तिला नाव तरी काय आहे? स्थानाची अलटापालट म्हणजे विपर्यय हा विकार बराच प्रचारांत असल्यानें यास नाव प्राप्त झाले आहे तें नाव म्हणजे विपर्यय होय. हा कधी स्वरात घडतो, तर कधी व्यजनात. गोक्षुर-चे गोखरू हें रूप स्वरविपर्यास दर्शवितें. कटुकी-चें-कुटकी, क्षुरक्षत–चें खरकूत यातही स्वरविपर्यय आहे. कोटि–चें रूप प्रथम 'कोट' असे होते अन्त्य इ–चा अ होणें ही गोष्ट रीति– रीत, लहरी–लहर, इत्यादि ठिकाणी आढळते. अशा रीतीनें बनलेल्या कोट शब्दामध्ये व्यजनविपर्यय होऊन टोक असा तद्भव शब्द बनतो. साराश स्वरविपर्ययानें बिदूचें रूप बुदी होऊन पुढें बुद असे बनले

४ बुंदीचा लाडू हा मूळ कोठे बनला असावा? अशा ठिकाणी की जेथे बुद हा शब्द थेंबाचा वाचक असावा हिंदी भाषेमध्यें बुद याचा अर्थ थेंब असा आहे अर्थात् हिंदी भाषा बोलणाऱ्या म्हणजेच उत्तर हिंदुस्थानातल्या लोकानी हा शब्दप्रयोग तद्बोधक पक्वान्नाबरोबर प्रचारात आणला असावा. हे पक्वान्न आपल्या प्रांतीच जर प्रथम उत्पन्न झाले असते, तर त्याच्या कृतीस अनुसरून आपण त्यास थेंबलाडू असे म्हटलें असतें.

५ गंगा-यमुनाच्या दो-आबात भूमि सुपीक असल्यामुळें, हरबरा, ऊस व दुभतें याची समृद्धि अनादि कालापासून चालत आली आहे अशा ठिकाणच्या श्रीमत लोकाना निरनिराळी पक्वान्ने सुचावी, त्यानी ती बनवावी व तेथून त्याचा इतरत्र प्रसार व्हावा, हें अगदी साहजिक आहे तेव्हा (थेंबलाडू अथवा) बुंदीचा लाडू ह्या नावानें प्रसिद्ध असलेलें पक्वान्न काशी-प्रयागासारख्या सपन्न प्रदेशांतून इकडील यात्रेकरूंनी महाराष्ट्रांत आणिलें असावें.

६ महाराष्ट्रात हें पक्वान्न कसें आलें, याचा विचार एका, यथार्थ रीतीनें वर सागितला आहे विनोदी अशा दुसऱ्या रीतीनेंही याचे कारण सागता येईल. नकाशाची उत्तर दिशा वरच्या भागी व दक्षिण दिशा अधोभागी, हा संकेत सर्वमान्य आहे. यामुळे नकाशा भितीवर लावल्यास उत्तर हिंदुस्थान वरती व आपला महाराष्ट्र खालती, असें सहजच घडतें. उच्च प्रदेशावरून सखल प्रदेशाकडे वस्तू गडगडत येणें हा सृष्टीचा नियम आहे. यवन लोक उत्तर हिंदुस्थानांत आले, त्यानी जिलबी आपणांबरोबर आणली. ही जिलबी दिल्लीसारख्या नकाशातील उंच

ठिकाणापासून खाली पुणें प्रांती दुचाकी ( Bi-cycle )-प्रमाणें गडगडत आली. वाटोळा वजनदार असलेला बुदीचा लाडूही असाच चेंडूसारखा गडगडत आला आहे

७ सारांश, बिंदु शब्द संस्कृत, त्याचा हिंदी तद्भव बुंद, तद्भर्म मराठीतील ' बुंदीचा लाडू ' हा शब्दप्रयोग, बिंदु म्हणजे थेंब, बुंदी थेंबा-थेंबाची बनते ही गोष्ट, प्रयागाकडील जमिनीचा सुपीकपणा, यात्रा इत्यादिकांच्या निमित्तानें हिंदुस्थानच्या परस्परापासून दूर असलेल्या अशा प्रांतातील दळणवळण, इत्यादि गोष्टींचा समुच्चयाने विचार केल्यास, बुन्दीचा लाडू हें पक्वान्न मराठी प्रांतातील मूळचें नसून हिंदी भाषेच्या प्रांतातून इकडे आलें असावें असें स्पष्ट दिसतें

---

# १२. ज्ञानेश्वरींतील एक शंका

## 'दोष अंगीं वाजो पाहाति' । यांतील वाजो-चा अर्थ काय ?

१ **चर्चोपकारक ओव्या**—का समोर अग्नि देखोनी । जरी न वाचिजे वोसंडोनी । तरी क्षणा एका कवळुनी । जाळू सके ॥ २४० तैसे दोष हे मूर्त । अंगी **वाजो** असती पहात । हें जाणताही केंवी येथ । प्रवर्तावें ? ॥ २४१ ऐसें पार्थ तिये अवसरी । म्हणे देवा अवधारी । या कल्मषाची थोरी । सांगेन तुज ॥ २४२ अ. १.

२ **या ओव्यांचा सामान्य अर्थ**—समोर आग लागलेली पाहून जर आपण दूर गेलों नाही, तर एका क्षणात ती आग आपणास जाळून टाकील त्याप्रमाणें हे गोत्रहत्याजन्य दोष युद्धामध्यें उत्पन्न होणार, हें स्पष्ट दिसत असूनही, त्या युद्धास मी कसे प्रवृत्त व्हावें ? असें अर्जुन त्यावेळी भगवान् श्रीकृष्णास बोलला.

३ **शंकारूप**—येथें दृष्टांतगत गोष्टी आहेत त्या अशा-पेटलेला **अग्नि**, जवळ असलेला **मनुष्य**, मनुष्याला अग्निस्पर्शाचा **संभव**, माणसानें **पळून जावें**, म्हणजे अग्नीचें **भय राहणार नाहीं**. अशा ५ गोष्टी दाखल्यात दिल्या आहेत. यास अनुरूप प्रस्तुतातील गोष्टी क्रमानें पुढील आहेत. प्राप्त होणारे **गोत्रहत्यादि दोष, अर्जुन** समरभूमीवर असलेला, अर्जुन गोत्रहत्येकडे

**ओढला जात आहे,** अर्जुनानें गोत्रहत्त्याजनक **युद्ध सोडून चालतें व्हावे,** म्हणजे युद्धात उत्पन्न होणाऱ्या गोत्रहत्त्यादि दोषापासून त्याची सुटका होईल.

हा एवढा विचार कोणीही कबूल करील यास अनुसरून अर्थ ज्ञानेश्वरीच्या सपादकानी केला आहे काय ? आग अगास जाळू पाहणार, तसे दोष ( म्हणजे पातके ) अगास **पीडूं पाहणार,** अर्थात् 'पीडा देणार', अशा अर्थाचे भाषातर पाहिजे, व तदर्थ मुळात शब्दही असले पाहिजेत अगी वाजो असती पहात । या चरणात ( १ ) वाजों हा **शब्द** आहे, व ( २ ) पीडा देऊ पाहणें, असा **अर्थ** विवक्षित आहे हा शब्द व ही विवक्षा यात मेळ पाहिजे आता भाषातरकाराचा अर्थ पाहू.

४ **भाषांतरकारांचा अर्थ**--( बकटस्वामी ) ' हे दोष आमच्या अंगावर **आदळूं** पहात आहेत '-अशा प्रकारचा अर्थ त्यानी केला आहे यावर हरकती ( १ ) ' आग लागून जाळणार, ' ' तसे दोष लागून पीडा देणार ' अग्नीचे जाळणे, दोषाचें पीडा देणें, दोष काय दगड आहेत, तर ते अगावर आदळतील ? करिता आदळणें हा अर्थ येथे उचित दिसत नाही

( २ ) वाजणें याचा अर्थ आदळणे हा आला कोठून ? येथें सस्कृत मूळ काय आहे ? कदाचित्-वादयति-वाद्यते इत्यादि स्वरूपाचें घेतलें तरी, त्याचा अर्थ बोलावयास लावतील, ओरडवतील असा होईल, पण आदळतील असा होणार नाही सारांश वाजणें-चा अर्थ आदळणें हा विवक्षित दिसत नाही, व तोही वादयति या मूळापासून निष्पन्न होत नाही. मग अर्थ काय असावा ?

५ **सुचविलेला अर्थ**—'शीत मा **बाध**ते '-चे मराठी ' मला थंडी वाजते ' असे आहे येथें बवयोः सावर्ण्यम् लागू पडतें शिवाय-बोधयितुम्-बुझावू (शकेना विधाता तयाला), यात ध-चा **झ** झाला आहे जाणून-बुजून येथें ध-चा **ज** झाला आहे. 'बवयोः सार्वण्यम्' व ' धस्य झजौ '-या नियमात दिसणाऱ्या प्रवृत्तीस अनुसरून बाध-चें वाज हें रूप सिद्ध होतें दोष पीडूं म्हणजे 'बाधू' पहात आहेत, हें विवक्षेस धरूनच आहे करिता येथील वाजणें या शब्दाचें **मूळ** बाधन, **अर्थ** पीडा देणें, हें सिद्ध होतें या म्या सुचविलेल्या अर्थाचा तज्ज्ञ लोक योग्य परामर्श घेतील अशी आशा व्यक्त करून आपला निरोप घेतों.

---

# १३. मोठेंच 'शतकृत्य!'

१ शतकृत्य हा शब्द साप्रत आपण मोठ्या शौर्याचे कृत्याला, तरवारबहादुरीला किंवा असामान्य तेजस्वी कृत्याला लावितों सकृद्दर्शनी हा शब्द 'शत' व 'कृत्य' या दोहोंचा समास असावा असें वाटतें या समासाचा अर्थ--'शभर सामान्य कृत्ये घेतली तर त्यात जें मुख्य दिसून येईल तें'–असा होईल. 'शतमूर्ख' या समासाचा अर्थही याच धर्तीवर करितात परंतु हा अर्थ वर दर्शविलेल्या रूढ अर्थाहून भिन्न आहे, करिता ही व्युत्पति ठरत नाही. कदाचित् 'सत्+कृत्य' या समासाचा 'शतकृत्य' अपभ्रंश असूं शकेल असें दिसतें परंतु या समासाचा अर्थही--एकादें लोकोपकारार्थ बाधलेले तळें, धर्मशाळा, अन्नसत्र असा होत असल्यानें तो--रूढ अर्थाहून निराळा आहे. एवच 'शतकृत्य' व 'सत्कृत्य' या दोन्ही व्युत्पत्ति युक्तिसिद्ध नाहीत.

२ हल्ली आपले देशात सर्वात मोठें कृत्य म्हणजे भरतवर्षाधिपतीचे मंत्रिमडळात जागा मिळविणें हें होय. कालभेदानें भिन्न कृत्यें शतकृत्ये मानिली जातात. पेशव्याचे काळात अटकेपर्यंत भगवा झेंडा नेणें हें शतकृत्य मानीत अवरंगजेबासारखे बादशाह परधर्मीयास बाटवून आपला धर्म प्रसृत करणें हें 'शतकृत्य' मानीत. फार पुरातन काळी एकादा पराक्रमी राजा सार्वभौमत्व, शतकृत्य समजून, इतरास जिंकून मिळवीत असे. त्याचे पूर्वी या सार्वभौमत्वप्राप्तीने महत्वाकाक्षा कुंठित होत नसे, तर त्रिभुवनाधिपति इंद्र याचें पदही मानवास अप्राप्य नसल्यानें तत्प्राप्ति वीर्योत्कर्ष समजत हें इंद्रत्व एकदा नहुषराजाला मिळालें होतें. तें मिळण्याचें साधन म्हणजे शभर यज्ञ करणें हें होतें क्रतु=यज्ञ

३ स्वतः इंद्रालाही शतक्रतु केल्यानेंच इंद्रत्व प्राप्त झालें आहे साराश 'शतक्रतु' यथासाग पार पाडणें त्यावेळी शौर्यसीमा होती. हें 'शतक्रतु' पद व '**शतकृत्य**' हें पद यामध्यें जन्यजनक भाव असावा असे वाटतें कालातरानें क्रतु हा शब्द अज्ञानानें अपभ्रष्ट मानिला जाऊन त्याचे जागी कृत्य हा शब्द योजण्यात आला असावा.

४ अशा प्रकारें अपरिचित शब्दाचे जागी, इष्टार्थास सर्वस्वी प्रतिकूल नसलेला, सदृशाक्षरघटित भृशपरिचित शब्द योजण्याची चाल मराठीत आढळून येते. 'सान्त्वन' हा शब्द शातवन असा मिथ्या–संस्कृत बनविला आहे-

यांतील 'शांत' हा भाग इष्टार्थास पोषक व दृढपरिचित असा आहे. दुष्ट हा शब्द विवक्षित कल्पना व्यक्त करण्यास काहीसा कमजोर वाटून, लोकांनी त्याचे जागी कर्णकटु–मूर्धन्य–रवर्ण यानें युक्त असें 'द्रुष्ट' रूप बनविलें आहे. सीमान्तपूजन हा शब्द अपभ्रष्ट वाटून,–जामातृ श्रीमत असावा या साहजीक इच्छेस अनुकूल असा–श्रीमतपूजन हा शब्द त्याचे जागी वापरण्यात येतो, व तो राजमान्यही झाला आहे. इंग्रजीतही Yawl-boat व Jolly boat या शब्दांपैकी Jolly boat हाच शब्द जास्त रूढ आहे याचे मुळाशीही वरील परिचित–( शब्द )–पक्षपात हेंच कारण आहे

वरील विवेचनावरून उघड होतें की, शतकृत्य हा शब्द शतस्य कृत्याना समाहारः एतदर्थक द्विगु समास नाही किंवा तो सत्कृत्य यावरूनही निघालेला नाही

---

## १४. सरोवर.

१ सरोवर म्हणजे काय ? तळें. भूगोलात आपण सरोवरें पाठ करितो, तेथें त्याचा अर्थ तळें असाच समजतो कबूल, पण हा अर्थ त्या शब्दाचे घटनेस धरून आहे काय ? सरस् म्हणजे तळें व वर म्हणजे श्रेष्ठ, यावरून या शब्दाचा अर्थ मोठें तळे, उत्कृष्ट तळे, असा ठरतों. मग या यौगिक अर्थाहून निराळा असा अर्थ प्रचारात का व्हावा ?

२ मराठीत सरस् हा शब्द येणार तो सर या रूपानें मनस्-चें रूप मराठीत मन असें होतें चन्द्रमा. याचें रूप चन्द्रमा असें होतें यशस् किंवा यशः याचें यश होतें. येथें संस्कृतातील अन्त्य सकार किंवा विसर्ग गळून स्वरान्त रूप मराठीत प्रवृत्त होतें तेव्हा सर हें रूप उत्पन्न होणार मग तेंच मराठीत का आलें नाही ?

सर अशा रूपाचे शब्द अगोदरच मराठीत बरेच आहेत. पावसाची सर, माळेचा सर, वस्तूची सर ( बरोबरी ) असे भिन्न-भिन्न सर या शब्दाचे अर्थ अगोदरच मराठीत आहेत. त्यातच आणखी भर कशाला घाला ? अर्थागणित शब्द असणें केव्हाही चागलें, निदान एकाच शब्दाचे अर्थ जेवढे थोडे, तेवढें अर्थबोधास सोईचें, हें तरी निश्चित. नागपुराकडे एखाद्यानें पुणें प्रांतातून गेलेल्या माणसास बाजारातून अळू ( बटाटे ) आणण्यास सागावें, त्यानें अळू ( कोंकणांतील प्रसिद्ध पालेभाजी ) घेऊन यावें. असें करण्यानें पहिले गृहस्थाचा

हेतु सिद्ध होत नाही, व्यवहारात घोटाळा होतो. येथें प्रांतभेदानें शब्दाचा अर्थ-भेद झाला आहे पाहुणा म्हणजे 'उखळ' व 'अतिथि' हे अर्थ काही प्रांतात एकाच ठिकाणी रूढ आढळतात. या अर्थद्वयाचाही घोटाळा होणें शक्य आहे. साराश, 'यावदर्थं शब्दाः' हें तत्त्व इष्ट दिसते; तें सर्वथा पालनीय नसलें तरी यावच्छक्य साधण्याचा प्रयत्न करणें केव्हाही श्रेयस्कर म्हणून विद्वानानी तळें हा अर्थ दर्शविण्यास सर हा शब्द न योजिता सरोवर हा योजिलेला दिसतो याचा अर्थ काहीसा निराळा आहे पण सर हाच शब्द योजून होणाऱ्या घोटाळ्यापेक्षा, सरोवर यानें कमी घोटाळा होणार, हें पाहून सरोवर हा शब्द स्वीकारण्यात आला व्यवहारातही असलें थोडेसें अर्थांतर उपेक्ष्यच ठरतें

३ आपण आपल्या साध्या मित्रालाही मित्रवर्य म्हणून संबोधितों येथें वर्य याचा अर्थ उपेक्ष्यच होतो त्याचा अर्थ कोणीच मनात आणीत नाही प्रस्तुत मित्र तेवढा मित्रवर्य व इतर मित्राधम असे मानण्यात येत नाही येथे शब्दाची व्याप्ति विस्तृत झाली आहे मित्रवर्य यौगिक अर्थानं जर एका किंवा मोजक्याच मित्रास लागणार, तर तोच हल्लीच्या रूढार्थानें सर्वांसच लागणार. अशा रीतीनें येथें सामान्यार्थत्व (किंवा Generalization of sense) प्रवृत्त झालें आहे. हें व्याप्तिविस्ताराचें तत्त्व मधूनमधून आढळतें, त्यास कोणी अप्रशस्त मानीत नाहीत याच तत्त्वानुसार सरोवर हा शब्द नुसता 'तळे' हाच अर्थ दर्शवितो तो शब्द मोजक्या तळ्यास न लागता सर्वांसच लागतो अर्थात् त्याच्या व्याप्तीचा विस्तार झाला आहे असली काही अन्य उदाहरणें आहेत काय ?

४ संस्कृतात मामा-ला मातुल असा शब्द आहे व मामी-ला मातुलानी मराठीत मामक यावरून मामा असा व त्यावरून मामी हाही शब्द अगोदरच रूढ झाला आहे. मातुलानी हा शब्द मराठीत येऊं लागला, तेव्हा आपलें क्षेत्र मामी या शब्दानें आक्रमिलेलें त्यानें पाहिलें, तेव्हा तो परत जाऊं लागला. पण शिष्टानी त्यास ठेवून घेतलें आणि मामी-हून भिन्न अर्थ 'बापाची बहीण' हा त्यास दिला व याच अर्थानें मावळण शब्द काही लोकांत चालू आहे. अयि-वरून मराठीत आई हा शब्द आला. नंतर मातृ हा शब्द डोकावू लागला, तों त्यास आढळलें की, आपले क्षेत्र आई या शब्दानें आक्रान्तपूर्व आहे. तेव्हा त्यानें आपणाकरिता निराळें क्षेत्र 'वडील बहीण' हें पैदा केलें. माई याचा अर्थ आई असा न होता वडील बहीण असा होऊं लागला. अशा रीतीनें

काहीं शब्दास मूळ अर्थाहून निराळा अर्थ प्राप्त होतो. नानासाहेब पेशव्याचे चिरंजीव माधवराव यांचे नंतर काही वर्षांनी त्याचे नातवासही माधवराव हेंच नाव ठेवण्यात आलें पण हा शब्द अगोदरच त्याचे चुलत्यास लाविला असल्यामुळें, त्याला भिन्न रूप धारण करणें प्राप्त झालें, अशाकरिता की चुलत्याचे नावाशी आपला घोटाळा न व्हावा ही गोष्ट, सवाई हें उपपद मागें चिकटवून घेऊन, त्यानें साधली.

५ येथें शब्दांतराचे मुळाशी दोन तत्त्वें दिसतात शब्दाची अंगें दोन-(वर्णात्मक) रूप व (वस्तुबोध करणारा) अर्थ सर या शब्दानें आपलें **रूप** वर या भरतीनें बदलिलें आणि अर्थ कायम राखिला, तर मातृ या शब्दानें, (साधितरूप माई हें कायम ठेवून) निराळा **अर्थ** आपणाकरिता मिळविला म्हणजे शब्द आपल्या अर्थाचा घोटाळा टाळण्यासाठी कधी रूप बदलतात, तर कधी अर्थ बदलतात, पैकी पहिल्या प्रकारानें म्हणजे आपला अर्थ (काहीसा) बदलून सरस् याचें रूप सरोवर असे झालें आहे

---

## १५. मराठींतील ‘ ही ’ अव्यय

संस्कृतात **अपि** हें अव्यय आहे त्याचा अर्थ ‘ सुद्धा ’ असा आहे. याचेंच रूपांतर मराठीत **ही** असें झाले आहे या ही-चें, अर्थाचे बाबतीत, अपि-शी ऐक्य आहे पण रूपाचे बाबतीतहि त्याचा संबंध कसा जुळतो, हें आपण पाहिलें पाहिजे असा संबंध स्थापित झाला तरच अपि-वरून ही झालें आहे, असें म्हणता येईल तद्भव शब्दाची सिद्धि दोनही प्रकारानी मिळून, अर्थैक्य व रूपसादृश्य यावरून, मान्य करावी लागते

अपि-मध्यें **प्** हें कठोर व्यंजन आहे कठोर वर्णांस उच्चारताना जास्त यत्न करावा लागतो, तितका मृदूस लागत नाही कमी यत्नानें काम भागविणें हा मनुष्याचा निसर्गच आहे शाळा शब्दानेच पुरेसा अर्थबोध झाल्यास त्याचें मागें पाठ हा शब्द कशाला ठेवा ? याच विचारानें पाठशाळा-चा संक्षेप शाळा असा झाला आहे प्रकट-चे प्रगट, सकल-चें सगळें, वट-चें वड, पप-चें बब, पटाटा-चें बटाटा इत्यादि रूपांतरामध्यें **मृदूकरण** आढळतें. याच उच्चारालस्याचे प्रवृत्तीनें अपि-चें रूपांतर प्रथम अबि झालें.

शब्दाच्या आरंभीचा लघु स्वर गाळण्याकडेही भाषेची प्रवृत्ति आढळते. अरण्य-चें रान, इयत्ता-चे यत्ता, उपाध्ये-चें पाध्ये व example चें

sample, Esquire चें Squire--ही अशाच प्रवृत्तीची द्योतक रूपातरें आहेत ही प्रवृत्ती अवि-चें रूपातर **वि** होण्यात दिसून येतें. हा वि, दीर्घत्व पावून, आपल्या महाराष्ट्रात अशिक्षित जननेंत, वी या रूपानें ऐकू येतो हें दीर्घत्वहि उच्चारसौकर्यास्तवच आहे

अल्पप्राण किवा विषमस्थानीय व्यजनात ह् शिरून त्याची रूपातरें कधी कधी महाप्राण होतात, चंपक—चे चाफा, पनस—चे फणस, गर्गरी—चें घागर, बर्बुर—चें बाभूळ ही रूपातरें अशीच बनली आहेत याच धर्तीवर बी—चे **भी** झाले यात ह—काराश किवा वातुळपणा अथवा बढाईखोरपणा उघड आहे, व तो उत्तर—हिंदुस्थानातील लोकाच्या शीलाशी काहीसा सवादीच आहे. त्यामुळें हें हकारविशिष्ट रूप **भी** असें हिंदी भाषेंत होणे साहजिकच दिसतें. तसेच तें हिंदीच्या प्रचारातही आहे. या भी—रूपात मुळातील प—चे रूपातर ब, व आगतुक ह, असे दोनही प्रकार आहेत, यजमान व पाहुणा असे दोनही विद्यमान आहेत

हें हिंदीतील भी रूप मराठीत येताना, त्यातील फक्त हकार राहिला, बकार गळाला, म्हणजे आगतुक तो राहिला, व यजमान नाहीसा झाला, अपि—मध्यें पडलेली भर तेवढी शिल्लक राहिली, **मूळचा अंश नापत्ता झाला** एखाद्या जोड्यास कधी कधी ससारी लोक दुरुस्तीकरिता वेळोवेळी इतकी ठिगळें लावून घेतात की, अखेर मूळचा जोड्याचा भाग जवळजवळ नामशेष होतो, व जोडा दिसतो तो केवळ नवीन दिलेल्या ठिगळाचाच असतो असाच प्रकार अपि—चा होऊन मराठीतील ही बनला आहे

सम वर्ग्यातील स्पर्शाचा अश लुप्त होऊन केवळ हकार अवशिष्ट राहणें मराठीत नवीन नाही, बधिर—बहिरा, गभीर—गहिरा, प्राघूर्णक—पाहुणा, इत्यादि याची अनेक उदाहरणें आढळतात. अशा उक्त रूपातराच्या परपरेनें सस्कृत अपि-चें ही असें रूप शिष्ट मराठीत आलेलें दिसतें. अपि ( संस्कृत ), पि-वि-भि ( अशिष्ट मराठी ), भी ( हिंदी ), ही ( शिष्ट मराठी ), अशी रूपातरप्रणाली दिसते यातील कदाचित् भी हें रूपही अशिष्ट मराठीतच एकाकाळी रूढ असावें, व त्यावरूनच ही बनलें असावें, असे असल्यास तदर्थ हिंदीचा आश्रय करण्याचें कारण नाही तरी पण हें सत्य आहे की, **ही** हें रूप **अपि**पासून निघालें आहे. पण त्यातील इ स्वर सोडून काहीच या तद्भवाचे रूपात उतरलेलें नाही. असो येथपर्यंतचे विवरणावरून अपि—चा तद्भव (व तो दीर्घान्त) **ही** आहे ही गोष्ट विद्वानास पटेल, असें वाटतें

---

# भाग ३.

## शुद्धलेखन.

### १ लेख.

### १ अव्यय ‘ च ’ कसें लिहावें ?

असें–च वगैरे ठिकाणी ‘ च ’ मागील शब्दास जोडावा की त्यापासून तोडावा ? त्याची जात कोणती ?

१ **प्रसंग**–अलीकडे काही वर्षे इतिहाससंशोधकमंडळानें छापिलेल्या लेखात ‘ च ’ हा मागील शब्दापासून तोडलेला सापडतो पूर्वीचा आजपर्यंतचा प्रघात ‘ च ’ मागील शब्दास जोडण्याचा आहे. मंडळाने ही रीत का मोडली, याच्या युक्तायुक्ततेचा विचार येथें करूं.

२ **दादोबांचें मत**–च ही ना मात्र देखील ही शुद्धशब्दयोगी अव्ययें आहेत. दादोबाचे ग्रंथात ती मागील शब्दास जोडलेली आढळतात

३ **मंडळाचें म्हणणें**–वरील चाल मोडण्याचे कारण मंडळानें कोठें वर्तमानपत्रात प्रसिद्ध केलें असतें तर त्याविषयी विचार करणें विशेष सोईचें झालें असतें तसें प्रसिद्ध झालेलें मला कोठें वर्तमानपत्रात आढळलें नाही एवढें मात्र ऐकतों की, मंडळाचे मतें–असेंच वगैरे ठिकाणी ‘ **च** ’ हें सर्वनाम आहे, अर्थात् स्वतंत्र महत्त्वाचा शब्द आहे, करिता तो स्वतंत्रपणेच मागील किंवा पुढील कोणत्याही शब्दास न जोडताच–लिहिणें अवश्य आहे. हेंच मंडळाचे मत गृहीत धरून त्याचे ग्राह्याग्राह्यतेचा विचार करणें प्राप्त आहे.

४ **च–चे वैलक्षण्य**–उपयोगदृष्ट्या. मागील शब्द कोणत्याही जातीचा असो, तो ‘ च ’ चा उपजीव्य बनतो नामावर किंवा सर्वनामावर विशेषणाचें उपजीवन होतें तेव्हां विशेषण हें त्याचें उपजीवक व नाम व सर्वनाम ही विशेषपणाची उपजीव्यें होतात. क्रियाविशेषण हें विशेषण, क्रियापद किंवा दुसरें क्रियाविशेषण याचें उपजीवक होय. अशा रीतीनें विशेषण व क्रियाविशेषण याची उपजीव्यें ठरलेली आहेत, असा प्रकार ‘च’ चा नाही. कोणत्याही शब्दा-

घर त्याचें उपजीवन होतें आडांतच नाही तर पोहऱ्यात कोठून येणार ? डोळेच नाहीत तर दिवा काय करणार ? पैकी पूर्वत्र 'आडांत' ही सप्तमी किंवा क्रियाविशेषण यावर 'च' अवलंबून आहे, तर उत्तरत्र डोळे या नामावर. या द्विविधत्वामुळें 'च' ची गणना विशेषण किंवा क्रियाविशेषण यापैकी कशातच करता येत नाही. यामुळेंच दादोबानी त्याची गणना 'शुद्धशब्दयोगी अव्यय' या स्वतंत्र संज्ञेने केली आहे सारांश-वाटेल त्या शब्दावर अवलंबून असणें, या कारणानें 'च' वगैरे शब्द इतर शब्दाहून विलक्षण ठरतात

५ **प्रतिगामी अव्यय**-'दाशरथी रामानें आपल्या बाणानें रावणाचें मस्तक उडविले' या वाक्यात प्रत्येक शब्दाचें धोरण अथवा अन्वयदिशा पुरोगामी-पुढें वाहणारी-आहे दाशरथी कोण ? राम रामानें काय ? उडविले आपल्या काय ? बाणानें बाणानें काय ? उडविलें. रावणाचें काय ? मस्तक मस्तक काय केलें ? उडविलें अशा रीतीने प्रत्येक शब्दाची उडी पुढें-पुढे आहे. कोणी म्हणून मागें पहात नाही प्रत्येक शब्दाबरोबर वाक्याचा ओघ एक एक कदम पुढें जातो म्हणूनच वाक्यगत शब्दास पद ( म्हणजे पाऊल ) म्हणतात. असा प्राङ्मुख प्रवाह सामान्यतः वाक्यातील प्रत्येक शब्दाचा असतो 'च' वगैरे शब्द या तत्त्वास अपवाद आहेत 'रामाचे वनवासानें सर्वांस शोक, कैकेयीलाच काय तो आनद, झाला ' येथें च या शब्दाचें धोरण पुढें नसून, तो केवळ कैकेयी या एकट्या शब्दासच धरून आहे वाक्यगत पदाचें धोरण प्राङ्मुख असते, तर 'च' या पदाचें प्रत्यङ्मुख आहे तो मागें वळून मागील पदास चिकटून बसला आहे. त्याचा अन्वय 'कैकेयीस' या एकाच पदात परिसमाप्त झाला आहे ( वृक्षादनी किंवा ) बाडगुळाप्रमाणें 'च' हा मागील पदावर रूढ झाला आहे इतर पदें पुढें-पुढें पाहतात, तर हें पद वानरीच्या पिलाप्रमाणें मागें वळून, वानरीप्रमाणें मागील पदास धरून बसतें. म्हणजे च वगैरे शब्दाचे धोरण प्रतिगामी ठरतें या धर्मावरून च या शब्दास काय संज्ञा द्यावी बरें ? नाम-सर्वनाम-प्रभृति आठ प्रकारापैकी कोणतेही प्रकारात च-चा अतर्भाव होत नाही.

सारांश-प्रतिगामी अव्यय म्हणून त्याचा स्वतंत्र वर्ग केला पाहिजे.

६. **उपजीव्याचें विविधत्व व च-चा प्रतिगामी अन्वय**-या द्विविध वैलक्षण्यावरूनच, च-चें लिहिण्यातही वैलक्षण्य येणें अस्वाभाविक नाही. उप-

जीवन व अन्वय या द्विविध बंधनानी ' च ' एकट्या मागील शब्दाशीच सर्वस्वी ग्रथित झाला असल्यानें, तो मागील शब्दाशी जोडून लिहिण्याचा पूर्व-प्रघात अयुक्त दिसत नाही.

**७. मंडळाचें समर्थन व त्याचें खंडन**—मडळाचें स्वमत–समर्थन असें ऐकतों की, ' च ' हें मूळचे सर्वनाम आहे **खंडन**– असेल तसें मूळचें तसे नसलें किंवा असलें तरी, **आतांचें काय** ? हाच विचार प्रधान आहे सस्कृतात ' अस्ति ' हें क्रियापद आहे, परतु ' अस्ति विदिशाया धनमित्रनामा वणिगवसत् ' अशा वाक्यात ' अस्ति ' हे अव्यय मानितात ' दिष्ट्या ' हा मूळचा तृतीयात शब्दही, उपयोगावरून व त्याच्या इतर विभक्ति लुप्तप्राय झाल्यामुळें, अव्यय मानण्यात येतो.

The day during इत्यादि ठिकाणी ' during ' हे वर्तमान धातु-साधित आहे, परतु during the day या व सदृश ठिकाणी, ते उपयोगाचे दृष्टीने केवळ शब्दयोगी अव्यय मानितात ' अस्ति ' एकवेळ क्रिया-पद होतें,नव्हे–हल्लींही प्रायः असते, तरी पण ते वरीलप्रमाणें ठिकाणी क्रियापद न मानिता उपयोगप्रधान दृष्टीनें अव्ययच लेखितात ' राम आणि लक्ष्मण ' या वाक्याशात ' आणि ' ( अन्य ) हे मूळचें सर्वनाम असता, हल्ली त्यास त्या संज्ञेनें न ओळखिता, केवळ अव्ययात गणितात साराश-अमूक शब्द पूर्वी मुळात कोण होता, हा प्रश्न लेखनात किंवा व्याकरणात महत्त्वाचा नाही, त्यास महत्त्व व्युत्पत्तिशास्त्रात आहे व्याकरण-शास्त्र, अमूक शब्द हल्ली व प्रस्तुत वादविषयक ठिकाणी काय कार्य करितो, एवढ्याच दृष्टीने त्याची जाति ठरविणार व तदनुरूप लेखनही करणार पूर्वी वापरण्यात असलेल्या परतु हल्ली गजत पडलेल्या बदुकी व तलवारी मोडून त्याच्या अनुक्रमे फुंकण्या व कोयते बनवून ते वापरणारास, यथाक्रम बल्लव व मजूर अशाच संज्ञा मिळणार व त्याचे हातातील वस्तूना एके काळी त्या बदूक व तलवार अशा रूपानें असताही हल्लीचे रूपात फुकणी व कोयता असेंच म्हणणार

**८. सारांश**—शास्त्रात काय, किंवा व्यवहारात काय, पूर्वी अमूक होतें यास महत्त्व नसून, हल्ली काय आहे, ( काय काम करितें ) यासच महत्त्व आहे मातीतीलच अंश ओढून पोसलेल्या उसाचे रसापासून बनलेली साखर वेढा त्याचे दृष्टीनें, मातीच असली तरी, व्यवहारात तिला साखरच म्हणणार.

तद्वतच 'च' हा शब्द एका काळी सर्वनाम असला तरी त्यास साप्रतचे उपयोगाचे दृष्टीनें सुज्ञ लोक अव्ययच म्हणणार. 'च'-चें पुरातन रूप लोकाना सागणेंच तर तसें एकदा स्पष्ट जाहीर करावें, त्याकरिता विचित्र लेखनानें वाचनात वाचकाचे दृष्टीस पदोपदी अडखळावयास लावण्याचें कारण दिसत नाही. तुम्ही कोण? आम्ही जाहगीरदार जाहगीर कोठें आहे? हल्ली काय करिता? जाहगीर मागेच गेली. हल्ली तागा हाकतो. अशी स्थिति असल्यास तुम्ही तागेवालेच. एके काळी होता, एवढ्यानेंच तुम्ही आता जाहगीरदार ठरत नाही. 'वर्तमानेन वर्तन्ते' हें सत्पुरुष-लक्षण ध्यानात ठेवावें 'च' हल्ली अव्यय आहे (त्यास विभक्ति लागत नाही), तद्रूपानेच त्यास वागविणें योग्य, सर्वनामाचें महत्त्व त्यास देणें उचित नाही करिता उपजीवन व अन्वय या दोन कारणास्तव तें मागील शब्दास जोडून लिहिणें अप्रशस्त दिसत नाही

९. **उच्चारदृष्ट्या विचार**—मी, तू, तो, हे, का, ना, ही, जी, ओ, **च, व** वगैरे काही शब्द मराठीत एकाक्षर (किंवा एकस्वर) आहेत यातील शेवटचे दोनच एकमात्रक दिसतात, बाकीचे सर्व अनेकमात्रक आहेत, 'व' हा बहुधा पुढील शब्दाबरोबर जोडून उच्चारला जातो 'भीम **व अर्जुन**' या वाक्याशात 'व' हा शब्द अर्जुनाबरोबर उच्चारण्यात येतो अशा ठिकाणी व-चा उच्चार किंचित् लाबविला जाऊन, तो द्विमात्र होऊ पाहतो '**व**डील' या शब्दातील व-शी (अव्यय) व-चा उच्चार ताडून पाहिल्यास, ही गोष्ट प्रतीत होईल पुढील अक्षराबरोबर उच्चारला गेल्याने व-चे उच्चारात फरक पडतो, त्याची मात्रा एकाधिक होते साराश-**उच्चारतः** मराठीत च-व्यतिरिक्त एकमात्रक शब्द नाही, असें दिसतें या एकमात्रत्वाचे दृष्टीने च-चा विचार करू.

१० **च-चा उच्चार**—कैकेयी म्हणाली-राम वनात गेला **तरच** मी जीव ठेवीन अशा ठिकाणी इतर ठिकाणचे उच्चाराहून तर-चे उच्चारात भेद दिसून येतो. नुसता '**तर**' व त**र**च यातील दोन ठिकाणचे र-चे उच्चार सारखे नाहीत पूर्वत्र र-ची मात्रा जवळजवळ शून्य आहे, उत्तरत्र त्याच्या मात्रा जवळजवळ दोन होतात, र-मधील अकार लाबविला जातो, तो द्विमात्र होऊं पाहतो. त्याला आपले बरोबर पुढील (स्वररहित) च-ला ओढून घ्यावयाचें असतें. अर्थात् अशा ठिकाणी 'च' हा तर-बरोबर जोडून लिहिणें युक्त दिसतें. याचीच सत्यता पुढील उदाहरणानें स्पष्टतर होईल.

११. **अर्थात्+च**–अर्थात् या शब्दात त् हा स्वररहित लिहिला व उच्चारिला जातो. पुढें च आल्यास तो च अत.प्रक्षिप्त अ–चे द्वारा त्–शी जोडून उच्चारला जातो ठराव, कळस, चोरून, आणि विचित्र, या शब्दाचे उच्चाराचा विचार केल्यास असे दिसते की, **अंतींचा अकार, मागें जोडव्यंजन नसल्यास, अनुच्चारितप्राय असतो** च-चे उच्चाराचे सबधातही अशीच स्थिती असते. तरीच, लवकरच, जातोच, ठरवावेच, हळूच, या शब्दाचे उच्चारात च-चा अकार मुळीच ऐकू येत नाही, ज्यामुळें च-ची दिसणारी एक मात्राही नष्ट होते. स्वर जर श्रुत होत नाही, तर मागील व्यजनानें काय करावे ? ते व्यजन ना ? दुसऱ्या (म्हणजे स्वरा-) बरोबर उच्चारले जाणारें ना? बरोबरीचा पुढला स्वर जर अनुच्चारित, तर तें व्यजन मागील स्वराचा आधार घेणार, मागील अक्षरातील स्वराबरोबर उच्चारले जाणार यावरून उघड आहे की, च-चा उच्चार होतो तो मागील स्वरामुळेच करिता त्याबरोबरच तो जोडून लिहिला पाहिजे पुढें च आल्यास 'अर्थात्'या शब्दात अ-ची भर पडते व अर्थात असें रूप तयार होतें हें केवळ पुढील च–चे उच्चारणासाठी मग त्या च-पासून अर्थात हा शब्द निराळा लिहिणार काय ? मुळीच नाही दोन्ही एकत्र जोडूनच लिहिले पाहिजेत पृथक् लिहिल्यास उच्चार व लेख यामध्ये निष्कारण विसवाद केल्याचा दोष लागेल.

( अर्थात्–च वगैरे ठिकाणचा ) च स्वतत्र लिहिल्याने, अशी अडचण येते की, जो स्वर ( म्हणजे च्-पुढील अ ) त्या बरोबर लिहिला जातो, तोच स्वतः अनुच्चारित, तेव्हा त्याचेबरोबर च-चा उच्चार होणे अशक्य, व ज्या (मागील) स्वराबरोबर तो उच्चारला जातो त्यापासून च तोडलेला हा उच्चार व लेख यातील विरोध टाळणे तर 'च' मागील शब्दास जोडल्यावाचून गत्यतरच नाही **ज्याचे बरोबर उच्चारण त्याचेच बरोबर लेखन झालें पाहिजे.**

या सर्व गोष्टींचा विचार केल्यास, 'च' यास अव्यय मानणें प्राप्त होत नाही काय? व ते मागील शब्दास जोडून लिहिणे सोईचे, युक्त व सशास्त्र दिसत नाही काय?

---

## लेख २ ( खंडनपर )

'च' अव्ययासबधाने माझे समान्य मित्र रा. रामभाऊ जोशी यास उत्तर.

१ मागील शब्दास जोडून 'च' लिहावा याचे समर्थनार्थ मी दोन मुद्दे लिहिले होते ( १ ) च केवळ प्रतिगामी अव्यय म्हणजे एक किरकोळ शब्द आहे, सर्व-

नामासारख्या मोठ्या महत्त्वाचे वर्गांत त्याची गणना होत नाही.' ( २ ) च–चे उच्चारास मागील शब्दाची आत्यंतिक जरूरी आहे, त्याचा उच्चार मुळी मागील स्वरामुळेंच शक्य होतो.

२ वरील मुद्यावर ( २९–७–२३ ) रा रामभाऊचें म्हणणें–( १ ) 'च हें उभयान्वयी अव्यय आहे' याचें प्रतिपादन त्यानी मुळीच केलें नाही त्याबद्दल केवळ चिपळूणकराचा हवाला दिला आहे–( २ ) 'च हा स्वतन्त्र शब्द आहे सबब तो निराळाच लिहिला पाहिजे'

३ यावर **उत्तर** ( १ ) च–चें अव्ययत्व रामभाऊसही मान्य आहे. त्याचें उभयान्वयित्व त्यानी सिद्ध केले नाही त्यामुळे माझा पहिला मुद्दा अढळच राहतो ( २ ) 'च स्वतन्त्र शब्द आहे' याने माझा दुसरा मुद्दा खंडित होत नाही. रामभाऊनी उच्चारणाचे मुद्याला अजिबात वगळले आहे. यामुळे तो मुद्दाही निर्बाधच राहतो एवच माझें म्हणणें त्यानी सप्रमाण खोडले नाही

४ आणखी **स्वतन्त्ररीत्या विचार**–राम हा शब्द 'र् आ म् अ' असा पृथक् वर्णांनी का लिहू नये ? उत्तर–त्या सर्वांचा उच्चार एकत्र होतो म्हणून, त्यात आपण मध्ये कोठेही थाबत नाही. यावरून उघड आहे की, जे ध्वनी आपण ( अव्यवहित = ) सलग उच्चारितों, त्याचे लेखनही सलगच झालें पाहिजे हेच तत्त्व प्रत्येक शब्द पृथक् लिहावयाचेही मुळाशी आहे, कारण दोन शब्दामध्यें आपण थाबू शकतो, म्हणजेच या उच्चारपद्धतीवरून पृथक् लेखनाचा नियम निघाला आहे नियम व उच्चारण यात जन्यजनक सबध आहे अर्थात् उच्चारणाचे विरुद्ध जर नियम जाऊ पाहील, तर त्यास उच्चारण गुडाळून ठेवील बापाचे माविरुद्ध त्यानेंच दिलेल्या सवलतीत मुलगा वागल्यास बाप ती सवलत काढून घेईल स्वतन्त्र शब्द स्वतन्त्र लिहावा, असा नियम जरी सामान्यत. सिद्ध होतो, तरी उच्चारण जेथें त्यास हरकत करील तेथें त्यास नमून मागें सरलें पाहिजे. 'अर्थातच', 'लवकरच', '**तोच**' इत्यादि ठिकाणी निष्पक्षपात मनाने कोणीही शिष्टानें सागावें, **च**–चा उच्चार मागील ( आगतुक किंवा मूळच्या ) स्वराबरोबर होतो की नाही ? मला वाटते, 'मागलि स्वराबरोबरच उच्चार होतो' असेंच उत्तर येथे खास येणार. **ज्याबरोबर उच्चारण त्याबरोबर लेखन** अशा रीतीनें च–चे मागील शब्दाबरोबर जोडून लेखन वरील नियमाचे मूलभूत तत्त्वास

अनुसरूनच आहे शब्दातील ध्वनीचे दर्शक वर्ण जोडून का लिहावें ? उत्तर-एकत्र उच्चारण्यात येतात म्हणून बरोबर, याच कारणाकरिता 'च' मागील शब्दास जोडून लिहिणें अशा रीतीनें जोशानी दिलेला नियम व मी प्रतिपादन केलेलें च-चें लेखन याची तत्त्वदृष्ट्या एकवाक्यताच सिद्ध होते

५ रामभाऊचे **अवांतर मुद्यांचा विचार**—(१) 'च' हें उभयान्वयी अव्यय आहे **खंडन**—मोक्ष हेंच ऋषीचें ध्येय होतें, म्हणजे 'दुसरें कोणतेंही ध्येय नव्हतें' असा उत्तर वाक्याचा अध्याहार मानून कदाचित् रामभाऊ 'च' हें उभयान्वयी मानीत असतील, परंतु खरोखरी हें जोडण्याचे काम 'च' कसें करितें, तें त्यानी स्पष्ट दर्शवावें जोडलेल्या दोन भागामध्यें च ठेवून दाखवावें. कोणत्या उभयाचा अन्वय **च** करिते ते स्पष्ट सांगावें अध्याहार कल्पिल्यानें शब्दाचें व्याकरणमूल्य ठरत नाही, ठरतें असे मानिल्यास—'वाः!' या केवल प्रयोगाचे पुढेंही 'मला फार आनंद वाटतो' असा अध्याहार करून त्यास वाक्य म्हणण्याचा प्रसंग येणार साराश-च हें उभयान्वयी अव्यय ठरत नसून केवळ 'प्रतिगामी अव्यय-'च ठरतें

(२) 'च' हे शुद्धशब्दयोगी अव्यय मानणे अप्रयोजक आहे, असें रामभाऊ म्हणतात.

**खंडन**—दादोबा 'वर' हें शब्दयोगी, व च हे **शुद्धशब्दयोगी** अव्यय मानितात उभयत्र शब्द तोच, अर्थ निराळा आहे पूर्वत्र शब्दयोगी हा शब्द योगरूढ असून, उत्तरत्र शुद्ध यौगिक आहे च हे फक्त एकट्या मागील **शब्दास चिकटून येतें** (दुसऱ्याशी त्याचा संबंध नाही) असा येथें शब्द-योगी-चा यौगिक अर्थ आहे, व हाच अर्थ '**प्रतिगामी अव्यय**' या संज्ञेनें स्पष्टतर व्यक्त केला जातो एखाद्या वैद्यानें औषधविशेषास अतिविष म्हटलें म्हणून तेवढ्यानें तो त्यास विषात गणितो असें अवश्य सिद्ध होत नाही अति-विष हा शब्द योगरूढ आहे तर, विष हा (प्राय.) यौगिक आहे असला अर्थभेद न कळण्याइतके दादोबा उथळ बुद्धीचे खास नव्हते. रामभाऊ मात्र (कळून वा न कळून) हा अर्थभेद लक्ष्यात न घेऊन, दादोबांस दोष देत आहेत अर्थात् 'च' वगैरे अव्ययें शब्दयोगीच नाहीत, तर शुद्धशब्दयोगी कशी व्हावी ? हा रामभाऊचा प्रश्नच भ्रममूलक ठरतो दादोबाचे मतें "**च**

वगैरे शब्द ‘ शुद्ध ’ (म्हणजे रूढार्थानें असस्पृष्ट) ‘ शब्दयोगी ’ म्हणजे ‘ शब्दाबरोबर केवळ जुळून येणारी ’ अव्ययें ” असा अर्थ विवक्षित आहे.

( ३ ) **रामभाऊ म्हणतात**—शब्दयोगी अव्ययास स्वतंत्र अर्थ नसतो; नामास विभक्तीचा अर्थ देणें हेच त्याचें कार्य.

**खंडन**—माघापर्यंत, मेघासमोर, गड्याहाती, घरापुढे, दागजवळ, डोक्यावर—या ठिकाणी अव्ययें प्रातिपदिकास कोणकोणत्या विभक्तीचा अर्थ देतात, हें रामभाऊनीच सांगावें. सातीपैकी कोणतीचाच अर्थ येथें संभवत नाही संस्कृतातही प्रति, अभि, अनु, विना, ऋते, इत्यादि शब्द स्वतंत्र अव्ययें मानिली आहेत त्याचेवर विभक्तीची कार्यें लादली नाहीत

( ४ ) ‘ **शब्दयोगी अव्यये** स्वतंत्र शब्द नव्हत तर प्रत्ययच आहेत. ’ असें रामभाऊ म्हणतात **खंडन**- त्याचेच व इतराचेही व्याकरणात अष्टविध शब्दात शब्दयोगी अव्ययाची एक जात सांगितली आहे तशी ती खरीच आहे पण त्याच्याच म्हणण्यात त्यामुळे विरोध येतो

( ५ ) **एक इष्टापत्ति**–‘अयोध्या प्रांताच्या पलीकडे हिमालय व त्याच्या**च**पलीकडे तिबेट देश ’ असे वाक्य घेऊ रामभाऊच्या म्हणण्याप्रमाणें पलीकडे हा स्वतंत्र शब्द नाही, तो केवळ शब्दावयव आहे आता एखादा शब्द व त्याचाच अवयव यामध्ये कोणी आलाच तर तो त्याचा अवयवच असणार, त्या उभयताशी अभिन्न, एकरूपच असणार, एवढेच नव्हे तर पलीकडच्यापेक्षाही अलीकडचा अवयव वस्तूशी जास्तच तादात्म्य पावणार झाडाचे बाह्य त्वचेपेक्षा अंतस्त्वचा केव्हाही वृक्षाशी गुणधर्मांनी अधिक सजातीय असणार. दूरचा जर अवयव किंवा परतंत्र शब्द, तर जवळचा तो ‘ अवयवतर ’ किंवा ‘अगदीच परतंत्रशब्द’ ठरणार. म्हणजे त्याच्याचपलीकडे या शब्दप्रयोगात ‘च’ केवळ शब्दावयव ठरत असल्याने मागील अक्षरद्वयाशी जोडल्याशिवाय गत्यंतर नाही, एरवी पलीकडे हा शब्दावयव मागील प्रातिपदिकास कसा जोडणार ? पहिल्या मजल्यावर दुसरा न उभारता तिसरा मजला कसा बांधणार ? प्रातिपदिकास शब्दयोगी अव्यय लावून बनलेला त्याच्याचपलीकडे हा अक्षरसंघ एक शब्द असून तो अखंड लिहिला पाहिजे असे रामभाऊच्या म्हणण्यावरून ठरतें. ( शब्दयोगी अव्यये कशी लिहावी याचा विचार स्वतंत्र केला पाहिजे ). ( क ) कालचे ( ३१-७-२३ ) केसरीत ‘ त्याचबरोबर ’ असा शब्दप्रयोग

रा. केतकर करतात (ख) टिळकचरित्र पान २५२ मध्यें टिळक, **रामभाऊ जोशी** इत्यादि लोकानी पाठविलेल्या प्रतिसूचनेंत 'एवढ्याच-बद्दल' असा शब्दप्रयोग आहे यामधील 'च' ची व्यवस्था रामभाऊ कशी लावणार ?

(६) शब्दयोगी अव्ययें हे नामाचे प्रत्ययच होत, असें रामभाऊ म्हणतात प्रत्यय व शब्द यात मोठाच भेद आहे 'नाम्ना सह' याचें भाषान्तर 'नामासह' किंवा 'नामाशी' असें होईल यात 'सह' हा शब्द व 'शी' हा प्रत्यय आहे या दोहोतील भेद इतका स्फुट आहे की, त्याविषयी लिहिण्याचें कारणच नाही. साराश-शब्दयोगी अव्ययें प्रत्यय आहेत हेंही मानणें प्रामादिकच ठरतें

---

## २. मराठींतील संयोगकल्प.

१ अर्क हा शब्द उच्चारताना मध्ये थाबावयाचें म्हटलें तर तें **अर्** आणि **क** याचेमध्यें संभवते अ-चे नतर थाबता येत नाही, कारण जोडाक्षर र्क यातील प्रथम घटक असलेल्या र्-चा उच्चार मागील स्वराबरोबर होतो रूप-दृष्ट्या अर्क शब्दाची **अ** व **र्क** अशी दोन अक्षरे ठरतात, तरी उच्चारदृष्ट्या ती अर् व क अशी मानावी लागतात इग्रजीत अवयव (syllable) पाडणें अशाच धोरणानें होतें Order हा शब्द or व der असा विभागला जातो साराश-प्रथम घटक मागील अक्षराबरोबर उच्चारला जाणें हें जोडाक्षराचें लक्षण दिसते ज्या शब्दात आरभीच जोडाक्षर असते तेथें अर्थातच हे लक्षण लागू पडणें शक्य नाही, इतरत्र या लक्षणाचें अस्तित्व जोडाक्षराची परीक्षा करण्याचे साधन बनतें.

**२.** मागील अक्षराबरोबर, अर्थात् स्वरानतर, पुढील व्यजन उच्चारण्यानें त्या अक्षरास, तें ऱ्हस्व असल्यास, गुरुत्व प्राप्त होतें याचे उलट—

**तुझ्या** बहुत शोधिले अघनिधी पदाच्या रजें ।

या चरणाच्या पहिल्या शब्दात झ्-चा उच्चार मागील अक्षराबरोबर होत नाही, म्हणून त्यास गुरुत्व येत नाही उद्यान या शब्दाचे अवयव उच्चारतः उद्-यान असे पडतात त्यामुळें प्रथमाक्षरास गुरुत्व येतें. उद्या याचे अवयव उ-द्या असें पडत असल्यानें, येथे **उ** गुरु होत नाही. साराश -मराठीत सर्व

जोडाक्षराचा उच्चार एकाच तत्त्वावर होत नाही. संस्कृतात मध्यें स्वर नसलेल्या दोन किंवा अधिक व्यंजनास मिळून संयोग म्हणतात, व त्यातील पहिले व्यंजनाचा उच्चार, मागें अक्षर असल्यास, त्याबरोबर नियमानें होतो. **पिऱ्या, उद्यां, उन्हांत** वगैरे शब्दांतील जोडाक्षराप्रमाणें उच्चारिली जाणारी अक्षरें संस्कृतात मुळीच नाहीत तेथें सर्वच जोडाक्षराचा उच्चार एकविध होतो, म्हणजे प्रथमघटक, मागे अक्षर असल्यास, त्याबरोबरच उच्चारित होतो

३ मराठीत **संयोग** या शब्दास पर्याय आढळत नाही. जोडाक्षरामध्यें संयोग व पुढील स्वर यांचा अंतर्भाव होतो द्य हा संस्कृताचे दृष्टीनें संयोग आहे, पण **उद्यां** या शब्दांतल्याप्रमाणे, त्यांतील द्-चा उच्चार मागील अक्षराबरोबर होत नसल्यास, तो अयथार्थ संयोग ठरेल सोईचे दृष्टीनें माझे मतें— र्क, र्क, ( तु ) ह्या यास क्रमानें **संयोग, जोडाक्षर** व **संयोगकल्प** ( किंवा संयोगाभास ) अशा संज्ञा योजाव्या या व्यवस्थेत संस्कृत व मराठी या भाषांतील विद्यमान संज्ञांचे अर्थात मुळीच ढवळाढवळ होत नाही, नवीन संज्ञा केवळ पूर्वीच्या उभय संज्ञांनी न दर्शविलेल्या अशा नव्या प्रकारास लाविली आहे प्रकार निराळा, संज्ञा निराळी वर्तमान लेखनपद्धतीप्रमाणें ( १ ) डोळ्यास स्पष्ट दिसणारा, पण ( २ ) कानास न भासणारा, ( ३ ) मागील अक्षरापासून पृथक् उच्चारला जाणारा व ( ४ ) त्यातील स्वरास गुरुत्व न देणारा-असा व्यंजनोच्चार म्हणजे **संयोगकल्प** होय संयोग व संयोगकल्प या दोहोंचा अंतर्भाव **व्यंजनयोग** या संज्ञेंत करावा.

४ या संयोगकल्पात उत्तरावयव नियमानें य् किंवा ह् असतो हा प्रकार संस्कृतातही अगदींच नाही असें नाही त्यातही हकारोत्तर संयोग पदोपदी आहेत, पण ते तसे लेखनात आलेले नाहीत क ख ग घ ङ इत्यादि स्पर्शवर्ण पाहिल्यास त्यातील समवर्ण हे प्रच्छन्न संयोगकल्पच आहेत. त्यांचा आकार पूर्वव्यंजनाहून जास्त संकीर्ण ( = घोटाळलेला, गुतागुंतीचा ) दिसतो. अशी कल्पना आहे-व ती यथार्थ दिसते-की विषमस्थानचे व्यंजनाकारात हकार मिळविल्यानें पुढील वर्णाचा आकार निष्पन्न झाला आहे. क्= K, ख्=Kh या इंग्रजी समीकरणावरूनही ही कल्पना यावदुच्चार स्पष्ट होते. साराश, ख्-घ् ..भ् हे सर्व १० समस्पर्श संयोगकल्प ठरतात रथ या शब्दात र हें पहिले व ( त्-ह्-अ= ) **थ** हें संयोग-कल्प-गर्भ दुसरें अक्षर होय ( क्... म् या २५ व्यंजनास स्पर्श ही संज्ञा आहे. )

५ वरील १० **संयोगकल्प** तर संस्कृतातून मराठीनें घेतलेच, पण आणखीही बनविले-काही **हकारान्त** व काही **यकारान्त** पैकी ण्ह् न्ह् म्ह् ऱ्ह् ल्ह् आणि व्ह् हकारान्त. पूर्वघटकाचा उच्चार जर कोठें मागील अक्षराबरोबर होईल, तर अर्थात् तेथे ( यथार्थ ) संयोग मानावा अशा ठिकाणी उच्चार-भेदानुरूप यथार्थ व अयथार्थ संयोगाचा लेखनभेद करणें इष्ट आहे पण याची हकारान्त संयोगाचे बाबतीत तादृश जरूर नाही या सहापैकी दोनच संस्कृतात आढळतात, इतर संस्कृतात मुळी नाहीतच, व मराठीतही आढळतात तेथें नेहमीच केवळ संयोगकल्प असतात. ' गर्जन्हरिः साम्भसि शैलकुञ्जे, ' इत्यादि ठिकाणी संस्कृतात न्ह् हा संयोग आहे, व गर्हा वगैरे ठिकाणी र्ह् हा संयोग आहे पैकी र् आणि ह् याचा योग मराठीत द्विविध आढळतो, संयोग असल्यास र्ह् व संयोगकल्प असल्यास ऱ्ह तेव्हा न्ह् या एकाच आकारावर मात्र द्विविध उच्चार लादला जातो गर्जन्हरिः व उन्हाने-यातील न्ह् हा एकच व्यजनयोग द्विविध उच्चारावा लागतो हीच उणीव, एकाच संयोगकल्पाकरिता लेखनभेद अवश्य न मानिल्यानें, भाषेत राहणार.

**हीच गोष्ट पुढील कोष्टकावरून स्पष्ट होईल–**

| सहघटक | आकार | संयोगप्रकार | भाषा | उदाहरण |
|---|---|---|---|---|
| ण | ण्ह | आभास | मराठी | कण्हणें |
| | ह्ण | सत्य | संस्कृत | प्राह्णः |
| न | न्ह | आभास | म | उन्हात |
| | | सत्य | स. | गर्जन्हरि. |
| | ह्न | सत्य | स | मध्याह्नः |
| म | म्ह | आभास | म. | ब्राम्हण |
| | ह्म | सत्य | स | ब्राह्मण |
| ल | ल्ह | आभास | म. | कल्हई |
| | ह्ल | सत्य | स | आह्लादः |
| व | व्ह | आभास | म. | लव्हाळा |
| | ह्व | सत्य | स | आह्वानम् |
| र | ऱ्ह | आभास | म | वऱ्हाड |
| | र्ह | सत्य | स. | गर्हणम् |
| | ह्र | सत्य | स | ह्रास |

६. **यकारान्त** संयोगकल्प मात्र मराठीत बरेच म्हणजे २४ आहेत व त्यातील बहुतेक संयोगरूपानेंही ( मराठीतसुद्धा ) आढळतात. अर्थात यामुळें उच्चारताना कोणता व्यंजनयोग संयोग व कोणता संयोगकल्प आहे, हें रूपावरून कळणें फार जरूर ठरतें. भाषाशुद्धीचे दृष्टीनें या दोहोंमध्ये लेखनभेद अवश्य केला पाहिजे. ' अशा भेदाचे अभावी जगच्चक्र कोठें अडलें आहे ? ' असें विचारणारास मी उत्तर देऊ इच्छीत नाही, त्यापुढें फक्त पुढील वाक्ये ठेवितों

( १ ) मेनकेच्या लाव**ण्या**च्या दर्शनानें मोहित होऊन, विश्वामित्र ईश्वराकडे चित्त लाव**ण्या**चें विसरला, असें अनेक लाव**ण्यां**त शाहिरानी वर्णिलें आहे. ( २ ) पु**ण्या**ची गणना कोण करी ? ( ३ ) गनिमी का**व्या**ची लढाई ( ४ ) रघुवंश का**व्या**ची महती

येथें व्यंजनयोग कोणते ठिकाणी कोणते प्रकारचा उच्चारावा, ही फोड लेखनावरून होत नाही तिचे अभावी अनभिज्ञ वाचकाच्या उच्चारात व बोधातही घोटाळा होणार उच्चार द्विविध होत असून त्याचा लेख एकविध आहे, या दोषाची उपेक्षा करणे म्हणजे इंग्रजीतील but = बट् व put = पुट् यातील उच्चारविसंवादासारखाच प्रकार मराठीत करणे होय ' पुण्याची ' यातील संयोग यथार्थ मानिल्यास तो अभंगाचे अर्थास अनुगुण होईल उलट, तो अयथार्थ मानिल्यास प्रस्तुत वाक्य आपल्या पुणे शहराविषयी तुच्छता व्यक्त करणारे होईल केसरीत मागें येऊन गेलेला ' गनिमी काव्याची लढाई ' हा मथळा वाचून, एका हिंदी बोलणाऱ्या, मराठी शिकलेल्या गृहस्थानें अशी पृच्छा केल्याचें ऐकण्यात आहे की,–' हे गनिमी काव्य कोठील ? ' साराश–स्पष्ट बोध होण्यास उच्चारानुरूप लेखनभेद आवश्यक ठरतो

७ **हकारान्त** संयोगकल्प--कण्हणें, पुन्हा, म्हैस, वऱ्हाड, कल्हई, तेव्हा इत्यादि ठिकाणी आढळणारे, बहुधा मराठीत स्वयंसिद्ध आहेत, (Inflection=) शब्दनयाचे योगानें प्रवृत्त होणारे क्वचित् ' गहू '--चे सामान्यरूप गव्हा यात मात्र संयोगकल्प शब्दनयोत्थ दिसतो याचे उलट--यकारान्त संयोगकल्प बहुतेक शब्द–नयमूलक आहेत सामान्यरूप किंवा स्त्रीलिंग अनेकवचन होताना असे संयोगकल्प बनतात. कड्यावरून, नद्या इत्यादि ठिकाणी, पूर्वत्र सामान्यरूप, व उत्तरत्र स्त्रीलिंग अनेकवचन आहे हे रूपवचनविकार प्रायः अंताक्षरांत होतात,

व बहुतेक व्यजनें शब्दाचे अताक्षरात आढळत असल्याने सामान्यतः कोणतेही व्यजनाचा य--शी सयोगकल्प घडतो मराठीत व्यजनें सर्वसमत ३४, अधिक ३ दन्त्य--तालव्य च, ज, झ, मिळून ३७. यकाराचे योगानें दन्त्यतालव्याचा ( शुद्ध ) तालव्य व स--चा श बनतो, जसें--चमचा चमचानें, ससा सशाने या सबधात तीन उच्चार विचारणीय आहेत दशरथराजा रामराजास यौवराज्यावर बसवू इच्छितो यापैकी पहिला उच्चार सस्कृतात उपलब्ध नाही. मराठी भाषेची सस्कृताशी, व विशेषतः मोरोपत, वामनपडित इत्यादि व्युत्पन्न कवीच्या व सुशिक्षित आधुनिकाच्या सस्कृतप्रचुर अभिजात वाङ्मयाशी, कायमची सागड असल्यानें, सस्कृतातील वर्णाचा लेख मराठीत अविकृत राखिला पाहिजे ज्या वर्णरूपानें जो ध्वनि सस्कृतात बोधित होतो त्या वर्णरूपाचा तोच ध्वनि मराठीत मानणें प्राप्त आहे तेव्हा, हा सस्कृताशी सवाद राखण्याकरिता, रामराजास या शब्दातील जा विद्यमान व्यजनाकाराचे द्वाराच व्यक्त केला पाहिजे, दशरथ राजा यातील जा सस्कृतास अपरिचित असल्याने त्याचें लेखन अन्यथा करणें प्राप्त आहे राज्यावर यातील ज्याचा उच्चार उभय भाषात एकच प्रकारे व्यक्त होतो

८ ज--प्रमाणेच च, झ याचेही मराठीत द्विविध उच्चार आढळतात चार, जग, झाक या सर्व ठिकाणी आद्याक्षराचे उच्चारभेदानें अर्थभेद उत्पन्न होतो दत्यतालव्य उच्चार केल्यास क्रमाने, ओले गवत, धातूचे कीट, व आच्छाद असे अर्थ प्रतीत होतात शुद्धतालव्य उच्चार केल्यास, तीन आणि एक, युद्ध, वर्णाची छटा--अशा अर्थाचा बोध होतो पैकी उत्तरत्र, सस्कृताशी उच्चारसाम्य असल्याने, च--प्रभृति वर्ण विद्यमान आकारातच लिहिले पाहिजेत, पूर्वत्र मात्र काही भेद करणे प्राप्त आहे तो तज्ज्ञाचे सर्वसाधारण मतानें घडवावा मला सुचवावेंसें वाटतें की, दत्यतालव्य उच्चार, च, 'ज, झ, अशा रूपानें, क्वचित् दर्शविलेले आढळतात, तसेच ते सर्वत्र दर्शवावे छ्--चा उच्चार नेहमीच एकविध म्हणजे शुद्धतालव्य असतो अशा रीतीनें जाता जाता दत्यतालव्य चकारादि वर्णाच्या रूपाचा विचार झाला यकाराशी योग होताना, दत्यतालव्य आणि स याचे जागी क्रमानें शुद्धतालव्य आणि श प्रवृत्त होत असल्याने त्याचे य-मिश्र सयोगकल्प केवळ च, ज, झ, श अशा असयुक्त

रूपानेंच होतात (क्  ळ् + च्, ज्, झ्=) सदतिसापैकी चाराचे सयोगकल्पाचा विचार झाला, बाकी ३ ३ राहिले

९. म्ह, न्ह, इत्यादि ठिकाणी जशी म् न् इत्यादि सहाच व्यजने ( ह्-चे योगानें ) प्राणप्रवण होतात, तशी सामान्यरूप किवा अनेकवचन वगैरे विकारात सर्वच व्यजनें तालु-प्रवण होऊ पाहतात प्रवण म्हणजे झुकलेला, कललेला, कडे रोख असलेला, त्यात शेवट लय पावणारा, ( प्राण म्हणजे हकारोच्चार-बीज व तालव्यत्व म्हणजे यकारोच्चारबीज ) अर्थात् मूळव्यजन मुळातच **अतालव्य** असेल तर त्यात ( क ) **य**-तत्त्व मिळते, (ख) तेच **सामि-तालव्य** म्हणजे दत्यतालव्य असेल, तर तें पूर्ण म्हणजे शुद्धतालव्य बनते, पण ( ग ) तें **पूर्णतालव्यच** असेल, तर तें तसेंच अविकृत राहतें भाचा याचे सामान्यरूप भाचा ( नें ), तर काचा याचें काचा (ने) असेच होणार **मूळच्याच पूर्णताल-व्यांत आणखी तालव्यत्वाची भर पडत नाही** सरी-चें अनेकवचन सऱ्या असे होतें, तर रोजनिशी याचे रोजनिशा असे यकाराने असपृक्तच बनतें खवा, अबा, घोडा, कोल्हा इत्यादींचें सामान्यरूप खव्या, अब्या, इत्यादि यकार-मिश्र होतें, तर मिया, पोपया, पाया, गाशा, तमाशा, याचे जे मूळरूप तेंच सामान्यरूप मानण्यात येते य् व श् मूळचेच पूर्णतालव्य असल्यानें, त्यात तालव्यत्व-वृद्धि होत नाही अय्या, भय्या, यात तर यकार शिरणे शक्यच नाही साराश येथें ' तालव्यस्य तालव्यत्ववृद्धिर्न ' हा नियम दिसतो सामा-न्यरूपात दन्त्यतालव्याचा शुद्धतालव्य व सकाराचा शकार होतो, शुद्धतालव्य, य आणि श हे तसेच राहतात बाजा बाजानें, ताशा ताशानें, पाया पायावर, इ० येथें यकारयोगासबधाने शुद्धतालव्य चार, सामितालव्य तीन,-य् श्, स् या दहाचा विचार झाला अप्रयुक्त असल्यामुळे ङ् ञ्-चा विचार करणें नको बाकी २५ व्यजनें राहिली ती क्  घ्  ट् . म्, र् ल् व् ष् ह् ळ् ( ४+१५+६=२५ )

१० या शेष २५ व्यजनाचे यकाराचे योगानें होणारे सयोगकल्प किंवा संयोगाभास लिहिताना य-चा आरभ वरील ओळीपासून न करिता, किंचित् खालून करावा, म्हणजे अशा तोतया-सयोगाचा खऱ्या सयोगाशी घोटाळा होणार नाही, म्हणजे मूर्ख मूर्खानें, सखा सख्यानें, सख्य सख्यानें असें लिहावें. जाता जाता हें लक्ष्यात ठेवावें की, संस्कृतातील हकारादि संयोग-हे ७ च

प्रचारात आहेत—मराठींत हकारोत्तर होतात, मात्र ह्य-मध्यें असा बदल होत नाही; जसे अपराण्ह, मध्यान्ह, ब्राम्हण, वह्या, ऱ्हास, आल्हाद, आव्हान ह् व य् याचे झटापटीत **य** आपली जागा मोडीत नाही, सह्याद्री असेंच रूप कायम राहतें

११ मराठींतील सयोगकल्प ऋषीचे काळी सस्कृतात पचारात असते तर, विषमस्पर्शावरून जसे समस्पर्श त्यानी तयार केले, तसे न्ह म्ह इत्यादि प्राण-प्रवण, व क्य म्य इत्यादि तालुप्रवण सयोगाभासाच्या स्थानीही स्वतन्त्र वर्णाकार त्यानी तयार केले असते, म्हणजे मराठी भाषेचें लेखन तेवढे सोपे झालें असते असो इतका वेळ सागितल्याप्रमाणें—(१) हकारोत्तर प्राण-प्रवण सयोगाभास ६ व यकारोत्तर तालु-प्रवण २५ मिळून ३१ होतात पैकी, (सस्कृताशी विसवाद बहुधा होत नसल्याने) प्राण-प्रवण सहाचा लेखभेद जरूर नाही (२) तालुप्रवणाचा लेखभेद जरूर असल्याने, तो यकार आरभी ओळीला न चिकटविता किंचित् खालून काढून दर्शवावा (३) मूळचे शुद्धतालव्यात, आणि य श हे तालव्यच असल्याने त्यात, य-ची भर घालण्याचें कारण नाही (४) दत्यतालव्य (हे च ज झ असे तीनच आहेत) व स याची तालुप्रवण रूपें क्रमाने तालव्य च ज झ, श अशी लिहावी शुद्धतालव्य (च-वर्ग) आणि य श यास निराळी तालुप्रवण रूपें मुळी नकोतच (५) दत्यतालव्य असताना च ज झ याची रूपे ॱच ज झ अशी लिहावी.

---

## ३. मोरोपंती व आजकालचें शुद्धलेखन.ऽ

प्रस्तुत विषयाचे पुढील भाग पडतात—

१ मथळ्याचा अर्थ २ वर्तमान मराठीच्या शुद्धलेखनातील उणीवा ३ या उणीवासबधी मोरोपती शुद्धलेखनाचें स्वरूप ४ मोरोपती शुद्धलेखनाचे सामान्य स्वरूप. ५ मोरोपती व वर्तमान शुद्धलेखनाची सामान्य तुलना ६ वरील तुलनेचा तपशीलवार विचार ७ बाराखडीतील काही अक्षरें ८ च, ही—याचे लेखन ९ उद्याचें शुद्धलेखन

---

ऽ हा निबध **'मयूर-मंडळा'**चे विद्यमाने होणाऱ्या पताऱ्या पुण्यतिथीच्या दिवशी (ता ८-४-२५) पुणें येथें श्री. रा रा न. चि. केळकर याच्या अध्यक्षतेखाली वाचण्यात आला

**१. मथळयाचा अर्थ**—प्रस्तुत मथळ्यातील ' मोरोपती ' म्हणजे मोरोपंतानी योजिलेलें ' आजकाल ' याचा अर्थ प्रथम मनात येतो तो नव्हे. 'आज व पूर्वी' असा अर्थ येथें अभिप्रेत नाही ' आजकाल काय काय घडेल, सागता येत नाही ' अशा ठिकाणी ' आज व समीप भविष्यकाळी ' असा अर्थ स्पष्ट भासतो. यात ' काल ' याचा अर्थ उद्या असा घेतला पाहिजे ' आजकाल ' हा शब्दप्रयोग कधीही भूतकाळ दर्शवित नाही ' आजकाल असें घडलें ' हा प्रयोग कानाला विसंगत लागतो, यावरून ' काल ' म्हणजे ' गतदिन ' असा अर्थ या ठिकाणी नाही, ' उद्या ' असा अर्थ आहे हा अर्थ काल-शब्दास हिंदीचें द्वारें मिळाला असावा. ' आजकल ' म्हणजे ' आजउद्या ' असा अर्थ हिंदीत आढळतो सारांश, ' आजकाल ' हा शब्दप्रयोग हिंदीचे रूपांतर ठरतो. यातील अर्थ-कल्पना संस्कृतातही ' अद्यश्वः ' या समासात आहे करिता ' आजकालचें ' याचा अर्थ ' वर्तमानकाळी आढळणारें व जवळच्याच भविष्यकाळी प्रवृत्त होणारें ' असा आहे एकदर मथळ्याचा अर्थ—मोरोपती शुद्धलेखनाशी तुलना करून वर्तमान मराठीतील लेखनात कोणते फरक करणें इष्ट आहे हें पाहून, तद्द्वारा भविष्यकालीन शुद्धलेखनाचें स्वरूप निश्चित करण्याचा प्रयत्न, असा मी योजिला आहे

२ **वर्तमान मराठीच्या शुद्धलेखनांतील उणीवा**—आपले पूर्वज पूर्वी संस्कृत भाषा बोलत असून, पुढें अनेक कारणानी ते मराठी बोलू लागले. या भाषाक्रातीबरोबर वर्णोच्चारातही क्राति झाली ही क्राति म्हणजे मुख्यतः विसर्गाचा लोप व बऱ्याच नवीन वर्णोच्चाराची भरती होय परंतु हे नवीन वर्णोच्चार दर्शविण्यास नवीन वर्णाची भर लिपीत मुळीच पडली नाही, किंवा पूर्वीच्याच वर्णाचे रूपात भेददर्शक काही विकार करण्यात आले नाहीत याचा परिणाम असा झाला आहे की, एकाच वर्णाला किंवा आकृतीला एकाधिक उच्चार व्यक्त करावे लागतात. यामुळें भाषेंत वेळेस दुर्बोधता, उच्चारविरोध व कटूच्चारत्व याचा प्रसंग येतो But, Put इत्यादि ठिकाणची उच्चार-विसंगति पाहून आपण इंग्रजी लेखनास हसतों, पण असेच प्रकार मराठीतहि वावरत असल्यानें हें आपलें हसणें केवळ बालिश आहे या गोष्टीचा प्रत्यय, जर्दाळु ( मेवा ), चटणी ( भोजनातील ) याचे परिचिताहून भिन्न उच्चार कर्णकटु लागतात, याचा विचार केल्यानें, कोणासही सहज येईल एका आकृतीचा एकच उच्चार हें संस्कृतात आढळणारें तत्त्व मराठीत वारंवार दृष्टीआड होतें.

या स्वरूपाच्या उणीवा मुख्यतः पुढील होत—

चार ( संख्या ), चार ( हिरवा ), ( माळ घेऊन ) जपणें, (मुलाला) जपणें; झूट, झूल,–इत्यादि ठिकाणी दिसून येत असल्याप्रमाणे च़ ज़ झ़ या तीन व्यंजनास प्रत्येकी दोन उच्चार व्यक्त करावे लागतात अर्थात् एखादा वरील वर्ण धारण करणारा शब्द केवळ वाचनद्वारा कळल्यास त्याचा उच्चार भिन्न लोकाकडून भिन्न होण्याचा संभव आहे उजेडाकरिता मारिलेले ' गज ' याचा उच्चार प्रांतभेदाने भिन्न-भिन्न ऐकूं येतो 'चाकू 'चा आद्यवर्ण कोकणदेशभेदाने द्विविध उच्चारिला जातो अशा व इतरही शब्दांचे परिचित-भिन्न उच्चार ऐकल्यानें मनुष्यास काहीशी चीड येते, हा अनुभव बहुधा प्रत्येकास आहेच; जसें–जळगाव, कुळकर्णी ' कुळकर्णी ' हा शब्द कोल्हापुराकडे ' कुलकर्णी ' असा निराळा उच्चारितात, ' जळगाव ' यातील आद्यवर्ण भिन्नभिन्न प्रकारें उच्चारण्यात आहे. या शब्दांचा परिचितभिन्न उच्चार कानाला कडू लागतो.

प्रस्तुत वर्णाचे संस्कृतोपलब्ध उच्चार हे ( शुद्ध ) तालव्य व तद्भिन्न ते दन्त्यतालव्य होत चिमटा यात तालव्य, तर चमचा यात दन्त्यतालव्य उच्चार आहे एखाद्या व्यंजनाच्या उच्चाराचे पर्यवसान अर्धवट ' य '-कारान्त झालें म्हणजे असे उच्चारलेले व्यंजन **तालुप्रवण** समजावे, जसें ' बाळ्या ' यातील ' ळ्या ' सामान्यरूप, स्त्रीलिंग अनेकवचन व वाक्पारुष्य यामध्ये व्यंजनें वारंवार तालुप्रवण होतात हा प्रकार संस्कृतात प्रायः मुळीच नाही हे तालुप्रवणोच्चार मराठीत यकारोत्तर संयोगानीच व्यक्त केले जातात पुणें गावाचा व पुण्याईचा असे भिन्न अर्थ असतांना ' पुण्याचा ' याचा उच्चार भिन्न-भिन्न होतो, पण लेखाकार मात्र एकच असतो. अर्थात् हा लिपीचा केवळ दोष आहे; कारण याने भाषेला दुर्बोधता येते असें तालुप्रवणोच्चार मराठीत पुढीलप्रमाणें पंचवीस आहेत.

क्य ख्य ग्य घ्य, ट्य ठ्य ड्य ढ्य ण्य, त्य थ्य द्य ध्य न्य, प्य फ्य ब्य भ्य म्य, ऱ्य ल्य व्य ष्य ह्य ळ्य हे दिसण्यात जरी संयोगाशी सरूप दिसले, तरी (क) उच्चारात तसे नाहीत, ( ख ) यामुळें मागील स्वरास गुरुत्व प्राप्त होत नाही, ( ग ) यातील आद्य व्यंजनाचा उच्चार मागील स्वराबरोबर होत नाही यामुळें हे वर्णोच्चार केवळ **संयोगाभास** ठरतात.

संस्कृतातही संयोगाभास आहेत; पण ते फक्त **प्राणप्रवण** असून स्पर्शान्तर्गत आहेत. संस्कृत वैयाकरणानी त्याची गणना मुळाक्षरात केली आहे. पहिल्या पाच वर्गातील समस्थानीय वर्ण पूर्वीच्या व्यजनात हकार मिसळल्यानें उच्चारतः व रूपतः सिद्ध झाले आहेत त्याचा हा मिश्र उच्चार कानास स्पष्ट भासतो त्याचे मिश्ररूपत्व आकाराचे परीक्षणावरून स्पष्ट होते क् मध्यें मिळून ख-चा आकार बनला आहे, हा आकार क-पेक्षा जास्त सकीर्ण व घोटाळ्याचा आहे, हें कोणासही पटेल. असाच आकार सर्वत्र समस्थानीय व्यंजनाचा आहे, हें सहज दिसून येईल संस्कृतातच प्राणप्रवणाबरोबर तालुप्रवण सयोगाभासही प्रवृत्त झाले असते तर त्याचीही मूळाक्षरात गणना होऊन त्यानाही विशिष्ट आकार लाभले असते क् + ह = ख, तसाच क् + य = क्य (स् + ह = श ), दोन्हीही उच्चार मिश्र एकाला मूळाक्षर म्हणून सस्कृत वैयाकरणाकडून शिक्का मिळालेला, तर दुसरा त्यास सर्वस्वी अपरिचित मराठीत मात्र दोन्हीही उपलब्ध असल्यानें, त्याची लेखनव्यवस्था लावणे मराठी वैयाकरणास भाग आहे

तालुप्रवण व्यजनाप्रमाणेंच काही प्राणप्रवण व्यंजनेंही–सस्कृतभिन्न अशी मराठीत उत्पन्न झाली आहेत त्याचीही सोय मराठी व्याकरणात केली पाहिजे. ही व्यजनें म्हणजे पुढील सात होत—ण्ह न्ह म्ह ऱ्ह ल्ह व्ह ळ्ह

संस्कृतात क्वचित् पदान्त्य स्वर विकल्पाने अनुनासिक उच्चारिला जातो, जसें दधि किंवा दधिँ असा उच्चार असताना, तो तसाच दर्शविण्यातही येतो. मराठीत ( १ ) हा अनुनासिक स्वरोच्चार पदोपदी आढळतो ( २ ) तो अन्ताक्षराहून इतर ठिकाणीही सापडतो, व ( ३ ) तो अनुस्वाराच्याच चिन्हानें व्यक्त करण्यात येतो यामुळे कधी कधी अर्थसदेह होणेचा सभव आहे देहाचा अत व देहामध्यें, दोन्ही अर्थ देहात या एकाच रूपाने लिहिण्यात येतात याचे उच्चार मात्र अर्थभेदानें भिन्न--भिन्न होतात. साराश, अनुस्वार व स्वराचे आनुनासिक्य या दोन्ही गोष्टी भिन्नोच्चार असल्यानें त्या वेगवेगळ्या आकारानेंच दर्शविल्या पाहिजेत. येथे वाचकानी लक्ष्यात ठेवावें की, अनुस्वार हें व्यंजन आहे व अनुनासिक हा स्वरधर्म आहे अनुस्वार बिंदुरूपानें तर अनुनासिक ( मराठीत ) शून्याचे रूपाने लिहावा बिंदु व शून्य या दोहोचा अतर्भाव पूज्य या सज्ञेंत करावा.

संगमरवर व एतादृश ठिकाणी अकार उच्चारदृष्ट्या बहुविध आढळतो स-मधील गुरू, ग-मधील मध्यम, म-मधील गुरुकल्प, र-मधील लघुतर, व-मधील गुरुतर, तर शेवटल्या र-मधील निभृत, पैकी गुरु व लघु याचेच उच्चार संस्कृतात आढळतात. त्या दोहोंचें लेखन समानच असतें. पुढें सयोग असल्यास मागील अकार नियमानें गुरुत्व पावत असल्यानें संस्कृतात तो निराळ्या रूपानें लिहिण्याचे कारण पडत नाही. बाकीचे चार उच्चार संस्कृतात नाहीत. अर्थात् त्याच्या लेखनाची तजवीजही तेथें आढळणे शक्य नाही मराठीत हे चतुर्विध उच्चार भिन्नपणे लक्ष्यात न येताही बहुधा यथापेक्ष उच्चारले जातात बहुधा म्हणण्याचें कारण याच प्रस्तुत शब्दाचा उच्चार, अवयवभेद् यथायोग्य लक्ष्यात न आल्यास, चुकीचा होतो. सग-मरवर अशा रीतीनें शब्द् लिहिल्यास, तो योग्यपणें उच्चारिला जातो; म्हणजे हा अ-काराचा भेद् दर्शविण्याचें कार्य शब्दाचे अवयव योग्य रीतीने विभागल्यानेंच बहुधा होतें. यामुळें त्याचे आकार निरनिराळे दर्शविण्याचें तादृश कारण पडत नाही. मात्र हे षड्विध उच्चार एकटाच अकार दर्शवू शकतो, हे साही उच्चार त्याचेच आहेत, हें लक्ष्यात ठेविल्यानें "मराठीच्या लेखनात अकाराचा शब्दोच्चाराशी वारंवार विसंवाद् आढळतो," हा आरोप निवारित होतो लघुतर म्हटलेला अकार वस्तुतः अविद्यमान आहे, हें म्हणणें योग्य होणार नाही. तबकडी यातील क-मध्येंही असाच लघुतर अकार आहे, तो अविद्यमान असता तर (वाकूडबर=) वाग्डबर यातल्याप्रमाणे तबग्डी असा शब्दोच्चार झाला असता. पळस-द्री या शब्दाचा यथायोग्य उच्चार होण्यास तो येथल्याप्रमाणे विभागून लिहिणे जरूर आहे, नाहीतर वेळेस पळ्-सद्री असा उच्चारण्यात यावयाचा

अशा रीतीनें ३ (दन्त्यतालव्य) च् ज् झ्, २५ तालुप्रवण व्यजनें, ७ प्राणप्रवण व्यजनें, १ (एक) अनुनासिक स्वर व अकाराचे ४ प्रकार मिळून ४० गोष्टी-संस्कृतास प्राय. अपरिचित,-याचा विचार करणे आपणास अवश्य आहे मराठी लिपीतील उणीवा त्या याच्याच सबधान्या होत. (अनुनासिक स्वर सस्कृतात फारच विरळा आढळतात)

३. **या उणीवांसंबंधीं मोरोपंती शुद्धलेखनाचे स्वरूप** तालव्य व **दन्त्यतालव्य वर्णोच्चाराविषयी मोरोपताची निश्चित योजना मुळीच दिसून येत**

नाही.'घटोत्कचासि (वनपर्व ५–२५) व 'घटोत्क-च्याच्या'(व० ५–३५) या रूपामध्यें सामान्य रूपाचें अन्ताक्षर एकविधोच्चार असूनही मोरोपतानी तें एकत्र 'चा' व अन्यत्र 'च्या' अशा भिन्न-भिन्न रूपानी दर्शविलें आहे हा विसवाद यमकमूलकही नाही, कारण हे दोन्ही शब्द यमक--गत नसून मध्येंच कोठें तरी आले आहेत.

तालुप्रवण व (स्पर्शभिन्न) प्राणप्रवण संयोगाभास हल्लीच्या पद्धतीप्रमाणेंच मोरोपतानी खऱ्याखुऱ्या सयोगाप्रमाणेच लिहिले आहेत.

(भरीव) बिंदू व (पोकळ) शून्य अशी दोन्ही चिन्हें मोरोपंत वापरितात. त्याचा उपयोग अर्थातच अनुस्वार व आनुनासिक्य दर्शविण्याकडे होतो, पण तो यथाक्रम नव्हे, किंवा ठरीव नियमानेही नव्हे दोहोंपैकी वाटेल तें चिन्ह वाटेल त्याचे स्थानी येतें मोरोपताचे हस्ताक्षराचे प्रकाशलेखात तसे॰ ऐसें, व दंडी कुडलें–अशा ठिकाणी अनुनासिक उच्चार शून्य व बिंदु अशा दोन्ही चिन्हानी अविशेषतः दर्शविला आहे, तीच स्थिति अनुस्वारोच्चाराची म्हणजे यावदुच्चार चिन्हें मोरोपंतानी योजिली असूनही त्याचा क्षेत्रविभाग न केल्यानें त्याच्या उच्चाराचे बाबतीत सदिग्धता कायमच राहिली आहे ही चिन्हें वापरण्यात केवळ लेखनसुकरतेवर त्याची नजर होतीसें दिसतें जेथें ओळीबरोबर टाक न उचलता चिन्ह दिलें आहे तेथें तें शून्यरूपाचें आहे, व जेथें ओळीपासून टाक उचलल्यानें चिन्ह तुटलें आहे तेथें तें बिंदुरूप आहे

संस्कृतात न सापडणारे चतुर्विध अकार पद्यात येणें शक्य नसल्यानें मोरोपतात ते शोधण्याचें कारणच नाही

अशा रीतीनें मराठी लिपीतील प्रस्तुत उणीवासंबधी मोरोपंती लेखनापासून काहीच मदत मिळत नाही, हें मान्य करणें भाग आहे

४. **मोरोपंती शुद्धलेखनाचें सामान्य स्वरूप**—वरील लिपीतील उणीवाचा विचार सोडला म्हणजे बाकी राहिलेला शुद्धलेखनाचा विचार सामान्यतः ऱ्हस्व–दीर्घ व अनुस्वार या दोहोंसबधाचा होय आपणास मिळालेले मोरोपती वाङ्मय प्रायः पद्यमयच आहे त्यावरूनच आपणास विचार करणें शक्य आहे.

आता पद्यामध्यें लघु-गुरु किंवा पर्यायानें ऱ्हस्व–दीर्घ हे स्वर, विशिष्ट क्रमानेंच योजणें प्राप्त असल्यानें, अनेक वेळा कवीला पसंत नसलेल्या म्हणजे अशुद्ध

रूपानेंच लिहावे लागतात. गद्यात जेथें ज्या रूपानें कवीनें स्वर योजिला असता, तेथें पद्यात त्याहून निराळ्या रूपानें कवीला तो वारवार योजावा लागतो अर्थात् अभिजात कवी असले दोष बहुधा टाळतात एवढेंच नव्हे तर कवींचें अभिजातत्व या एका गोष्टीवरूनही बऱ्याच अशी प्रतीत होतें. अर्थ-हानि किंवा छंदोभंग होऊ न देता जो व्याकरणशुद्धीही साधितो तोच खरा कवि खडकातून व वादळातून मार्ग काढून जो तारू योग्य मार्गानें नेतो तोच खरा कर्णधार एरवी fair weather sailors किंवा शूरशून्ययोध काय थोडे असतात " मोरोपताचे भाषाप्रभुत्व सर्वसमत आहे आता किती केलें तरी पद्य हे कृत्रिम वाङ्मय असल्यानें त्यात काही सवलती घेणे कवीस अपरिहार्य होणारच.

अशापैकी मोरोपतानी घेतलेली सवलत म्हणजे प्रायः **सामान्य रूपाच्या अन्त्यस्वराचे अनिश्चित प्रमाण** हीच होय. प्रातिपदिक, म्हणजे शब्दाचें मूळरूप, मोरोपत बहुधा शुद्ध वापरितात, पद्यरचनेस्तव ते विकृत करीत नाहीत. विधि-ची द्वितीया 'विधीला' अशी व्हावी, पण मोरोपतान्नी 'विधिला' अशी वारवार सापडते. ऱ्हस्व-दीर्घाचे बाबतीत अन्त्यस्वर—मग तो मूळचा शब्दाचा अन्त्य असो किंवा सामान्यरूपाचा अन्त्य असो,—वृत्तानुसार मोरोपती काव्यात बदल पावतो तद्इतर स्वर मात्र बहुधा शुद्धरूपाने वापरिलेले असतात सारांश ऱ्हस्वदीर्घाचे बाबतीत, कोश सोडून शुद्ध व्याकरणाचे क्षेत्रात, मोरोपत प्रायः निरुपायानें निरकुश वागत असल्याने त्याचेपासून आपणास काहीच प्रकाश मिळत नाही मूळरूप जे मोरोपतात शुद्ध सापडते ते कोशातही आहेच त्याक-रिता प्रकाशाची अपेक्षा नाही सारांश, ऱ्हस्व-दीर्घाचे बाबतीत जेथे आपणास जरूर तेथे पद्यबन्धनामुळे आपणास प्रकाश मिळत नाही, व जेथे तो मिळतो तेथें तो कोशापासून अगोदरच मिळत असल्याने आपणास त्याचा उपयोग नाही

अनुस्वार या संज्ञेमध्ये रूढीने दोहोंचा, अनुस्वार व (स्वरधर्म) आनुना-सिक्य याचा अंतर्भाव होतो पैकी अनुस्वार हा मागील स्वराला गुरुत्व देत असल्यानें त्याचे भावाभावाला पद्यरचनेत महत्त्व आहे आनुनासिक्याचें किंवा अनुनासिकाचें मात्र तसें नाही येथे व पुढील विवेचनात **आनुनासिक्य या स्वरधर्माचे अर्थी अनुनासिक** हाच शब्द सुटसुटीत म्हणून वापरला आहे.

हा अनुनासिक निरुपद्रवी आहे. यानें पद्यरचनेंत मागील स्वराची मात्रारूप किंमत बदलत नाही. मात्र तो हातानें अक्षराचे डोक्यावर पूज्यरूपानें लिहावयाचा, डोळ्यानें पहावयाचा, व नाकाच्या थोड्याशा साह्यानें उच्चारावयाचा. अशा रीतीनें पद्यरचनेस काडीमात्र ढका लावीत नसल्यानें, हा अनुनासिक मोरोपतामध्यें यथावत् पहावयास सापडावा पण तसा सर्वत्र सापडत नाही. 'आहे कीं नाहीं' अशा संशयास पात्र होणारा तो हाच अनुनासिक, अनुस्वार नव्हे अनुस्वार उच्चारात खणखणीत प्रतीत होत असल्यानें तो कोठें द्यावा हें सांगावें लागतच नाही. म्हणून त्याविषयी या लेखात काहीच सांगितले नाही.

अनुनासिक हा अनुस्वाराप्रमाणे कानास स्पष्ट भासत नाही, मग त्यास अस्तित्व तरी कसें आले ? याचें उत्तर चतुर्विध आहे—

( १ ) आता, कोठें, इत्यादि ठिकाणी त्यास व्युत्पत्तीचा आश्रय आहे

( २ ) गाव, नाव, फेस इत्यादि ठिकाणी तो मंदपणें भासमान होतो

( ३ ) तू **करीं**, तुम्ही **गेलां** इत्यादि ठिकाणी तो कृत्रिम नियमावर प्रतिष्ठित आहे

( ४ ) पोंच, धाव, कींव, इत्यादि ठिकाणी तो केवळ रूढिमूलक आहे.

शुद्धलेखनाचे कोणतेहि बाबतीत इतर कवीचा तर राहोच, पण मोरोपताचाहि दाखला घेणें तो जपूनच घेतला पाहिजे. पूर्वी आपण पाहिलेंच आहे कीं भरीव बिंदु व पोकळ शून्य या चिन्हाचा उपयोग करण्यात मोरोपंताचे उच्चाराकडे लक्ष्य मुळीच नसते यामुळें त्या चिन्हाचा उपयोग पृथक्-पृथक् करण्यास त्याचा मार्गदर्शक आधार सापडत नाही जेथें अनुनासिक व्याकरणदृष्ट्या सर्वस्वी अवश्य गणिला आहे, तेथेही तो दर्शविण्यात त्याची धरसोड दिसून येते त्याचे हस्ताक्षराचें बारा ओळीत 'ताटकें' हा शब्द दोनदा आला आहे, पैकी के-वर पूज्य एकाच ठिकाणी दिले आहे. दुसऱ्या ठिकाणी शून्य वा बिंदु काहीच दिलें नाहीं 'धाव' धातूही दोनदा आला आहे, त्याचीहि पूज्याचे बाबतीत अशींच धरसोडीची स्थिति. साराश, मोरोपती पद्यरचना जरी ऱ्हस्व-दीर्घाचे बाबतीत यावच्छक्य शुद्ध असते तरी अनुनासिकाचे बाबतीत ती तशी नाही, ही गोष्ट शुद्धलेखनास त्याचा आधार घेताना लक्ष्यात वागविणें जरूर आहे

यापासून आणखीही एक बोध घेता येण्यासारखा आहे. स्वराचे बाबतीतील त्यांचें सूक्ष्मदर्शित्व अनुस्वारानुनासिकाचे सबधात कां दिसून येऊ नये ? याचें उत्तर उघड आहे, तें हें की हा अर्धवट मृतप्राय मिळमिळीत अनुनासिक कानात भरतच नाही, तो केवळ विचारदृष्ट्या व्याकरणामुळेच किंवा शिष्टसंकेतामुळेंच कल्पावयाचा. यामुळें साहजिकच त्याचेकडे मधूनमधून कोणाचेहि दुर्लक्ष्य होणार. तसेंच तें मोरोपताचेंही झाले असावे स्पष्ट प्रतीयमान, कानावर आपटणारा अनुस्वार त्याचे हस्तलेखात कोठेही गळाला नाही, केवळ मिळमिळीत अनुनासिक गळाले आहेत अशा या गळालेल्या दोन अनुनासिकापैकी एक–धाव येथील–केवळ सांकेतिक, स्वतापुरता आहे, त्यास व्याकरण–धर्मदृष्ट्या काहीच किमत नाही, दुसरा 'ताटके' यातील के–वरचा कृत्रिम–नियम–मूलक आहे यावरून या निप्राण अनुनासिकाविषयी मोरोपंताचे मत निश्चित नव्हतें, असें दिसतें या त्याच्या अनिश्चिततेच्या बळावर आपणास अशी सवड घेण्यास हरकत नाही की **केवळ मनास, कानास नव्हे, वाटणारा अनुनासिक स्वर साधा लिहिला तरी चालेल**

## ५ मोरोपंती व वर्तमान शुद्धलेखनांची तुलना

( १ ) काही सर्वनामें वगळून इतर सव्ययाचे सामान्यरूप दीर्घान्त करणें–दोघास समत.

( २ ) स्त्रीलिंग क्रियापदाच्या अन्ताक्षरात कोठें कोठें य् चा प्रवेश–मोरोपंतास समत, वर्तमान सरणसि असमत

( ३ ) रवि, निधि, स्थिति, सत्कृति, साधु, बाहु, राहु इत्यादि ऱ्हस्वान्त संस्कृत शब्दाची प्रथमा मोरोपत ऱ्हस्वान्तच ठेवितात, ती दीर्घान्त करावी अशी काही आधुनिकाची प्रशस्ति आहे

( ४ ) अन्त्य–अकारावर कधीही पूज्य ( पोकळ वा भरीव ) न देणें–उभयसंमत

( ५ ) नपुंसकलिंग नामाच्या अत्यस्वरावर पूज्य देणें—उभयसमत.

( ६ ) नपुसकलिंगी विशेषण, सर्वनाम व क्रियापद याच्या अंतस्वरावर तो लिंगविकार्य असल्यास म्हणजे लिंगभेदाकरिता बदलत असेल तरच पूज्य देणें–उभयसंमत

( ७ ) तत्सम–भिन्न क्रियाविशेषणाचे अन्ती पूज्य देणे—उभयसंमत

( ८ ) लुप्तान्त क्रियाविशेषणाचे अन्ती पूज्य न देणें ( शब्दयोगीचा अन्तर्भाव क्रियाविशेषणातच होतो )—उभयसमत.

( ९ ) ला--भिन्न--प्रत्ययान्त विभक्तिरूपान्तावर पूज्य देणे—उभयसमत

( १० ) अनेकवचनी सामान्यरूपाचे अंती पूज्य देणें—मोरोपताची धरसोड व आधुनिकाचा नियम

( ११ ) प्रथमपुरुषी क्रियापदाचे अती पूज्य देणे—उभयसमत

( १२ ) मी, आम्ही ह्या शब्दाचे अती पूज्य देणे–मोरोपतास सर्वथा मान्य; आधुनिक दृष्ट्या हे शब्द तृतीयान्त असतील तरच

( १३ ) द्वितीयपुरुषी आज्ञार्थी एकवचनी क्रियापद ईकारान्त असल्यास व अन्यार्थी अनेकवचनी क्रियापद आकारान्त असल्यास, त्याचे अन्ती पूज्य देणें–उभयसमत.

( १४ ) हास, धाव, झाक, फेक, वेंच इत्यादि काही शब्दात, व्युत्पत्तीचा आधार नसताही पूज्य देणे–उभयसंमत

( १५ ) ण, न, म याच्या बाराखडीतील अक्षरावर नियमप्राप्त असेल तेथेंही पूज्य न देणें–दोघाची धरसोड

( १६ ) या अनुवाकातील पूज्यासबधीची सर्व विधानें केवळ अनुनासिक–विषयक समजावी

## ६ वरील तुलनेचा ( तपशीलवार = )सांग विचार—

( १ ) मला, तुला, तिला, हिला, जिचा इत्यादि थोडे अपवाद काही सर्वनामाच्या एकवचनात मोरोपतात सापडतात

( २ ) हे पितृराज्यश्री तपती ( व १३–३२ ), मूर्ति श्रमत्ये ( व ४–४९ ), स्वी मज आठवते ( ४–१८१ ) असे त्रिविध प्रयोग मोरोपतात सापडतात. ‘ तपती ’ हा देशस्थी, तर ‘ श्रमत्ये ’ हा कोकणस्थी प्रयोग होय. तिसरा ‘ते’ कारान्त प्रयोग मध्यम असल्यानें हल्ली सार्वत्रिक झाल्यासारखा आहे. यू–विशिष्ट प्रयोग दादोबाचे व्याकरणात व लो. टिळकाचे लेखात सांपडतो. अलीकडे इंग्रजी भाषेचे सवईनें आपल्या बोलण्यात दाक्षिण्याचा योग्याधिक देखावा

शिरत चालला आहे. इंग्रजी भाषा, तोंडावर कोणास उद्देशून बोलताना अनेकवचन ( you ) वापरिते, पण त्याची पाठ फिरताच त्याचा निर्देश करण्यात he वापरिते, ही रीत आपणही सांप्रत उचलीत आहों अशाच खऱ्या वा खोट्या दाक्षिण्याभिरुचीमुळे य्–विशिष्ट रूप ग्राम्य वाटून आपण तें टाकितों यामुळें 'जात्ये' या प्रयोगास 'जाते' याने खो दिला आहे. ही प्रवृत्ति मोरोपंतात क्वाचित्क असणारी वर्तमान मराठीत सार्वत्रिक होत आहे 'दिल्ये' याचें स्थानी मोरोपंतात कधी कधी 'दिलें' ( वि० १--७३ ) असें रूप आढळते.

सारांश, नागरिकत्वामुळे स्त्रीलिंगक्रियापदरूपात य् प्रविष्ट करू नये, ही वर्तमान प्रवृत्ति होय ही लक्ष्यात घेतल्यास 'पराजप्ये' असे लिहावे की 'पराजपे' लिहावें, हा वाद सहजच निकालात निघतो दाक्षिण्यानुगुण असल्याने पराजपे, आठले, हेच प्रयोग हल्ली शिष्टसमत होत नामदार पराजपे, जे आपणास पराजप्ये म्हणवितात, यानी लिहिलेल्या व नटेसन कंपनीने छापिलेल्या नामदार गोखले याचे चरित्रातही गोखले यानी पराजप्यास लिहिलेल्या पत्राच्या हस्तलेखात पराजप्याचा उल्लेख (प्रथमेंत) 'पराजपे' अशा य-काररहित नावानेंच केला आहे, ही गोष्ट या संबधात लक्षणीय आहे य-प्रमाणे संयोगाभासातील ह् गाळण्याचीही प्रवृत्ति सांप्रत बहुशः दिसून येते. कोण्ही तरी ( व ३– १० ) –असे प्रयोग मोरोपंतात वारंवार सापडतात, पण हेच प्रयोग वर्तमानकाळी 'कोणी तरी' असे हकाररहित आढळतात.

( ३ ) या संबधात असें दिसतें की, मराठीत जे ऱ्हस्वान्त संस्कृत शब्द फार विरळा आढळतात ते प्रथमेमध्ये ऱ्हस्वान्त लिहावे त्याचा परिचय वाढून ते तत्सम कोटीत दाखल झाले म्हणजे अर्थातच दीर्घान्त लिहावे सारांश विधु, नति इत्यादि शब्द केवळ संस्कृत असल्याने त्याची प्रथमा ऱ्हस्वान्त लिहावी, तर गुरू, बुद्धी हे तत्सम बनल्यानें त्याची प्रथमा दीर्घान्त लिहावी

( ४ ) हा नियम सार्वत्रिक समजावा इतर कोणत्याहि नियमाशी विरोध आला तरी याचेंच अनुसरण करावें. फूल, मूल इ नामें नपुंसकलिंगी असताहि तदन्ती पूज्य देऊ नये

( ५ ) अशी नामें म्हणजे फळ, फळे इत्यादि बहुत अकारान्त, पाणी, मोती दही इ. थोडी ईकारान्त, वासरू, वासरें इत्यादि काही ऊकारान्त, भाडें, भाडी इत्यादि अनेक एकारान्त होत. पैकी पाणी, लोणी इ. शब्द नियम १५ प्रमाणें

शून्यरहित ठरतात. याच नियमानुसार देवानी, मुलाना, जाताना इ. ठिकाणी अन्ताक्षरावर शून्य न देण्याकडे प्रवृत्ति होते, व तें योग्यच आहे कारण 'मनानें' यात अती पूज्य दिलें तरी तें उच्चारात पृथक् भासमान होत नाही अशा स्थितीत तें याच कशाला ? येथे **उच्चारानुरूप** अनुनासिक-**लेखन** हें तत्त्व पाळलें जाते, ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे.

( ६ ) मोरोपती ग्रथ, मोरोपती कविता, मोरोपंती लेखन इत्यादि ठिकाणी विषेशणाचा अन्त्यस्वर लिगानुसार बदलत नसल्यानें तो स-पूज्य लिहू नये. पण काळें फूल, काळा ढग इत्यादि ठिकाणी लिगानुसार बदलणारा स्वर नपुसकलिगात स-पूज्य लिहिणे प्राप्त आहे. हे मुलगे,**हीं** मुले,- यातील सर्वनामावरील पूज्यही असेंच सकारण आहे. ' न बुडवि**ति** न वा तारि**ति** चित्रें बरवीहि आइ-नावाची ' या आर्यार्धात ' ति '–वर पूज्य प्राप्त होत नाही, कारण त्यातील स्वर नपुसकलिगविशिष्ट नाही, वारे, नद्या, वादळे बुडविति–इत्यादि प्रयोगावरून ईकारान्त रूप सर्व लिगास साधारण ठरते कारिता प्रस्तुत नियमानें ' बुडविति ' हें रूप पूज्यान्त नको, व मोरोपती प्रयोगही हीच गोष्ट दर्शवितात.

( ७ ) सदा, बहुधा, सर्वथा इत्यादि क्रियाविशेषणें तत्सम असल्यानें ती पून्यान्त होत नाहीत उलट--परवा, मघा, उद्या, खाली, पुढें, मागें, कोठें ही सर्व पूज्यान्त होनात या बाबतीत एक मोरोपती विशेष नजरेंत येतो जेविं-तेवि, केवि ही तीन क्रियाविशेषणे आपण सर्वसाधारण रीतीस अनुसरून अन्ताक्षरावर पूज्य देऊन लिहितों. तर मोरोपत नियमानें ती जेंवि, कोंवि, तेंवि, अशी लिहितात सामान्यतत्त्वाशी विरुद्ध दिसल्यास व्यक्तीचे मत उपेक्षणीय असल्यानें येथे आधुनिक प्रघातच योग्य ठरतो

( ८ ) क्रियाविशेषण पूज्यान्त लिहिणें हें तत्त्व त्याच्या मूळ म्हणजे अविकल रूपासच लाविले पाहिजे, त्याच्या छाटलेल्या रूपास लावू नये. 'त्याच्या कडेला' यातील 'कडेला' याचें रूप छाटून 'कडे' असें आपण योजितो यातील 'डे'-वर पूज्य लिहू नये. जिकडे, तिकडे यातही हाच नियम पाळावा. 'आणोनिया' यातील 'या' गाळून होणारे सक्षेप आणोनि, आणून इ० हेही पूज्यरहित ठरतात. मात्र मोरोपतात 'आणोनी' अशा दीर्घान्त रूपावर वारवार, नियमानें नव्हे, पूज्य आढळतें हें पूज्य न देण्यास आपणास अनेक कारणें आहेत. ( क ) स्वता मोरोपताची धरसोड, ( ख ) हें रूप खंडित असल्यामुळें प्रस्तुत नियमाची अप्राप्ती, ( ग ) कलम ५ ही या पूज्यास विरुद्धच मानितां येईल.

( ९ ) या संबधात षष्ठीच्या प्रत्ययाची गणना विशेषणप्रत्ययात करावी, म्हणजे चा, ची–इत्यादीवर सर्वत्रच अनुस्वार प्राप्त होणार नाही.

( १० ) या बाबतीत दुहेरी विचार करणें प्राप्त आहे–प्रत्ययपूर्व सामान्यरूप व अप्रत्यय सामान्यरूप,—प्रत्यक्ष विभक्तीचे रूपात अवयवरूपाने असणारें, व स्वतंत्रपदरूपाने असणारें, जसें–' शाहण्या लोकानी ' येथें लोका हें पदागभूत सामान्यरूप व ' शाहण्या ' हें पदभूत सामान्यरूप मोरोपत उभयत्र कधी पूज्य देतात, कधी देत नाहीत सिहानी ( वि० २–१ ), या डोळ्याचें रक्षण ( व० ६-१६ ),ज्या मानवा (वि० २–७३), सुभटाही (वि २-४२), इत्यादि ठिकाणी दिसणारी धरसोड अनुकरणार्ह नाही प्रस्तुत मराठीत पदावयव असलेल्या अनेकवचनी सामान्यरूपावर नियमानें पूज्य देतात, पण पदभूत सामान्यरूपावर देतात तें तें स्पष्टपणें स्वतः होऊन **अनेकवचनाचा बोध** करीत असेल तरच, जसें–' तु**म्हां** भाव**ड्या** मु**लां**ना ' ही वर्तमानकालीन व्यवस्था कोणासही योग्यच वाटेल.

( ११ ) मि, मः इत्यादि–प्रत्यय अन्ती असल्यानें, संस्कृत प्रथमपुरुषी क्रियापदाचें अंताक्षर मकारगर्भ असते, व तन्मूलक पूज्य मराठी रूपातही आढळतें. अर्थात् व्युत्पत्तिदृष्ट्या हें योग्यच आहे ही दोन्ही वचनातील पूज्यें केवळ व्युत्पत्तिसंकेतमूलक आहेत पण ही देण्यात कोठेंच धरसोड दिसत नसल्यानें ती ठेवणें योग्य दिसतें

( १२ ) मी हा शब्द अती पूज्य देऊन लिहिण्याचें मोरोपताचें कारण असें असावें की अहम्, यातील मकाराचा प्रस्तुत शब्दात अनुनासिक होतो. पण साप्रत हा व आम्ही शब्द प्रथमान्त असताना त्यावर पूज्य देत नाहीत, तर तृतीयात असताना देतात, व हें योग्यच आहे कारण तृतीयाताशी पूज्याची कल्पना निगडित आहे येथें असें तत्त्व दिसतें की, भेददर्शनास उपकारक होईल अशा रीतीनें पूज्याचा उपयोग करावा.

( १३ ) या संबधाचा विचार जरा सविस्तर करणें भाग आहे ( क ) मूळ संस्कृत शब्दात-म्हणजे प्रभवात—असलेला अनुस्वार किंवा पंचमवर्ण तद्भवात पूज्याचे रूपानें व्यक्त केलाच पाहिजे. ( ख ) प्रभवात आधार नसलेलेंही पूज्य रूढीस अनुसरून कायम ठेवावें. ( ग ) काही शब्दात रूढ असलेलें अशा

प्रकारचें पूज्य तत्सरूप शब्दापासून त्याचा भेद दाखविण्याकरिता अवश्य, अतएव रक्षणीय आहे या मुद्द्याचा यथाक्रम विचार—

( क ) प्रभवातील नासिक्य तद्भवात भासविणे अवश्य मानिल्यास, (विंशति) **वी**स, (त्रिंशत्) **ती**स, (दामन्) **दा**वें, (**न**मन) लवणे, (दशम) दहा**वा** (जेमन) **जे**वणे, (यमल) **जा**वळा, (कामला) **का**वीळ इ० अनेक शब्दात पूज्य द्यावें लागेल, पण **कालाचा ओघ** असलेलीच पूज्यें कमी करण्याकडे असल्यानें, नसल्या ठिकाणी पूज्य देण्याचा आग्रह कोणी धरील असें वाटत नाही. करिता प्रस्तुत मत–म्हणजे प्रभवानुरूप तद्भवात अवश्य पूज्य देणें ग्राह्य ठरत नाही

( ख ) केवळ रूढि-प्राप्त पूज्याविषयी मोरोपताचें मत ' धावणें ' ह्या शब्दाचे लेखनावरून अनुमित होतच आहे हे पूज्य देण्यात त्याची धरसोड आहे अर्थात् ते काढून टाकण्यास त्याची हरकत दिसत नाही करिता दुसरें मतही त्याज्यच ठरते.

( ग ) शब्दभेद दाखविण्याकरिता पूज्य देणें, तर ते कोणकोणत्या शब्दात देणार ? पाट ( पाण्याचा, बसण्याचा ), पाव ( पोचणे, चतुर्थांश, खाद्य ), माठ ( भाजी, मडकें ), घोट ( पाण्याचा, घोटणे ), वात ( वारा, दिव्याची ), वाणी ( व्यापारी, वाचा ), ताव ( कागदाचा, ताशेरा ) इ० अनेक शब्द मूलतः भिन्न असलेले, भिन्नार्थ पण सरूप आहेत. याच्या अर्थाचे नियमन वाक्यावरूनच होणार हा अर्थनिर्णय करण्याचा भार घेणें लेखनास योग्य व शक्यही नाही. 'वाट' शब्दाचे मार्ग, मनास वाटणे, पाट्यावर वाटणे, भावात वाटणें, पोटातील अवयवविशेष,इ० अनेक अर्थ आहेत यातील भेद नुसत्या शब्दरूपावरून व्यक्त करणें शक्य आहे काय ? असला भार इतर भाषातही लेखन पतकरीत नाही. सस्कृतात ' हरि ' या शब्दाचे अनेक अर्थ आहेत तरी पण तो शब्द निरंतर एकरूप लिहितात, मग त्याचा अर्थ कोणताही असो पूर्वापर संबंधावरून अशा शब्दाचा अर्थ कोणता घेणें हे वाक्यात ठरतें. इग्रजीतही अनेक (Paronyms) सरूप शब्द आहेत, जसें Bear, Bat, Hind, Ring.अर्थभेदास अनुसरून याचें निरनिराळें स्पेलिंग कोणीही सुचविलें नाही साराश, **अर्थभेदाकरितां कृत्रिम ( निर्मूल ) लेखनभेद इष्ट नाहीं**, ह्या तत्त्वाची सत्यता येथें सिद्ध होते. एवच अर्थभेदास उपयुक्त, पण निर्मूल

व रूढ, अशा पूज्यास फाटा देणें वाजवी ठरतें. या तिन्ही मुद्याचा विचार केल्यास असें मत ग्राह्य ठरते की, शब्दविशेषातील पूज्य कोणत्याही एकाच कारणा-करिता म्हणजे ते ( १ ) आहे म्हणून, किंवा ( २ ) भेददर्शनास आवश्यक म्हणून, फार काय ( ३ ) व्युत्पत्तिदृष्ट्या समर्थनीय आहे म्हणूनही, रक्षणार्ह नाही. असें पूज्य खुशाल काढून टाकावें शिवाय असे मिळमिळीत आनुनासिक्य गाळिल्यानें पक्षपाताचा आरोपही टळतो नम व नाम या दोहोमध्यें 'म' अस-ल्याने वस्तुतः त्याचे तद्भवात पूज्य हवे पण ( नम् ) लव यात ते न देतां फक्त ( नाम ) नाव ह्यातच देतात. अशाने उघड पक्षपात होतो समत्व इष्ट अस-ल्यास, ते उभयत्र देणें, किंवा कोठेच न देणें. पैकी भाषेची आधुनिक प्रवृत्ति पूज्ये गाळण्याकडे असल्यानें पक्षपात टाळण्यास तें कोठेंच न देणें हें योग्य दिसते.

येथें एक गोष्ट मनात वागवावी की जरी भाषेची प्रवृत्ति अनुनासिक–उच्चारातल्याप्रमाणे लेखनातही–गाळण्याकडे आहे, तरी एकदम तसें करणे योग्य होणार नाही. इग्रजी भाषाही ( Spelling= ) वर्ण–विन्यास सुबोध करू पहात आहे पण किती विम्मेपणाने ? आज कोठे Programme सारख्या थोड्याशा शब्दात Program अशी दुरुस्ती होत आहे, व ती सुद्धा ऐका-न्तिक नव्हे तर वैकल्पिक लेखनात एकदम क्रांति केल्यास वर्तमान पुस्तकें काहीशी दुर्बोध होतील. करिता साप्रत अनुनासिक गाळावयाचा तो फक्त अस-लाच की ( १ ) ज्याला मुळात आधार नाही, जसें-फेक ह्या शब्दातील, किंवा ( २ ) समूल असूनही जो भेददर्शनास उपकारक नाही, जसें–फेस यातील, पण नाव ( नामन् ) व नाव ( नौ ) यातील भेददर्शनास जरूर असल्याने पहिल्या शब्दातील अनुनासिक रक्षणार्ह आहे. साराश, व्युत्पत्ति व भेददर्शन याच्या-छेदरेषेस बरोबर स्पर्श करणारा अनुनासिक पूज्यरूपानें कायम राखावा

( १५ ) या नियमाची अमलबजावणी हल्ली प्रत्यय, व लोणी वगैरे थोडीशी नामे, एवढ्यापुरतीच करण्यात येते, इतरत्र पूज्य देतात, जसें–ताम्हनें, खेळणी, कवनें इ.

७. **बाराखडींतील कांहीं अक्षरें**—मराठी बोलणाऱ्याच्या आपल्या विशिष्ट उच्चार–पद्धतीमुळें बाराखडीतील काही अक्षरे आपल्या बोलण्यात येतच नाहीत. अशाचा जबरीनें उच्चार करणें हें अस्वाभाविक, अतएव त्याज्य आहे. 'केळ' याचें अनेकवचन 'केळी' असें होतें, पण तुल्य–न्यायाने 'गाय'

याचें 'गायी' करणें गैर आहे कारण आपण नेहमी गाई असाच उच्चार करितों. सामान्य रूपही गाई (-ला ) असेंच करितों अकारान्त स्त्रीलिंग शब्दांचें अनेकवचन आ किंवा ई प्रत्यय लावूनच करणें हा नियम अपूर्ण आहे य्-ला ई लाविताना त्या य्-चा लोप करावा लागतो, ही त्या नियमाची पुरवणी होय. आपल्या विशिष्ट उच्चारपद्धतीमुळें 'य्' या तालव्यास तालव्य ई हा स्वर लाविताना ते व्यंजन लोप पावते असाच प्रकार 'व' संबंधानेही उ-वर्णापूर्वी कधीकधी घडतो देऊळ-देवळें इ० जोड्यात याचा प्रत्यय येतो सांगश, गाय, कोय, चोय, सोय इत्यादि शब्दांचें सामान्यरूपाचे (किंवा अनेकवचनाचें) अन्ताक्षर यी-चे स्थानी ई करावे ही प्रशस्ति उच्चारानुरूप लेखनात अनुसरणें योग्य आहे.

(क) याहूनही जास्त महत्त्वाचा नियम म्हणजे शुद्ध मराठीत 'सि, सी' या अक्षराचा अभाव, तसाच, 'इ ई' पूर्वी दन्त्यतालव्य च-वर्गाचा अभाव होय. इ-ई-स्वर मिळाल्याने याचे ठिकाणी क्रमाने शि, शी व तालव्य च-वर्गाच्या बाराखडीतील अक्षराचा उच्चार होतो ही गोष्ट स्वयंसिद्धच आहे लहान मुलेही बाराखड्या म्हणताना च-चा (दन्त्यतालव्य), चि-ची (तालव्य), स-सा, शि-शी असे म्हणतात. सारांश, शुद्ध मराठीत यी-चे स्थानी वारंवार ई, सि-सी चे स्थानी शि शी, व चि-ची (दन्त्यतालव्य) याचे स्थानी चि-ची (तालव्य) अशी अक्षरे येतात मत्स्य मत्सी, माधुर्य माधुरी इ० उदाहरणात संस्कृतात सुद्धा यी-चे स्थानी ई आढळतो इंग्रजीतीलही Selby या नावाचा उच्चार शेल्बी असा काही सुशिक्षिताच्या तोंडूनही ऐकू येतो या दोन्ही ठिकाणी मराठीतील वरील उच्चारतत्त्वच दिसून येतें

(ख) गाई-गाया या धर्तीवर रोजनिशी-रोजनिश्या, अशी-अश्या असें अनेकवचनात आपण लिहीत नाही, तर रोजनिशा, अशा, असेच लिहितों. म्हणजे श या तालव्यात आणखी य् या तालव्याची भर घालीत नाही

यावरून असा नियम निघतो की, (क) स्-ला ई स्वर जोडल्यास, तो श-रूप पावतो, म्हणजेच स् + इ ई = शि शी. (ख) श्-ला य्-युक्त अक्षर जोडणें असल्यास त्यातील य्-चा लोप होतो, म्हणजेच श् + या = शा. असेच नियम च-वर्गासंबंधानेंही व अंशतः य्-चे संबंधातही आढळतात (ग) (दन्त्यतालव्य) च् + इ ई = तालव्य चि ची. (घ) तालव्य च्+य = तालव्य च. य्+इ ई = इ ई, य्+य्=य्.

किंवा थोडक्यात **सशयचुभ्यो यस्य लोपः** ही विचारसरणी लक्ष्यात ठेवि-ल्यास, ससा सस्यानें, माशी माश्याना, पाया पाय्यात, बाजा बाज्याने, पोपया पोपय्याचा, भय्या भय्य्याला इ० रूपातील जोडाक्षरें कशी प्रामादिक आहेत हें कोणासही दिसून येईल ‘ काही शब्दाचे सामान्यरूपात किंवा अनेकवचनात ‘ या ’ जोडितात ’ हा नियम अपुरा आहे, हें लक्ष्यात न घेतल्यानें अशी रूपें लेखणीतून उतरतात वेदहि **अस्या** सतीची ( व ४–१०१ ), गगा **यमुनाइया** ( व ६–४० ) इ ठिकाणचें मोरोपतांचें लेखन उच्चारविरोधी अतएव सदोष आहे, हें उघड आहे माझ्या मतें मराठीत असा नियम निरतर लक्ष्यात ठेवावा की ‘ वचनविभक्तिविकारामुळे स श य चवर्ग याम **य्**-चे बाराखडीतील अक्षर जोडण्याचा प्रसग आल्यास तो य्–रहित जोडावा.’

**८ च, ही यांचे लेखन**—अलीकडे इतिहाससशोधकमडळानें व त्याच्या काही गतानुगतिकानी मराठी लेखनात एक नवीन प्रकार आरंभिला आहे हा प्रकार म्हणजे च, ही, हे शब्द मागील शब्दाशी न जोडता ते त्यापासून तोडून लिहिणें. हा प्रकार अयोग्य असल्याचे पुढील कारणावरून दिसून येईल

( १ ) च तोडून लिहिणारे हेच लोक शब्दयोगी अव्यये मागील शब्दाशी जोडून लिहितात आता याचिपासुनि ( व ३-७८ ) इ. अनेक मोरोपती प्रयोगावरून मागील शब्दास जोडिताना च अगोदर, शब्दयोगी नतर, असा प्रकार दिसतो. जवळच्याचा संबंध दूरच्यापेक्षा दृढतर हें उघड आहे, म्हणजे शब्दयोगीपेक्षा च-चें नातें मागील शब्दाशी दृढतर हें उघड होतें हि-चें बाबतीतही तयाहिसह ( व ८–३० ) अशी उदाहरणे सापडतात यावरून असा प्रश्न सहज निघतो की दूरचा नातेवाईक जोडून लिहिणें तर जवळचा तोडून कसा लिहावा ? बरें, च तोडावा तर पुढील शब्दयोगी अव्यय कसे जोडावें ? साराश, शब्दयोगी अव्ययें मागील शब्दाशी जोडणाराला मध्यगत ‘ च, ही ’ ही अव्ययें सुद्धा जोडूनच लिहिणे भाग आहे शब्दयोगी अव्ययाहून ही अव्यये मागील शब्दाच्या समीपतर बसत असल्यामुळें ती त्यास जास्त जिव्हाळ्याची अतएव अविश्लेष्य आहेत, हे उघड ठरतें

( २ ) **ज्याबरोबर उच्चार त्याबरोबर लेखन** या सामान्य तत्त्वानुसारही ‘ च ’ मागील शब्दाशी जोडणें प्राप्त आहे. अर्थात्–‘ च ’ असा विश्लिष्ट प्रयोग वाचणार तरी कसा ? हा उच्चाराशी होणारा विसंवाद लेखनात क्षम्य कसा मानावा ?

( ३ ) खार, खारट, या दोन शब्दांचे उच्चार पाहिल्यास ट जोडताना मागील निभृत अकारास लबत्व प्राप्त होतें. आता ट हा प्रत्यय म्हणजे शब्दावयव आहे अतएव मागील भागापासून तो वियोज्य नाही **अर्थातच** हे दोन्ही एकदम उच्चारले जातात. **हार हारच** येथल्याप्रमाणें 'च' मुळें मागील निभृत किंवा अविद्यमानप्राय अकाराला लंबत्व प्राप्त होतें म्हणजे मागील अक्षरसंघावर उच्चारदृष्ट्या च आणि ट या दोन्ही भरतीचा एकच परिणाम होतो; तर तो उभयत्र एकाच पद्धतीने लिहिणें प्राप्त आहे 'खारट' पैकी 'ट' जर जुळून लिहिणें तर 'अर्थातच,' 'हारच' यातील 'च' ही जोडून लिहिणें ओघानेंच प्राप्त होतें.

## ९ उद्यांचे शुद्धलेखन—

मागील सर्व विवेचनाचा निष्कर्ष पुढीलप्रमाणें देता येईल. शुद्धलेखनाचे बाबतीत पाळावयाचे नियम—

( १ ) काही सर्वनामे सोडून बाकीच्या सव्ययाचे सामान्यरूप दीर्घान्त लिहिणें.

( २ ) स्त्रीलिंगी क्रियापदाच्या रूपात व इतरत्रही शिरू पहाणाऱ्या य–कारास सुखोच्चार व दाक्षिण्य यास अनुसरून प्रतिबंध करणे

( ३ ) ऱ्हस्वान्त संस्कृत सव्ययें सामान्यरूपाप्रमाणें प्रथमेमध्येंही दीर्घात लिहिणें.

( ४ ) अन्त्य 'अ' कारावर कधीही पूज्य न देणे.

( ५ ) नपुंसकलिंगी नामें पूज्यान्त लिहिणें.

( ६ ) नपुंसकलिंगी विशेषण, सर्वनाम व क्रियापद याच्या अंतस्वरावर, तो लिंगानुसार बदलत असल्यास, पूज्य देणे.

( ७ ) 'तत्सम' नसलेली क्रियाविशेषणे पूज्यान्त लिहिणे

( ८ ) लप्तान्त क्रियाविशेषणाचे अंतावर पूज्य देऊ नये.

( ९ ) ला–भिन्न प्रत्ययात विभक्तिरूपावर पूज्य देणे

( १०, ११, १२ ) अनेकवचनी सामान्यरूप, प्रथमपुरुषी क्रियापद व तृतीयात असलेले तुम्ही, मी, आम्ही, हे शब्द पूज्यान्य लिहिणें.

( १३ ) द्वितीयपुरुषी आज्ञार्थी एकवचनी क्रियापद ईकारात असल्यास, व स्वार्थी द्वि० पु० अनेकवचनी क्रियापद आकारात असल्यास, ती पूज्यात लिहावी.

( १४ ) ( क ) केवळ रूढीवर अधिष्ठित असलेली ( मग ती भेद्दर्शनास उपयुक्त असोत वा नसोत ) व ( ख ) मूल व रूढी दोहोंवर अधिष्ठित असूनही भेद्दर्शनास उपयुक्त नसलेली, अशी पूज्यें गाळून टाकणें.

( १५ ) न, म, ण याचे बाराखडीतील अक्षरावर पूज्य नियमप्राप्त झाल्यास तें फक्त नपुंसकलिंगी प्रथमेच्या अंती किंवा अनेकवचनी सामान्यरूपाच्या अंती देणें

( १६ ) च, ही–ही अव्ययें मागील शब्दास जोडून लिहिणे

( १७ ) मराठीची प्रवृत्ति शब्द दीर्घान्त उच्चारण्याकडे असल्यानें सदेह-स्थळी शब्द दीर्घान्त लिहावा

( १८ ) मराठी भाषेस अलीकडे अनुनासिक रुचत नसल्याने सदेहस्थानी पूज्यास फाटा देणें.

( १९ ) लिंगवचनादिविकारानी सि–सी, ( दन्त्यतालव्य ) चि–ची, यि-यी ही अक्षरे जेथे प्राप्त होत असतील तेथें त्याचे जागी क्रमानें शि–शी, तालव्य चि–ची, इ–ई ही अक्षरें योजणे

( २० ) च, ज, झ, य, श, स यापासून तालुप्रवण वण करण्याचा प्रसग आल्यास तेथे क्रमाने च, ज, झ, य, श, श,—हेच साधे तालव्यवर्ण योजणे.

( २१ ) संस्कृतात नसलेले दन्त्यतालव्य च, ज, झ हे मराठीत काही भेद-दर्शक चिन्हाने दर्शविणे इष्ट आहे

( २२ ) जातिवत कर्णभेदी अनुस्वार हा भरीव बिंदूचे रूपानें व मनोमय अनुनासिक पोकळ शून्याचे रूपाने दर्शविणे, जसे–देहात (= मरण ), देहांत (= शरीरामध्ये )

हे येथें सुचविलेले नियम अनुसरल्यास लेखनातील बरीच संदिग्धता निघून जाईल

---

## ४. अनुस्वारलेखन.

### पूज्य, बिंदु व शून्य

१. '**देहांत** जीव आहे तोपर्यंत', व '**देहांत** होईपर्यंत' या दोन वाक्या-तील पहिले शब्द सारखेच लिहिण्यात येतात त्याचा उच्चार अर्थानुसारे ठरत

असल्यानें,अर्थ कळेपर्यंत वाचकाचे वाचनात चूक संभवनीय. ही टाळण्यास पुढील योजना मी सुचवितों.

२ देहात व तत्सदृश शब्दातील अनुस्वाराच्या द्विविध उच्चाराचा विचार करिता असें दिसतें की, 'देहाचा अन्त' अशा अर्थी योजिल्या जाणाऱ्या **देहांत** शब्दामधील अनुस्वार प्रकट ऐकूं येतो असाच 'अनुस्वारोच्चार' संस्कृतात सर्वत्र असतो देहामध्यें असा अर्थ असता प्रयुक्त होणाऱ्या देहात या शब्दात अनुस्वार अस्फुट, मद्, निभृत असा प्रतीत होतो. हा अनुस्वारोच्चार मराठीत मात्र आढळतो दोन प्रकारच्या अनुस्वारोच्चारातील हा भेद पुढीलप्रमाणें सागता येईल—

३ एक संस्कृतोपलब्ध, दुसरा प्राकृतैकदृष्ट ( येथें प्राकृत हा शब्द 'मराठी'-चा पर्याय म्हणून योजिला आहे ), एक स्फुट, दुसरा अस्फुट, एक तीव्र, दुसरा मंद्, एक प्रकट, दुसरा निभृत, एक सहाघात, दुसरा निराघात, एक प्रबल, दुसरा निर्बल, एक पुष्ट, दुसरा क्षीण; एक जड, दुसरा हलका, एक भरीव, दुसरा पोकळ, एक अतःसार, दुसरा अतःशून्य

४ वरील भेददर्शनाचे वर्णन मुद्दाम लाबविले आहे, अशाकरिता की, त्यावरून भेद् दर्शविण्यास उपयुक्त अशा सज्ञा उपलब्ध व्हाव्या. वरील शब्दयुग्मापैकी एक भरीव, दुसरा पोकळ, हें युग्म प्रस्तुत ठिकाणी अनुरूप आहे, असें दिसून येईल

५ याप्रमाणें उच्चार–भेद् ठरविल्यावर अनुस्वाराचे मराठीतील पर्यायाचा विचार करू 'शून्य' टिब, बिंदू, पूज्य, हे शब्द अनुस्वाराशी समानार्थक म्हणून वापरितात उच्चार द्विविध व पर्याय बहुविध, तेव्हा आपलें काम सोपें आहे फक्त अमुक प्रकारास अमुक पर्याय व दुसऱ्यास दुसरा एवढेंच ठरविणें जरूर आहे हे पर्यायशब्द हल्लीप्रमाणें निर्विशेष न वापरिता, त्यामध्ये क्षेत्र वाटून दिलें पाहिजे. हा क्षेत्रविभाग, शक्यतर, मनसोक्त नसून, पर्यायाचे यौगिक अर्थावर प्रतिष्ठित असावा, म्हणजे संज्ञा व सज्ञित याचा संबध निःसदेह व अचूक ध्यानात राहील. करिता या पर्यायाचे व्युत्पत्तीचा विचार करू.

६ ( १ ) **शून्य** हा शब्द आकाशाचा पर्याय म्हणूनही योजितात. आकाश म्हणजे केवळ पोकळी. तेव्हा शून्याचा यौगिक अर्थ **पोकळ** असा उघड आहे ( २ ) द्रवाचा थेंब पडल्यानें **टिंब** उत्पन्न होतें थेंब अर्थातच भरीव असतो तेव्हा **टिंब** यानें अर्थात् भरीवपणाची कल्पना येते. ( ३ ) बिंदु म्हणजे थेंब, तेव्हा या शब्दातही भरीवपणाचा अर्थ अंतर्भूत आहे हें सिद्ध होतें. ( बिंदू शब्दाचें स्वरविपर्यासानें **बुंदी** असें रूपांतर होतें. हें **बुंदीचः** लाडू या चिरपरिचित पक्वान्नसंज्ञेत विद्यमान आहेच थेंबानें बनलेली कळी भरीव असते हें दांत सांगतातच सारांश–बिंदू म्हणजे भरीव वर्तुळ ) ( ४ ) पूज्य याची व्युत्पत्ति निश्चयात्मक सांगता येत नाही अनुस्वाराचा सामान्य पर्याय म्हणून त्याचा प्रयोग करावा.

७ सारांश, संस्कृतोपलब्ध म्हणजे भरीव उच्चारास बिंदू, टिंब, हे शब्द उचित ठरतात, तर प्राकृतोपलब्ध पोकळ उच्चारास शून्य हा शब्द अनुरूप भासतो. अशा रीतीनें अनुस्वारोच्चार द्विविध व तदनुरूप पर्यायही द्विविध. आतां लेखनाचा विचार करू.

८ कांही प्रांतांत, कांही काळांत, व कांही ग्रंथांत अनुस्वर पोकळ शून्यानें दर्शविलेला आढळतो. भरीव आकार तर सर्वत्रच प्रयुक्त आहे एवंच अनुस्वाराचें द्विविधत्व दर्शविण्यास द्विविध योजना मराठींत आयतीच सिद्ध आहे. मात्र या योजनेचें नियमन करणें–अमुक उच्चारास अमुक प्रकार, व दुसऱ्यास दुसरा–हें ठरविणें विद्वानांचें काम आहे त्यांचे पुढें मी नम्रपणें असें सुचवितों की, देहाचा अंत अशा अर्थी **देहांत** व देहामध्यें अशा अर्थी **देहांत** असा उच्चार–भेद दर्शवावा. पहिले ठिकाणी टिंब किंवा बिंदू, दुसरे ठिकाणी शून्य.

९ हा लेखनभेद उद्यापासूनच प्रचारांत आणावा, असें मी म्हणत नाही. केवळ दोन प्रकार दर्शविण्यास द्विविध योजना ठरवून ठेवावी. वाटेल त्यानें वाटेल तेव्हा, विशेषतः भेद स्पष्ट करणे असेल तेथें, तिचा स्वीकार करावा. भात्यांत बाण तयार करून ठेविलेला असल्यास काय वाईट ?

१० वरील लेखनभेदास अनुसरून पुढील पंक्ती अशी लिहिता येईल—

**"कज्जे कफावती होऊन रस्त्यांत, असावी घरांत शांती मोठी."**

येथें स्त्या, रा यावर शून्य आहे, शा–वर बिंदू आहे. हा भेद लेखनांत पाळल्यास, संवय व संवाद हे शब्द अज्ञ मुलांसही शुद्ध वाचतां येतील. वरील सूच-

नेनें संस्कृताचे लेखनात मुळीच ढवळाढवळ होत नसल्यानें संस्कृत भाषेकडून या सूचनेस काहीच विरोध होण्याचें कारण नाही.

११ असो, देहात व देहांत अशा ठिकाणी (१) उच्चार द्विविध—भरीव व पोकळ, किवा तीव्र व मद. (२) लेखन द्विविध—भरीव वर्तुळ व पोकळ वर्तुळ व (३) पर्याय द्विविध—बिंदु किवा टिंब, व शून्य. अनुस्वाराचें कथन अविशेषानें करावयाचें असेल तर तदर्थ पूज्य या शब्दाचा प्रयोग करावा.

अशा रीतीनें मी आपली सूचना विद्वानापुढें माडिली आहे तीवर अनुकूल वा प्रतिकूल मतें यथारुचि त्याचेकडून दर्शाविली जातील, अशी आशा व्यक्त करून हा लेख संपवितों

---

## ५. अनुनासिक, अनुस्वार व विसर्ग.

१. मागील लेखात अनुस्वाराचा लौकिक दृष्टीने विचार करून, तो द्विविध ठरवून त्याचें लेखन व सज्ञाही द्विविध दर्शविली. प्रस्तुत लेखात त्यासंबंधी शास्त्रीय विचार करूं.

२ देहांत (= शरीरात) व देहात (= मरण) या दोन्ही शब्दात व्यवहारांत अनुस्वार मानिला जातो, पण शास्त्रतः तें अयोग्य आहे पूर्वोक्त शब्दांत मुळीच अनुस्वार नाही, ज्यामुळें अनुस्वाराचा भास होतो तो अनुनासिक स्वर होय, म्हणून तदनुरूप त्याचें लेखन शास्त्रदृष्ट्या देहँत असें करणें प्राप्त आहे.

३ **अनुस्वार** (= अनुस्वर्यते सः) म्हणजे स्वराचे मागून पण त्याचे पाठोपाठ उच्चारला जाणारा स्वराचे **मागून**, त्यालाच चिकटून, काहीही उच्चारलें गेल्यास, तें त्या स्वराचे पुच्छ (किवा शिष्य) बनून त्यास गुरूं (गुरु) बनवितें. स्वराबरोबर **तदंगभूत** म्हणून काही उच्चारिलें गेल्यास, तें गुरुत्वापादक होत नाही.

**संयोगाद्यं दीर्घं स्वानुस्वारं विसर्गसंमिश्रम् ।**
**विज्ञेयमक्षरं गुरु (पादान्तस्थं विकल्पेन) ॥ १ ॥**

या लक्षणाप्रमाणें—अर्क, रूप, हिंसा, दुःख या शब्दात क्रमानें र्, उ, अनुस्वार, विसर्ग, ही अ उ इ उ याच्यामागून अव्यवहित उच्चारली जातात व त्या स्वरास गुरुत्व देतात. सारांश—अनुस्वाराचे योगानें मागील स्वरास गुरुत्व

आप्त होतें. उलट ज्या अनुस्वारामुळें असें गुरुत्व उत्पन्न होत नाही, तो खरा अनुस्वारच नव्हे तो केवळ **अनुनासिक**, म्हणजे **स्वराचा एक धर्म** आहे. दुसऱ्या रीतीनें सांगणें म्हणजे अनुस्वार स्वराचे मागून उच्चारला जातो, उलट अनुनासिक स्वराचा अगभूत म्हणूनच उच्चारला जातो. मागून उच्चारला जाण्यानें, अनुस्वारानें पूर्वस्वर द्विमात्रक किंवा गुरु बनतो.

४. अनुनासिकामुळें स्वराच्या मात्रात फरक पडत नाही

**सँवय सुटेना मूढा, संवत उपदेशिला जरी शब्दीं ।**

वरील पक्तीत सँवय शब्दाच्या मात्रा तीनच आहेत, त्यातील प्रत्येक अक्षर लघु आहे सँमध्यें नस्यामुळें गुरुत्व उत्पन्न होत नाही त्यात केवळ अ हा अनुनासिक स्वर आहे सवत–शब्दामध्ये व–पूर्वी अकारानंतर अनुस्वार उच्चारला जातो त्यामुळे तो अकार गुरुत्व पावतो व द्विमात्रक बनतो असा प्रकार सँवय शब्दात घडत नाही. तेथे अ हा जो स्वर उच्चारला जातो तोच अनुनासिक उच्चारला जातो नासिकाप्रधान उच्चारण त्यात अगभूतच आहे, मागून प्रतीत होणारें नाही अशा रीतीनें सँवय शब्दात **अनुनासिक,** व सवत शब्दात **सानुस्वार,** अकार आहे मराठीत पोकळ अथवा शून्य म्हटला जाणारा अनुस्वार संस्कृताचे दृष्टीने अनुनासिक नावाचा स्वर–धर्म आहे अर्थात् तदनुरूप लेखनातही भेद करणें क्रमप्राप्तच आहे तो भेद खाली दर्शविल्याप्रमाणें

५. संस्कृतात पुलिंग हा शब्द दोन प्रकारानी शुद्ध लिहिता येतो पुलिङ्ग व पुँल्लिङ्ग येथे पूर्वत्र पकार सानुस्वार आहे, व उत्तरत्र पुकारानतर अनुनासिक लकार आहे, जो ॅ ल् असा लिहिला जातो वर्ण अनुनासिक लिहिणे तर त्यावर ही ॅ खूण करितात या खुणेस संस्कृतात अनुनासिक चिन्ह व हिंदीत चंद्रबिंदु म्हणतात तेव्हा संस्कृत परंपरेस अनुसरणें तर सवय, देहात (= शरिरात ), बोलण्यात, इत्यादि शब्द सँवय, देहाँत, बोलण्याँत, असे लिहिले पाहिजेत. ( वंशकः = ) वाँसा, व कसाला असें लिहिणें प्राप्त आहे घरामध्यें अशा अर्थी मराठी पद्धतीनें घराँत असें लिहिणे योग्य ठरतें. तथापि मला वाटतें की सोईचे व लाघवाचे दृष्टीनें घरांत लिहिणे बरें.

६. वरील द्विविध उच्चार, भरीव अनुस्वार व पोकळ अनुस्वार किंवा अनुनासिक, कोठें-कोठें आढळतात हें ठरविण्यास पुढील उदाहरणें घेऊ.

(क) रंक, शंख, संत, गुंफ ( ख ) सांखळी, गांठ, दांत, झोंप, सांपळा, डांस, चोंच ( ग ) चंग, सांग, झांज, झुंज, हंडी, सोंड, रुंद, बांध, खुंभ ( घ ) सवय, गांव, शींव.

येथें क–ख–मधील शब्दांत नासिक्य उच्चारापुढें कठोर ( =खर् ) व्यंजनें आहेत व मागें क्रमानें ऱ्हस्व व दीर्घ स्वर आहेत. ग–मधील शब्दांत नासिक्य उच्चारापुढें ( झश् = ) वर्गांतील तृतीय व चतुर्थ म्हणजे मृदुव्यजनें आहेत; घ–मधील शब्दांत व–कार आहे. त्याचप्रमाणें ख–घ–मधील शब्दांत नासिक्योच्चार पोकळ किंवा अनुनासिकस्वररूप आहे, इतरत्र म्हणजे क–ग मधील शब्दांत तो भरींव आहे. अमल, संयाव इत्यादि थोडी उदाहरणें आढळतात, अशी की ज्यांत नासिक्योच्चारापुढें पंचमवर्ण, किंवा व–भिन्न अर्धस्वर आहे, पण त्याचा विचार करण्याची येथे जरूरी नाही, कारण अशा ठिकाणी नासिक्योच्चार एकविधच म्हणजे भरींव असतो

तेव्हां भरींव व पोकळ नासिक्योच्चाराचा क्षेत्रविभाग दिसून येतो तो असा. ( १ ) दीर्घ स्वर व कठोर व्यजनें याचेमध्ये, आणि ( २ ) कोणताही स्वर व वकार याचेमध्ये नासिक्योच्चार पोकळ असतो, व इतरत्र म्हणजे (३) दीर्घस्वर व मृदुव्यजनें ( ४ ) ऱ्हस्व स्वर व कठोर व्यजने आणि ( ५ ) ऱ्हस्व स्वर व मृदुव्यजने, याचेमध्यें--तिन्ही ठिकाणी -नासिक्योच्चार भरींव असतो. उदाहरणें--चोंच, नाव, डोंब, कुंचा, पलंग

७ वरील क्षेत्रविभाग अर्थातच संस्कृत म्हणजे तत्सम शब्दांस लावण्याचें कारण नाही, ते जसेच्या तसेच उच्चारले पाहिजेत, तरच ते तत्सम, नाही तर तद्भव ठरतील चांचल्य, संवत्सर वगैरे शब्दांत नासिक्योच्चार भरींव आहे, तसाच लेखनांतही योजिला पाहिजे. त्या शब्दांस मराठी उच्चाराचे नियम लागतच नाहींत तत्सम वगळून बाकीच्या संस्कृतागत शब्दांस लागणारा वरील नियम पुढील प्रमाणे देता येईल—

### तद्भवे वे सर्वतोऽनुनासिकः खरि दीर्घतः ।

**अर्थ**–तत्सम शब्दाहून भिन्न असलेल्या (=तद्भव) मराठी शब्दांत व–काराचे पूर्वी नेहमीच, असल्यास, पोकळ अनुस्वार ( किंवा अनुनासिक ) असतो; तसेच दीर्घस्वर व कठोर व्यंजन याचेमध्यें असल्यास पोकळ अनुस्वार असतो. ( खर् म्हणजे कठोरव्यंजन ).

८. आता–अनुस्वार काय आहे? याचा विचार करून हा लेख संपवू. कंस, दुःख इत्यादि शब्दाचा विचार केल्यास असें दिसून येईल की, अनुस्वार व विसर्ग दोघेही **स्वरानंतर** उच्चारले जातात, पैकी अनुस्वाराचे पुढें व्यंजन असावें लागतें, विसर्गापुढें तें असो व नसो पैकी पूर्वोक्त धर्म म्हणजे उच्चारास ( मागील ) **स्वराची अपेक्षा**, याचे योगानें दोघाचीही जात ठरते स्वरावाचून उच्चारलें जात नसल्यामुळें दोघेही व्यजनें ठरतात 'व्यज्यते तद् व्यञ्जनम्'=( स्वराचे योगानें ) प्रकाशित केलें जाते तें व्यजन या सज्ञेत अन हा प्रत्यय कर्मवाचक आहे हा विचार पुढीलप्रमाणें ग्रथित करिता येईल—

**अनुस्वारो हलः पूर्वो, विसर्गश्चापि, वान्तगः।**
**स्वरोत्तरमुभौ दृष्टौ, व्यञ्जने तौ स्वराश्रयात् ॥**

**अर्थ**—अनुस्वार हा हल् म्हणजे व्यजनाचे पूर्वी आढळतो, तसाच विसर्गही; पण विसर्ग अतीही असू शकतो, म्हणजे त्याचे पुढें व्यजन पाहिजेच असें नाही मात्र दोघेही स्वरानंतर नियमानें आढळत असल्यानें, या स्वराचे अवश्यक आश्रयामुळें दोघेही व्यजनें ठरतात

९ मराठीतील व्यजनापूर्वीचा पोकळ नासिक्योच्चार बिंदूचें रूपानें व्यक्त करण्याची नेहेमीची रीत सोडून नवीन रीति म्हणजे पोकळ शून्यानें व्यक्त करण्याची पद्धति अवलबणे योग्य आहे हें आतापर्यंतच्या केलेल्या विवेचनावरून उघड होतें या पद्धतीचा आदर विद्वान करतील, अशी आशा करून हा लेख संपवितों.

---

## ६. अनुस्वारांची अडगळ ( खंडनपर )

**" अलंकारेषु लुप्तेषु, किंफलं छिद्रदर्शनम्? "**

**प्रास्ताविक**—माझे शिष्यमित्र रा दत्तोपंत केळकर यानी मराठीतील अनुस्वार बरेचसे कमी करावे, असें केसरीपत्रद्वारा प्रतिपादिलें तें प्रतिपादन मला योग्य वाटलें त्यावर उत्तरपक्ष रा कुळकर्णी यानी केला आहे. त्यास उत्तरादाखल पुढील मजकूर आपणाकडे प्रसिद्धीकरिता पाठवीत आहें.

**१ संज्ञांचें स्पष्टीकरण**—संस्कृतात नासिकाप्रधान उच्चार द्विविध आहेत, ते भिन्न–भिन्न रूपानी व्यक्त करितात, दधिँ व संहार—या उदाहरणात पूर्वत्र

अनुनासिक स्वर इ आहे, तर उत्तरत्र अकारोत्तर अनुस्वार आहे स्वर अनुनासिक असतो, अर्थात् आनुनासिक्य हा स्वराचा धर्म आहे, तर ' अनुस्वार ' हें स्वतत्र ' व्यजन ' आहे. अनुस्वार मागील स्वरास गुरुत्व देतो, तर स्वर अनुनासिक झाल्याने स्वराचे प्रमाण ( = मात्रा ) बदलत नाही. सँवय व संवत्सर यात पूर्वत्र सकारापुढील अकार लघु आहे, तर उत्तरत्र तो गुरु झाला आहे. साराश, संस्कृतात आनुनासिक्य व अनुस्वार ही जशी उच्चारतः तशीच लेखतः भिन्न आहेत या संबंधात मराठीत घोटाळा झाला आहे

२ **मराठींतील अनुस्वार**—मराठीत संवय व संवत्सर या दोन्ही ठिकाणचे नासाप्रधान उच्चार सारखेच दर्शविले व बोधिले जातात. दोहोंकरिता टिब देतात व दोहोंस अनुस्वार म्हणतात विशदतेकरिता पुढील विवेचनात वरील उच्चाराची दर्शकें म्हणून क्रमानें उपनासिक्य व अनुस्वार व उभयसामान्य म्हणून 'नस्य' या संज्ञा मी उपयोजीत आहें.

३ **उपनासिक्य-लेखन**-संस्कृत काव्यात स्वराचें उपनासिक्य फार विरळा आढळतें, तर मराठीत तें पदोपदी दृग्गोचर होतें हें उपनासिक्य व अनुस्वार याची लेखनव्यवस्था उच्चारानुरूप लावणें तर सस्कृतानुसार उपनासिक्याच्या जागी चंद्रबिंदु व अनुस्वाराच्या जागी टिब देणें प्राप्त आहे, जसें-सँवय व सवत्सर. परतु चंद्रबिंदु लिहिण्यास घोटाळ्याचा असल्यानें त्याच्या स्थळी नुसतें पोकळ शून्य द्यावें, असें मी ( पूर्वीप्रमाणें 'साहित्य' १७-५-२५ पहा. ) आताही सुचवितों, जसें-सँवय व सवत्सर साराश-नाकात हुळहुळणारा उच्चार (पोकळ) शून्य किंवा वलयाच्या रूपानें व (कर्णभेदक) कानावर आदळणारा उच्चार (भरीव) टिब किंवा बिंदु या रूपाने दर्शवावा जुन्या मराठी लिखाणात हे दोन्ही लेखनप्रकार आहेत, पण ते सविवेक वापरलेले नाहीत आपल्या सोईकरिता येथें सुचविल्याप्रमाणें भेददर्शनार्थ त्याच्या उपयोगात क्षेत्रविभाग करावा

४ **उपनासिक्याचे प्रकार**—गाव, रोंख, कॆंस यातील पहिल्या उदाहरणात उपनासिक्य म्-वरून आलें आहे, दुसऱ्यात ' रोकड ' या अर्थापासून तें भेद दर्शवितें, तर तिसऱ्यात तें निष्प्रयोजन आहे पहिलें उपनासिक्य ' व्युत्पन्न ', दुसरें ' भेदक ', तर तिसरें स्वैर आहे. यातील कोणतें ठेवावें व कोणतें गाळावें ?

**५ उच्चार विरुद्ध लेखन**—शब्दोच्चार ज्याप्रमाणें देशभदानें त्याप्रमाणें कालभेदानेंही बदलतात, शब्दरूपेंही भेद पावतात. वेदात 'हस्तासः' काव्य-संस्कृतात 'हस्ताः' व मराठीत 'हात' अशी रूपें मूलतः एकच असलेल्या शब्दाच्या प्रथमेची आढळतात 'हस्तासः' बोलणारे लोक किंवा त्यांचे वशज कालभेदाने 'हस्ताः' असें बोलूं लागले, तर आणखी काही पिढ्यानी तेच 'हात' असें वापरूं लागले साराश—कालाच्या ओघाबरोबर शब्दाचे उच्चार अथवा रूपें बदलत जातात. हा बदल म्हणजे निसर्गाचा नियमच आहे. तो सर्व देशात व काळात आढळावयाचाच यामुळें, विसंवाद टाळण्याकरिता उच्चारभेदाबरोबर लेखभेद करणें विद्वानास प्राप्त होतें हा लेखभेद न केल्यास मूर्खत्व पदरी येतें इंग्रजी भाषेंतील अनेक शब्दाचे उच्चार व लेख यात विसंवाद आढळून येतो, याचे कारण प्रधानतः 'उच्चारानुरूप लेख न बदलणे' हेंच होय. 'NIGHT' याचा उच्चार मूलतः 'नक्त'सदृश असावा. सौकर्याच्या प्रवृत्तीनें तो कालातरानें 'नाइट्' असा होऊ लागला, म्हणजे उच्चारातून [GH = घ् = ( सर्धामुळें ) क्] क् लोपला, पण लेखनात तो तसाच राहून गेला. ज्ञा—चें रूपातर ग्ना, क्ना अशा परपरेने KNOW असे झाले पुढें त्या उच्चारातून ( क् ) K लोपला,पण लेखनात तो तसाच राहिला. येथील 'मनस्येकं, वचस्येक, कर्मण्येकं, दुरात्मनाम्' अशा विसंवादामुळें आपण इंग्रजास हसतों, पण मराठीतील उपनासिक्य अनेक शब्दातून उच्चारतः लुप्त झालें असूनही आपण लेखनात तें हट्टाने किंवा गतानुगतिकत्वाने ठेवून तसाच प्रमाद करितों. पाच, धाव, हास यातील नासिक्य एके काळी ( उच्चारतः ) जिवत असेल ( म्हणूनच तें प्रवृत्त झालें असावे ), पण हल्ली जर तें मृत झालें आहे तर भूतपूर्व म्हणूनच त्याचा सागाडा बिदूच्या रूपानें का ठेवावा ? नष्टोच्चार अथवा अन्यथाभूत गोष्टी ठेवू पाहणें तर पहाट—चें रूप प्रहाट—प्रभाट की प्रभात, असें काही तरी लिहावे लागेल. हें इष्ट आहे काय ? प्र—मधील र उच्चारात नाही तर लेखातही नाही. याच साम्यानें हास ( हसणें ) यामधील अनुनासिक उच्चारात नाही, तर लेखातही असता कामा नये. पाठशाला यातील पाठ—शब्द ( अर्थदर्शनास अवश्यक असूनही ) उच्चारातून गळाला म्हणून आपण तो लेखातून गाळतों. मधु शब्दातील उकार उच्चाराबरोबर लेखातही अकारत्व पावला 'गाडि' शब्दातील इकार उच्चा-

राबरोबर लेखनांत दीर्घत्व पावला. उपविश्-मधील उ गळून बैस शब्द बनला. साराश उच्चाराच्या पावलावर पाऊल टाकून जाणें लेखन अनेक बाबतींत करितें. जसें-वर्णलोप, अवयवलोप, स्वरभेद, स्वरप्रमाण इत्यादि. हें उच्चारानुसरण आपण मान्य करितों. पण उपनासिक्याच्या बाबतींत मात्र आपण लेखनास असें अनुसरण करूं देत नाही. ही विषमता कां चालू ठेवावी ? प्रत्यक्ष शब्दलोप खपतो; मग बिंदुलोप का न खपावा ? मौंजबिधन याचें रूप मुंज असें वापरण्यात आपण बंधन हा अवयव गाळितों, तर फेंस सारख्या शब्दातील ( अनुच्चारित ) उपनासिक्य का गाळू नये ? ' ग्राम ' याचा तद्भव बनतांना र–लोप होऊन ' गाम ', म-चें रूपातरानें गाव, तसेंच आणखी एका पायरीनें उपनासिक्याच्या लोपानें गाव का होऊं नये ? तद्भवत्वाचा ओघ गाव या रूपाशींच का थाबावा ? तद्भवात होणाऱ्या विकारात इतराबरोबरच उपनासिक्याच्या लोपास मान्यता देणें योग्य आहे याचा विचार करिता " विक्रीते करिणि किमङ्कुशे विवादः ? " हा पद्यचरण आठवतो साराश–उच्चाराबरोबर लिहिण्यात फरक करण्याचा समंजसपणा आपण जसा इतरत्र दाखवितों, तसाच तो मृत अनुस्वाराच्या किंवा उपनासिक्याच्या बाबतीत दाखविणें अवश्य आहे

६ **त्याज्यात्याज्य उपनासिक्य**—( १ ) व्युत्पन्न उपनासिक्य अनुच्चारित असून भेददर्शनासही अनवश्यक असल्यास काढून टाकावें, अगोदरच लुप्तप्रचार तर सर्वथाच उपेक्षावें गाव हा शब्द गाव असा लिहावा. पूज्याचा उपयोग पुढील शब्दात कोणी स्वप्नींही आणू नये–' वीस ( विंशति ), ' आठवा ' ( अष्टम ), ' सावळा ' ( श्यामल ), ' कावीळ ' ( कामला ). येथें आठवा यातील पूज्य भेददर्शनास जरूर असूनही, भाषा तें प्रतिप्रवृत्त करण्यास तयार दिसत नाही, हें लक्षणीय आहे ( २ ) ' भेददर्शन ' ही भाषेची एक प्रकारची शक्ति असल्यानें, तदुपयुक्त ' भेदक ' उपनासिक्य ( अर्थात् प्रचारात असलेलेंच) कायम राखावें, मग तें व्युत्पन्न असो वा नसो, जसें वाटा ( वाटा–पासून, अर्थ रस्ते ) व वाटा ( वट्-पासून, अर्थ विभाग ), रोख ( रोकड ) व रोंख ( लक्ष्य ) ( ३ ) तिसऱ्या प्रकारचें म्हणजे स्वैर उपनासिक्य सर्वथैव त्याज्य होय. सारांश उच्चारात प्रतीत झालें नाही तरी, भेददर्शनोपयुक्त असल्यास **प्रचारांतील मात्र** उपनासिक्य ठेवावें, अन्यविध टाकावें.

७ **भेदक उपनासिक्य**—शंका–रत्नबोधक 'पाच,' की संख्येंतील 'पाच'? हा भेद पूर्वापर सदर्भावरून लक्ष्यात येईल मग तो भेद वर्तुलानें का दर्शवावा? व कोणासाठी? साक्षरासाठी की निरक्षरासाठी? साक्षरास तर संदर्भच भेद सागेल, तदर्थ पूज्य नको तसेंच या चिन्हाची येथील भेददर्शक योजना निरक्षरास अज्ञात असल्यानें, त्याच्या भावाभावापासून त्यास अर्थभेद काय कळणार? एवच, भेददर्शनार्थ पूज्य इष्ट नाही समाधान–भेददर्शनास पूज्याची जरूरी गद्यात तितकी भासत नसली तरी, पद्यात ती चागलीच जाणवते पद्यामध्यें नैसर्गिक पदक्रम वारवार बदललेला असतो, व त्यामुळें, अर्थास दुर्बोधता येते. करिता त्यात अर्थनिश्चयास जितक्या प्रकारें मदत होईल तितक्या प्रकारें पाहिजेच असते अर्थात् भेददर्शक असल्याने पूज्याचा आदर पद्य अवश्य करणार, व साम्यदृष्ट्या गद्यातही त्याचा अवलंब करणें प्रशस्त ठरतें.

८ **कोश व व्याकरण**— कोशातून शब्द घेऊन त्याचें रूप विधानानुसार यथासंभव बदलून व्याकरण वाक्यात उपयोजितें आतापर्यंत वर्णिलेलें उपनासिक्य केवळ कोशगत होय. व्याकरणगत उपनासिक्य– ( उदाहरणार्थ–अनेकवचनी सामान्यरूप, किंवा नपुसकलिंगी शब्द, याच्या अतीचें ) हें सामान्यतः भेददर्शक असल्यानें, तें छाटताना कातर जपूनच चालविली पाहिजे, हें उघड आहे असो. उक्तरीत्या बरीचशी नासिक्ये गाळणें प्राप्त आहे पण कोणताही फरक करणें तो क्रमशः करणें इष्ट असल्यानें उपनासिक्यनिरासही बेतानेंच करावा.

९ **नस्यासंबंधीं**—दिसून आलेल्या अनेक प्रकाराचें '**वर्गीकरण**'— ( १ ) **उच्चारतः**—उपनासिक्य व अनुस्वार, जसें—क्रमानें संवय व सवत्सर यातील. ( २ ) **लेखतः**—शून्य व बिंदु, जसें—क्रमानें संवय व संवत्सर–यातील पूज्य उभयविध तसेंच ( १ ) **उपनासिक्य**—व्युत्पन्न, भेदक, स्वैर, लुप्त व वैयाकरण, जसें–नांव, रोंख, केंस, तींस, फुलें° यातील (२) **अनुस्वार** हा नित्य कर्णभेदक असतो, तो नेहेमीच स्पष्टलिखित असलाच पाहिजे. त्याच्या लेखनाबद्दल चिकित्सा केवळ अस्थानी आहे अनुस्वार म्हणजे अनुस्वार

'सारभूत गोष्टी'—( १ ) कर्णगोचर उपनासिक्याची प्रवृत्ति कर्णागोचर होण्याकडे असल्यानें थोड्याच कालानें वैयाकरण–भेदक–भिन्न अशी–सर्वच सांप्रतचीं ( कर्णगोचर ) उपनासिक्यें लेखनांतून गळतील, जसें–**सवय**, **आरव**.

( २ ) कर्णगोचर, भेदक व वैयाकरण एवढीच उपनासिक्यें लिहिणे जरूर आहे. ( ३ ) वैयाकरण, भेदक ( = अर्थभेददर्शनोपयुक्त ), कर्णगोचर यांस यथापूर्व प्राधान्य द्यावें.

**१० कांहीं अवांतर मुद्दे**—( १ ) अनुस्वार राखण्यानें-उदाहरणार्थ-ग्राम-चा तद्भव गाव असा लिहिल्यानें-शब्दाचें शुद्ध रूप राहतें, असें रा कुलकर्णी म्हणतात. यावर मी असें विचारतों की शुद्ध म्हणजे काय ? व्युत्पत्त्या मुळाच्या जवळचें, की तत्कालीन शिष्टादृत ? व्युत्पत्तिसमीप तें शुद्ध असें जर म्हणणें असेल तर तीस ( त्रिंशत् ), काल, बल, समय ( संवय-च्या जागी ), पानी ( पानीय ), काण ( कर्ण ) इत्यादि रूपें मराठीत शुद्ध ठरतील काय ? नाही ती शुद्ध मानणें म्हणजे कालक्रमभगाचा दोष करणें होय. सर्प-सप्प-साप ही तीनही रूपें तत्तत्काली शुद्ध ठरणार. कोणत्याही एकाच काली नव्हे सर्प व सप्प ही दोन्ही पूर्व काळी शुद्ध म्हणून आजही मानणें उचित नाही. आजच्या शब्दरूपाची शुद्धि ठरविताना, वर्तमानशिष्टप्रयोगच आदर्शभूत घेतला पाहिजे सारांश-'प्रयोगशरणा वैयाकरणाः, प्रयोगाश्च शिष्टादृताः' हीं तत्त्वें सर्वथा प्रमाण समजावी

( २ ) शास्त्रीय व लौकिक लिखाण असे दोन भेद करूं नयेत. लेखनाचें रूप जितकें स्थिर राहील तितकें अर्थबोधास इष्टतरच असल्यानें, लौकिक लिखाण शास्त्रीयापासून वेगळें करूं नये तसें केल्यास त्यात मनसोक्त प्रकार शिरून, तें आपणाबरोबर शास्त्रीयासही ओढील, व तेणेंकरून स्थिरतेची हानि होईल शास्त्रीय बंधनाची वेसण सर्वच लिखाणास पाहिजे, म्हणजे कालौघामुळें होणारे बदल मंदगतीनें होऊन, स्थिरता यावच्छक्य साधेल.

तात्पर्य-"**नस्यं-वैयाकरणं भेदकमथ कर्णगामि च त्रिविधम् ।**
**शून्येन बोधनीयं, भवति यथा पूर्वमत्र बलधुर्यम् ॥**"
( येथें नस्य म्हणजे उपनासिक्य )

---

## ७. मराठी भाषेचें शुद्धलेखन.

**१ उपन्यास**—मराठी भाषेचें शुद्धलेखन हा विषय सामान्य वाचकास रूक्ष असल्यामुळें, मनात असूनही, त्यावर लिहावेंसें मला वाटत नाही. परतु सद्यः-

कालीन वाङ्मयात त्यास एक प्रकारें तोंड पडलें असल्यामुळें त्यावर लिहिण्यास हा समय अनुकूल आहे असें समजून पुढील ओळी प्रकाशनार्थ आपणाकडे पाठवीत आहें.

२ **विषयाचें सामान्य स्वरूप**—मराठीचें शुद्धलेखन हा विषय बराच विस्तृत आहे त्याचे सर्वांगावर येथें लिहीत नाही त्याचे केवळ एकाच बाबीचा विचार येथे करितों, ती म्हणजे अनुस्वारलेखनासंबंधीची होय, जी सध्या प्रामुख्यानें जनतेपुढें मांडिली जात आहे

३ **विशिष्ट स्वरूप**—संस्कृतातील परिभाषेप्रमाणें देहांत ( देह+अंत ) व देहात ( शरीरामध्यें ) या दोन शब्दांपैकी पहिल्यात अनुस्वार ( व्यंजन ) आहे, तर दुसऱ्यात अनुनासिक (स्वर) आहे येथें असा प्रश्न निघतो की, हा अनुस्वार व हें (स्वराचें) आनुनासिक्य सारखेंच लिहावें की निरानिराळे? अनुस्वार हा श्रुतिगम्य आहे, तसेंच आनुनासिक्यही कधी कधी असतें. मग असें श्रव्य असताना तरी तें लिहावें की नाही? उदाहरणार्थ, '**त्यांच्या** म**नां**तून गावयाचें असूनही ते उगीच **कांकूं** करीत होते.' प्रस्तुत वाक्यात त्याच्या या शब्दात अनुस्वार आहे, मनातून यात आनुनासिक्य आहे, तर काकू यातही तेंच आहे, पण स्पष्टतर आहे हें स्पष्टतर नस्य लेखनात दर्शवावें, असेंच कोणी म्हणेल. आश्चर्यसूचक यव, प्रश्नार्थक क्यव, इत्यादि ठिकाणीही असेंच स्पष्टतर नस्य आहे हें **स्पष्टतर** नस्य चंद्रबिंदूचे रूपानें म्हणजे संस्कृतातील पद्धतीप्रमाणें व्यक्त करावें असें मी सुचवितों, जसें—यॅव, हॉ हॉ दुष्यत भूपाला

४ **उपनासिक्याचे भेद किती आहेत**?—कोशगत किंवा कौशिक व वाक्यगत किंवा वैयाकरण. पैकी कौशिक उपनासिक्यें द्विविध आहेत, भेदक व स्वैर ( किंवा अजागळ ) ही उपनासिक्ये फिरून समूल वा निर्मूल अशीही आढळतात नाव ( नामन् ) व नाव ( नौ ) यातील उपनासिक्य समूल भेदक आहे, तर काच ( द्रव्य ) व काच ( सासूचा ) यातील निर्मूल भेदक आहे. गाठ ( ग्रंथि ) यातील उपनासिक्य समूल व हसणें यातील निर्मूल आहे, पण दोन्हीही भेददर्शनास उपयुक्त नसल्यानें स्वैर आहेत हे चारी प्रकार शब्दाचे मूळ रूपातच आढळत असल्यानें ते सर्व कौशिक होत वाक्यात येताना लिंग-वचनादि विकारामुळें प्राप्त होणारे ते वैयाकरण उपनासिक्यप्रकार होत. उदाहरणार्थ—बरें, फुलास, आलों इत्यादि येथील पहिलें उपनासिक्य लिंगापेक्ष, दुसरें

वचनापेक्ष, तर तिसरें पुरुषापेक्ष आहे ही तिन्ही, कोशातील शब्द (वाक्यात) व्याकरणानुसार पदरूप धारण करिताना प्रवृत्त होत असल्यानें, वैयाकरण उपनासिक्य होत. शब्द कोशात,पद वाक्यात, तेव्हा कौशिक व वैयाकरण उपनासिक्यास क्रमानें शब्दगत, व पदगत किंवा वाक्यगत असेंही म्हणता येईल. अशा रीतीनें उपनासिक्यें एकदर त्रिविध ठरतात कौशिक दोन–भेदक व स्वैर, आणि वैयाकरण पैकी वैयाकरण हें बहुधा भेदक असतें, तरी पण तें स्वतन्त्र महत्त्वामुळे येथें पृथक् गणिलें आहे

५ **काळाचे धोरण** काय आहे ?—काळ हा कट्टर उपयुक्ततावादी आहे. ज्याचें प्रयोजन नाही त्यास. किवा ज्यावाचून निर्वाह होतो त्यास, खो देण्यास काळ निरतर तयार असतो Photograph चा सक्षेप Photo हा कोणी केला ? किरातार्जुनीयाचें किरात हे सक्षिप्त रूप कोणी घडविलें ? ‘ पाठशाळा ’ मोडून नुसती ‘ शाळा ’ कोणी केली ? फार काय आपली पायाची नखें आपल्या ग्रामवासाने अनुपयुक्त झाल्यानें क्रमाने पार नाहीशी करण्यासाठी दर पिढीस लहान–लहान कोण करीत आहे ? या सर्व कृत्याचा जनक काळच होय. हीच काळाची सक्षेपरुचि उपनासिक्यासही भोंवणार, नव्हे, आज भोंवते आहे. अर्थात् उपनासिक्यें हळू हळू गळाली तर तें काळाचे धोरणास अनुसारीच आहे, त्यासंबंधात विरोध करण्याचें किंवा विषाद मानण्याचें कारण नाही. याच दृष्टीनें प्रथम कातर लावावी ती हास, धाव, पोंच, इत्यादिसारख्या निर्मूल, निरर्थक उपनासिक्यास. समूल उपनासिक्येंही, परपराशुद्ध असूनही वर्तमानकाळी अकिंचित्कर असल्यास म्हणजे भेदक नसल्यास, काढून टाकणें अनिष्ट दिसत नाही या दृष्टीनें विचार केल्यास गाव यातील ( समूल ) उपनासिक्य प्रथमतः लोपार्ह वाटतें पण कोशात ‘ सापडणें ’ या अर्थी असलेला ‘ गाव ’ हा धातु पाहिला म्हणजे तें उपनासिक्य रक्षणीय ठरतें या उदाहरणावरून एखादें उपनासिक्य भेदक आहे की नाही हें फार विचारपूर्वकच ठरविलें पाहिजे, हें इष्ट ठरतें.

६ **भेदक उपनासिक्य** दर्शवावें की नाही ?—वरील विचारसरणीवरून निरर्थक उपनासिक्य तर लोपलें, पण काही लोक याहीपुढें जाऊन भेदक उपनासिक्यही लोपू पहात आहेत; एवढेंच नव्हे, तसें प्रत्यक्ष करीत आहेत. याची इष्टानिष्टता ठरविताना पुढील प्रश्न प्रथम विचारात घेतला पाहिजे. तो

हा की, लेखनानें शब्दातील, पदातील वा वाक्यांतील अर्थभेद दर्शवावा की नाही ? लेखनाने केवळ यथोच्चारच असावें काय ? उत्तर-आपण मनातील विचार शब्दानी व शब्द अक्षरानी व्यक्त करितों, म्हणजेच विचार अक्षरानीं व्यक्त करितों अक्षराशिवाय अन्य काही साधनें योजितों की नाही ? होय, योजितों. अनुवाकाचे ( म्हणजे Paragraph-चें ) आरंभचिन्ह म्हणजे ओळीचा आरभ थोडासा उजवीकडे सारणें, पदें तोडून लिहिणें व विरामादिक अनेक चिन्हें आपण करितों, ही चिन्हें का योजितों ? अर्थात् तीं विचारलेखनात अर्थभेदास आवश्यक आपण मानितों म्हणून यावरून अर्थभेदनास आपण जपतों हें उघड आहे म्हणजेच अर्थभेद दर्शविणें इष्ट ठरते मग नासिक्यही तसेंच जेथे असेल, तेथे तें वापरणें ओघप्राप्तच होय. प्रश्न—असा भेद न दर्शविल्यास काही घोटाळा होईल काय ? प्रतिप्रश्न—आपण स्वल्पविराम वापरतों तो नेहमी घोटाळा टाळण्यासाठीच काय ? त्याचे अभावी अर्थाचा अनर्थ होईल म्हणूनच काय ? उत्तर—नेहमीच नव्हे. विरामाचा उपयोग बहुधा अर्थाचा बोध स्पष्ट व लवकर व्हावा एवढ्यासाठी असतो. विरामादि चिन्हाचा उपयोग अर्थाचे सुबोधतेसाठीच प्रामुख्यानें होतो येथें जी विरामादि-चिन्हाची तीच उपनासिक्याची स्थिति तेंही अर्थबोधास मदत करील, तर का योजूं नये ? अर्थात् योजावें आनर्थक्यपरिहारच नव्हे तर केवळ सुखबोध्यताही विरामाप्रमाणें उपनासिक्यरक्षणानें साधावी. अर्थाचा अनर्थ प्रत्यक्ष झाला की नाही, हा मुद्दा नसून त्याचा सभव, विरळा तरी, आहे की नाही, हा मुद्दा आहे. अनर्थाच्या सबधाने तर उपनासिक्य ठेवणें उचित आहेच

७ **उपनासिक्यामुळे** अर्थभेद—'मी चोरी करणार नाही, केल्यास शिक्षा करावी' या वाक्यात स्वल्पविराम केल्यास-चे मागे किवा पुढे योजिल्यानें मोठाच अर्थभेद उत्पन्न होतो 'त्याची कडी मोडली, दिवाळी निघाली,' या वाक्यात प्रत्येक शब्दाचे अन्ती उपनासिक्याचे भावाभावामुळे अर्थान्तरें उत्पन्न होतात साराश, विरामचिन्हाचे, तसेच नासिक्याचे, भावाभावानें अर्थभेद शक्य आहे. अर्थात् त्याचा उपयोग अविचार्य केल्यास, वेळेस त्याच अक्षरापासून भलताच अर्थ निष्पन्न होईल. असा भलताच अर्थ उत्पन्न होऊन, त्यानें प्रत्यक्ष हानि होईपर्यंत, वैयाकरणानें वाट पहात बसण्याचें कारण नाही. लकडीपूल अरुंद असल्यानें, त्यावर गर्दीत

कोणी चेंगरून मरेपर्यंत, तो रुद्रावण्याचें कोणी लावणीवर टाकीत नाही. साराश–प्रत्यक्ष हानि न घडली तरी, हानीचा संभव हा जसा आपणास व्यवहारात उपाययोजनेस प्रवृत्त करितो, तसाच अर्थाच्या घोटाळ्याचा संभव वैयाकरणास तत्परिहारार्थ योजना अंगीकारण्यास प्रवृत्त करितो. आता असे प्रत्युपाय पदोपदी योजूं लागल्यास, त्याची सख्या फार वाढेल, हें खरें. तरी पण ते उपयुक्त असल्यानें, प्रचारात असतील ते तरी निदान टाकूं नयेत. या विचारसरणीनें भेदक उपनासिक्य रक्षणीय ठरतें.

८ **वैयाकरण उपनासिक्य**—हें बहुधा भेदकच असल्यानें वर प्रतिपादिल्याप्रमाणें लेखनीय ठरतें. राजा प्र**जां**पासून कर घेतो, बाय**कां**कडून मुलाचें शिक्षण करवावें, टो**प्यां**साठी कापड आण, मोठ्या न**द्यां**वर पूल बाधावे, लो. टिळ**कां**पेक्षा कट्टर कर्मवीर कोण आहे ? इत्यादि असंख्य ठिकाणी वैयाकरण उपनासिक्य गाळणें योग्य ठरतें काय ? ' नाही ' असेच कोणीही म्हणेल, व तदनुरूप मी सुचवितों की, भेदक ( कौशिक ) व वैयाकरण नासिक्यें ही लेखनात रक्षणार्ह आहेत, इतर त्याज्य होत आता वैयाकरण उपनासिक्ये सर्वच भेददर्शनोपयुक्त आहेत की नाहीत ? इत्यादि विचार स्वतन्त्र आहे. माझा मुद्दा एवढाच की भेदक ( मग तें कौशिक असो वा वैयाकरण असो ) उपनासिक्य अवश्य राखावें, तदितर गाळावें. पूर्वकालीन कवीची काव्यें दुर्बोध होणार नाहित ना ? हा विचार उपनासिक्यत्यागात सदोदित जागरूक ठेविला पाहिजे, वर्तमानकाळानें जसा स्वताचे सोईचा विचार करावा, तसाच भविष्य काळाच्याही.

९ **उपनासिक्य कसें दर्शवावें ?**—याचें उत्तर मी मागेंच ( साहित्य, १७५-२५ ) लिहिलेल्या लेख ६ त येऊन गेले आहे, त्याचीच पुनरावृत्ति येथे करितों ( श्रौत ) अनुस्वार भरीव ( टिबानें म्हणजे ) बिंदूनें व ( मानस ) उपनासिक्य ( पोकळ ) शून्याचे रूपानें व्यक्त करावें, जसें त्या देशांत एक शात मुनी रहात होता.

---

# ८ टिळक–चरित्रांतील शुद्धलेखन.

## खंड १. यथोच्चार लेखन

वरील विषयावरील रा. तात्यासाहेब केळकर याचे महाराष्ट्रातील लेखास आपण आपल्या पत्री स्थान दिलें आहे. त्यामुळें तो विषय लोकाचे डोळ्यापुढें

जास्त प्रकटतेनें आल्यानें त्याविषयी चार शब्द लिहिणें सोईचें आहे, असें समजून आपणाकडे पुढील लेख पाठवीत आहें, त्यास यथावकाश स्थान देण्याची कृपा करावी.

प्रस्तुत लेखातील विचारणीय मुद्दे—

( १ ) लेखनपद्धति उच्चारानुसारी असावी किंवा नाही ? ( २ ) शब्दरूपावरून त्याचे मुळाचे ज्ञानास मदत व्हावी किंवा नाही ? ( ३ ) अर्थभेदास त्याच प्रमाणें पुरुषलिंगवचनभेदास शुद्धलेखनानें किंमत द्यावी की नाही ! ( ४ ) ( निभृत ) उपनासिक्यें कोठें-कोठें आढळतात !

या मुद्याचा यथाक्रम विचार—

१ **यथोच्चार लेखन**—( क ) रूढीची प्रवृत्ती-बोली लेखारूढ होऊं लागली म्हणजे प्रथमतः तिचें लेखन अनेक प्रकारें होत असतें. त्यातील काही प्रकार शिष्टजनांना पसंत पडून विशेष रूढ होतात, इतर गळतात. अशी रूढी स्थापित झाली म्हणजे पुढील वैयाकरण तिची ( नोंद = ) निवेशना आपल्या ग्रंथात करितात, व ती, नियमरूपानें दिलेली, पुढील लेखकास मार्गदर्शक होते, व ते तदनुसार वागतात. जसें—' अत्र ' हा शब्द मराठीत आला तो लोक अनेक प्रकारांनी उच्चारूं व लिहूं लागले. इत, इठ, एथें, येथें, इत्यादि या अनेक प्रकारांपैकी अंतिम प्रकार शिष्टसंमत झाला, त्यास व्याकरणात व कोशात अग्रस्थान मिळालें, व त्याचाच अंगीकार लेखक करूं लागले म्हणजे " अत्र " याचा अपभ्रंश " येथें " असा शिष्टांनी मानिला, वैयाकरणांनी अनुमोदिला व इतरांनी आदरिला येथें लक्षणीय म्हणून एवढेंच की कोणतीही पद्धति जनरूढ होण्यास हे त्रिविध संस्कार लागतात-शिष्टसंमति, वैयाकरणानुमति व जनतांगीकार

( ख ) **रूढीचें रूपान्तर**—वर सांगितल्याप्रमाणें एखादी रूढी स्थापित होऊन काही दिवस चालू असते रूपान्तर हा जगाचा नियमच असल्यानें लोकांचे उच्चार सारखे,अत्यंत सूक्ष्मतम प्रमाणात का होईनात, बदलत असतात. "नदी वाहत्ये " अशा वाक्यात वीस-पंचवीस वर्षांपूर्वी " वाहत्ये " असें य-विशिष्ट स्त्रीलिंगी रूप प्रचारात होतें अर्थात् त्यास वरील त्रिविध आधार पूर्वीच मिळालेला होता. रूपांतील 'य' शिष्ट लोक व्यवहारात उच्चारीत, वैयाकरण ग्रंथात अनुमोदीत, व सामान्य लोक लेखात आदरीत, हें खरें; परंतु जगाच्या रूपा-

न्तरशीलत्वामुळें विविध कारणानी सामान्य जन वाहते असा उच्चार करूं लागले. हा उच्चार सौकर्यानुकूल असल्यामुळें, शिष्टानाही तो आदरावा लागला. बऱ्याच शिष्टानी त्यास उच्चारात आश्रय दिल्यामुळें, वैयाकरणांसही तो अनुमोदनार्ह झाला. अर्थात् जनताही तोच सुखोच्चार आदरूं लागली. अशा रीतीनें वाहत्ये–चें रूपातर वाहते असे झालें रूपातर कोणकोणत्या कारणांनी होतें, याचा थोडा सविस्तर विचार करू.

( ग ) **रूपांतराची सरणी**—वाहत्ये या रूपास शिष्टाच्या संमतीची मुद्रा (=शिक्का) पूर्वीच मिळाली असल्यामुळे,ते व्याकरणात प्रविष्ट झालें.त्यामुळें त्यास स्थैर्यही मिळालें, कारण एखाद्या रूपाविषयी शका आल्यास, लोक व्याकरणात पाहणार, तेथें जें रूप सापडणार त्याचाच आदर उचित म्हणून लोक करणार. अशा रीतीनें व्याकरण हे भाषेचे लेखनास व उच्चारास स्थिरता देत असतें; तर रूपातरशीलत्व उच्चारात सारखा फरक घडवीत असतें व्याकरण म्हणतें ‘वाहत्ये’ पाहिजे. सामान्य लोकाची सुखोच्चारप्रिय जीभ म्हणते ‘वाहते’ पाहिजे. असा लढा चालू असताना शिष्ट काय करीत असतात ? ‘वाहत्ये’ हें रूप परंपरेनें शिष्टानीच प्रवृत्त केलें असल्यामुळें, त्याची स्थिरता त्यास इष्ट असते. तेंच नित्य टिकावें असे त्यास साहजिकच वाटतें आपणच ज्या रूपास जन्मास, निदान प्रसिद्धीस तरी, आणिलें, त्यास मूठमाती कशी द्यावी ? अशा विचारानें व्याकरणस्थित रूप, अर्थात् स्वसमत रूप, रक्षण करण्याकडे शिष्टाची प्रवृत्ति असते. म्हणजे उच्चाराचे बाबतीत शिष्टजन मागें व सामान्यजन पुढें, असा प्रायः नेहेमीच क्रम असतो.हा सामान्य जनाचा कल प्रबल होऊन क्रमाक्रमानें शिष्टासही आपणाकडे वळवितो,व नंतर बऱ्याच शिष्टाची मान्यता त्यास मिळाल्यावर तो ग्रथमान्यता मिळवू पाहतो ही मान्यता क्रमशः ग्रथकार व विशेषतः वैयाकरण यानी दिली म्हणजे, तो कल किंवा प्रवृत्ति शुद्ध म्हणून मिरविते; तिची शुद्धी सर्वमान्य होते म्हणजे शिष्ट व वैयाकरण हे भाषेतील राज्यतत्रचालक, जनता ही बंडखोर, प्रथम काही शिष्ट फितूर व नंतर बरेच. पुढें पुष्कळ शिष्टांचे बंडाला आनुकूल्य व शेवटी भाषेचे कर्मसचिव वैयाकरण याची त्या बंडास मान्यता. अशा रीतीनें सामान्यजनानी केलेली रूपातराची मागणी अखेर वैयाकरणाकडून स्वीकारिली जाते. सामान्य जनतेनें नवीन उपक्रम करावा, तो बऱ्याचशा शिष्टानी आदरावा, व नंतर वैयाकरणांनी प्रवर्तित करावा.

यापैकीं दुसरी पायरीच महत्त्वाची, तिसरी केवळ औपचारिक आहे तिचें स्वतंत्र महत्त्व नाही. वेळी तिची कोणी वाटही पहात नाही. वरचेंच उदाहरण पहा. लोकमान्य टिळक नेहमीच ' रूढी पडल्ये ' अशातल्या सारखे य-विशिष्ट प्रयोग करीत, पण हल्ली तद्भिन्न ' पडते ' असा प्रकार सर्वथा रूढ आहे. तो सशास्त्र का ? तर प्रथम शिष्टादृत म्हणून हल्ली ' तो जातो, ' तर ' ती जाते ' असाच प्रकार सर्वसंमत आहे तो,एक-दोघांना नव्हे तर बहुत शिष्टांना उच्चारांत पसंत पडल्यामुळे,रूढिपूत होऊन ग्रंथांत प्रविष्ट झाला आहे.तो प्रयोजण्याचे बाबतींत व्याकरणाचे संमतीची पर्वा केलेली दिसत नाही रा केळकरकृत टिळक-चरित्रांत लोकमान्यांचे लेखांत असले य-विशिष्ट प्रयोग पहावयास सांपडतात हल्ली ते पार लोपून गेले आहेत

( घ ) **रा केळकरांचा उपक्रम**—वर प्रतिपादिल्याप्रमाणें, शिष्टसंमत रूढींत फरक करण्याविषयी लोकांची धडपड निसर्गतःच राहून-राहून चालू असते ही उच्चारांतील क्रान्ति बंडखोरीनें ते लेखांतही करितात तो त्यांचा अधिकारच आहे या बंडखोरीस अनुरोध वा विरोध, तिचे युक्तायुक्ततेप्रमाणे शिष्ट करितात सारांश, बंड करणें हा सामान्य जनांचा अधिकार, यथापरिस्थिति त्याची संभावना करणें हा शिष्टसमवायाचा अधिकार बंडखोरीस विरोध कोणीही शिष्ट व्यक्तिशःही करील, पण तीस उत्तेजन देणें हें काम त्यांनी समवायानेंच केले पाहिजे रूढी पाळणें व पाळविणें हें शिष्टाचें कर्तव्य असल्यानें, ते बजावण्यास समवायाची जरूरी नाही पण रूढीचा भंग करणे तर, तो मात्र एखाद्-दुसऱ्या पुढाऱ्यानें आपल्याच धूर्वहनेवर करणें उचित नाही करितां रा केळकर यांनी अनुस्वाराचे बाबतींत केलेली बंडखोरी त्यांच्या-सारख्या भाषासचिवास उचित नाही लक्ष्यांत ठेवण्याचें म्हणून हें की, शिष्टांनीं रूढी पाडावी, सामान्य जनांनी तीविरुद्ध बंड करावें, तें बंड अनुचित असल्यास कोणीही शिष्टांनी, एकानें वा अनेकांनी, त्यास विरोधावे, तें बंड युक्त असल्यास त्यास शिष्ट-समवायानें अनुमोदावें, ही सरणी सशास्त्र ठरत कोणाही शिष्टानें व्यक्तिशः बंडखोरी करणें किंवा तीस उत्तेजन देणें हा भाषेचे साम्राज्यांत अपराध ठरतो यासंबंधांत 'रूढ्यन्तरप्रवृत्तिः स्यात् शिष्टसंघानुमोदनात्।' हेंच तत्त्व प्रभावी ठरतें

(ड) **रा केळकरांच्या उपक्रमाचा परिणाम**—रा. केळकर हे शिष्ट असल्यामुळे बंडखोरीला नालायक होत हें आपण पाहिले अशा स्थितीत त्यानीच बडखोरी केली विद्यमान नियम ज्यानी पाळावयाचे त्याच्यापैकीच एका मुख्यानें ते मोडणें हे शिष्टसमवायास रुचलें नाही, व म्हणूनच तद्विषयक नापसती रा अण्णासाहेब पराजपे याचे समेलनाचे अध्यक्ष या नात्यानें झालेल्या भाषणात दिसून आली रा केळकर यानी सुचविलेला मार्ग समवायास रुचलासें दिसलें नाही आता तो म्हणजे कोणासच इष्ट नव्हता असें नाही अनुच्चारित पूज्य काढून टाकावें, असें बऱ्याच जणास वाटत आहे व होतें, पण तदर्थ शिष्टमुख्यानें एकदम प्रवृत्त होणें, हा आपला उपमर्दच आहे असें शिष्टास वाटले अर्थात् त्यानी त्यास विरोध केला जी नवीन प्रवृत्ति हळूहळू समाजात प्रवृत्त होऊन बळावत होती, तिला असें उपमर्दकारक स्वरूप प्राप्त झाल्यानें तद्विरुद्ध शिष्टमत वास्तवाधिक चिडलें ही प्रवृत्ति इतरेजनाचे लेखात इतकी असह्य वाटली नसती तेथेंच ती चालू असती तर तिची असह्यता क्रमशः कमी-कमी होत गेली असती, व अशा रीतीने ती बऱ्याचशा शिष्टास समतही झाली असती म्हणजे तिला शिष्टसमवाय-समति क्रमानें मिळाली असती पण प्रस्तुतच्या बडखोरीनें ती समति जवळ न येता दुरावली, असे दिसतें येथें एक दृष्टात सुचतो, तो देण्यासारखा आहे एक बाई शेजारणीकडे ताकाला गेली शेजारीण घरात नव्हती ताकही देण्यासारखे नव्हतें तिची सून घरात होती. अर्थात् तिनें 'ताक नाही' म्हणून सागितलें. हा नकार घेऊन ती बाहेर पडताना शेजारीण आली तिला सुनेनें दिलेला नकार खपला नाही ती म्हणाली 'अहो साळूताई, ताक नाही म्हणून म्हणणार सून कोण? ताक असो वा नसो, पण सुनेला काय अधिकार ते आहे की नाही म्हणण्याचा? चला तुम्ही घरात, मी तुम्हास ताक देते'. असें म्हणून त्या बाईनें ताक थोडें असतानाही, केवळ सुनेच्या कल्पित अधिकारातिक्रमावर रागावून शेजारणीला दिले येथें स्वतःचे सोईविरुद्ध तिचें वर्तन झालें सुनेनें ताकाचे बाबतीत काहीच म्हटलें नसतें तर, सासूनें आपली गैरसोय केली नसती साराश स्वतःस संमतप्राय असलेली गोष्टही मनुष्य स्वतःचे अभिमानास धक्का बसत असल्यास अंमलात आणण्यापासून निवृत्त होतो. असाच प्रकार रा केळकराचे उपक्रमासंबधानें शिष्टानी केला आहे, व तो प्रकार तसाच होणार हें स्वाभाविकच आहे सोयसाधन की मानरक्षा? असा प्रश्न उत्पन्न झाला असता मनुष्य सोय

बाजूस सारतो व मान सभाळतो ग. केळकराचे उपक्रमानें सोय कितपत झाली ( काही झाली आहेच ), हा प्रश्न निराळा आहे

( च ) **यथोच्चार लेख कीं यथालेख उच्चार** ?–जनतेतील उच्चाराचा सामवायिक विचार करून तदनुरूप शिष्ट लोक लेखनाचे नियम बनवितात. अर्थात् एवढ्यापुरतें यथोच्चार लेख हें तत्त्व प्रभावी दिसतें पुढे एकदा बनविलेले नियम यावच्छक्य टिकून रहावे असें साहजिकच कर्त्यास वाटणार. नियम करावयाचे तेच मुळी कशाकरिता ? पाळण्याकरिता की मोडण्याकरिता ! तेव्हा शिष्ट लोक साधेल तितका काळपर्यंत या नियमास चिकटून राहतात. म्हणजेच तदनुरूप लेखच नव्हे तर उच्चारही करितात, कारण लेखननियमास स्थिरता पाहिजे ही स्थिरता, उच्चाराने यावच्छक्य नियमास अनुसरल्यानें, त्या नियमास प्राप्त होते सारांश, उच्चाराप्रमाणें लिहावे हे जरी नियमकालापुरते खरें असले, तरी लेखनाप्रमाण उच्चार करावा हे सामान्यतः इष्ट ठरतें. असा उच्चार न केला तर रोज नियम बदलावे लागतील, आणि नियम जर असे रोज बदलणार असतील तर ते करा तरी कशाला ? नियम जर करणें ( व कोणीही ही गोष्ट इष्ट मानील ) तर ते टिकविणे हे ओघानेच प्राप्त होतें. हेच तत्त्व रा नानासाहेब वैद्य यानीही समेलनात बोलून दाखविलें ते म्हणाले, ' बोलणे कसें ? तर पूर्वीच्या लोकानी तत्कालीन बोलण्यास अनुसरून जे लिहावयाचे नियम केले आहेत त्याप्रमाणे बोलण्याप्रमाण लेखन व लेखनाप्रमाणें बोलणें ' उच्चार व लेख याचा असा हा अन्योन्य–सबध आहे. लेख ( नियम ज्या काली ठरले त्या ) विशिष्टकालाच्या उच्चाराप्रमाणे, तर रोजचा उच्चारही त्या लेखाप्रमाणे अर्थात् उच्चाराचे लेखानुगामित्व विश्वाचे परिवर्तनशीलत्वामुळें कालांतराने क्रमशः सुटत जाणार, हे उघडच आहे पण ही गोष्ट दीर्घकालानें होणारी, रोजची नव्हे व्यवहारदृष्ट्या बोलणें म्हणजे लेखानें उच्चारास एकदा, तर उच्चाराने लेखास नेहमी अनुसरावें

येथपर्यंत लेखनपद्धति उच्चारानुसारी असावी की नाही, या मुद्याचा विचार झाला आता दुसऱ्याचा विचार करू

---

## खंड २.—शब्दरूप व व्युत्पत्ति.

**शब्दरूपावरून त्याचे मुळाचे ज्ञानास मदत व्हावी कीं नाहीं ?—**

२ या प्रश्नाचे दोन भाग पडतात शब्दाचें मूळ कळावें की नाही ? व हे ज्ञान शब्दाचे रूपावरून होणें इष्ट आहे की नाही ? पैकी ( क ) पहिल्याचें उत्तर

कोणीही ' होय ' असेंच देईल व्यवहारात जसें ज्याशी व्यवहार करावयाचा त्या मनुष्याचें पूर्ववृत्त ज्ञात असणें इष्ट असतें, तसेंच भाषेंत जो शब्द वापरावयाचा त्याचे मूलज्ञान असणें इष्ट असतें थोडीशी उदाहरणें येथें घेऊं श्रीमतपूजन कोठे करावें ? तें काही गावातून एखाद्या देवळात का करितात ! वाङ्निश्चय जसा नेहेमी मुलीकडे, तसे तें मुलाकडेच नेहेमी का करीत नाहीत ? या शब्दाचें मूळ पाहिल्यास तें सीमांतपूजन असे आहे त्यावरून बोध होतो तो हा की–उठून आलेल्या जावयाचें सीमेवर पूजन करावे या अर्थानुसारच अनेक ठिकाणी हा विधि वराचे बिऱ्हाडी न होता, एखादे देवळात ( तें ग्रामसीमा मानून ) करितात थडी वाजते, मग ती ऐकू का येत नाही ? याचे उत्तर ' वाजते ' याचे मुळाचें ज्ञान झाल्यानें सहज मिळेल थडी वाजते म्हणजे पीडा, बाधा देते, बाधते-चेंच रूपांतर वाजते असें आहे, व बाधते यात आवाजाची उत्पत्ति मुळीच संभवत नाही, तशीच वाजते-मध्येही संभवण्याचें कारण नाही येथील ' वाजते ' याचा वाद्य वाजतें यातील वाजते–शी व्युत्पत्तिदृष्ट्या मुळीच संबंधी नाही मुलींनी भावजईशी कसे वागावे ? उत्तर-त्या तिला कोणत्या शब्दाने संबोधितात ? वहिनी या नावानें वहिनी हा शब्द भगिनी–वरून झाला आहे, तेव्हा नणदांनीं भावजईशी वागणें तें बहिणीचे प्रेमानें वागावें, हें उघड आहे अशी विविध बोधप्रद व हितकर माहिती शब्दमुळाचे ज्ञानानें लाभते तेव्हा शब्दमुळाची माहिती कोणीही इष्टच मानील प्रश्न एवढाच की ही माहिती शब्दानें आपल्या **रूपानें** द्यावी की काय ?

( ख ) शब्दाचे रूपानें ही माहिती देणें कितपत शक्य आहे ?– ही माहिती शब्द कशी देणार ? मुळातील वर्ण कायम राखून मग त्यानें विवक्षित अर्थाचा बोध व्यवहारात कसा करावा ? लोकातील उच्चारानुसार आपलें रूप धारण करून विवक्षितार्थ–बोध व मूळबोध अशी दोन कामें शब्दावर येऊन पडणार वरीलच उदाहरण घेऊं तुम्ही कोठें चालला ? मी सीमांतपूजनाला चाललों या रूपानें ' गावाचे हद्दीवर कोणाचें तरी पूजन होणार तिकडे ' हा मूळचा अर्थ कळला तरी, व्यवहारातील विवक्षित अर्थ मुळीच ज्ञात होत नाही. या रूपानें व्यवहारच खुंटणार आता **व्यवहार-सिद्धि व मूळार्थ-ज्ञान,** यातून कोणीही व्यवहारसिद्धीच पसंत करील. अर्थात् उच्चारानुसार रूप धारण करणें हेंच शब्दास उचित आहे, मग मुळाचें ज्ञान त्यापासून होवो

न होवो सारांश–मूळ व व्यवहार यांत विरोध आल्यास मूळ सोडून व्यवहाराम शब्दाचे रूपानें अनुसरलें पाहिजे इंग्रजी भाषेत लेखन व वाचन यामध्यें विसवाद वारवार आढळतो लिहावयाचें (Sign) सिग्न्, व वाचावयाचें साइन् [ येथें मूळ signum सिग्नम्, लेखन sign सिग्न् व वाचन sine साइन् असा तिरंगी प्रकार आढळतो ] लेखन एक, तर वाचन दुसरें, असा विक्षिप्त प्रकार कोणीच मराठीत शिफारसणार नाही पण आहे त्याच सरणीस अनुसरून उच्चार मूळ-भिन्न झाल्यास लेखनही मूळाभिन्न, अर्थात् मूळ-ज्ञापनास अशत. तरी अक्षमच होणार, हे उघड आहे, व तसेंच शेकडों शब्दांत आढळतेंही येथें प्रश्न असा निघतो की शब्दरूप जर मूळज्ञान करून देत नाही, तर तें व्हावे कसें ? याचे उत्तर–कोशांत प्रत्येक शब्दापुढें मूळ देऊन ठेवण्यानें कोशात शब्दाच्या अर्थाचगोचर त्याचें मूळ व दरम्यानची रूपें ही (शक्य असल्यास तत्तत्कालभेदा-बरोबर) द्यावी अशी व्यवस्था कोशात करण्याची इंग्रजीत वहिवाटही आहेच

---

## खंड ३ लेखनाने अर्थाचें आणि लिंगादिधर्माचें बोधन.

३ अर्थभेदास, त्याचप्रमाणे पुरुषलिंगवचनभेदास, शुद्धलेखनाने किंमत द्यावी की नाही ?

( क ) **द्विविध अनुस्वार**—वाक्यात अनुस्वार-द्वारा अर्थभेद दोन रीतींनी साधिता येतो ( १ ) शब्दशरीराचे द्वारा, व ( २ ) वाक्यात त्यास होण्याऱ्या विकाराचे द्वारा. तो ' मानी पुरुष ( किंवा नावाडी ) अशा वाक्यांत नाव ( किंवा नांव ) सोडील काय ? ' येथे कर्मभूत वस्तू ' बाणा ' किंवा ' होडी ' हे अनुस्वाराच्या भावाभावामुळें बोधित होते हा अनुस्वार प्रस्तुत शब्दात वाक्यगत विकारामुळे शिरला नसून, मूळचाच आहे तो कोशांतच सापडतो म्हणजे येथे दोहोंपैकी कोणता अर्थ विवक्षित आहे हें केवळ **कोश** पाहिल्यानेच कळतें **नाव** असल्यास होडी असा अर्थ, **नांव** असल्यास बाणा असा अर्थ या अर्थभेदाचे मुळाशी व्याकरणाचा मुळीच संबंध नाही व्याकरण कोशातून शब्द घेऊन त्यास वाक्यात उपयोजितें शब्द कोशानें द्यावा, तो व्याकरणानें उपयोजावा. शब्दाचें रूप कोश सांगतों, तर ( वाक्यगत ) पदाचें रूप व्याकरण सांगतें विद्वस् हा नुसता शब्द आहे, तर विद्वान् विद्वांसौ

इत्यादि शब्द असून पदेंही आहेत. साराश, शब्द कोशगत व पद व्याकरणगत, हें लक्ष्यात ठेवावे.

वाघानी गुरें मारिली—यातील सव अनुस्वार व्याकरणगत आहेत. **घां**—सानुस्वार का ? सामान्यरूप अनेकवचन म्हणून **नीं**—तृतीयाप्रत्यय म्हणून, तर ( गुरु ) रें-(मारि) ली-वचनार्थ बदलणारें नपुसकलिग म्हणून. अशा रीतीनें अनुस्वार द्विविध ठरतात-कौशिक व वैयाकरण,-अथवा शब्दगत व पदगत. की, नाही, पुढें, सुद्धा, ही अव्ययें असल्यानें, कोशात व वाक्यात एकाच रूपानें आढळतात यातील अनुस्वारास काय म्हणावे ? कोशगत की पदगत ? वाक्यात शिरण्यापूर्वीच हे शब्द सानुस्वार असल्यामुळे यातील अनुस्वार कोशगतच होत म्हणजे (कोशलब्ध)अव्ययातील कोणताही अनुस्वार व सव्ययातील मूलरूपगत अनुस्वार कोशगत ठरतात याचा आता विचार करू

( ख ) **कोशगत अनुस्वार**—सभवनीय प्रकार—अर्थभेद निभृत अनुस्वारानेंच उत्पन्न होण्यास शब्दरूप एरवी ( = अनुस्वार सोडल्यास ) एकच असलें पाहिजे, जसें पाच ( सख्या ), पाच ( रत्न ) असें भिन्नार्थक होण्यास शब्दरूप दोन मुळावरून प्राप्त झालें असले पाहिजे पण रूपाची मुळे दोन, तर अर्थही दोन असणार. कोणता अर्थ व मूळ विवक्षित आहे हें कसे कळावें ? ही फोड निभृत अनुस्वाराचे द्वारें कोठें-कोठें करण्यात येते माचा ( खाट ), साचा ( सचय ), कात ( पिंड्यातील-क्वाथ--पासून ), कात ( सापाची, 'कृत्ति-'पासून ), जाऊ ( दिराची बायको ), जाऊ ( जाणें क्रियापद ), खट ( क्षत, शठ ), सोळा ( षोडशन्, समुज्ज्वल ), असे अनेक द्विमूल शब्द मराठीत आहेत. यातील अर्थभेद फारच थोड्या ठिकाणी अनुस्वारानें दर्शवितात क्वचित् त्रिमूलही शब्द सापडतात, जसे-वाण ( १ वर्ण, २ ऊन, ३ वायन )

या कोशगत अनुस्वारासबधी एकदर पाच प्रकार सभवतात

( १ ) शब्द एकमूल, पण मानवि अनुस्वाराने युक्त, जसा-हसणें ( हस् )

( २ ) शब्द एकमूल, पण मौलिक अनुस्वारानें युक्त, जसा-फेंस ( फेन )

( ३ ) शब्द द्विमूल, पण सर्वथा निरनुस्वार, जसा-पाठ (पठ्-पाठ, पृष्ठ-पाठ).

( ४ ) शब्द द्विमूल, एकच मौलिक अनुस्वारानें युक्त, जसे-नाव ( नामन् ), नाव ( नौ )

( ५ ) शब्द द्विमूल, एकच मानीव अनुस्वाराने युक्त, जसे फास ( पाश ), फास ( लावणें, चोळणें, स्पृश्-स्पर्श ).

या पचविध शब्दाचा विचार करून अर्थभेदास कोशगत अनुस्वाराची मदत कितपत होते हें पाहू

( ग ) **कोशगत अनुस्वार व अर्थभेद**—हसणे हा शब्द सागतो की माझा अनुस्वार अर्थभेदाकरिता आला नसून ( अर्थभेदाचा प्रसंगच नाही ), केवळ उच्चाराचे ठकबीने आला आहे पाठ शब्द सागतो की, अर्थभेद असूनही तो अनुस्वारानें साधिला नाही फास मागतो की, अर्थभेद असल्यानेंच मजवर अनुस्वार लादला आहे म्हणजे या त्रिविध लक्षणावरून दिसतें की, कोशगत अनुस्वाराची प्रवृत्ति कोणत्याही तत्त्वास अनुसरून झालेली नाही. अर्थभेद नसूनही अनुस्वार शिरला आहे, तर अर्थभेद असूनही कोठे शिरला आहे, कोठें नाही यावरून उघड आहे की अर्थभेद दर्शविण्याकरिता अनुस्वाराची योजना करणे अथवा **रूपभेद आदरणें** रूढीस समत नाही म्हणजेच " अनुस्वारः कोशगतो नार्थभेदप्रयोजनः । " ( कोशातील शब्दात अर्थभेद दर्शविण्याकरिता अनुस्वार देतातच–असे नाही ) इतर भाषातही हाच प्रकार आहे. सस्कृतात हरि शब्दाचे अर्थ अनेक आहेत पण तेथें अर्थभेद दर्शविण्याकरिता त्याचे रूपात फरक करीत नाहीत. अन्यही असख्य अनेकार्थवाचक शब्द रूपत. सारखेच योजण्यात येतात. " उच्चरद्भूरिकीलालः शुशुभे वाहिनिपितिः " यातील कीलाल व वाहिनी हे शब्द द्व्यर्थ असूनही एकविध रूपाने येतात. ( कीलाल म्ह० पाणी किंवा रक्त, वाहिनी म्ह० नदी किंवा सेना ). इग्रजी भाषेतही अनेक भिन्नार्थक शब्द एकाच रूपानें योजण्यात येतात Bat, Bear, Shed, इ० साराश–शब्दगत अर्थभेद दर्शविणे हें अनुस्वाराचें काम नाही आता अर्थभेददर्शन केव्हाही इष्टच असल्यानें रूढीनें तदर्थ अगोदरच योजिलेला अनुस्वार मात्र काढून टाकूं नये तो मौलिक असो वा नसो, करिता नाव, फांस यातील अनुस्वार रक्षणीय आहे निदान भेददर्शनोपयुक्त ( मौलिक ) अनुस्वार तरी राखावे असे कोणीही म्हणेल हाच विचार प्रकारातरानें असा माडता येईल–निभृत अनुस्वार मौलिक असेल वा मानीव असेल, तसेंच तो भेदक वा अभेदक असेल म्हणजे एकदर प्रकार चार संभवतात-नाव (मौलिक व भेदक,)

गाव ( मौलिक व अभेदक ), फास ( पाश-पासून मानीव व भेदक ), पोंच (मानीव व अभेदक) यातील नाव-मधील अनुस्वार ठेवावा, पोंच-मधील ठेवण्याचें कारण नाही गाव व फास यातील उपनासिक्य गाळण्याचे सबधात दुमत शक्य आहे मुळातील इतर अनेक वर्ण तद्भवात गळतात तसे अनुनासिकही गळतात, हें प्रसिद्धच आहे द्वार–दार येथे व् गळाला, तसाच त्रिंशत्–तीस यातील अनुस्वार गळाला आहे

( घ ) **पदगत अनुस्वार**—पदगताचे प्रकार–( १ ) मी जातों, तो जातो ( पुरुषापेक्ष ) ( २ ) तू सशय न **धरीं**, धरितोस क्रमानें द्वितीयपुरुष आज्ञार्थ व स्वार्थ–( अर्थापेक्ष ) ( ३ ) काळे पक्षी, काळें फूल ( लिगापेक्ष ) ( ४ ) एका पुरुषास, अनेक **पुरुषांस** ( वचनापेक्ष )

यातील प्रत्यक अनुस्वार व्याकरणकार्यानुसार प्रवृत्त झाला असल्यानें तो रूपविशेष सागण्यास समर्थ आहे अर्थात् तो भेदक आहे, व म्हणून रक्षणीय आहे येथें असा प्रश्न उत्पन्न होतो की इतके अनुस्वार देताना लेखकास शब्द-रूपाकडे फार बारकाईनें लक्ष द्यावें लागणार, हा एक प्रकारे त्याचेवर जुलूम होय करिता, तो जुलूम चालू द्यावा, की या अनुस्वाराचे अभावी सदर्भानेच काम भागवावें ?

( ङ ) **पदगताचा रक्ष्यारक्ष्य विचार**–(१) मी जातो, तो जातो, येथील अनुस्वार पुरुषभेद दर्शविण्याकरिता प्रवृत्त असल्यानें तो पुरुषापेक्ष आहे, पण हा अवश्यक आहे काय ? त्याचे अभावी गैरसमज होणें कितपत शक्य आहे ? (२) हाच प्रकार ' घेई घेई माझे वाचे, गोड नाव विठ्ठलाचें । '—येथील अर्थापेक्ष अनुस्वाराचा (३) ' काळे घोडे हरवले' या वाक्यानें दोन अर्थ मनात येतात त्याची फोड अनुस्वाराचे साह्याने चागली होते येथील अनुस्वार लिगा-पेक्ष आहे ( ४ ) ' ज्यान्च्या भुजाश्रये करि दुर्योधन पाडवासवें वैर । ' येथे एकाशी की अनेकाशी-? हा अर्थभेद पाडवा यांतील वा-वरील अनुस्वारानें व्यक्त होणारा आहे हा अनुस्वार वचनापेक्ष आहे. या चतुर्विध अनुस्वाराचा विचार करिता असें दिसतें की-पदगत अनुस्वार ठेवणें तो लिगवचनापेक्षच ठेवावा, तदितर गाळावा. कारण तो भेदक होण्याचा सभव दिसत नाही. शिवाय, पुढील गोष्टही लक्षणीय आहे.

( च ) **पदाचे रूप** ( सर्वथा व्याकरणशुद्ध असूनही ) अर्थभेददर्शनास सामान्यतः कितपत समर्थ असतें ? इग्रजीत Will go या रूपावरून जाणा-

राचा पुरुष व वचन स्पष्ट होत' नाहीत. येथे शब्दरूप पुरुषवचन सागण्याचा भार पतकरीत नाही मराठीत, तो जातो, ती जाते, तें जातें यातील क्रियापद्-रूपावरून कर्त्याचें लिगाची ओळख होते, तर तो–ती–तें जाईल यातील रूपा-वरून होत नाही सारांश, व्याकरण सर्वथा पाळूनही बनवलेली रूपें पूर्णतः निश्चयात्मक होतील असा भरसा नाही, म्हणजेच असें ठरते की, व्याकरण अर्थभेदाची धूर्वहता आपणावर घेत नाही अर्थभेदासाठी तें रूपातर सुचवीत नाही. शब्दरूपनिश्चय सर्वस्वी जनरूढीकडेच तें सोपविते रूप ठरविण हे सर्वस्वीं लोकाधीनच राहणार व्याकरणास अखेर शिष्टजनरूढींपुढें मान वाकवावी लागते जसजशी शिष्टप्रवृत्ति बदलते तसतसे व्याकरणही आपले नियम बद्-लिते कारण तसे करणे त्यास भागच पडते गवाक्ष म्हणजे गाईचे अक्षि. अर्थात् हा शब्द मूलतः नपुसकलिगी सिद्ध होतो, पण लोक तो पुलिगी योज-तात हा विसवाद पाहून भाष्यकार पतजलि म्हणतात–' लिगमशिष्य, लिगस्य लोकाश्रयत्वात्' (व्याकरणात लिग सागू नये, कारण लिग हे लोकाच्या बोल-ण्याच्या रूढीवरून ठरतें ) साराश लोकानी रूपें योजावी व ती वैयाकरणानी व्याकरणात निवेशावी त्याचे द्वारा अर्थभेदास मदत होत असल्यास उत्तमच; पण होत नसली तरीही ती रूपें प्रयोगार्ह असणारच.

( छ ) **संदर्भाचें महत्त्व**—व्याकरणोपदिष्ट अनुस्वार देऊनही जेथें अर्थाचा निश्चय होत नाही, असें एक उदाहरण येथें देतों

**कर्ण द्रोण, पितामह, पडले जेव्हां महाप्रभव शिष्ट ।**

**सूता! संशय न धरीं, मद्वीर कबंधतुल्य अवशिष्ट ॥** द्रो. ५-४

येथें **न धरीं** हें क्रियापद प्रथम-पुरुषी व द्वितीय-पुरुषीही होऊ शकते मी संशय धरीत नाही किंवा तूं संशय धरू नको–असे दोनही अर्थ संभवतात. यातून एकतराच्या ग्राह्यत्वाचा निश्चय संदर्भच करणार

( ज ) **सारांश**—उच्चारानुसारी व तदितर सुद्धा योजना केल्या असताही त्या अर्थभेदास समर्थ नेहमीच होतात, असा भरसा नाही शेवटी संद्-र्भाकडेच धाव घ्यावी लागते यावरून उघड होते की, अनुस्वारादि अर्थभेदो-पयुक्त व्याकरण-योजना वापरिताना आपण हें लक्ष्यात ठेवावें की, त्या सर्वस्वी पर्याप्त होत नाहीत. अर्थात् या गोष्टीमुळें त्या योजनाचीही किमत काहीशी कमी होते, निदान इतकी तरी खास की, जी योजना सामान्यतः

अर्थभेदोपयुक्त आढळत नाही ती खुशाल गाळणें अयोग्य ठरत नाही या सव-लतीची अमलबजावणी येथें करणे तर पुरुषापेक्ष व अर्थापेक्ष अनुस्वार लोपार्ह ठरतात.

**तात्पर्य**—शब्दगत पूज्य, तें मौलिक असो वा नसो, अर्थभेदास उपयुक्त असेल तरच ठेवावें, एरवी गाळावें पदगत पूज्य लिंगवचनापेक्ष; ठेवावें, पुरुषार्थापेक्ष गाळावें

---

## ४. ( निभृत ) उपनासिक्यांचा क्षेत्रपरिच्छेद.

( १ ) **मथळ्याची फोड**—सवाद, संवय, यॅव या शब्दात अनुक्रमें श्रौत अनुस्वार, मूक उपनासिक्य, व अनुनासिक स्वर आहेत. पैकी संवय यातल्यासारखें मूक उपनासिक्य येथें विवक्षित आहे म्हणजे येथें विचार होणार तो सवय या शब्दातल्यासारखी लिहिली जाणारी पण उच्चारात न येणारी उपनासिक्यें भाषेत कोठे-कोठें आढळतात याविषयी

( २ ) **त्रिविध नासाविशिष्ट उच्चार**—( क ) सवाद, तटा, सत, सहार इत्यादि ठिकाणच्या अनुस्वाराचे लेखन भरीव टिंबानें होतें, व त्याचे उच्चाराचे सबधात काही भ्रम किंवा कोणाचा मतभेद नाही ते संस्कृत धर्तीवर लिहिले व उच्चारिले जातात हे **श्रौत** अनुस्वार संस्कृतात व मराठीत सर्वथा एकच, अभिन्न आहेत. ( ख ) यॅव, हॉं. इत्यादि थोड्या ठिकाणी मराठीत खऱ्या अनुनासिक स्वरांचें उच्चारण होतें. त्याचें लेखन येथील-प्रमाणें अनुनासिक-चिन्हानें म्हणजे **चंद्रबिंदूनें** करावें. सस्कृतात दधिँ असा लेख आढळतो. त्यातील अनुनासिक व मराठी यॅव यातील अनुनासिक **उच्चारतः** एकच आहे, तो तसाच एकाच रूपाने दोन्ही भाषात लिहिला जावा. हे अनुनासिक मराठीत फारच थोडे असल्यानें त्याचे उच्चाराचे किंवा लेखनाचेही बाबतीत कोणाचा मतभेद असेलसें दिसत नाही. करिता श्रौत अनुस्वाराप्रमाणें (यथार्थ) **अनुनासिकांचे** सबधातही मराठीचा सस्कृताशी पूर्ण सवाद आहे, असें म्हणता येईल. ( ग ) संवय यातील नासिक्याच्या उच्चाराचेच सबधात मुळात मतभेद आहे कोणाचे मतानें त्यात अनुनासिक उच्चार स्पष्ट आहे, तर कोणाचे मतानें तो मुळीच नाही काळाचा ओघ पाहिल्यास, अनुनासिक भरा-

भर लोप पावत आहेत असें दिसतें. ( कपित्थ ) 'कऊठ' अशा शब्दात सुद्धा, ज्याचे मुळात अनुनासिकाचा लवलेशही नाही अशा शब्दात, एका वेळी अनुनासिक उच्चारिलें जात होते तो शब्द आता सर्वथा–निदान पुण्याकडे तरी–निरनुनासिक झाला आहे. कोंकणात अजूनही, 'करॉयचें काय आणि सॅरॉयचें काय ?– अशा ठिकाणी अनुनासिकाचें श्रवण होतें, पण ते दिवसानुदिवस कमी–कमी होत चाललें आहे अनुनासिक हल्ली वाढत नाहीत, तर घटत आहेत. पूर्वी नसलेल्या ठिकाणी ते प्रविष्ट होत नाहीत, तर असल्या ठिकाणातूनही हळूहळू नाहीसे होत आहेत. ही काळाची प्रवृत्ति कोणीही कबूल करील अर्थात् एतद्नुसार अनुमान उघड आहे की, असलेल अनुनासिक काही दिवसानी पार नाहीसे होणार श्रवणतः अस्तमित किंवा अस्तमितप्राय अनुनासिक उच्चार भाषेंत यापढे लिहावे की नाही, या बाबतीत बराच तीव्र मतभेद आहे रा परांजपे यासारखे **परंपरावादी** म्हणणार 'ते उच्चारात नसले म्हणून काय झाले ? लेखात कायम ठेवलेच पाहिजेत ' रा केळकरासारखे प्रत्यक्षवादी किंवा **केवलदृष्टवादी** म्हणणार 'उच्चारातून जर ते आपण होऊन गेले, तर त्याना लेखनात तरी का धरून ठेवावे ? ' पूर्वपक्षाकडे परंपराभिमान, तर उत्तर पक्षाकडे युक्तिवाद आहे, हे स्पष्ट आहे. कालाचे ओघात युक्तेपुढे परंपरा लोपणार हे उघडच आहे '**उच्चाराभावे लेखाभावः**' हें तत्त्व अखेर प्रभावी ठरणार पण तसें तें पंडित-समवायाचे मतानें ठरेपर्यंत सामान्य वाचकाची अडचण होणार, ती कशी परिहृत करावी ? ती पूर्णतः, निदान अंशतः तरी, परिहृत झाल्यास पहावी अशा विचारानें पुढील ओळी लिहित आहे. त्यातील प्रतिपादन सोपे व्हावें म्हणून ते येथें संवादरूपानें देत आहें.

**( ३ ) क्षेत्र मोजण्याची आवश्यकता. केवलदृष्टवादी म्हणतात**—तुम्ही,सांपत्तिक,सांपडला यातील नासिक्य उच्चार भिन्नभिन्न असूनही एकरूपानें दर्शवित असल्यानें, वाचकाचा घोटाळा होण्याचा संभव आहे.करिता हे उच्चार भिन्नभिन्न प्रकारानी दर्शवू नयेत काय ?

**परंपरावादी**—या दोन्ही शब्दाचा अर्थ व उच्चार सहज लक्ष्यात येत असल्यानें, वाचनात घोटाळा होण्याचे कारण नाही.

**के०**—पण ही गोष्ट सुशिक्षिताची, लेखन जसें सुशिक्षिताकरिता तसेंच अशिक्षिताकरिताही असल्यानें त्याचा घोटाळा येथे होईलच होइल

( ४ ) **मूकानुस्वार लखनपद्धति—प०**—घोटाळा टाळण्याकरिता पुढील योजना सुचविण्यात आली आहे तिचे स्वरूप थोडक्यात पुढील वाक्याचे लेखनावरून लक्ष्यात येईल

अङ्ग्र्यान्च्या पण्डिताने शान्तिपाठ सम्पवून वँशास आशीर्वाद् दिला.

**के०**—हे लेखन सोईचे आहे काय ? येथे ठिकठिकाणी अनुस्वाराचे लेखनात व वाचनात ठेचा खात चालावें लागते नुसता बिंदू न देता त्याचें जागी ङ् ण् न् वँ इत्यादि योजना करीत बसणे म्हणजे किती त्रासाचें काम आहे ? शिवाय या लेखनाचा संस्कृताशी विसवाद आहेच बिंदूने संस्कृतात श्रौत अनुस्वार बोधित होणार, तर मराठीत केवळ दिखाऊ, पोकळ, म्हणजे एकाच चिन्हाचा संस्कृतात व मराठीत उच्चार निरनिराळा होणार अर्थात् या पद्धतीने सोईपेक्षा गैरसोयच जास्त होणार या पद्धतीचें नाव तरी काय ?

**प०**—हिला पचमवाद्याची किंवा **पंचमपद्धति** म्हणता येईल

( ५ ) ही पटत नसल्यास **दुसरी पद्धति** पहा, जिची माहिती वरीलच वाक्य फिरून लिहून देतों अग्रयान्च्या पडिताने शातिपाठ सपवून वशास आशीर्वाद् दिला

**के०**—ही पद्धति सोईस्कर दिसते, कशी ती पहा

( क ) येथें **पोकळ अनुस्वार शून्यानें** व भरीव अनुस्वार बिंदूने बोधित होतो पैकी भरीव अनुस्वाराचा उच्चार संस्कृतातल्याप्रमाणेच असल्याने, या पद्धतीचा संस्कृताशी पूर्ण मेळ आहे

( ख ) कोणता अनुस्वार मूक व कोणता श्रौत, हें येथे पहावे लागतें, पण तें पचम-पद्धतीतही आहेच ते कोणत्याही पद्धतीत पहावे लागणारच कारण उच्चार जर दोन, व ते निरनिराळ्या चिन्हानी दर्शवावयाचे, तर लिहिताना त्यातील भेद लक्ष्यात घ्यावाच लागणार, मग तो भेद तुम्ही कसाही दर्शवा

( ग ) ङ् ण् न् इत्यादि पचम वर्ण व बिंदू अशी पाच सहा चिन्हें पचम पद्धतीत वापरावी लागतात, तर या पद्धतीत केवळ दोघानीच काम भागणार. शिवाय ठणठणीत, भरीव उच्चार भरीव बिंदूनें, व केवळ मूक, पोकळ उच्चार पोकळ शून्यानें, दर्शविणें हें युक्तीलाही संमतच आहे

( घ ) भरीव व पोकळ पूज्ये याचा क्वचित् घोटाळा होणे जरी खरें असलें तरी ठिकठिकाणी भिन्न-भिन्न पचम वर्ण लिहीत बसण्यात मोडणाऱ्या वेळा-पेक्षा उच्चारभेदानुरूप ( पोकळ ) शून्य व ( भरीव ) बिंदू देण्यात वेळ खचीत कमी लागेल.

**प०**—भरीव पूज्याचा कोणता उच्चार हें या पद्धतीत दिसून येत नाही, तें पचम-पद्धतीत उत्तम रीतीनें व्यक्त होतें. करिता पचमपद्धति सरस नाही काय ?

**के०**—मुळीच नाही कारण पुढील व्यजनापूर्वी कोणता पचम-उच्चारावा, हें न सागताच जिभेस उत्तम रीतीनें कळतें शङ्ख हा शब्द शख असा जरी लिहिला तरी त्यात हडीतिल्याप्रमाचें शण्ख असा भल-त्याच पचमानें युक्त उच्चार कोणीच करणार नाही एखादे व्यजनापूर्वी कोणता पचम उच्चारावा हें मुळीच सागण्याचें कारण नाही. ते निसर्गत. पूर्ण-पणे सिद्धच आहे करिता ही दुसरी पद्धति सरस ठरते हिचें नाव काय ?

**प०**—शून्यवाद्याची पद्धति हिला **शून्यपद्धति** असें म्हणता येईल असो या पद्धतीचा आणखी एक विशेष तुमच्या लक्ष्यात आलेला दिसत नाही पंचम-पद्धति नासिक्याचा कोणता विशिष्ट उच्चार विशिष्ट ठिकाणी करावा, हें साग-ण्याचा बाणा मिरविते, पण तें तिला अर्धवटच साधतें सयोग, सरक्षण, पुलिङ्ग या शब्दात बिदूचा उच्चार कोणता विशिष्ट करावा, हें समाधानकारक रीतीनें हें पचमवादी लेखानें सागू शकत नाहीत शून्य-पद्धति या बाबतीत आपणावर धूर्वाही मुळीच घेत नाही कोणता विशिष्ट उच्चार हें जरी तिला दाखविता आले नाही तरी ते जिभेस पूर्णतः साधतें मग जर उच्चार अचूक होत आहे, तर तो दाखविण्यासाठी नसती व व्यर्थ धडपड तरी करा कशाला ? या विचारानें शून्य पद्धतीचे व्यवहारपाटव प्रतीत होतें

( ६ ) **लेखनांतील खूट** **के०**–सस्कृताशी शून्य-पद्धतीचा विसवाद नाही असें तुम्ही म्हणता, पण त्याबद्दल शका येते. सस्कृतात शुद्ध लेख कोणता, शकर की शङ्कर ? सामान्य लोक म्हणतात की, पहिला चूक, दुसरा शुद्ध तुमची शून्य-पद्धति हा शब्द शंकर असाच लिहिणार, मग तिचा सस्कृताशी मेळ कोठें राहिला ?

**प०**—अज्ञ लोकाच्या अनेक खुळापैकी हें एक आहे. रा नानासाहेब वैद्या-सारखे लोकही असल्या भ्रमातून सुटले नाहीत. 'रामचरित' न म्हणता ते

'रामचरित्र' म्हणतात ( वेत्र–वेत या रूपांवरून अन्त्य त्र--चा मराठीत त्र होतो हें स्पष्ट दिसतें. ) कदाचित् मराठीतील बहुजनसमाजाच्या पद्धतीस अनुसरून ते तसे म्हणत असल्यास माझें काही म्हणणें नाही पण संस्कृतात **जीवनवृत्तान्त** हा अर्थ **चरित** याने दर्शित होतो, चरित्र यानें झालाच तर तो ओढाताणीनें असो. संस्कृतात दोन्ही पद्धती आहेत त्याची विभागणी डोळसपणानें केलेली आहे. ( १ ) जेथे नासिक्य उच्चारावर ( व्युत्पादन-शास्त्रानुसारी ) यौगिक घटक पडेल, तेथे **बिंदू** चालतो ( २ ) तद्भावी मात्र यथासंभव पंचम लिहिला पाहिजे ( ३ ) ज्याना पंचम नाही अशी काही व्यंजनें आहेत, तेथें सर्वत्र बिंदूशिवाय गतीच नाही उदाहरणार्थ—( १ ) सङ्गम किंवा संगम ( २ ) सङ्ग ( ३ ) संशय इ येथील शेवटल्या शब्दात बिंदूच लिहिला पाहिजे, दुसरी योजना शक्यच नाही. करिता संस्कृतात पंचमच लिहिणे अवश्य, त्यात बिंदू चालत नाही, ही कल्पना सर्वस्वी वेडगळपणाची आहे धिक्कार शब्दात विसर्ग देणें हेही असेच एक खूळ आहे असो. या शून्यपद्धतीने शुद्ध उच्चाराची सोय बरीच–नव्हे, पूर्णत.–होणार आहे, तरी पण ' गतानुगतिक ' लोक हें लेखन पसंत करतील की नाही, काय सांगावे ? करिता ही पद्धति प्रचलित होईपर्यंत श्रौत व मूक अनुस्वाराची फोड अशिक्षित वाचकाकरिता करणे जरूर आहे.

**के०**—नुसती जरूरी कबूल करून भागणार नाही. तिची पूर्णताही केली पाहिजे शून्यपद्धति अंगिकारून किंवा उपायांतराने दोन्ही उच्चारातील भेद दर्शवा. मला तर ही शून्यपद्धति बरी वाटते कोणी म्हणेल ' ही नवीन आहे, ' पण तशी ती सर्वथा नाही. मोरोपंताचे हस्तलिखित पोथ्यातही शून्ये वारंवार आढळतात. पोकळ शून्याचा भरींव टिंबाशी घोटाळा होऊ नये, एतदर्थ जपण्याचीही सवय आपणास आहेच दशांश अपूर्णांक लेखनात, आपण भरींव व पोकळ पूज्यें दोन्ही देताना सावधानता राखितोंच. असो. शून्यपद्धति लोक स्वीकारीपर्यंत आपण काय उपाय सुचविणार ?

( ७ ) **मूक अनुस्वारांचें परिगणन** प०—कोणतीही नवीन गोष्ट म्हटली म्हणजे लोकाचा विरोध हा असणारच. पंचांग व शिवजन्मातिथि याचे वादाचे मुळाशी हीच पुराणप्रियता आहे नवीन गोष्ट सदोष वा निर्दोष असो, ती जनतेस सहसा पटत नाही करिता नवीन पद्धति पटून सार्वत्रिक अमलात

येईपर्यंत मूक अनुस्वाराचे परिगणन अथवा त्याचा क्षेत्रविस्तारनिश्चय हें इष्टच ठरतें

**के०**--ते परिगणन कसें करणार ? **प०**—हें काम सोपें आहे ते असें—

( क ) **संवय, हंसला**, फेंस, सांवळा,

( ख ) **टोंक, सांखळी**, चोंच, सांठा, आंत, झोंप, चांफा, उलट–खक, टचाई, पसंत, चाभार, ओळचा.

( ग ) आतां, कीं, पुढें, रामानें, खानें, गळ्याशीं, जों, तों, बोलूं ( पाहतों )

( घ ) गावांहून, मुलींस,–उलट–मुलाचे खेळ

या उदाहरणावरून दिसून येईल की—

( क ) व, स, याचे पूर्वीचें नस्य नेहमीच निभृत असतें

( ख ) शुद्ध मराठी शब्दाचे **पोटांत** पुढील परिस्थितीत मात्र अनुस्वार निभृतच असावयाचा,–दीर्घ स्वरापुढे पण प्रथम व द्वितीय वर्ग्यामागे ( प्रथम वर्ग्य म्हणजे क च ट त प, द्वितीय वर्ग्य म्हणजे ख च ठ थ फ ),इतरत्र श्रौत

( ग ) शब्दाचे किंवा पदाचे **अंतीं** नस्य आढळल्यास तें निभृतच असावयाचे, श्रौत कधीही असावयाचें नाहीं

( घ ) अनेकवचनी सामान्य रूपाचे **अंतीं** येणें तें उपनासिक्य म्ह. निभृत नस्यच होय.

अपवाद्—षष्ठीच्या अनेकवचनी सामान्यरूपाचे अंती श्रौत अनुस्वार येतो हे वरील सर्व प्रकार पुढीलप्रमाणें लक्ष्यात ठेवणें सोपें जाईल.

**नैभृत्यं त्रिषु ( क ) शब्दान्तः से वे, ( ख ) खयि तु दीर्घतः ।**
**( ग ) शब्दस्यान्ते ( घ ) विना षष्ठ्याङ्गस्य चानेकवाचिनः ॥**

**अर्थ**—( निभृत ) उपनासिक्य–तीन ठिकाणी आढळते

( क ) **शब्दाचे पोटांत स** किंवा **व** याचे मागें (स्वरनिरपेक्ष,) आणि

( ख )क ख, च, छ इत्यादि ( खय् = प्रथम–द्वितीय–वर्ग्य ) व्यजनापूर्वी मागे दीर्घ स्वर असल्यास.

( ग ) शब्दाचे ( अर्थात् कोशगत वा वाक्यगत शब्दाचे ) **अंतीं**

( घ ) षष्ठीखेरीज कोणत्याही विभक्तीच्या **अनेकवचनी सामान्य रूपाचे अंतीं**

हें परिगणन लक्ष्यात ठेवल्यानें, इतक्या ठिकाणी (मूक) उपनासिक्य, इतरत्र (श्रौत) अनुस्वार हें लक्ष्यात येईल.

लिहिण्यात शून्यपद्धति अवलंबून किंवा उपायांतरानें भेद दर्शविण्यास जोंपर्यंत लोकांची तयारी नाही, तोंपर्यंत वाचकानी वरील तीन ठिकाणी अनुस्वार नुसता डोळ्यानी पहावा, तोंडाने वाचू मात्र नये, इतरत्र ठणठणीत वाचावा.

**के०** —हें परिगणन जर बरोबर असलें, तर या (मूक) उपनासिक्याचा बाऊ प्रथम वाटतो तेवढा खास नाही ती जी येतात ती काही तत्त्वास धरून येतात. उगाच वाटेल तेथील नस्य मूक असत नाहीत इतक्या तत्त्वशुद्ध रीतीनें जर (मूक) उपनासिक्याची प्रवृत्ति होत असेल, तर तें निराळे दर्शविले नाही तरी विशेष घोटाळा होणार नाही. हा **घोटाळा** शब्दच घ्याना तो 'घोंटाळा' असा लिहिला तरी त्यात 'खयि तु दीर्घतः' या नियमानं नस्य मूकच ठरणार व त्यामुळें उच्चारात संशय मुळीच येणार नाही अर्थात् वाचकाचा घोटाळा होण्याचं तादृश कारण नाही

**सारांश**—मूक नस्याबद्दल पोकळ शून्य द्यावें, हा उत्तम मार्ग, तदभावी वरील परिगणन लक्ष्यात ठेवावें, म्हणजे बरीच सोय होईल.

---

## ९. मराठीचें शुद्धलेखन (खंडनपर)

लोकशिक्षण मासिकाच्या जूनचे अंकात रा. **कृ. पां कुलकर्णी**, एम्. ए. बी टी, याचा 'मराठीचें शुद्धलेखन' या विषयावर एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यासंबंधी चार ओळी येथे लिहीत आहे.

**प्रास्ताविक**--सदरील लेख वाचून निरनिराळे विचार माझे मनात उत्पन्न झाले. त्यात म्हटलें आहे की, वर्णप्रक्रियेसंबंधी लोकात गाढ अज्ञान आहे; एवढेच नव्हे, तर दादोबा इ. नाणावलेल्या मराठीच्या वैयाकरणानाही अनुस्वा-

राची उपपत्ति देता आली नाही, इ०, हा आरोप पाहून दादोबा-गोडबोले-गुजीकर-दामले इत्यादि परिणतप्रज्ञ वैयाकरणाविषयी अभिमान बाळगणाऱ्या कोणत्या पुरुषास वाईट वाटणार नाही? तेव्हा मलाही तसें वाटलें, हें साहजिकच आहे पण पुढे याच लेखात वर्णप्रक्रियाविषयक अपूर्व माहिती आपणास मिळणार म्हणून काहीसा आनदही झाला लेख समग्र वाचला त्यात वर्णप्रक्रियेसबधाने नवीन माहिती मला काहीच आढळली नाही, त्यामुळे अर्थातच माझी निराशा झाली असो, सदर लेखातील बऱ्याच मुद्द्याशी माझा मतभेद आहे, तो कसा, हें पुढील ओळीत लिहीत आहें

**१ उच्चारितपूर्व आनुनासिक्याचे लोपास शास्त्राधार**-(क) **'जी आनुनासिक्यें आज उच्चारांत नाहींत**, ती लेखनात विनाकारण गाजणूक करणारी, अतएव निरर्थक असल्याने गाळावी' असे म्हणणारास, आपल्या म्हणण्याचे समर्थनार्थ काही शास्त्राधार दाखविता येत नाहीत, करिता ती लेखनातून गाळू नयेत,-असे रा कुलकर्णी म्हणतात उत्तर-उच्चाराकरिता लेखन, जे उच्चारात नाही तें लेखनात किमर्थ? ही साधी विचारसरणी त्यास पटत नाही करिता पुढील उदाहरणे देणे प्राप्त झालें आहे 'शृङ्गा.-शृङ्गाणि-शिगें,' अशी तीन रूपें क्रमाने वेदात, काव्यसस्कृतात व मराठीत आपण पाहतों व योजितो ही रूपें आपापल्या परी निर्दोष मानण्यात येतात येथील रूपभेदास शास्त्राधार कोणता? उच्चारभेद हाच होय. ज्या काळी जसा उच्चार त्या काळी तसे लेखन. **यथोच्चार लेखन** हेंच तत्त्व प्रभावी दिसते. उच्चाराच्या सोपेपणाकडे व लाघवाकडे जनाची साहजिकच प्रवृत्ति असते त्यामुळें जों-जो काळात पुढे जावें तों-तो सोपे व छोटे उच्चार आढळतात. इग्रजीत Programme मधील शेवटचा n e अनुच्चारित असल्याने हल्ली लेखनात वैकल्पिक ठरला आहे **कोणी म्हणेल,** 'जो ध्वनि उच्चारातून गळाला त्याचें **लेखन** लोपलें' हे तत्त्व इग्रजी भाषा फार विरळा अनुसरते know सारख्या शब्दातलि लुप्तोच्चार k आजही लेखनात आहे करिता इग्रजीचें साम्य (मराठीतील) आनुनासिक्य-रक्षणासच पोषक आहे.

यास **उत्तर** पुढीलप्रमाणें-तत्त्व जरी विरळा अनुसरलें, तरी तेवढ्यानें त्याची मान्यता ठरते त्याचा प्रसार जास्त होत नाही हा रूढीच्या प्राबल्याचा परिणाम. पण सुदैवानें मराठी इग्रजीच्या इतकी रूढीत हट्टी नाही. ती लेखन उच्चारा-

नुरूप वारवार बदलते. वट, कंकाल, ग्राम, द्वार, नवनीत, प्रभात, दधि, बाधते, कल्प, भवानी,—याची रूपान्तरें क्रमानें वड, कंगाल, गाव, दार, लोणी, पहाट, दही, वाजते, काप, बोहेनी, अशी मराठीत लिहिण्यात येतात. लेखनातील या फरकास शास्त्राधार कोणता? शिष्टप्रयोग हाच की नाही? की अन्य काहीं आहे?

२ **आधीं उच्चार, मग लेख**—उच्चारात बदल कालक्रमानें अवश्य व्हावयाचाच. सस्कृतकाव्यवाङ्मयकाळी सुद्धा ही प्रवृत्ति दाखविता येते सस्कृतातील 'ऋ' मराठी बोलणारास फार दुरुच्चार भासतो त्यामुळें तत्स्थानी मराठीत अनेक आदेश येतात स्मृति, घृष, हृदय, ऋक्ष, ऋजु, वृक्ष, यांची रूपें आपण सय, घास, हिया, रीस, उजू, रूख, अशी क्रमानें करितों यात ऋ—चे स्थानी अ, आ, इ, ई इत्यादि स्वर येतात असाच प्रकार पुढील सस्कृतातील रूपातही आहे ऋक्थ, ऋष्टि, ऋण्य, कृमि याची रूपान्तरें सस्कृतातच रिक्थ, रिष्टि, रिण्य, क्रिमि अशी क्रमशः आढळतात. ही वाङ्मयात आढळतात तशी कोशातही निविष्ट आहेत या रूपान्तरात ऋ-च्या स्थानी सुलभोच्चार वर्ण आणिला आहे तो उच्चारानुसारच होय. अशा रीतीने सस्कृत वाङ्मयासही लेखनाचे उच्चारानुगामित्व समत आहे मग तें तसें मराठीस का नसावें? सुलभोच्चारप्रवणता सस्कृतात ऋ पुरतीच मर्यादित नसून इतरही उच्चाराचे बाचनीत क्वचित् आढळते वर्ष—वरिष, पर्शु—परशु ही असलीच उदाहरणें होत या विकारास **स्वरभक्ति** या सज्ञेनें सस्कृतात व्याकरणसमतीही मिळाली आहे. साराश-इतर वर्णांच्या लोपास व रूपान्तरास आपण जर समति देतों, तर तशीच समति स्वराच्या अननुनासिकत्वासही का न द्यावी? शृग-चे शिग करण्यात ऋ--चें रि हें रूपातर चालतें, तर त्रिंशत्-चें तीस, यन्त्र—चें जातें, असें होण्यास स्वराचे निरनुनासिकत्व आपणास का खपू नये? आनुनासिक्यलोपासच आपण शास्त्राधाराकरिता का अडावें! यात आणखीही एक अन्याय आढळतो. ज्या (त्रिंशत्—यन्त्र-सारख्या) शब्दातील आनुनासिक्य लेखातून अगोदरच लोपलें आहे, त्यावर आपण सक्ती मुळीच करीत नाही, पण ज्या शब्दात तें राहिलें आहे, त्यातून मात्र गळण्यास त्यास आपण मनाई करितों असें का! जीं मुलें आपण होऊन पळाली त्यास मोकळीक, पण जी वर्गात बसून जाण्यास परवानगी मागतील त्यांस मात्र मनाई, हा खासा न्याय! उघड्या डोळ्यांनीं प्राण जात नाही म्हणतात तें हेंच त्रिंशत्-मधून आनुनासिक्य गळालें (व **तीस**

झालें ), तें चालतें, पण हांसणें यांतील आनुनासिक्य व्युत्पन्न नसून सुद्धा गळा-लेलें चालत नाही, कारण त्यानें आजपर्यंत, स्वतःच्या नव्हे तर लेखकाच्या लहरीनें, लेखात राहण्याचें पातक केलें साराश, केवळ उच्चारितपूर्व अशी आनुनासिक्यें कायम ठेवण्यात लेखनाचे उच्चानुसारित्वाचें उल्लंघन व पक्षपात असे दोष उत्पन्न होतात अर्थात् असें आनुनासिक्य गाळणें हें क्रमप्राप्तच ठरतें.

३ **वर्णप्रक्रिया व परंपरा यांचा आधार**—रा. कुळकर्णी म्हणतात ‘( ख ) गाव, माचा, इत्यादि शब्दातील आनुनासिक्यें गाळली पाहिजेत का ? तर त्यास परपरा व वर्णप्रक्रिया याचा आधार आहे म्हणून ’ वर्णप्रक्रियेमुळें आनु-नासिक्य रक्षणीय, म्हणजेच व्युत्पन्न आनुनासिक्य ठेवावें, असे जर म्हणणें आहे, तर ( कुलकर्णी–लेख पान ३४७ ) नाम प्रत्ययाचें स्थानर जो **ला** त्यावर आनुनासिक्य लिहावें असे म्हणणें प्राप्त होत नाही काय ? वर्णप्रक्रिया तर तें लिहिण्यास सागते, पण शिष्टप्रयोग तें मान्य करीत नाही येथें **शिष्टप्रयो-गानें वर्णप्रक्रियेस मागें सारलें नाहीं काय ?**

दुसरे त्याचें म्हणणें असे की ( ग ) ‘**अनुच्चारित आनुनासिक्यें मोरोपंतांपासून लिहिलेलीं आढळतात हीच परंपरा** म्हणजे नष्टो-च्चारही आनुनासिक्ये लिहिणें आपण का अवलबू नये’ ? **उत्तर**—मोरोपत इत्यादि-काच्या पुरातन काळी ही आनुनासिक्यें नष्टोच्चार होती कशावरुन ? आपण त्याचे लेखात ती बिदुरूपानें पाहतों,मग ती त्यावेळी उच्चारात नव्हती,हें कशा-वरून ? तत्कालीन ध्वनि-लेखकाचे अभावी याविषयी निश्चित काय सागणार ? बरें, या कवीचें लिहिणें पद्यात आहे खरें, पण अक्षरान्य. लघुगुरु–भेदानेंही अशा आनुनासिक्याचें अस्तित्व अनुमित करता येत नाही, कारण आनुनासिक्यानें अक्षराच्या मात्रात अथवा मात्रासख्येत मुळीच फरक पडत नाही यावरून मोरोपतादि-कविकाळी ही आनुनासिक्ये (हल्लीप्रमाणें) मूकच होती कशावरून ? उलट, ती उच्चारितच असण्याचा जास्त सभव आहे कारण दिवसानुदिवस, आपण पहात आलों आहों की, आनुनासिक्यें उच्चारातून, हळू-हळू का होईना, पण कमी अथवा मद होत आहेत, अधिक किंवा प्रकट होत नाहीत.

**‘कज्जे-कफावती होऊन रस्त्यांत असावी घरांत शांती मोठी ।’**

ही पंक्ति म्हणताना शाळेच्या विद्यार्थ्यांना ज्यानें कोकणात व देशात ऐकलें आहे, तो सागू शकेल की, येथील शून्यानें बोधित आनुनासिक्यें कोक-

णात ठणठणीत अनुस्वार-रूपानें उच्चारिली जातात व देशात ती मूकप्रायच असतात जसा देशभेद आनुनासिक्याचे मूक-मुखरत्वभेदास कारण होतो, तसाच कालभेदही असणें शक्य आहे. करिता पुराणकाली हल्लीप्रमाणेंच आनुनासिक्ये मूक होती असें म्हणणें निराधार आहे अर्थात् त्याचा दाखला वर्तमानकालीन मूक आनुनासिक्याचे लेखनास मुळीच लागू पडत नाही.

४ **प्राकृताचाही दाखला अनुपपन्न**--( घ ) 'हल्ली **आनुनासिक्यें अनुच्चारित** आहेत, तशी ती पूर्व-मराठीतच नव्हे, तर **प्राकृतांतही होतीं,' असे लेखक म्हणतात.** कशावरून ? तर 'बभणा' 'मजरो' ( पान १४७ ) इत्यादि उदाहरणावरून पण पुराव्याचे संबधात प्राकृताचीही स्थिति पूर्वमराठी-प्रमाणेंच आनुनासिक्य लेखात आहेत, पण उच्चारात नव्हती, हें ठरविण्यास आधार नाही उलट-यातील काही उदाहरणावरून स्पष्ट होते की येथील बिंदूनें दर्शविलेला उच्चार आनुनासिक्याचा नव्हे, तर साक्षात् अनुस्वाराचा आहे. बभणो, मजरो यातील परवर्णापूर्वी आनुनासिक्याचा उच्चारच अशक्य आहे झश्-वर्णापूर्वी ( म्हणजे पुढें तृतीय किंवा चतुर्थ वर्ग्य आल्यास ) आनुनासिक्य नव्हे, तर अनुस्वारच उच्चारला जातो, उदाहरणें-शभर, चाभार, गुज, गाजा, बुंधा, बद इ० ( या संबधात याच भागातील लेख ४ पहा ) करिता बभणो इ० काही उदाहरणें आनुनासिक्याचें अनुच्चारितत्व दर्शविण्यास अनुपयुक्त, अर्थात् सर्वस्वी गैरलागू आहेत येथील आनुनासिक्याचा उच्चार करून पहावा, म्हणजे जीभच तेथें अनुस्वार कसा स्पष्ट उच्चारते हें कळेल

५ **आनुनासिक्यरक्षण म्हणजे शब्दांनीं पूर्वजाभिमान धरणें**-- ( ङ ) 'शब्दानी पूर्वरूप टाकू नये तसें केल्यानें त्याची पूर्वजाभिमान-शून्यता ठरेल' असें विधान लेखक करितात व त्यास दृष्टान्त आपला माणसाचा देतात. आपण काय पूर्वजाचा पोशाख राखला आहे ? काल व देश यास अनुसरून आपण पोशाख बदलीत आहों पूर्वी वल्कलें, नतर दोनच वस्त्रें, पुढें ( यावनी ) आगरखा, हल्ली कोट, व त्याचीही टूम रोज नवी. पूर्वजासारखें दिसण्याचा हाच काय आपला प्रयत्न ? मग हा माणसाचा दृष्टान्त शब्दास कसा लागणार ? बरें, दृष्टांत सोडिला तरी शब्दानें मूळरूप सोडू नये, हें तरी योग्य व शक्य आहे काय ? 'पानास चुना लाव' याचे स्थानी पूर्वरूपानुसारी 'पर्णास चूर्ण लागव' असला प्रयोग लेखकास संमत होईल काय ? साराश

'**राजा कालस्य कारणम्**' या न्यायानें आपली दाढी, धावळी, वल्कलें इत्यादि जाऊन तत्स्थानी प्रतिनिधी आले, तद्वतच उच्चाराचे बरोबर हेलकावे खातखात, शब्दाची रूपेंही बदलणार त्यानीच स्थिर का रहावें ? आणि तसा त्याना आग्रह का ? व त्यातही हा आग्रह आनुनासिक्यापुरताच का असावा ? 'सचय' याचे 'साचा' या रूपान्तरात य-चा लोप खपतो, पण आनुनासिक्याचा लोप खपत नाही, असें का ? साराश-उच्चारातून गळालेले आनुनासिक्य, त्याचा पूर्वजाभिमान इरेस घालून, टिकवू पाहणें केवळ हास्यास्पद आहे.

६ **लेखनाची शुद्धी** म्हणजे काय ?--रा कुलकर्णी म्हणतात

(च) 'वर्णप्रक्रियानुसारी रूप तें शुद्ध, इतर अशुद्ध' येथें मी असें विचारितों की, वर्णप्रक्रियेची सीमा रा. कुळकर्णी ठरवितील तीच खरी, की शिष्टाच्या उच्चारप्रवृत्तीनें सिद्ध होईल ती खरी ! श्यामलक-चें रूपातर सावळा, असें आपण घेऊं यात शूल् याचे रूपान्तर क्रमानें सूळ्, यूक् याचा लोप हे दोन्ही विकार वर्णप्रक्रियातर्गत, पण म्-चे रूपातर (वॅं होऊन पुढे) व् होणें हें मात्र वर्णप्रक्रियाबाह्य ? कामला-चे कावीळ यात म्-चा व्-होतो, तो चालतो, त्रिशत्-मधील आनुनासिक्याचा मागमूस तीस-मध्ये लागत नाही, हेंही खपतें, पण (निरनुनासिक) सावळा हा शब्द मात्र वर्णप्रक्रियाविरोधी ठरतो वर्णप्रक्रिया जशी म्-चा वॅं मान्य करते, तशीच एक पाऊल पुढें जाऊन तिने व्-ही का मान्य करू नये ? दामन्-चें दावें या उदाहरणात भाषा म्-चा व् करीत नाही काय ? अशा स्थितीत वर्णप्रक्रियेचे स्तोम माजवून व तिची मर्यादा खुटवून (=आपल्या लहरीप्रमाणें ठरवून) सावळा या रूपावर अशुद्धतेचा छाप मारणे योग्य होईल काय ? रा कुलकर्णी म्हणणार-सावळा हेंच शुद्ध, कारण त्यातील आनुनासिक्यास परपरा व वर्णप्रक्रिया अनुकूल आहे,व तें राखलेच पाहिजे आता जे लोक प्रस्तुतसारख्या शब्दात आनुनासिक्य स्पष्ट उच्चारीत असतील, त्यासबधानें येथें काहीच म्हणणे नाही त्यानी तें उच्चारावें व लिहावें पण जे ते उच्चारीत नाहीत त्यास तें लेखनातूनही गाळण्यास कोणी वर्णप्रक्रिया आड आणू नये उच्चारापुढें रूढि, वर्णप्रक्रिया, लेखनपरपरा, इत्यादिकानी मान वाकवलीच पाहिजे

(छ) **शुद्धलेखन संस्कृतीचें मापक**—हें तत्त्व कोणीही कबूल करील, पण एवढीच पुस्ती त्यास जोडली पाहिजे की, 'जें तत्कालीन-शिष्टादृत

तें शुद्ध '. ' त्याला त्यावेळी बैलानें शिगानें मारले '—याचे ऐवजी ' त्याला त्यावेली बलीवर्दानें शृगानें मारले ' असें कोणी म्हटल्यास त्यामुळें त्याची संस्कृती आपण आपल्याहून उच्च मानू काय ? बळ, काळ, फळ, मळ याचे-जागी क्रमानें, बल, काल, फल, मल, म्हणणें सुशिक्षितपणाचें गमक होईल काय ? पाणी—ऐवजी पानी, लोणी—चे लोनी ही रूपें ( मुळास समीपतर असली तरी ) संस्कृतीची द्योतक गणली जात नाहीत सारांश, हें तत्त्व लक्ष्यात ठेवावें की शुद्ध म्हणजे मुळास समीपतर तेंच नव्हे, तर जें शिष्टादृत तें. ' **शिष्टादृतं शुद्धम्** ' ( शिष्टानी प्रयुक्त तें शुद्ध ) करिता अनुच्चारित आनुनासिक्य संस्कृतीचें मापक म्हणून ठेवणें हें सिद्ध होत नाही. वीस—चे स्थानी संस्कृतभाषा-परिचयदर्शक म्हणून विंस योजावें, हें कोणासच समत नाही

८ **आधारभूत उदाहरणें**—इष्ट तत्त्वाची सिद्धि करणें हें जर उदाहरणाचें प्रयोजन, तर लेखातील उदाहरणे पुष्कळशी गैरलागू आहेत असें म्हणणें प्राप्त होतें अर्थात् अशा उदाहरणानी मुद्दा सिद्ध होत नाही, हें ओघ-प्राप्तच आहे. ( १ ) ' प्रेमा**ने** ज्या**चें** तोयी ' ( ३४५ ) यातील निर्बिंदु असलेल्या **ने**—वरून वर्तमानकालीन नें—मधील शीर्षबिंदूचे अस्तित्व सिद्ध होत नाही, उलट खंडितच होतें ज्या**चें** तोयी अशा ठिकाणी चे—वर शीर्षबिंदु द्यावा, असें उदाहरण सांगतें, हें रा. कुलकर्णी यास इष्ट आहे काय ! ( २ ) ' तया ज्यानें **यि**तकें पाप कोणी न केले कान**नी** तैसे **सि**वचरित्री ' यातील यि, नी, सि, लेखनदृष्ट्या प्रमाणभूत मानावयाची काय ? मानल्यास मनी अशा सप्तम्यन्त पदान्ती शीर्षबिंदु देऊ नये असेंच उलट सिद्ध होत नाही काय ? आणखीही अनेक प्रकार या उदाहरणावरून धरसोडीचे व अनिष्टार्थ-प्रतिपादक आढळून येतील तेव्हा असल्या उदाहरणाची किंमत तज्ज्ञानीच ठरवावी **दंं**डनाके यातील नासिकोच्चार स्पष्ट श्राव्य,तर **दांं**डे यातील अनुच्चारित मानावा काय ? **दांं**डे यात असा अनुच्चार संभवतो काय ! मा**हिं**भट्टी, उ**सां**गिए या ठिकाणी शीर्षबिंदु अनुच्चारित आहे, असेंच अनुस्वार दर्शवितो काय ? येथील आनुनासिक्यें उच्चारितच असणार अशा रीतीनें रा. कुळकर्ण्यांनी 'बिंदूनें दर्शित **अनुच्चारित** आनुनासिक्यें' म्हणून दिलेली कित्येक उदाहरणे स्पष्ट **उच्चारित** आनुनासिक्यें दाखवीत असल्याने, इतरही तशी नसतील कशावरून अशा शंकेनें, उदाहरणें सर्वच अनिर्णायक ठरतात. सारांश यातील बरीचशी उदाहरणें विरुद्धार्थप्रतिपादक अतएव अप्रयोजक आहेत येथें मी जाणून आहें की कांहीं

उदाहरणातील दोष केवळ मुद्रणजन्य असतील, तसे ते असल्यास त्यावरील दोषारोपही मी आनदानें काढून घेईन, हें सागणें नकोच.

९ **इतर विधानें**—( क ) शी–प्रत्यय समेन–पासून आला आहे काय ? सह–पासून नव्हेच ? वस्त्रानिशी यातील शी–ची व्यवस्था काय ? ( ख ) विध्यर्थाचा प्रत्यय ‘ **वें** ’ हा सपूर्ण नव्हे, तर ऍं एवढ्याच अशानें नव्य-पासून आला आहे काय ? मग व् हा भाग कोठून आला ? ( ग ) द्वितीया–प्रत्यय ‘ **ते** ’ हा सस्कृत तैः—पासून आला आहे काय ? ( घ ) वर्णप्रक्रियानुसारें **आम्ही**–चें अती शीर्ष बिंदु असावा, तर **तुम्ही**–चें अती का नको ?

१० **उपसंहार**--( १ ) हल्ली उच्चारात नसलेलें आनुनासिक्य गाळण्यास त्याचा अनुच्चार हाच पुरेसा आधार आहे ( २ ) लेखनानें उच्चारानुसारीच झालें पाहिजे ( ३ ) वर्णप्रक्रिया किंवा लेखनपरपरा या गोष्टी उच्चारविरोधी असल्यास उपेक्षणीय ठरतात, व त्या शीर्षबिंदूचें ( किंवा शीर्षशून्याचे ) रक्षण करू शकत नाहीत ( ४ ) पूर्व-मराठीतील किंवा प्राकृतातील दिलेली उदाहरणें केवळ लेखापुरतीच प्रमाण होत, पण उच्चाराचे बाबतीत सर्वथा उदासीनच ( ५ ) कालाचे धोरणापुढें ( तत्त्वशून्य ) पूर्वजाभिमान लटपटतो. ( ६ ) लेखनाची शुद्धता म्हणजे व्युत्पत्ति-परायणता नव्हे, तर तत्कालोच्चारानुवर्तित्व ( ७ ) जें शुद्धलेखन शिष्टोच्चारानुगामी तेंच सस्कृतीचे मापक ठरतें, केवळ मुळास अधिक सनिकृष्ट असलेलें नव्हे ( ८ ) उदाहरणे उपपादक होण्यास ती ऐकान्तिक पाहिजेत, धरसोड करणारी उपयोगी नाहीत

ग कुलकर्णी याचा मुख्य आग्रह असा की, ‘मराठीत नाणावलेले वैयाकरण सुद्धा, अनुच्चारित आनुनासिक्याचे मुळाशी असलेल्या वर्णप्रक्रियेचे अभिज्ञ नाहीत ’ हें म्हणणें धाष्टर्याचे नाही काय ? समय व सपत्नी याची रूपातरे क्रमाने **सं**वय व **स**वत अशी होतात. यात एकात शीर्षबिंदु आहे, दुसऱ्यात नाही तो आहे का, आणि नाही का, हें जाणणें मोठें कठीण आहे काय ? तें वैयाकरणाना कळू नये इतके ते मट्ठ डोक्याचे आहेत काय ? ग्राम, नामन्, सीमन्, हिम, आमलक इत्यादि अनेक शब्दाची रूपातरें गाव, नाव, शिव, हीव, आवळा ही आनुनासिक्ययुक्त का, हें कोणासही समजेल. कदाचित् या घडामोडीस ‘वर्णप्रक्रिया’ हें नाव तो देत नसेल, पण नाव दिले नाही म्हणून त्यातील तत्त्व अपरिचित आहे, असें म्हणता येणार नाही. मिरची खाल्ल्यानें

ती तिखट लागून डोळ्यातून पाणी येणारच तिला मिरची म्हणतात, किंवा तिचे चर्वास तिखट म्हणतात, अशा प्रकारचें शब्दज्ञान नसले तरी मिरचीच्या धर्मांचा परिचय होणारच एक भटाचा व एक गवयाचा असे दोन मुलगे रडत आहेत. पैकी पहिला बेसूर व दुसरा सुरेल रडत आहे, तर, हा सुरेल का रडतो, याचें कारण जाणण्यास खेडवळही समर्थ असतो तेव्हा आपल्या पूर्व वैयाकरणास वर्णप्रक्रिया ज्ञात नव्हती, असा रा. कुलकर्णी याचाही अभिप्राय असेल, असें मला वाटत नाही. केवळ वैयाकरणानी या बाबतीतील उदासीनता सोडून, या वादात मन घालावें, एवढीच त्याचा अधिक्षेप करण्यात रा कुळकर्णी याची सात्त्विक इच्छा जमेस धरून व तीबद्दल त्याचे आभार मानून मी आपली रजा घेतों

---

## १० मराठींतील अनुनासिक उच्चार [ टीकात्मक ]

**प्रास्ताविक**--' महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका ' त्रैमासिकाच्या आश्विनाचे अंकात माझे समान्य स्नेही रा रगाचार्य रड्डीशास्त्री याचा 'अनुच्चारित अनुनासिकासबधी ' लेख प्रसिद्ध झाला आहे रा रड्डी याच्या लेखात, मी याच विषयावर ज्ञानप्रकाशात प्रतिपादिलेल्या मताहून विशेष विसदृश अशी मतें नाहीत. उलट-बऱ्याच ठिकाणी माझे मतास त्याचें सर्वथा आनुकूल्यच दिसून येतें त्यामुळे त्याचे लेखावर विशेष लिहिण्याचेंही माझ्या मनात नव्हतें परतु ज्या अर्थी त्यानीच मित्रत्वाची चर्चा मागविली आहे, त्या अर्थी तशी थोडीशी चर्चा पुढें देत आहे.

**परिभाषा**—नासाविशिष्ट उच्चार हस, तटा एतादृश ठिकाणी अनुस्वारानें बोधित होतो, व छॉ छॅ इत्यादि थोड्या ठिकाणी आनुनासिक्यानें या विधानावरून अनुस्वार व आनुनासिक्य याच्या अर्थाची फोड होईल येथें रा. रड्डीच्या अनुनासिकस्थानी मी मुद्दाम शुद्धतर म्हणून आनुनासिक्य ही सज्ञा योजिली आहे, कारण, अक्षराच्या डोक्यावरील चद्रबिंदु काय दर्शवितो ? स्वराचें आनुनासिक्य की अनुनासिक स्वर ? नुसतें आनुनासिक्य आनुनासिक स्वर दर्शविला जातो तो स्वरचिन्ह व चंद्रबिंदु या उभयाच्या योगानें आपणास विचार कर्तव्य तो केवळ स्वरधर्माचा अर्थात् तदर्थ आनुनासिक्य हीच सज्ञा प्रशस्ततर, अतएव आदरणीय ठरते. आता प्रस्तुत विषयासबंधी, म्हणजे वासरू या शब्दातल्या सारख्या उच्चारितपूर्व आनुनासिक्याविषयी, व एक

दोन तत्संबद्ध अशा ( प्रस्तुत लेखांत आलेल्या ) गोष्टीविषयी क्रमशः विचार करूं उच्चारितपूर्व आनुनासिक्य म्हणजे **उपनासिक्य** असें या लेखांत समजावें.

**१. अनुनासिक उच्चाराचें कालक्रमागत धोरण**–पाणिनि– कालीं अनेक स्वरांचा उच्चार अनुनासिक होत होता, तो कालांतरानें पुष्कळ ठिकाणचा लुप्त झाला, हें खरें आहे अर्थात् त्यावरून मराठींतही अनुच्चारित आनुनासिक्ये क्रमशः पार लोपून जाणार हें उघड आहे कारण आपणही मराठी भाषा बोलणारे, त्याच संस्कृतभाषी आर्यांचे वंशज आहों, व साहजिकच त्याचें धोरण, आपणास पिंगडतच असलेलें, पुढें चालू राहणार तेव्हां आनुनासिक्य मराठींतून हळुहळू गळणार–हें तत्त्व आपण उच्चाराचें धोरण म्हणून गृहीत धरिलें पाहिजे. यावरून उघड आहे की,ज्या आनुनासिक्याचे उच्चाराचे संबंधांत दुमत आढळेल तें आनुनासिक्य गाळण्यास विद्वानांनी संमति दिली पाहिजे

**२. उच्चारितपूर्व आनुनासिक्य दर्शवावें कीं नाहीं** ? दर्शविणें असल्यास कोणत्या चिन्हानें ? इत्यादि प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वी पुढील विचार येथें मांडणें जरूर आहे प्रस्तुत ( उच्चारितपूर्व आनुनासिक्यें किंवा संक्षेपार्थ ) उपनासिक्ये द्विविध आहेत कोशगत किंवा कौशिक, व वाक्यगत किंवा पदिक. कौशिकामध्यें कांही समूल व कांही निर्मूल असतात त्यांचा आणखीही विभाग भेदक व निरर्थक किंवा अजागळ, असा करितां येईल यांची उदाहरणें–हींव ( वाजणारें,–कौशिक समूल अजागळ ), ढेकूण ( कौशिक निर्मूल अजागळ ), पांच ( संख्या, कौशिक समूल भेदक, कारण हा शब्द बिंदूमुळें, ' पाच ' या रत्नविशेषवाचक शब्दापासून ओळखिला जातो ), फांस ( पाश, निर्मूल भेदक, फास–णें पासून भेद दर्शवितो म्हणून ) ' व्यापाऱ्याचीं दिवाळीं निघालीं '–यातील उपनासिक्यें पदिक आहेत, तसेंच या **टोप्यांस** काय पडलें ?–यांतीलही दिवाळी यांत बिंदूनें लिंगभेद सूचित होतो, तर टोप्यांस यांत वचनभेद

( १ ) अशा या नानाविध उपनासिक्यासंबधानें पुढील व्यवस्था मला योग्य दिसते

विद्यमान उपनासिक्य ( अर्थात् कौशिक ) समूल भेदक असेल तरच ठेवावें. अर्थात् पांच ( ५ ), वांट ( क्रियापद आज्ञार्थ ), घांट ( घंटा ), यातील उपनासिक्य ठेवावें,व घांस ( घृष् ) यातील गाळावें, कारण हें शेवटलें निर्मूल आहे.

पदिक उपनासिक्यें, ही सर्वच एका अर्थानें भेदक असल्यानें, प्रस्तुत नियमानेंच रक्षणीय आहेत. ही लिंग, वचन व पुरुष यांतील भेद दर्शवितात, जसें-कर्डे ( न लि. ),फुलां (-नीं ) ( अनेकवचन ),जातों ( प्र. पु. ). लिपीत अर्थभेददर्शनास कोणतीही मदत इष्ट असल्यानें, भेदक उपनासिक्य राखावें हें ठीकच आहे असलेली सोय का टाका ? विजेचे दिवे घेतले म्हणून घरातील असलेले तेलाचे दिवे आपण टाकीत नाहींच तें हळुहळू कालांतरानेंच नाहींसे होतील ही गोष्ट निराळी

( २ ) हें उपनासिक्य, त्याच्या उच्चारातलि पोचटपटास अनुलक्षून, पोकळ शून्यानें दर्शवावें. अशा प्रकारच्या शून्य-लेखनानें यथोच्चार-लेखन हें तत्त्वही पाळिलें जाते येथें हें आणखी लक्ष्यात ठेवावे की, विद्यमान भेदक उपनासिक्यें जरी भेददर्शनाकरिता ठेवावी, तरी ती नसतील अशा ठिकाणी भेददर्शनार्थ नवीन आणू नयेत, कारण उघड आहे की, कालाचा ओघ अशा अनुच्चारित पूज्याविरुद्ध आहे

३ **व्युत्पन्न उपनासिक्य** ठेवावें की नाही ? याचे उत्तर वरील उत्तरात बहुतेक आलेच आहे भेद-दर्शनास उपयुक्त नसल्यास, व्युत्पन्न उपनासिक्यही गाळावें केवळ शब्दाच्या इतिहासज्ञानासाठी उच्चाराशी विसवाद करणें केव्हांही योग्य नाही शिलगण ( सीमोल्लंघन ), ताम्हन ( ताम्रभाजन ), चामुंडा ( चंडमुंडनाशिनी ), मॉट्-फर्ड् ( Montague-Chelmsford ), ( थंडी ) वाजते ( मूळ ' वाघते ' ), शाळा ( पाठशाळा ), हातचा मळ (हस्तामलक ), बरसात ( वर्षर्तु ), सराई ( शरत् ), पाऊस ( प्रावृष् ), गाजरपारखी ( गर्भपरीक्षक ), इत्यादि अनंत ठिकाणी व्युत्पत्ति दर्शविण्याची तजवीज लेखात काय केली आहे ? काही नाही मग अशी सक्ति या बिंदूवरच कां करावी ? करिता समतेचा अवलंब करून, व्युत्पत्तीसाठी उच्चाराचा बळी देऊं नये

४. उपनासिक्यें लेखनात ठेविल्यानें, ती उच्चारित होऊं लागतील काय ? हा प्रश्न, ही आशा, किती वेडगळपणाची आहे ? पूर्वी लेख विद्यमान असतानाही जी एकदा उच्चारातून गळाली, ती का पुन्हा लेख प्रवृत्त झाल्यास परत येण्यासाठी ? त्याच्या उच्चाराचें अगत्य भाषेला असतें, तर ती गळालीच असती कशाला ? पिंजऱ्यातून जो वाघ एकदा सुटून गेला, तो का पिंजरा

उघडाच ठेविल्यास फिरून येईल ? सारांश, लेखनात नासिक्यकल्पें ठेविल्यानें त्याचा उच्चार होऊं लागेल, ही केवळ मृगतृष्णाच आहे, हें रा. रड्डींचे मत सर्वथा उपपन्न आहे.

५ **लिपी उच्चारानुसारी असावी काय** ? नसावी, हें एका पक्षाचें म्हणणें आहे का ? तर शब्दोच्चार देश, काल व व्यक्ति इत्यादिगत भेदानुसार विविध होतो. त्याच्याबरोबर चालण्यास लिपी पुरी पडणार नाही करिता लिपीनें उच्चाराकडे लक्ष्य न देता केवळ परंपरेसच चिकटावें. हें या पक्षाचें म्हणणें अत्यंत बालिश दिसतें. रा. माटे याचेप्रमाणें मी विचारितों, लेखन उच्चाराप्रमाणें नसावें, तर कशाप्रमाणे असावें ? उच्चारभेदाबरोबर लेखनास भिन्नभिन्न रूप पूर्णतः धारण करिता येत नसेल, पण म्हणून काय झालें ! जें सोळा आणे साधत नाही, तें दहा बारा आणे तरी साधू नये काय ? या बाबतीत ' खाईन तर तुपाशी, नाही तर उपाशी ' असा त्रागा करणें समंजस होईल काय ? देशादिगत भेदानुसार उच्चाराचें अनंतत्व असलें तरी, त्यात प्रमाणभूत म्हणून काही विशिष्ट उच्चारच मान्य असतात, हे सत्य आहे. लोकात शब्दप्रयोगाचे भिन्नत्व असले तरी, व्याकरण त्यापैकी विशिष्ट प्रयोग प्रमाण मानून आपले नियम बनविनेंच की नाही ? ' (शिष्ट–) प्रयोगशरणाः वैयाकरणाः ' हें तत्त्व सर्वशिष्टसमत नाही काय ? याच तत्त्वानुसार ' शिष्टोच्चारशरण लेखनम् ' असेंही म्हणणें योग्य ठरत नाही काय ? सर्वथा योग्य ठरतें. याच मताचा पाठिंबा रा. रड्डी याच्या पुढील विधानात स्पष्ट दिसून येतो. ' ज्या बोलीत तुम्ही विद्वत्सभेत विषय प्रतिपादिता ती बोली प्रमाणभूत मानून तुम्ही लेखन करावे, हेंच सर्वथा प्रशस्त होय. ' याच तत्त्वाचे अनुसरण आपण अनंत काल करीत आलों आहों प्रथम वैदिक संस्कृत, नंतर काव्यसंस्कृत, पुढें प्राकृतादि अपभ्रंश, नंतर जुनी मराठी, सांप्रत वर्तमान मराठी, इत्यादि क्रम बोलीत उत्पन्न झाला आहे, तसाच लेखनातही आणिला पाहिजे काव्यसंस्कृतात ' प्रतिशब्द ' असें रूप उच्चारानुसार लिखित सापडतें. तेंच रामदासादि कवींच्या जुन्या मराठीत पडसाद असे सापडतें, तेंच फिरून वर्तमान मराठीत प्रतिशब्द या रूपानें लिहिलें जाते. हें लेखनातील रूपांतर व प्रतिरूपांतर कशामुळें झालें ! उच्चारानुसारेंच नाही काय ? अशा रीतीनें लेखनास उच्चारानुसारें हेलकावे मिळतातच. सारांश, लेखनास परंपरेचा पायबंद

थोडाफार असला तरी तो उच्चाराच्या दृढतर विरोधापुढें फार काळ टिकू शकत नाही. अंती 'यथोच्चार लेखन' हेंच तत्त्व विजयी होते

६ उपनासिक्य न दर्शविल्यास **अर्थाचा अनर्थ** होईल काय? कदाचित् कोठें होत असल्यास, उपनासिक्य-लेखन सर्वत्रच योग्य होईल काय? अर्थाचा क्वचित् अनर्थ होणें हें प्रायः दुष्परिहरच आहे संस्कृत एवढी नियमबहुल भाषा, पण तीतही अर्थाचा अनर्थ संभवतोच तीत श्लेषाची उदाहरणें पदोपदी सापडतात यातील काही तर अभंग श्लेषाची असतात,-अशी की, पदें बरोबर तीच, पण अर्थ मात्र भिन्न 'उच्चरद्भूरिकीलालः शुशुभे वाहिनीपतिः.' (येथें कीलाल म्ह पाणी किंवा रक्त, व वाहिनी म्ह. नदी किंवा सेना यावरून समुद्र की सेनापती, कोण शोभला? हा संदेह उद्भवतोच ) हें असलेंच एक उदाहरण होय संस्कृतात जर हा प्रकार, तर मराठीत वक्त्यानें बोललेल्या शब्दाचा त्याचे विवक्षेस सोडून अर्थ झाल्यास काय आश्चर्य? अविवक्षित अर्थ हटकून टाळण्यास लेखन पुरें पडणे शक्य नाही विवक्षित अर्थ कोणता, हें बहुतेक संदर्भावरूनच ठरतें कधी-कधी संदर्भही कोताच पडतो, पण त्यास उपाय नाही. अर्थाचा अनर्थ केव्हाच होणार नाही, अशी ऐकान्तिक व्यवस्था दुर्घटच आहे. अनर्थ झाल्यास त्यास लेखन-पद्धति मुळीच भागग्राही नाही

मला छडी **लागते** ( जरूर आहे, किंवा पीडा करिते ), गेलो रे **गेलों** ( नदीपलीकडे गेलो, किंवा मेलो ), **सोन्याचें** अगडे तुला वाहीन ( सुवर्णाचें किंवा तन्नामक मुलाचें ), **साखरेचे** पोतें ( भरलेले किंवा रितें ) इत्यादि शब्दप्रयोग बोलण्यात केल्यास, संदर्भ एक असूनही निरनिराळे अर्थ होणें शक्य आहे सारांश, अविवक्षितार्थ संभव-निवारण हें लेखनपद्धतीस नेहमीच साध्य आहे असें नाही

७. लेखनाचे नियमबद्धतेस **उपनासिक्यांचा लोप** विरोधी नाही काय? मुळीच नाही. कारण तुम्ही जे नियम म्हणून म्हणता, त्याचीच मुळी उभारणी उच्चाराच्या लटपटणाऱ्या पायावर झाली आहे अर्थात् पायाप्रमाणें त्यावरील उच्चारही वारवार बदल पावणार.हें लेखनाचें **उच्चारानुवर्तित्व** गृहीत धरिलें म्हणजे लेखनातून उच्चारानुरूप नासिक्यकल्प गाळण्यातच लेखनाची नियमबद्धता,परंपरा व एकसूत्रीपणा साधतो, हें रा रंगाचार्यांचें म्हणणें सर्वथा तर्कशुद्ध ठरतें लेखानें उच्चारानुरूप बदलावें हीच खरी परंपरा.

८ **च-वर्गांतील पंचमवर्ण**-- चिच, झुंझ, वाझ यासारख्या शब्दात शीर्षबिदूनें परसवर्ण पचम व्यक्त होतो की नाही ? अर्थात् होतो. अनुस्वाराचा उच्चार कसा करावा, हें आपणास सहज कळते तो, पुढील व्यंजनाचे विशिष्टत्वाप्रमाणे, आपणास नकळतच विशेषरूप धारण करितो या तत्त्वानुसार, जर येथें **न**-चा उच्चार ऐकू येत असेल तर, सवर्ण उच्चारित होत नाहीं असे न म्हणता, उलट पुढील व्यजन न-शी सवर्ण अर्थात् दन्त्य आहे असें समजावें पुढील व्यजनाचे मुखगतस्थान ठरविण्याची ही एक कसोटीच आहे याच दन्त्यत्वास पोषक अशी गोष्ट म्हणजे काही मराठी व्याकरणात (चमचा इ० शब्दातल्यासारख्या) च, ज इत्यादि व्यजनाचें स्थान दन्ततालु असे सागितलें आहे, म्हणजे त्याचे उच्चारात दन्त्यत्व आहे, ही गोष्ट हे वैयाकरण मान्य करितात मग पुढील व्यजन दन्त्य, व त्याचे मागील उच्चारही दन्त्य, न-सदृश किंवा न-हून अभिन्न, अशी स्थिति असता, 'प्रस्तुतस्थळीं परसवर्णोच्चार होत नाही' हे म्हणणें टिकत नाही जो उच्चार होतो तोच परसवर्ण; मग तो वेळेस नक्की कोणता हें सागता न आलें तरीही, त्याचे परसवर्णत्वास बाध येत नाही तेव्हा, चिच-सारख्या शब्दातील नासाविशिष्ट उच्चारविशेषाचे लेखनाची व्यवस्था विद्वानानी लावावी असें जें रा० रड्डीशास्त्री लिहितात, त्याचें प्रयोजनच सिद्ध होत नाही च-पूर्व परसवर्ण 'न' वाटत असल्यास, तोच मानावा त्यात नवीन व्यवस्था ती काय लावावयाची ? दत यात जसा परसवर्ण न म्हणता, तसाच तो चिच यातही म्हणावा

९ **चिंच-सारख्या शब्दांतील आनुनासिक्य** सस्कृतास अपरिचित आहे, व तें मराठीत रूढ **होत आहे** व पुढें विस्तार पावणार, अशा अर्थाचें भविष्यमिश्रित विधान रा० रड्डी करितात. चिच यातील च-पूर्व व्यजन सस्कृतात (उच्चारतः) आढळत नाही हे खरें येथील च सस्कृतातील च-हून भिन्न, तसा तत्पूर्व अनुस्वार-परसवर्णही ञ-हून भिन्नच असणार पण ही दुसरी गोष्ट पुढें विस्तार पावणार म्हणजे काय करणार ? प्रस्तुत परसवर्ण न आहे, हें मान्य नसल्यास, न-सदृश एक नवीन परसवर्ण मराठीत आला आहे, असें म्हणा फार तर तदर्थ एक नवें चिन्ह असावें, असेंही म्हणा, पण त्याच्या विस्ताराच्या भविष्यानें काय सुचविणार ? आज चाळिसाहून अधिक वर्षे हा नवीन उच्चार आपण प्रत्यक्ष करीत व ऐकत आहों.

एवढ्या मुदतीत त्यात काहीच विस्तार झाल्याचें माझ्या प्रत्ययास आलें नाही मग पुढेंच तो का विस्तार पावणार ? मुळीच नाही. एवढेंच नव्हे, तर वर्तमान वस्तुस्थिति त्याच्या उलट आहे. हा उच्चार पूर्णतः रूढ झाला आहे, व त्याच्या विस्ताराचा संभव मुळीच दिसत नाही, असलाच तर संकोचाचाच दिसतो. (खिडकीतील) **गज**, जगताप, पराजपे इत्यादि शब्दात पूर्वी दन्त्यतालव्य जें ऐकू येत असे, तो अलीकडे वारंवार तालव्यच ऐकू येतो, हें सुज्ञास बारकाईनें पाहिल्यास सहज पटेल

१०. **एका लिपिचिन्हाने एकाधिक उच्चार बोधित करणें**, हा दोष **अलीकडे** उत्पन्न होत आहे–हे रड्डी-कृत विधान सदोष आहे 'उच्चाराचें चिन्हाधिकत्व पूर्वी नव्हतें' हे आनुनासिक्यासंबधानें खरे असलें तरी '**क्य**' इत्यादींच्या उच्चारासंबधानें तसें नाही कसें ? आज चाळिसाहून अधिक वर्षे आपण **उद्यां** व **उद्यान** यातील दोन निरनिराळे उच्चार एकाच चिन्हानें दर्शवीत आहों. हे एकाधिक उच्चार पूर्वीही होत असत, तसेच ते साप्रतही होत आहेत साप्रतची पिढी पूर्वीच्या, निदान १२, पिढ्याच्या तोंडी नसलेले असे नवीन उच्चार प्रचारात आणीत आहे, व त्यामुळेंच विद्यमान चिन्हें त्याचे बोधनास अपुरी पडतात असें दिसत नाही त्याच्याही मागील पिढ्याचे उच्चार जरी आपण ऐकिले नाहीत किंवा ( Phonograph ) ध्वनिलेखामध्ये संगृहीत केलेले आज आपणास ऐकण्यास मिळत नाहीत,तरी यासबंधात काही गमकें अवश्य सापडतात '**तुझ्या**' हा शब्द संस्कृत लिपीप्रमाणें चतुर्मात्रक उच्चारिला पाहिजे, तो आज आपण त्रिमात्रच उच्चारितों तु यातील स्वरास गुरुत्व येत नाही आणि हाच प्रकार मोरोपत कवि याचे काळीही होता. 'तुझ्या बहुत शोधिलें' इ पद्यचरणात तु एकमात्रक आहे, हें उघड आहे. साराश 'झ्य' सारख्या चिन्हानें यथार्थ संयोग व दिखाऊ संयोग असे दोन उच्चार मराठीत पूर्वीपासूनच प्रवृत्त आहेत तदर्थ चिन्हभेद असावा, हें म्हणणें योग्य आहे. पण हे उच्चारभेद अलीकडे उत्पन्न होत आहेत, हें म्हणणे सत्याभासच होय हें झालें संयोगाभाससंबधानें. आता अ–चा विचार करू. चंद्रगडकर, अ (-ळवा-)चें (साभारें) या सर्व आठही अक्षरात अकारोच्चार आहेत, व ते सर्वच अन्योन्यभिन्न आहेत. यातील नवीन असलाच तर, चें–मधील अकारोच्चार होय. पण तोही उच्चार शिष्टजनसंमत दिसत नाही. सप्तविध अकार जुनेच आहेत.

साराश ' यावदुच्चार चिह्नानि ' हें तत्त्व योग्य आहे,व त्याची अंमलबजावणीही यावच्छक्य करणें इष्ट आहे पण प्रस्तुत दोष म्हणजे चिन्हाचा तुटवडा आनुनासिक्यासंबंधाने व तो अलीकडचा आहे,असें म्हणणें सत्य असलें तरी, अकारासारख्या इतर उच्चारासंबंधानें हा तुटवडा तीनचार शतकें तरी प्रचारात असावा, हें तितकेंच सत्य आहे

११ रा रंगाचार्य म्हणतात, कस, पक, चंचू, तटा, पत,आरंभ इत्यादि ठिकाणचा नासाप्रधान उच्चार अनुक्रमानें शीर्षबिंदु व ङ्, न्, ण्, इत्यादि पंचमवर्ण अशा षड्विध चिन्हानी दर्शवावा यात ते कोणतें तत्त्व पाहतात ! ' जितके उच्चार तितकी चिन्हें '. मान्य. पण त्याबरोबरच येथें सोय आहे की गैरसोय आहे ? जेथें चिन्ह एक असूनही त्यापासून इष्ट कार्यें बिनचूक होतात, तेथे चिन्हाचे पार्थक्याचा आग्रह का धरावा ? ३३३३३ या पचाकी संख्येत उजवीकडून दुसरा आकडा दशक, तिसरा शेकडे, चौथा हजार, पाचवा अयुत, तर सहावा लक्ष, दर्शवितो. आकडा किंवा लेख तोच, पण तो स्थानानुसार मूल्यभेद धारण करितो हें स्थान-प्राप्त मूल्य सर्वास बिनचूक कळतें व म्हणून येथे कोणी असा आग्रह धरीत नाही की, दशक दर्शविण्यास तीन हा आकडा काही निराळाच लिहावा, शेंकडे दर्शविण्यास त्याहून निराळा इ० म्हणजे स्पष्ट प्रतिपत्तीस बाधक होत नसेल तर चिन्हाचें एकत्व निर्बाध आहे, हें सिद्ध होते हें तत्त्व भाषेच्या लेखनास लाविल्यास पक, पचाईत, पडित, पत, पिपळ इत्यादि ठिकाणी शीर्ष-बिदूचा उपयोग सर्वथा निर्बाधच ठरतो हे शब्द उच्चारताना आपण जिभेस सागतों, ' येथें शीर्ष-बिदूने अनुस्वार दर्शित होत आहे. करिता अनुस्वाराचा उच्चार स्पष्ट कर ' जीभही अनुस्वार बरोबर ( यथाशास्त्र ) उच्चारिते. त्या अनुस्वाराचे उच्चाराच्या प्रयत्नातच पुढील व्यजनाचे व्यक्तित्वाची छटा पडून यथेष्ट उच्चार प्रवृत्त होतो पाण्याचा रंग जसा तें धारण करणाऱ्या कुपीचे काचेच्या रंगानुरूप दिसतो, तसा दिसावा म्हणून आपणास निराळी खटपट करावी लागत नाही, तसेंच अनुस्वाराचा उच्चार परव्यजनानुसार तें-तें रूप धारण करूनच मुखातून बाहेर पडतो, तदर्थ बुद्धीस जिभेचे साह्यास जावें लागत नाही आकड्याचें मूल्य स्थानविशेषाधीन तसा शीर्ष-बिंदूचा उच्चार परव्यंजनाधीन. येथें सर्व ठिकाणी एकाच बिदूचा तो-तो इष्ट उच्चार बिनचूक होतो. करिता लंघनसारख्या शब्दांत केवळ बिंदूनेंच कार्य साधावें.

१२. शेवटी एका गोष्टीविषयी लिहून हा लेख संपवितों पान १३ मध्यें राजवाडी म्हणतात की, ' अकाररूपशीर्षे तु दक्षिणे **बिन्दु**रूपिणी । ' असें वर्णन अनुस्वाराविषयी दिलें आहे त्याच पानात पुढें म्हणतात की, अनुस्वार नाद्-गुणक आकाशाप्रमाणें वर्तुलाकार **शून्य** असणें युक्तच होय. येथें बिंदू आणि शून्य या दोन कल्पनाची सांगड कशी घालावयाची ? बिंदु पडतो तो पोकळ असतो काय ? बुंदी ( बिंदु-पासून स्वर-विपर्ययाने साधित ) या पक्वान्नाच्या कळ्या असतात. या कळ्या म्हणजे बिंदूचीच रूपांतरे भरीव असतात की पोकळ ? जर भरीव, तर बिंदु हाही भरीवच असला पाहिजे, हे प्राप्त होत नाही काय ? सारांश कोणीकडून तरी लेखाच्या पोकळ आकाराचें समर्थन साधावें ही त्यांची खटपट येथे सफल झाली नाही, असें म्हणावें लागतें

१३ **उपसंहार**—( १ ) कालाचे धोरण पाहिल्यास, तें मळमळीत आनुनासिक्य गाळण्याकडे आहे, अर्थात् संशयित स्थानी आनुनासिक्य खास गळणार ( २ ) उच्चारितपूर्व पण सांप्रत लेखनमात्रवर्ती असें आनुनासिक्य भेदक, म्हणजे दोन शब्दांतील अर्थभेद दाखविण्यास उपयुक्त, असल्यास ठेवावें, एरवी गाळावे. कौशिक आनुनासिक्यात काही ( पांच-सारख्या शब्दामधील ) भेदक असतात, इतर नसतात वैयाकरण किंवा पदिक आनुनासिक्यें सर्वच भेदक असतात अनुनासिक्य दर्शविणें तें स्पष्टोच्चार असल्यास ( हॉं, यँव येथल्याप्रमाणे ) चंद्रबिंदूनें दर्शवावें व केवळ उच्चारितपूर्व असल्यास ( म्हणजे सामान्यतः भाषेंतील बहुतेक ), पोकळ शून्यानें, जसें—तूं काम कां केलेंस ? ( ३ ) व्युत्पन्न आनुनासिक्य भेदक नसल्यास गाळावें; जसें-( हिम ) हींव. जेथें सीमोल्लंघनाचें शिलंगण होते, सीमान्तपूजनाचें शेवती होतें ( ज्यात वर्ण–लोप–विकारादि अनेक घडामोडी होतात. ), तेथें व्युत्पत्तीसाठी आनुनासिक्य राखलेंच पाहिजे हा आग्रह पाहिला म्हणजे ' विक्रीते करिणि किमङ्कुशे विवादः ?' ही उक्ति आठवते ( ४ ) प्रथम उच्चार बदलतो, नंतर लेख, उच्चार लेखानुसार बदलत नाही प्रभात–चें उच्चारण पहाट होऊ लागलें, तेंव्हा लेखनही तदनुरूप बनलें. उच्चारातून गेलेला नासिक्योच्चार, तो लेखात दर्शवित गेल्यास, फिरून परत येईल, ही आशा सर्वथा मोघ आहे. वीस ( विंशति ) हा शब्द वींस असा लिहिला तरी कोणीच त्याचा उच्चार तसा करणार नाही, हें निश्चित कालप्राप्त धोरणाचा प्रतिकार होणें

नाही. ( ५ ) लेखनास प्रमाणभूत उच्चार मानणें ते केवळ सभ्याचेच होत. अर्थात् शिष्ट लोक सभेंत जे प्रयोजितील तेच ( ६ ) आपल्या लेखाचा इष्टार्थाहून इतर अर्थ होताच कामा नये अशी सक्ति कोणीही लेखक स्वीकारणार नाही. इष्टेतरार्थ–सभव-निवारण हें लेखनास नेहमीच साधेल असें नाही. (७) लेखनाचा एकसूत्रीपणा किंवा परपरा उच्चारास विरोधी ठरल्यास त्याज्यच होय. पूर्वी ( लोभ = ) हाव ( उच्चारीत व ) लिहीत होतों म्हणून आज तो शब्द तसाच लिहिला पाहिजे हा असदाग्रह होय. ( ८ ) चिंच या शब्दातील अनुस्वारोच्चार पुढील व्यंजनाच्या वर्गातील पचमाचेच रूपानें होतो. ( ९ ) चिंच यातील बिंदूचा उच्चार सस्कृतातल्याहून भिन्न असला तरी तो मराठीत आज तीनचार शतकें रूढ आहे. त्याचा विस्तार होता दिसत नाही ( १० ) सस्कृतातल्याहून नवीन उच्चार मराठीत शिरले आहेत, पण चिन्हे मात्र नवीन आली नाहीत; यामुळें मराठीत चिन्हाचा तुटवडा आहे पुण्यात हे एकच रूप 'विशिष्ट गावात' व 'सुकृताचा शेवट' अशा भिन्न-भिन्न अर्थात भिन्नोच्चार असूनही लिहिण्यात एकविधच आढळते ( ११ ) शीर्षबिंदूचा उच्चार ( अर्थात् स्पष्ट प्रतीत होणारा ) पुढील व्यंजनानुसार यथापेक्षच होत असल्यानें त्याचे विशेष दर्शविण्यास भिन्न–भिन्न पचमवर्णाचा उपयोग करू नये असा उपयोग करणें अनवश्यक तर आहेच, पण लिहिण्यास, छापण्यास व वाचण्यासही त्रासदायक आहे सयोग, सकर, सर्डीन, सचय, सताप, सपर्क इत्यादि ठिकाणी शीर्षबिंदूने अनुस्वारोच्चार यथापेक्ष शुद्ध होतो आपली जीभच हा उच्चार त्या-त्या व्यजनापूर्वी जसा–जसा तो व्हावा तसा-तसाच बिनचूक साहजिकच करिते करिता येथें चिन्हभेद करण्याचे कारण नाही ( १२ ) स्पष्ट श्रूयमाण होणारा अनुस्वार बिंदुरूपानें दर्शवावा अर्थात् तो भरीव वर्तुळानेच दर्शविला पाहिजे, कारण बिंदु हा नेहमी भरीवच असतो

---

## ११. उपनासिक्य अथवा अनुच्चारित अनुनासिक.

[ टीकात्मक ]

१. **व्युत्पत्ति, रूढी व उच्चार**—हासणे या शब्दातील आद्याक्षर भूतपूर्व निरनुनासिक आहे, तर वीस या शब्दातील तसें नाही, पहिल्या शब्दाचे मुळात अनुस्वार नाही, तर दुसऱ्याचे मुळात तो आहे, **हसनम्–हांसणें, विंशति–वीस.**

येथे प्रश्न असा की पूज्य योजावें तें ( रूढ नसूनही ) समूल असलेलें, कीं ( निर्मूल असूनही केवळ ) रूढ असलेलें ? समूलच योजणें असेल तर वींस, ह्रास, असें लिहिले पाहिजे. ( २ ) रूढच योजणें असेल तर वसि, हास असें लिहिलें पाहिजे येथें तिसराही एक पक्ष संभवतो तो असा की, मूळ पाहूं नका, अथ रूढीही पाहू नका, केवळ उच्चार, अर्थात् शिष्टादृत, पहा व तद्नुसार पूज्य योजा या मते ( ३ ) वीस, हास, असें लिहिलें पाहिजे या पक्षत्रयानुसार क्रमाने ह्रास-हास-हास, वींस-वसि-वीस अशी रूपें प्राप्त होतात

२ **पक्षांचें बलाबल**—( क ) आपले पूर्वज ऋजु असा उच्चार करीत व तसेंच लिहीतही संस्कृत शब्द आपण हल्लीच्या मराठीतील तद्भवाचें मूळ समजतों. येथें ऋजु हा शब्द आपल्या उजू-चें मूळ होय. जसे ऋजु हे संस्कृत रूप आपल्या संस्कृतकालीन उच्चारानें ठरलें, तसेंच उजू हे मराठी रूप आपल्या मराठीकालीन उच्चाराने ठरलें. हेंच उजू रूप सांप्रत सर्वमान्य आहे येथें ऋजु हें मूळ रूप टाकून आपण उजू का उचललें ? येथे आपण ( उच्चारविरोधी असलेल्या ) मुळास टाकून उच्चारास आदरिले.

( ख ) संस्कृत शब्द मुद्ग हा प्राकृत-काळी मुग्ग असा उच्चारण्यात येऊ लागला, अर्थात् लेखही तसाच रूढ झाला. पुढें मराठीन तोच शब्द आणखी विकार पावून मूग असा उच्चारण्यात व तद्नुसारें लिहिण्यात येऊ लागला. यावरून ठरते की,प्राकृतातील रूढीस मराठीतील उच्चारानें खो दिला लौकिक उच्चारानें प्राकृतातील रूढी बदलून स्वसंमत असें लिहिणे प्रवृत्त केलें. साराश-लेखनरूढीच्या संबंधात कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम्-शक्ति लौकिक उच्चाराचे हाती आहे हें सिद्ध होतें याचाच अर्थ असा की रूढीचा उच्चाराशी विरोध आल्यास उच्चारच प्रभावी ठरतो.

३. **श्रुतपूर्व अनुनासिक**--येथवर आपण पाहिलें कीं, मूळ व रूढी या दोहोंसही प्रवृत्त-निवृत्त करणारा उच्चारच आहे मार्ग-मधील र कशानें गळाला ? पाठशाळा-मधील पाठ कोणी घालविला ? सांत्वनमध्यें ( शांतवन करिताना ) सू-चा शृ व अकारागम कोणी केला ? यंत्राचें जातें कोणी बनविलें ? बाधते-चे जागी ( थडी ) वाजते असे रूप कोणी आणिलें ! शारदेची सारजा कोणी केली ? वरयात्रा-चे ऐवजी वरात कोणी काढिली ? समय ( वहिवाट, रूढी )-चे जागी सवय कोणी प्रवृत्त केली ? या सर्व प्रश्नाचें उत्तर

**उच्चारानें** हेंच होय. अशा रीतीने उच्चाराची सत्ता वाटेल त्या वर्णावर, फार काय शब्दावयवावरही, चालूं शकते ती नस्याचे बाबतीत का कुंठित व्हावी ? मुळीच होणार नाही यंत्राचें जातें बनविताना उच्चाराने मुळातील अनुस्वाराची पर्वा केली नाही. विंशति–चे वीस करण्यात त्यानेंच अनुस्वाराची हकालपट्टी केली. हाच उच्चाराचा प्रभाव प्राकृतानेही मान्य करून व्याकरणात निविष्ट केला आहे ' विंशति–इत्यादि संस्कृत शब्दातील अनुस्वार गळतो ' असें प्राकृत व्याकरणात ग्रथित केलें आहे असें ग्रथन करणे प्राकृत व्याकरणास कशामुळें भाग पडले ? प्राकृतभाषाकाळी आपण विंशति–चा तद्भव निरनुस्वार उच्चारू लागलों म्हणून. म्हणजे यंत्र, विंशति यातल्यासारख्या ढळढळीत अनुस्वारास देखील उच्चार–विरोधामुळे पळावें लागले, अशा स्थितीत, उच्चाराशी विरोध आल्यास ( अनुच्चारित म्हणजेच ) मळमळीत अनुस्वार खास पळणार. अर्थात् एखाद्या शब्दाच्या उच्चारातून अनुस्वार गळाला म्हणजे तदनुसार लेखनरूढीही बदलून, निरनुस्वार रूढी ( त्या शब्दापुरती ) प्रवृत्त होणार, हें उघड आहे अशा प्रकारचा रूढीत बदल विंशति-चे बाबतीत प्राकृतानें केला, व तो मराठीनेंही आदरिला आहे हेच तत्त्व कालक्रमानें हळूहळू अमलात येऊन सर्वच भूतपूर्व अनुनासिक गळणार, हें उघड आहे. मग यात बिघडलें कोठे ? असे अनुनासिक लोपणार मान्य गाजावाजा न करिता ते लोपिल्यास चालतें, पण त्यासंबंधी कोणी प्रकट प्रयत्न केल्यास मात्र चालत नाहीं, हा चमत्कार नाही काय ? जी गोष्ट निरुपयोगी, जिचा नाश निश्चित, ती काढून टाकण्यास विरोध करणें गैर आहे जें झाड मेलेलें, तें फांदी-मागून फांदी अशा क्रमानें पडूं देण्यापेक्षा एकदमच पाडून टाकलेले काय वाईट ?

४ **लेखनांत उच्चारानुगामी फरक** करण्याची आपली परंपरा प्राकृतात होती तशी अलीकडील मराठीतही आहे ही परंपरा अनुच्चारित नस्याचे बाबतीत जे स्वीकारीत नाहीत तेच खरोखर परंपराद्वेषी अतएव उपेक्ष्यच मानिले पाहिजेत त्याच्या मताकडे लक्ष्य न देता मराठीचे उच्चाराचा योग्य मान राखिलाच पाहिजे. लोकमान्याचे लिहिण्यात ' तीं जात्ये, बोलत्ये ' अशीं यकार-विशिष्ट रूपें सर्वत्र आढळतात. तशीच रूढी पर्वा–पर्वापर्यंतही होती. अलीकडे उच्चारात ठळक फरक पडून ही रूपें निर्यकार लेखात येऊं लागली आहेत, एवढेच नव्हे तर ती राजमान्य होऊन बसली आहेत. येत्ये हें रूप

आज चूक मानिलें जाऊन, येतें हेंच शुद्ध मानण्यात येतें. येथें यकार कोणी गाळिला ? उच्चारानें अशा रीतीनें लेखनरूढीचें उच्चारानुगामित्व अनुच्चारित नस्याचे सबंधातही आपण आदरिलें पाहिजे, नाही तर आपण परपराविरोधी व यत्किंचनकारी ठरू. आपणास ग्राम शब्दातील र् लोपलेला खपतो, म–चा ँव बनलेला चालतो, म्हणजे आपणास अक्षरलोप व अक्षरभेद खपतात, पण अक्षराचे धर्माचा लोप चालत नाही साक्षात् १६ आणे अनुस्वाराचा लोप खपतो ( जसें विंशति–चे वीस ), पण अनुच्चारित नस्याचा म्हणजे एक आणा अनुस्वाराचा लोप खपत नाही हा केवळ हट्टच नव्हे काय ? विंशति–मधील समूळ ( ढळढळीत ) अनुस्वार गाळलेला चालतो, मग ( पाश-पासून झालेल्या ) फास शब्दातील निर्मूल नस्याचा लोप का खपू नये ?

साराश—उच्चारानुरूप लेखात फरक करण्याच्या मराठीच्या अव्याहत परपरेला अनुच्चारित नस्य न गाळल्यानें बाध येतो, ज्यामुळे नाफेरवाले हे परंपराशत्रू होत व सर्व शिष्टानी त्याचा निषेधच केला पाहिजे

५ काही **उच्चारितपूर्व नस्यांचें परीक्षण**—येथपर्यंत केलेल्या वर्णनावरून अनुच्चारित नस्य गाळावें असेच कोणीही म्हणेल ही सर्व गाळणें नसतील तर निर्मूळ तेवढी तरी गाळावी, एतदर्थ आपल्या पत्रात प्रसिद्ध झालेल्या अनुच्चारिताचे परीक्षण येथे करीत आहें

[ ता. ३१–१–३१ चे ज्ञानप्रकाशात रा पावशे लिहितात ‘ पुढील यादीतील सर्व शब्दातील उपनासिक्ये निर्मूल अतएव त्याज्य आहेत ती कोणी समूल दाखविल्यास ठेवावी ’ अशी काही उपनासिक्ये खाली समूल म्हणून सिद्ध केली आहेत ]

( १ ) संस्कृतातील द्विरावृत्त व्यजनाचे स्थानी तद्भवात अनुस्वारपूर्वक ( एक ) व्यजन येतें, जसे–ढक्का–डका, उच्च–उच, कुट्टनी–कुटीण, भित्ति–भित, पिप्पल–पिपळ हाच विकार कधी-कधी संस्कृतातील क्ष किंवा अन्य जोडाक्षराचे संबधातही घडतो, जसे पक्ष–पख, मार्जार–माजर. यातील प्रवृत्तीस अनुसरून अक्ष–आंख, पक्ष–पांख–पांख(-खूं,)अशी रूपें होतात. कृत्ति-चे कांत-ही याच विकाराचें फळ दिसतें.

( २ ) संस्कृतातील म्–न् इत्यादि अनुनासिक व्यजनाबद्दल तद्भवात अनुनासिकोत्तर वकार किंवा व्यजनातर प्रवृत्त होतें, जसें ग्राम–गांव, अनुज्ज्वल–

**ओंवळें** याच नियमानुसार समुज्ज्वल–**सोंवळें**, फेन-फेंस, समय-सैंवय, लोमन् लंव ( केश )-लोंकर, वंचनम्–वांचणे–वांचून, ( वांचणें म्हणजे काळास फसविणेंच होय ), भ्रमर–भोंवरा, गोधूम–गहूं.

( ३ ) काचकार व कास्यकार या दोहोंपासूनही कांसार हाच तद्भव बनतो. पैकी कांच ( भिग ) हा अवयव सानुस्वार लिहिण्यात आल्यानें, तद्घटित काचकार याचा तद्भव सानुस्वार लिहितात कास्यकार याचा तद्भव तर सानुस्वार असणारच.

( ४ ) बीं, जूं यातील एज्यें 'नपुसकलिंगी इ-उ-वणान्त शब्द नस्यान्त होतात,' या सामान्य नियमानेच प्राप्त झाली आहेत.

येथवर केलेल्या विवरणावरून दिसून येईल की, नस्योच्चार जोडाक्षराच्या घडामोडींनेही उत्पन्न होतात, त्याना मूळ पचमवर्णच पाहिजे असे नाही हें सर्व सांगण्याचें तात्पर्य असें नाही की ही नस्ये ठेवावी, ते असें आहे कीं याहून इतर, ज्यास मुळातील अनुस्वारादिकाचा किंवा जोडाक्षराचा आधार नाही, ती गाळावी.

---

## १२. मराठींत संस्कृतागत इ–उ-कारान्त नामांची प्रथमा कशी करावी ?

**१ प्रस्तुत शीर्षकाचा अर्थ**— मति, भानु यासारखी संस्कृतातील ऱ्हस्व इ–उ–वर्णान्त नामें मराठीत प्रथमेंत दीर्घान्त म्हणजे मती, भानू अशीं लिहावी की नाही ? या प्रश्नाचे उत्तर देण्याचा येथें प्रयत्न करीत आहें हीं नामें बोलण्यात दीर्घान्त होतात, हे तर प्रश्नातीतच आहे. विचार करणें ते फक्त ती तशी दीर्घान्त लिहावी की नाही, एवढ्याचपुरता.

**२ विवेचनाची दिशा**—प्रश्न ( १ ) इ–उ–वर्णान्त शब्द मराठीत कसे सांपडतात, दीर्घान्त की ऱ्हस्वान्त ? ( २ ) संस्कृतातील ऱ्हस्व यु–वर्णान्त शब्द मराठीत आले आहेत की नाहीत ? आले असल्यास त्याचे मराठीतील रूप कसें आहे ? उत्तर-( १ ) मराठीत तद्भव किंवा देशी शब्द ' जलदी, काही, गडू, तटू ' असे दीर्घान्त अनेक आहेत. निदान उच्चारतः तरी ते दीर्घान्त आहेतच, ते ऱ्हस्वान्त कधीच नसतात. ( २ ) ऱ्हस्व युवर्णान्त संस्कृत शब्द मराठींत

पदोपदी आढळतात त्यांचे यावच्छक्य प्रकार पुढील–प्रमाणें सात आहेत. पुं०–कवि, धनिन् ( समासात पूर्वावयव असताना हा शब्द धनि असा प्राप्त होतो ), भानु, स्त्री०–रीति, धेनु, न०–दधि, वस्तु प्रश्न–असे हे शब्द मराठीत कसे योजावे ? तत्सम म्हणून आहेत तसे ऱ्हस्वान्त राखून, की तद्भव म्हणून दीर्घान्त करून ? ( १ ) धनिन् हा शब्द धनी या रूपानें आपण तद्भव म्हणून योजितों ( २ ) वस्तु–चा वस्त ( ३ ) रीति–चा रीत, असे तद्भव शब्द आपण करितो. येथें आपण अंत्य युवर्ण टाकून, तत्स्थानी दीर्घस्वर किंवा अकार योजितों ( ३ ) अक्षि–चे रूपांतर आख व दधि चें दही असें होतें, यांतही अंत्य ऱ्हस्वास फाटा मिळतो राहता राहिले कवि, धेनु व भानु–हे तीन प्रकार हेही आपण उच्चारात दीर्घ करितोच **यथोच्चार लेखन** हें तत्त्व पाळणें तर त्याची रूपे कवी, धेनू, भानू, अशी दीर्घान्तच लिहिली पाहिजेत याच क्रमप्राप्त गोष्टीस पोषक अशा काही गोष्टी सापडल्यास पाहू

३ **संस्कृताची अनुकूलता**—( क ) शक्ति, पद्धति, रात्रि, शकटि, ओषधि, अंगुलि अशा स्त्रीलिंगी ( ऱ्हस्व ) इकारान्त रूपाचे जागी संस्कृत व्याकरण ' अक्तिन्नर्थाद्वा ङीप् ' इत्यादि वचनानी दीर्घान्त रूपाचा विकल्प उपदेशितें. अशा रीतीनें अंत्य स्वराचे दीर्घीकरणास संस्कृत व्याकरण सर्वथा विरुद्ध नाही, हे स्पष्ट आहे ( ख ) स्त्रिया मूर्तिस्तनुस्तनूः ' असे अमरकोशातील प्रतीक प्रसिद्धच आहे यात तनु–चे जोडीस तनू असे दीर्घान्त रूप दिलें आहे म्हणजे दीर्घान्तत्व जेथें मुळीच प्राप्त होत नाही, असे प्रकार तिनांपैकी दोनच राहिले. ते कवि व भानु इतर पाच प्रकारात, येथें दर्शविल्याप्रमाणें, काही ठिकाणी अकार तर काही ठिकाणी दीर्घ, थोड्याफार अशानें प्रवृत्त होतो, म्हणजे असे म्हणता येईल की सातांपैकी पाच ठिकाणी, अर्थात् जवळजवळ पाऊण क्षेत्रात, ऱ्हस्वान्ताला सो मिळतो बाकी राहिलेलें एक चतुर्थांश क्षेत्र, त्याचा आता विचार करूं

४ **धनिन्–चा दाखला**—आपण धनिन्–चा तद्भव दीर्घान्त धनी असा का करितों ? तो प्रथमेचें रूप आहे म्हणून. म्हणजे असें ठरते की, संस्कृत प्रथमान्त रूपावरूनही तद्भव बनतो. हें तत्त्व कवि या शब्दास लाविल्यास कविः असें रूप मराठीतील रूपाचे उद्गमस्थानी प्राप्त होतें. पण ( त्यात आढळणारा ) विसर्ग तर मराठीत नसल्यासारखाच आहे. करिता तो मराठीत टिकणें शक्य नाही;

तो लोपला पाहिजे. पण तो लोपताना मागील स्वरास दीर्घत्व देणार. स्वर्+राज्य यातील र् लोपताना तो मागील स्वरास दीर्घत्व देतो, व तेथें स्वाराज्य असें रूप बनतें संस्कृतात असा नियमच आहे की, ढ् र् ही व्यंजनें लोपल्यास, ती यथासंभव मागील स्वरास दीर्घ करितात. मराठीतही सर्प-चें साप, यासारख्या उदाहरणात हीच प्रवृत्ति आढळते. तीच येथें विसर्गास लाविल्यास-विसर्ग झाला तरी व्यजनच आहे-कविः--चे कवी मराठी रूप प्राप्त होतें, याच विचारसरणीने भानू धेनू अशी दीर्घान्त रूपें मराठीत योग्य ठरतात.

५ अन्त्य इ-वर्णाविषयी थोडासा **आनुषंगिक विचार**-समसन ( = समासरचना ) व विभजन (= विभक्तिग्रहण) या दृष्टीनी मराठीत इ-वर्णान्त पु नामें त्रिविध आढळतात,-( पति ) पती, ( धनिन् ) धनी, व तेली. पैकी तेली-चे मूलरूप दीर्घान्त व अग तेल्या असें होतें, व तो शब्द आपण नित्य तेली असा दीर्घान्त उच्चारितो व लिहितोही. पति व धनिन् अशी मूळची रूपें असून पती व धन्या अशी त्याची अगे बनतात चालण्यात धनिन्-चे तेली-शी, तर समासगत पूर्वपद होताना पति-शी साम्य आहे साराश-हे तीन प्रकारचे शब्द मराठीत एकमेकाहून एकदरीत भिन्नपणें वागतात तेल्या,धन्या,पती अशी त्याची अंगें बनतात तेली, धनी, पती अशी मूळरूपे दीर्घान्त मानिली तरी, समासात पूर्वपदस्थानी योजिताना, त्यातील भेद दृष्टीसमोर ठेविला पाहिजे ' मोरोपत हा प्रख्यात कवी होऊन गेला ' अशा वाक्यात अर्थातच कवी असें दीर्घान्त रूप लिहावें, मग त्यातील मूळरूप कोणी दीर्घान्त मानो वा ऱ्हस्वान्त मानो. मराठीत इ-वर्णान्त पु०-नामाची रूपें अशी त्रिविध प्राप्त होतात—

| समासपूर्वपद | प्रथमान्त | विभक्ति-अग ( = सामान्यरूप ) |
|---|---|---|
| **कवि**-श्रेष्ठ | कवी | कवी (-नें ) |
| **धनि**-वर | धनी | धन्या (-नें ) |
| **तेली**-ताबोळी | तेली | तेल्या (-नें ) |

यातील ( क ) कवि-बरोबर **हत्ती**, शेटजी ( इत्यादि जी -प्रत्ययात शब्द ), केसरिन्, शशिन्, ऋषि, मुनि, पति, इत्यादि शब्द, व (ख) **धनिन्-बरोबर शास्त्रिन्**, रथिन्, वेदान्तिन्, संन्यासिन्, रत्नपारखी, सारथि, हे शब्द सवर्गीय होतात. साराश, मराठीत **मूळचेच** ( जसें गांधी, **हत्ती**, तेली ) किंवा **इन्-प्रत्य**

यान्तापासून आलेले दीर्घ-ईकारान्त ( जसे-शाखिन्, स्वामिन् ) शब्द चाल- ण्यात एकविध नाहीत असाच काहीसा प्रकार स्त्रीलिंगातही आढळतो.

६ **शब्दजात्यंतराचे साम्य**-यु-वर्णान्त अव्ययामध्यें **आणि, तथापि** व **परंतु** ही तीनच अव्यये, मला वाटतें, ह्रस्वान्त आहेत, बाकी सर्व अर्थात् दीर्घान्त, जसें-आधी, कधी, खाली, मुळी, तर्हि या ऱ्हस्वान्ताचा तद्भव 'तरी,' लघुचा हलू, कर्तुम्-चा करू, असा दीर्घान्त बनतो.

अशा रीतीने मराठी तद्भव अव्ययात मूळ ऱ्हस्व यु-वर्णाबद्दल दीर्घस्वर प्राप्त होतो ( यु--वर्णान्त नामा-सर्वनामा-मध्येंही हा प्रकार अगदीच अपरिचित आहे असे नाही, अश्रु--चा तद्भव असू असा दीर्घान्त होतो **गडी, किती** यातील दीर्घस्वर ऱ्हस्वाचेच जागी प्रवृत्त झाला आहे )

७ **मराठीचें उच्चाराचें धोरण**—मधु, मधुनी, मधूनि, पठति, पठतः, पठन्ति; इत्यादि अनेक ठिकाणी संस्कृतात ऱ्हस्वान्त पदें आढळतात ती ऱ्हस्वान्त उच्चारावयाची म्हणजे जिभेस एक प्रकारचा झटकाच द्यावा लागतो. मधु इतका उच्चार झाल्याबरोबर जिभेच नियमन करून तिला अत्याचे दीर्घ उच्चारापासून निवृत्त करावें लागतें हा एक प्रकारचा खटका किंवा खड काही संस्कृत शब्दाचे उच्चारणात आढळतो, तसा मराठीत नाही. ' रघू नावाचा राजा होऊन गेला, ' अशा वाक्यात रघु--मधील उकार उच्चारून झाल्याबरो- बर आपण जीभ एकदम थाबवीत नाही, तिला तिचे कलाप्रमाणें उकार दीर्घ उच्चारूं देतों, ज्यावरून मराठी भाषा खटकी किंवा **खंडनादी** नसून, अनु- नादी किंवा दंडनादी ठरते ती शब्दाचा नाद एकदम थाबवीत नाही, तर तो ( जिभेचे सुखाकरिता ) काही वेळ चालू देते ही प्रवृत्ति लक्ष्यात घेतली म्हणजे ' राम वनात गेला व सीताही ' अशा वाक्यात सीता--पुढील अव्यया तील स्वर ऱ्हस्व उच्चारण्याचें कोणीच मनातही आणणार नाही

८. **अस्थानीं आग्रह**—संस्कृतातून मराठीत येताना कटुकी व गोक्षुर-- या शब्दाची रूपें क्रमानें कुटकी व गोखरू होण्यात **स्वरविपर्यय, गौडचें** गोड होण्यात **स्वरविकृति** व इयत्ताचें यत्ता होताना **स्वरलोप** होतो. इतक्या गोष्टी स्वरासंबंधानें खपतात. मग केवळ अत्य स्वराचें दीर्घत्वच का खपूं नये ? पुट--चें पूड, हिम--चें हीव, भूशिरस्--चें भुशीर होण्यात उपान्तातही दीर्घीभवन खपतें, मग अंतांतच का खपूं नये ? या प्रश्नास समाधानकारक उत्तर शक्य

दिसत नाही. केवळ अधपरंपरा हेंच कारण येथें दिसून येईल. तेव्हा अत्य यु-वर्णाचे दीर्घत्वास प्रतिबध करणें म्हणजे निव्वळ अवास्तव आग्रह म्हणजेच दुराग्रह होय

१ **प्रस्तुत संबंधांतील तीन मतें—**

| | मूळरूप | प्रथमा | विभक्ति–अग |
|---|---|---|---|
| (१) | कवि | कवि | कवी |
| (२) | कवि | कवी | कवी |
| (३) | कवी | कवी | कवी |

अशी तीन मते येथे संभवतात. यातील मध्यगत म्हणजे दुसरे मत युक्त भासतें. त्याप्रमाणें मूळरूप समासासाठी म्हणून कोशात ऱ्हस्वान्त वापरावें, व प्रथमान्तरूप उच्चारानुरूप दीर्घान्त करावें. अग तर सर्वच मताप्रमाणें दीर्घान्त आहेच

**उपसंहार**—अशा रीतीनें मराठी मति--चें मती, भानु--चें भानू करणें (किंवा ऱ्हस्वान्ताचा दीर्घ करणें) कसे योग्य आहे हें पटवून देण्यास येथवर सांगितलेली कारणें पर्याप्त आहेत असें मला वाटते तीच थोडक्यात अशी—(१) **मराठी भाषेची प्रवृत्ति**, जिचे योगानें (क) दीर्घान्तच शब्द प्रशस्त ठरतात, जसें—चालू, काही, भारी, नाही, इ०, किंवा (ख) अन्त्य स्वर ह्रस्व न राहता, त्याचे ठिकाणी केवळ अकार येतो, जसे–गत, रीत, मध, तन, इ० (२) संस्कृतातही अंत्य इकारास दीर्घत्व द्यावयाची सवलत, जसे- अंगुलि–ली, वीचि–वीची इ० (३) जसें धनिन्–चे प्रथमान्त रूप त्याच्या तद्भवाचा प्रभव बनतें, तसेंच मति–चें मतिः हें रूप घेतल्यास, मराठी रूप मती असें दीर्घान्तच प्राप्त होतें. (४) तरी, हळू इ० अनेक अव्ययें अत्य ऱ्हस्वाचे जागी दीर्घ योजितात. (५) कति–चे किती, दधि–चे दही, अश्रु–चें असू, वेणु–चे वेळू, गडि-चे गडी यातील दीर्घीकरणाची सर्वसमत वहिवाट सार्वत्रिक केल्यास तद्भवात येणारी एकविधता, (६) पदाचे अत्य स्वर दीर्घ उच्चारून मराठी शब्दोच्चारास मिळणारें सौकर्य, व शेवटी (७) तद्भव बनताना मूळ स्वराचे विकारापासून तो लोपापर्यंत अनेक प्रकार रूढ असताना, अंत्याचें दीर्घीभवनही क्रमप्राप्तच ठरतें, तसें तें होऊं न दिल्यास प्राप्त होणारा **पक्षपातदोष**–या सर्व गोष्टींचा विचार केल्यास याच सप्तविध कारणास्तव कवि–चें कवी, भानु–चे भानू अशीं **दीर्घान्त** रूपें मराठीत प्रशस्त ठरतात.

---

# १३. केसरी व मराठीचें शुद्धलेखन.

१ **मराठींत शुद्धलेखनाला महत्त्व कां?**—इंग्रजी भाषा अनेक शतकें लेखारूढ आहे, जगाच्या अनेक देशांत चालू आहे, तिच्यांत ग्रंथसंपत्ति प्रतिवर्ष, प्रतिमास, प्रतिदिन, इतकेंच नव्हे तर प्रतिक्षण, वृद्धिंगत होत आहे, कोट्यवधि लोक व्यवहारभाषा म्हणून ती उपयोगींत आहेत, तरी पण तिच्या लेखनाविषयीं निदान चालू शतकांत तरी कांहीं सुधारणा धूर्वहत्वानें सुचविण्यांत आलेल्या दिसत नाहींत. बरें, तिची लेखनपद्धति सर्वांगपरिपूर्ण आहे, तिला शुद्धीची किंवा बदलाची अथवा अन्यथा-भावाची अपेक्षाच नाहीं असे नाहीं But चा उच्चार 'बट्', तर put चा उच्चार 'पुट्' कां करावा हें शास्त्र सांगू शकत नाहीं, व या व्यवस्थेंत अथवा गैरव्यवस्थेंत सोय तर नाहींच. सारांश, इंग्रजी लेखनपद्धतींत अथवा शब्दांच्या वर्णविन्यासांत (Spelling) शास्त्रीयता किंवा सोय मुळींच नाहीं, म्हणजेच इंग्रजी स्पेलिंग सर्वथा अशास्त्रीय व स्वैर आहे, अर्थात् इंग्रजी भाषा बोलणाऱ्या लोकसंख्येची वृद्धि होण्यास ही मोठीच अडचण आहे तरी पण, ही अडचण निवारण्याचें इंग्रज लोक मुळींच मनांत आणीत नाहींत. यावरून त्यांची पुराणप्रियता, शास्त्रबाह्यता व चढेलपणा हे दोष व्यक्त होतात Night (नाइट्) हा शब्द पूर्वकाळीं 'नक्त' किंवा 'निक्त' असा उच्चारिला जात होता. कालक्रमानें उच्चार बदलला तरी, लेखन पूर्वीचेंच कायम राहिलें. हा उच्चार व लेखन यामधील विसंवाद कोण क्षम्य म्हणेल? हा मोडून टाकला तर, म्हणजे उच्चारानुरूप लेखन केल्यास, इंग्रजी भाषा बोलणाऱ्या नव्या व जुन्या लोकांचीही पुष्कळ सोय होईल पण अशी सोय करण्यास इंग्रज लोक कबूल होत नाहींत. या लोकांशीं आपली तुलना केल्यास काय दिसतें बरें? संस्कृताचे काळीं असलेला **सप्त** हा शब्द पुढें **सत्त** व नंतर **सात** असा उच्चारण्यांत येऊं लागला. तदनुरूप आपण लेखनांतही बदल करीत आलों आहों यांत शास्त्र व सोय अशीं दोन्हीही आपण साधिलीं आहेत. 'उच्चारानुगामी लेख' हें **शास्त्र** आपण पाळितों, व यामुळेंच लिहिणें सोपें जातें, ही **सोय** आपण मिळवितों. असेंच उच्चारानुगामी लेखन संस्कृताच्या काळापासून आंग्लशाहीच आरंभापर्यंत अप्रतिहत चालू होतें. जसा उच्चार तसा लेख. समय—चा उच्चार 'संवय' असा

होऊं लागला तदनुरूप लागलाच लेखनांत बदल झाला मुद्रणकलेच्या विशेष प्रसारापूर्वी हे फरक शिष्टाच्या हातून मुकाट्यानें होत असत. त्यासंबंधी 'भवति न भवति' चा प्रसग बहुधा येत नसावा मुद्रणाच्या प्रसारापासून विशेषेंकरून नियतकालिकाच्या फैलावामुळें, कोणताही फरक केल्यास तो तत्काल सर्वच लोकाचे नजरेपुढे येऊं लागला. यामुळें असा फरक करावा की नाही, ही गोष्ट शिष्टाशिष्ट सर्व वाचकवर्गाच्या मतावर अवलबून राहू लागली यामुळेच लेखनाची पद्धति काय असावी, ती कोणत्या नियमानी बद्ध असावी इत्यादि विचारांना महत्त्व येऊन, सुशिक्षित लोकाच्या लिहिण्यात प्रचारबाहुल्य पाहून तदर्थ नियम केले गेले असे नियम निश्चित झाल्यामुळें लेखकाची पुष्कळ सोय झाली या नियमाचे धोरण, प्रायः उच्चारानुगामी असेंच होते हें आपले धोरण कोणीकडे व पूर्वोक्त इंग्रजाचे कोणीकडे ? आपण लेखनामध्यें वृथापुराणवादित्व अवलंबीत नाही, तसेच उच्चारास लेखनाची लगाम लावून त्यास स्वैर सचारूही देत नाही साराश-**लेखनाची शुद्धता व लोकांची सोय** ही इष्ट मानून आपल्या भाषेच्या शुद्धलेखनाचा विचार आपण आस्थेनें करीत आलो आहों यावरून या विषयाला इंग्रजीत महत्त्व का नाही व मराठीत का आहे, याचा सहज उलगडा होईल

२ **शुद्धलेखनचर्चेचा उपक्रम**—१९०४ साली या आपल्या मुबई इलाख्यात शाळाखात्याकडून एक 'मराठी शुद्धलेखन-समिति' नेमण्यात आली या समितीमध्यें रा. साने, हातवळणे व गोडबोले हे गृहस्थ प्रमुख होते त्यानी मराठीच्या शुद्धलेखनाविषयी पुष्कळ विचार करून आपल्या सयुक्त मताने काही नियम ठरविले व त्यास कालिकातून व स्वतत्र पुस्तकरूपानें प्रसिद्धी दिली त्यानी ठरविलेल्या नियमाचें स्वरूप पाहिल्यास त्याच्या मुळाशी शास्त्र, तर्क व सारासार-विचार हे स्पष्ट दिसतात याच संबधात रा. हातवळणे यानी केसरीतून पत्रद्वारा जनतेपुढें आपली मतें माडिली आहेत ती मतें विचारपूर्वक वाचल्यास सर्वथा समजस अशीच आहेत. रा. हातवळणे याचेप्रमाणें दिवंगत रामभाऊ जोशी यानीही हा विषय केसरीद्वारा लोकाच्या निदर्शनास आणिला आहे. इतर लेखकानीही या विषयाची चर्चा मधूनमधून केसरीतून जनतेपुढें माडिली आहे. अशा रीतीनें शुद्धलेखन या विषयास विशेष प्रोत्साहन, प्रसग आला तेव्हा, केसरीनें १९०४ या वर्षी प्रथम दिलें, व पुढेंही यथाप्रसग वेळोवेळी या विषयाला केसरीनें स्थान दिलें आहे.

३ **सुधारसमितीचें धोरण**—रा. हातवळणे इत्यादि लोकांनी केलेल्या सुधारणाना त्या वेळी बुध्द्या विकृत रूप देऊन नावें ठेवण्याचा खटाटोप करण्यात आल्याचें दिसून येतें. कारण ५–७–१९०४ चे केसरीचे अंकात हातवळणे याचें पत्र प्रसिद्ध झालें आहे, त्यात ते म्हणतात, "प्रतिपक्षीयानी आम्हांवर मिथ्या आरोप करून आमच्या प्रयत्नास हाणून पाडण्याचा प्रयत्न केला आहे मति-सारखे शब्द दीर्घ लिहावे, मती--भ्रश असे समास बनवावे, व पाणी, लोणी असें शब्द अनुस्वारान्त लिहावे, असें म्हणणे प्रतिपक्षीयानी आम्हावर लादिलें आहे. पण हें सर्वस्वी निर्मूल आहे. आम्हीं, मति–सारखे **शब्द** दीर्घात लिहावे, असें म्हणतों, पण तें वाक्यातील **पद** या नात्याने, समासाचें पूर्वपद या नात्यानें नव्हे पाणी, लोणी यासारख्या नपुसकलिंगी शब्दाच्या अती, की ज्याच्या अंताक्षरामध्ये पचम वर्ण आहे त्याच्या अंती, अनुस्वार द्यावा, असें आम्ही मुळीच म्हटलें नाही. एतद्भिन्न मोती, दही इत्यादि शब्दान्तीच आम्ही अनुस्वार ग्राह्य मानितों; व हें संप्रदायशुद्धच आहे." याच पत्रात रा हातवळणे पुढें लिहितात-- "शुद्धलेखनाच्या बाबतीत विद्वानामध्यें चार पक्ष आढळून येतात १ सस्कृताभिमानी, २ मराठीचे पुरस्कर्ते, ३ उच्चारवादी व ४ व्युत्पत्ति, सोय, उच्चार इत्यादींचा विचार करणारे--अर्थात् सारासारवादी या सर्व पक्षाचा यावच्छक्य समन्वय करून आम्ही शुद्धलेखनाचे नियम ठरविले आहेत." हेच नियम रामभाऊ जोशी याचे ( २७-९-०४ च्या केसरीत छापलेल्या ) पत्रात दिले आहेत.

४ **सुधारसमितीचे नियम**—( १ ) नामाचे व विशेषणाचे **अंत्य इ उ** हे स्वर दीर्घ लिहावे असे शब्द समासात पूर्वपद बनल्यास ते ऱ्हस्वच लिहावे. कोशातही ते ऱ्हस्वान्त म्हणूनच द्यावे शब्द वाक्यात आला म्हणजे त्यास पद म्हणतात अव्ययें कोशात व वाक्यात एकाच रूपानें येतात, अर्थात् इतर शब्दाप्रमाणे जर ती वाक्यात दीर्घ लिहिणे तर ती कोशातही तशीच लिहावी. 'आणि, तथापि, परतु' इत्यादि थोडेसे अपवाद ऱ्हस्वान्त लिहिणें प्राप्त आहे (२) अकारान्त नामाचे व विशेषणाचे उपान्त स्वर दीर्घ लिहावे, जसें—वीष, गूण, हीत, याच शब्दाचें सामान्यरूप होताना हे उपान्त स्वर ऱ्हस्व होतीलच, जसें—**विषानें, गुणामुळें**, इत्यादि. या नियमास इंद्र, कुंड, विप्र, इ० अपवाद समजावे. **या** अपवादभूत शब्दात अन्ताक्षरात जोडव्यंजनें आहेत हें विद्वानाचे लक्ष्यांत

येईलच. ( ३ ) व्यजनान्त भासणारे शब्द अकारान्त लिहावे; जसें—विद्वान्, क्वचित्, इ० ( ४ ) ज्या अनुनासिकास व्युत्पत्तीचा आधार नाही ते काढून टाकावे, जसें—धावतो, शेपूट, लाकूड, कीव, कोपर, ऊस, सवय, भोकर्णे, इ० शब्दातील आद्याक्षरगत. या सबधात जोशी म्हणतात--“ येथील पहिल्या नियमाविषयी आद्य व्याकरणकार दादोबा यानी काहीच विचार केला नाही, व तिसऱ्या नियमास चिपळूणकर याची संमति आहे.” १८-८-०४ चे पत्रात रा जोशी लिहितात “ चिपळूणकराच्या निबधात व गोडबोले याचे व्याकरणात अंत्यस्वर दीर्घ लिहिणें प्रशस्त मानिले आहे तसेंच, प्रस्तुत नियमापैकी पहिले तीन नियम रा. भाडारकर यास पसत आहेत. शेवटल्या अनुनासिकाचे नियमाविषयी ते काहीच बोलत नाहीत ”

**५ सुधारसमितीचे नियम व केसरीनें केलेलें कार्य**—वरील नियमाविषयी केसरीने क्रमाने चार अग्रलेख लिहिले हे लेख १२-७-०४ च्या अकापासून २-८-०४ च्या अकापर्यत लागोपाठ आलेले आहेत पैकी पहिल्या अंकामध्यें हातवळणे इत्यादि तीन समितिघटकास सहज जाता-जाता मुनित्रय म्हटले आहे या उल्लेखावरून यान्याविषयी केसरीचें मत आरभी अनुकूल नव्हते, असे दिसते १९ तारखेचा, दुसरा अक गहाळ झाला आहे २६ तारखेच्या या विषयाच्या तिसऱ्या अकात,अधिक माहिती मिळाल्यामुळे,केसरीची दृष्टि निवळलेली दिसते पहिल्या अकातील लेख लिहिला तत्पूर्वी, डॉ. भालचद्र, विनायक कोडदेव ओक इ० गृहस्थानी सरकारी समितीच्याविरुद्ध सभा भरविली होती व त्या सभेतील कामाचे अनुवृत्त ( Report ) केसरीकडे आले होते. या अनुवृत्तात सरकारी समिति शुद्धलेखनामध्ये आपल्या अधिकाराचे जोरावर अवास्तव खटपट करीत आहे, ससकृत शब्दाचे मराठीतील लेखन भ्रष्ट करीत आहे, भलभलत्या ठिकाणी आजपर्यतची रूढि मोडून पाणी, लोणी याच्या अतासारख्या स्वरावर अनुस्वार देत आहे इ० सर्वथा निर्मूल असे आक्षेप घेण्यात आलेले आहेत. हे आक्षेप समूल मानून केसरीनें आपल्या भेदक लेखणीनें समिति-घटकास मुनित्रय या शेलक्या उपपदाने हास्यास्पद केलें पुढें रा. हातवळणे याच्या पत्रानें, व अवातर मार्गानें, माहिती मिळून समितीची विचारपद्धति योग्य आहे, असें दिसून येताच समिति दोषार्ह नाही, असे चक्क प्रशस्तिपत्र (Certificate) केसरीनें त्यास दिलें आहे. २-८-०४ च्या, चवथ्या अकात

समितीच्या नियमास उचलून धरले आहे. (१) 'तत्सम' ऱ्हस्व इ--उ--कारान्त शब्द **कोशांत** ऱ्हस्व लिहावे व **वाक्यांत** पद या नात्यानें दीर्घांत लिहावे, असें विशेष प्रामुख्यानें सांगितलें आहे."अशा रीतीनें पदाचे अंत दीर्घ स्वीकारल्यानें त्यामध्यें अव्ययेंही समाविष्ट असल्यानें, त्याचेही अत वाक्यामध्यें आपो-आपच दीर्घ ठरतात. आता अव्यये ही कोशातल्याच रूपाने वाक्यात प्रयुक्त होत असल्यामुळें वाक्यात जर ती दीर्घांत लिहावी तर कोशातही तशीच लिहावी, हें उघडच ठरते अर्थात् या नियमास 'आणि, तथापि, परंतु' इ० परिमित अपवाद मानणें प्राप्त आहे सस्कृत इ-उ-कारात शब्दाचें रूप आपण बदलीत नाहीच असें नाही गति-गत, रीति-रीत, जाति–जात अशा प्रकारें इकाराचे स्थानी अकार योजितों वस्तूचें रूप वस्त असें करितों 'तन-मन-धने करून' या प्रयोगात तनू-चे तन असे रूप आपण योजितो असे स्वरातर करुन हे शब्द आपण शुद्ध मराठी बनवितोच. या मराठीकरणामध्ये स्वरातरत्व (इ-उ-चें स्थानी अकार येणे) जर खपतें, तर स्वरदीर्घत्व का खपू नये ? शिवाय हेंही दीर्घत्व सार्वत्रिक करावें, असाही आम्ही आग्रह धरीत नाही मति--भ्रश अशा ठिकाणी समासात शुद्ध ऱ्हस्वान्त रूप लाभावे म्हणून, हे शब्द कोशात ऱ्हस्वान्त द्यावे, ही सवलत आम्ही ठेवीतच आहों शिवाय ऱ्हस्वत्वाचा आग्रह धरणाऱ्या लोकानाही मतीनें, धेनूला, भानूचा, इ० ठिकाणी म्हणजे **सामान्य रूपाच्या अतीं** हे स्वर दीर्घ करणें मान्य आहेच" अशा प्रतिपादनाने समितीची कामगिरी केसरीनें प्रायः पसत केली आहे काही थोड्या ठिकाणी विसवादही दाखविला आहे (२) घर, मग, फळ, इ० शब्दाचा उपान्त अ जर दीर्घ लिहू नये हें कबूल, तर विष, गुण इ० शब्दाचे उपान्त इ-उ हे तरी दीर्घ का लिहावे ? अ–इ–उ या तिन्ही स्वराना सारखेंच वागवावें शिवाय, केसरी म्हणतो,–एकट्या उच्चाराचे जोरावर संस्कृत शब्दाची रूपे पालटणें योग्य नाही केसरी पुढें म्हणतो, (३) व्यजनान्त शब्द अकारान्त लिहावे हा नियम सर्वच शब्दास एकदम लावू नये कारण, मराठी भाषा वाढती आहे, तेव्हा तिच्यातील नियम सर्वस्वी निरपवाद न करिता त्यात अपवादास जागा ठेवावी (४) अनुस्वाराचे बाबतीत अग्रलेखात म्हटलें आहे–" जे अनुनासिक केवळ प्रातविशिष्ट असतील ते गाळावे प्रातभेदाने जे वैकल्पिक असतील ते, अर्थभेदास उपयुक्त किंवा व्युत्पत्तीनें आधारित असतील तेच, अवश्य ठवावे, पण ज्या ठिकाणी आज आपण अनुनासिक देत नाही, तेथें व्युत्पत्तीला स्मरून नवीन प्रवृत्त करण्याचें

कारण नाही, उदा० केंस हा शब्द कोंकणात अनुनासिकाने सहित, तर देशांत रहित, उच्चारण्यात येतो हा अनुनासिक अर्थभेदास जरूर नाही. ( मग प्लेगची केस इ० ठिकाणच्या भिन्नार्थक शब्दाचा विचार केल्यास गोष्ट निराळी ) हा अनुनासिक मूल संस्कृत केश या शब्दातही नाही करिता मराठीत केस असें अनुनासिकहीन रूप घेणें प्राप्त आहे वाटणें हा शब्द प्रांतभेदानें अनुनासिकानें सहित व रहित असतो या अनुनासिकानें '( मनाला ) वाटणे ' व '( भक्ताना प्रसाद ) वाटणे' अशा ठिकाणी क्रियापदांतील भेद व्यक्त केला जातो,म्हणून तो ठेवावा. परंतु ' सांचे जयात सुरसाचे ' यातील **सांचा** हा शब्द **संचय** यावरून आला आहे अर्थात् त्यातील अनुनासिक समूल आहे, म्हणून तो रक्षणीय ठरतो. आता त्रिंशत्–**तीस,**कमला–**का**वीळ इ० ठिकाणी **ती** व **का** या अक्षरावर व्युत्पत्तिदृष्ट्या अनुनासिकाची प्राप्ति होते तरी पण ' नसत्या ठिकाणी अनुनासिक नवीन प्रवृत्त न करणें ' या नियमानुसार हे शब्द निरनुनासिकच लिहावे " अशा प्रकारचें मत केसरीने समितीच्या नियमाबद्दल व्यक्त केले आहे. यातच एक महत्त्वाचा इशारा दिला आहे तो असा— भाषेच्या वाढीस सवड ठेवण्याकरिता कोणत्याही ' सुधारणेची अमलबजावणी तात्कालिक किंवा कडकपणें करू नये. ' हा इशारा किती पोक्तपणाचा व आपलेपणाचा आहे, हें सांगणें नकोच

६ **सुधारणांसंबंधीं केसरीचें सामान्य धोरण**—शाळाखात्यानें भाषेची ओळख करून देणाऱ्या प्राथमिक पुस्तकात वर्णमालेमध्यें अनेक प्रकारची फिरवाफिरव, अर्थात् सद्धेतूनें, सुचिविली. तिच्यावर लिहिताना ४–१०–०४ च्या अग्रलेखास केसरीनें **आमच्या वर्णमालेचा खून** असा मथळा घातला आहे. यात सरकारी धोरणाच्याविरुद्ध केसरीचे धोरण स्पष्ट दिसतें. त्याचे मुळाशीं, वर्णमालेतील फेरफारानी मिळवूं पाहिलेला सोपेपणाचा लाभ हा त्यापासून होणाऱ्या शास्त्रीयता, पारपरीणत्व इत्यादिकाच्या हानीपुढें अगदीच क्षुद्र होय, हेंच मत आहे असो. हा वर्णमालेचा विषय प्रस्तुत नसल्यानें त्यावर जास्त लिहिण्याचे कारण नाही. या लेखावरून आपणास एवढेंच उचलावयाचें की कोणतीही सुधारणा करताना तज्जन्य हित व अहित या दोघाची तुलना करून हित अधिक ठरेल तरच ती सुधारणा ग्राह्य, असें केसरीचें मत आहे. याच अग्र

लेखात पुढें म्हटलें आहे की,–नव्हे–सरकारास एकप्रकारें आह्वानच दिले आहे की, शाळाखात्याची व्यवस्था लोक मानतीलच असें नाही भाषेची वाढ होणें ती लोकमत, युक्ति व विद्वत्ता यांच्याच जोरावर झाली पाहिजे, सरकारच्या जोरावर होऊन उपयोगी नाही वर्णमालेतील योजिलेल्या फेरफाराविरुद्ध लोकांनी सरकारात अर्ज पाठवून तद्विषयक आपली नापसती स्पष्टपणें कळवावी, असेंही केसरीनें लोकास बजाविलें आहे येथील सरकारी धोरणावर टीका करताना, आपलें उपहासाचें शस्त्र चालविण्यास केसरी विसरला नाही तो लिहितो, 'मुलास अगोदर **ग** शिकवावा, नतर **म,** पुढे **भ.** त्याच्यापुढे काय ? **र, ड.** आणि अशा रीतीनें पुढें काय होणार ? **ढ** '

याच सबधात तत्कालीन विद्याधिकरणाधिपति प्रायरसाहेब यांनी १९०७ या वर्षी दिलेला अभिप्राय केसरीनें सादर छापिला आहे यावरून इष्ट ती सुधारणा सरकारनेंही केल्यास केसरी तिचे अभिनदन करितो, वृथा पक्षाभिमानानें तिचा त्याग करीत नाही, हें उघड आहे. प्रस्तुत अभिप्राय १४।४।१४ च्या अकात 'मोडी की बालबोध ?' या मथळ्याच्या अग्रलेखात दिला आहे तो अभिप्राय असा–'मोडीत ऱ्हस्वदीर्घाच्या खुणा नाहीत, यामुळे, मोडीचा अर्थ कळला नाही किंवा त्याबद्दल कोणाला शका आली, असे एकही उदाहरण माझ्या आठवणीत नाही करिता ऱ्हस्वदीर्घाभावामुळें मोडी लिपी त्याज्य मानू नये जास्त सोईकरिता तिच्यात वाटल्यास फेरबदल करावे. यासबधात प्रायरसाहेब स्पष्ट म्हणतात–कोणत्याही लिपीत फेरबदल व्हावयाचे ते लोकाचे लोकांनीच केले पाहिजेत ते त्याच्यावर लादणें चुकीचें आहे ' यासबधात जाता–जाता सुचवावेंसे वाटतें की, हल्लीचें व्याकरणासबधी शाळाखात्याचे धोरण सर्वस्वी एकतत्री आहे. अलीकडे त्यानें व्याकरणसुधारणा ( ? ) चालविली आहे पण यासंबधात लोकमताचें सहकार्य मिळविण्याकरिता, या सुधारणाची उघड खुली चर्चा तें करीत नाही, केवळ काही विद्वान् मिळवून योजना ठरविण्यात आली आहे व ती दरोबस्त जनतेवर अधिकारबलानें लादण्यात येत आहे या गोष्टीस उपरि उल्लेखिलेल्या आपल्या धोरणानुसार प्रतिबध करणें केसरीस क्रमप्राप्त आहे. पण महत्तर राजकीय विषयापुढें असल्या वाग्विषयाचा विचार करण्यास केसरीस हल्ली सवड होत नाहीसें दिसतें.

**लोकसंग्रह** हे सुधारणाच्या निर्वहणातील केसरीचे धोरण इतर विषयातही दिसून येतें केसरीच्या पंचाशद्वर्षपूर्तीच्या अंकविशेषात चौदावे पानावर लोकमान्याचें पुढील मत महत्त्वाचें आहे टाइपाच्या सुधारणेच्या बाबतीत ते म्हणतात, "लोकाच्या डोळ्यात न खुपेल अशी आस्तेकदम सुधारणा असावी सर्वच सुधारणेचा मक्ता आपण केव्हांही घेऊ नये. आज थोडी सुधारणा करावी, ती पचनी पडली की उद्या थोडी केव्हाही सुधारणा करण्याला पुढील पिढीस वाव ठेवावा म्हणजे आपल्यावर व लोकावर बोजा न पडता, सर्व काम निमूटपणें होतें ' याच अंकात पान ६२ त ते म्हणतात–' केसरी महाराष्ट्राचा आहे मीं आणिलाही नाही व घेऊनही जाणार नाही ज्याचें अंतःकरण खरोखर जळत असेल, अशा सर्व राष्ट्रभक्तानी तो चालविला पाहिजे आज जे केसरीचे वर्गणीदार व सहायक आहेत, त्यान्च्या विचाराबाहेर केसरीनें जावयाचे नाही. ते सर्व राखलेच पाहिजेत येथे कोणाही योग्य पुरुषास कर्तबगारी दाखविण्यास वाव आहे." या अवतरणामध्यें केसरीची प्रेमळ, लोकसंग्राहक व उदार अशी बुद्धि स्पष्ट दिसून येते

रा. केळकर यानी शुद्धलेखनाच्या बाबतीत पुष्कळच सुधारणा सुचविल्या व त्या अमलात आणण्याचे साहसही करून पाहिलें पण त्यानें, कोणती का होईना, सर्वन्च्या सर्व सुधारणा लोक एकदम पत्करीत नाहीत हे पुन्हा एकदा सिद्ध झालें वास्तविक पाहता रा केळकर याच्या सुधारणा सदोष नाहीतच, उलट सर्वस्वी निर्दोष, इष्ट व आवश्यक आहेत असें म्हटले पाहिजे या सुधारणाची मराठीच्या वाढत्या संसारास अत्यंत जरूर आहे पण सागावयाचें तें इतकेंच की जरूर अमलात यावयास हवी अशा प्रकारचीही सुधारणा स्वीकार्य बनविण्यास ती सगळीन्च्या सगळी लोकापुढें एकदम माडू नये चागली वस्तु सुद्धा एकाच हप्त्यानें लोकान्च्या माथी मारल्यास ती अप्रिय होण्याचा संभव असतो.

७ **शुद्धलेखनासंबंधीं आनुषंगिक विचार**–महाराष्ट्रात पेशवाईचा अंत होऊन गेल्या शतकात आंग्लशाही प्रवृत्त झाली ही प्रवृत्त होण्याबरोबर विविध क्षेत्रात नानाविध फरक झाले. विद्यार्जनान्च्या सबंधात तर मोठीच क्रांति झाली. जुन्या पंतोजीच्या शाळा व पाठशाळा क्रमाने मागें पडून नवीन पद्धतीच्या शाळा प्रसृत होऊं लागल्या. या शाळातून विद्याध्ययन चालून १८५० च्या सुमारास मुंबई-विश्वविद्यालय स्थापन झालें, व मराठीतील नियतकालिकें व पुस्तकें

यातून गद्य लिहिण्यात येऊ लागलें. यावेळी, लेखक बहुधा उच्च वर्णातील असत, कारण त्याच्यामध्येच विद्याप्रसार झाला होता. इतर वर्ण प्रायः आशिक्षितच होते या गद्यलेखकाच्या प्रवृत्तीबरोबरच एक विशिष्ट प्रकारचे लेखन, अर्थात् बहुमतानें, मराठीत प्रवृत्त झालें. हें एकदम प्रवृत्त झाले, असें कोणी समजू नये भिन्न-भिन्न लेखक आपल्या मतानुसार लेखन करीत असत. त्या सर्वाचा परस्परावर आघात-प्रत्याघात होऊन **शक्ततरातिजीवन** (The survival of the fittest) या न्यायानें एक विशिष्ट नियम-समुच्चय रूढ झाला या समुच्चयास अनुसरून सरासरी १९०० वर्षापर्यंत लेखन चालू होतें, म्हणजे लेखनपद्धति १८५० पासून ५० वर्षेपर्यंत काही विशिष्ट शुद्धलेखन--नियमानी नियमित होती. काळाच्या ओघाबरोबर मागसलेले वर्णही विद्यार्जन करू लागले अर्थात् त्याची बुद्धिविषयक कुवत सापेक्षतेनें कमी असल्याने, त्यास पूर्वीचे शुद्धलेखनाचे नियम वारवार अडू लागले हे नियम सुशिक्षित वर्गानें केले होते, व ते पाळिले हातेही त्यानेंच. ते त्याला कठिण वाटण्याचे कारण नव्हते पूर्वी, मराठीची शिक्षित जनता थोडी अर्थात् लहान होती, ती आता मोठी झाली उच्च वर्णाबरोबर खालचे वर्णही लेखन करू लागले लहानपणचा कपडा मोठेपणी अडू लागतो, त्याप्रमाणें अल्पजनतेचे नियम मोठ्या जनतेच्या अंगास दाटू लागले तेव्हा हे नियम शिथिल करण्याकरिता तीव्र इच्छा जनतेत उत्पन्न झाली याच इच्छेचे फळ म्हणजे ( सरकारनें केलेली ) शासनिक सुधारसमितीची योजना व तिनें केलेली शुद्धलेखन-नियमावली हें होय १८५० पासून १९०० पर्यंत एक नियमावली चालली, तशीच ही दुसरी नियमावली १९०० ते १९२५ पर्यंत चालली या अवधीत **मूळ**-महाराष्ट्राप्रमाणे **शाखा**-महाराष्ट्रातही मराठीची जोपासना शाळा, नियतकालिकें, कोश, इत्यादि रूपाने प्रवृत्त झाली, व अलीकडे मराठीच्या या नवीन उपप्रातातील लोकाची अशी मागणी चालू आहे की शुद्धलेखनाचे नियम अधिक सोपे अर्थात् सग्राहक करावे ही मागणी मराठीच्या क्षेत्रविस्ताराची गमक असल्याने सर्वथा अभिनदनीय आहे. तिची पूर्तता केंद्रस्थ विद्वानानी यावच्छक्य केली पाहिजे, म्हणजे सुधारणा सशास्त्र व नियमित अशी होईल, अन्यथा ती अशास्त्रीय प्रवाहानी स्वैर वाहू लागेल हें उघड आहे. आपल्या कुटुबाचा विस्तार व्हावा व मुलानी, नातवानी अधिकाधिक क्रीडागणें, माड्या, जिने, गच्चा, इत्यादि सुखसोई कर्त्या पुरुषापाशी मागाव्या, हें केव्हाही इष्टच आहे लकडीपुलावरची रहदारी वाढून जनतेला तो पूल अरुद

वाटल्यानें तिच्या मागणीप्रमाणें मोय करण्याकरिता तो रुद् केलाच की नाही ? अशाच रीतीनें शिकणाऱ्या वाढत्या जनसंख्येबरोबर तिच्या शक्तीस झेपतील अशाच बेताची ढिली नियमबधनें ठेवावी पूर्वीचे नियम जनतेस जड जात असल्यास ते सोपे करणे प्राप्त आहे, मात्र हें काम विद्वानानीच केलें पाहिजे कपडा ढिला करून घ्यावयाचा झाला तरी तो कुशल शिप्याकडूनच घ्यावा लागतो अशा प्रकारची मागणी वऱ्हाड, गोवे, इत्यादि मराठीच्या उप-प्रातातून अलीकडे जोरानें होऊ लागली आहे. या मागणीची यथाशास्त्र पूर्तता करण्यासाठीच मराठी साहित्यसभेने अलीकड ४ वर्षे गटपट चालविली आहे. साराश, शुद्धलेखनात फेरफार हे अभ्यासकाच्या सख्येच्या वाढीबरोबर अपरिहार्यच आहेत, व असे फेरफार शास्त्रानुसार करणे हें विद्वानाचें कर्तव्य आहे या शुद्धलेखनासबधात यथापूर्वोक्त काळाचे असे भाग पडतात ( १ ) **अग्रवर्णीय पर्व** १८५०–१९०० या पर्वात बहुधा पाढरपेशे लोकच लेखन करीत असत. ( २ ) **अनुवर्णीय पर्व** १९००–१९२५ या पर्वात खालच्या वर्णाचे लोकही विद्यार्जन करू लागले ( ३ ) **उपप्रांतीय पर्व** १९२५ पासून चालू या पर्वात मराठीच्या उपप्रातात म्हणजे इदूर, मध्यप्रात, गोवें इ० भागात विद्याप्रसार अधिक होऊन मराठी लेखनाची आवड व मुख्य महाराष्ट्रा-तील विद्वानाशी स्पर्धेची सात्त्विक ईर्ष्या उत्पन्न झाली आहे या लोकाचाही, आपले धाकटे भाऊ म्हणून केंद्रीय विद्वानानी थोरपणानें आदर करणें प्राप्त आहे असे केल्यानें केंद्रीय विद्वानास सहचराच्या सख्यावृद्धीचा लाभ होइल. या लाभाचे उतराई होण्यास, विद्वानानी उपप्रातीय लोकाच्या मार्गातील अड-चणी कमी करण्याकरिता, लेखनबधनें ढिली करणे प्राप्त आहे अशा रीतीनें सिद्ध होते की खोलीने व विस्ताराने **वाढणाऱ्या भाषेचे शुद्धलेखन तिच्या वाढीबरोबर वेळोवेळीं अधिकाधिक सुकर झालेंच पाहिजे** तेव्हा ऱ्हस्व–दीर्घाचा लढा लागल्यास, दीर्घ स्वर सुलभोच्चार वाटत असल्यानें, तोच अखेर विजयी होणार हे उघड आहे अशाच रीतीनें अननुनासिक स्वर अनुनासिकावर मात करणार हेंही निश्चित मग जी गोष्ट अवश्य होणारच, तिला आपण होऊन समति देऊन शिष्टानी आपला बोज राखावा, की तीस संमति न देता आपल्या अनुज्ञेविरुद्ध ती घडलेली पाहून नुसतें जळफळत बसावें ? साराश, शुद्धलेखनाचें धोरण सर्वथा सग्राहक असावें, परिवर्जक असू नये

८ **संशोधन**—( १ ) अनुवाक ५ मध्ये ( अभ्यास-पर्यायभूत ) **संवय** व **भोंकणें** यातील प्रथमाक्षरावरील अनुनासिक निर्मूल असल्याचें म्हटलें आहे. पण तो तसा नाहीं वहिवाट, सम्प्रदाय, एतदर्थक **समय** हा शब्द संस्कृतात आहे **वहिवाट** या अर्थावरून **अभ्यास** हा अर्थ अत्यंत सुखसाध्य आहे. **संवय** हें रूपही समय याचे सहज होण्यासारखे आहे. अशा रीतीनें संवय हा शब्द अर्थतः व रूपत. समय-वरून साध्य असल्यामुळें, त्यातील अनुनासिक समूलच दिसतो ढक्का-डका, उच्च-उच, भित्ति-भित, पिप्पल-पिंपळ, युद्ध-झुज, इत्यादि शब्दयुग्मावरून द्वि (-राबृ-) त्त व्यजनामुळें मराठीत अनुनासिक येतो, असें दिसतें एतदनुसार **बुक्क**-भुकणें यावरून **भोंकणें** हे रूप सिद्ध होत असल्याने, यातीलही अनुनासिक व्युत्पन्नच ठरतो ( २ ) अनुवाक ६ मध्ये अ-वर्णाशी इ-उ-वर्णाचे साम्य सागितलें आहे पण हें साम्य भ्रममूलक आहे विहीण-विहिणीस, वरात-वरातीत, या शब्दयुग्मात सामान्यरूपाच्या उपान्तस्थानी ( दीर्घ ) ईकाराचे जागी इ आला आहे, पण आकाराचे स्थानीं अ आला नाही. यावरून उघड ठरतें की इ-उ-वर्णाच्या ऱ्हस्वदीर्घांत जसा सबध आहे तसा सबध अ-आ याच्यामध्यें नाही अर्थात् अ-ला इ उ-वर्णा-प्रमाणें वागविणें योग्य नाही, हें सिद्ध होतें ( ३ ) याच अनुवाकामध्यें केवळ **उच्चारानुसार लेखन बदलूं नये**, असें सागितलें आहे पण हें वस्तुस्थि-तीस धरून नाही **लेखनांत बदल** होतो तो **उच्चारानुसारच होतो**; मग तो उच्चार व्युत्पत्तीस धरून असो वा सोडून असो. द्वाविंशति याचे **बावीस** या रूपांत व्युत्पत्तिदृष्ट्या अनुनासिक प्राप्त होतो, शिवाय असा अनुनासिक ‘ विहिरीस ’ एतदर्थक ‘ बावीस ’ या रूपाहून अर्थभेद दर्शविण्या-करिता उपयुक्तच झाला असता. अशा रीतीनें येथें **व्युत्पत्ति व सोय** दोन्ही अनुनासिक मागत आहेत, व एकटा उच्चार तो नाकारीत आहे, व आपण केवळ उच्चारास प्राधान्य देऊन अनुनासिक गाळीत आलों आहों, व पुढेंही २+२० एतदर्थक शब्दरूप **बावीस** असें लिहिण्याची शिफारस कोणी करील हें सभवनीय दिसत नाही.

९ **उपसंहार**—लेखन कोणासाठी ? जो ऐकणारा बोलणारापासून देश-कालानी दूर आहे त्यासाठी. करिता, **बोलणार** जसें बोलतों तसेंच ऐकणारास ऐकू येणे इष्ट असल्यानें, हें बोलणें लेखनानें पोंचविणें झाल्यास तें लेखन याव-च्छक्य उच्चारानुगामीच पाहिजे हाच अभिप्राय असा संक्षेपिता येईल —

यावच्छक्यं लेखनेन भाव्यं वागनुवर्तिना ।
यतः स बोध्यो लेखेन योऽतिवाग् देशकालतः ॥

---

# भाग ४. व्याकरण

## १. गुण व वृद्धि या संज्ञा

रामेश्वर हा शब्द राम + ईश्वर असा बनला आहे यात र + ई = ए झाला आहे म्हणजे ए-चे घटक अ व ई हे ठरतात दोरी ही प्रायः दोन पेडाची बनलेली असते पेड हे दोरीचे घटक **दोरीला गुण अशी संज्ञा** आहे तेव्हा असें दिसते की ए-सारख्या स्वराचे साम्य दोरीशी कल्पून तीस तदर्थक गुण शब्द लावण्यात आला असावा सूर्य + उदय = सूर्योदय, देव + ऋषि = देवर्षि अशा रीतीनें संस्कृतात ए, ओ, अर् यास गुणसंज्ञा देण्यात आली आहे अर्-चे साम्यानें अल् यास हीच संज्ञा प्राप्त झाली आहे आता दोन पेडाचे दोरीची ( अथवा तिच्या जाडीची ) **वृद्धि** तिसऱ्या पेडानें होते अ + ए = ऐ असें होतें दुपेडी दोरीची तिसऱ्या पेडानें ( जाडीत ) वृद्धी होते. तिपेडी दोरी ही दुपेडीची वाढच होय द्विस्वरघटित ए या स्वरामध्ये अ या तिसऱ्या स्वराची भर पडल्यानें, ऐ हा स्वर सिद्ध होतो ए-ला जर साधी दोरी असें म्हटले, तर ऐ-ला वाढलेली दोरी अशी संज्ञा क्रमप्राप्त होते यातील ' वाढलेली ' या कल्पनेला अनुलक्षून ऐ-ला वृद्धि ही संज्ञा लावण्यात आलेली दिसते जल + ओघ = जलौघ ऐ–औ–चे धर्तीवर आर् व आल् यानाही वृद्धि हीच संज्ञा देण्यात आलेली आहे अशा रीतीनें व्याकरणातील संज्ञा गुण ( = दुपेडी दोरी ) व वृद्धि ( = जी जाडीत वाढली आहे अशी दोरी) ए--ओ, ऐ--औ अशा संयुक्त स्वरास क्रमानें लावण्यात आलेल्या दिसतात.

---

## २. य-व-र-ल हा क्रमप्रशस्त दिसतो

१ **आपली वर्णमाला**—आपली वर्णमाला विशिष्ट तत्त्वानुसारें रचिलेली आहे, इंग्रजीसारखी तिची मांडणी स्वैर नाही a b c d e इ० मध्ये पहिला स्वर आहे, तर दुसरें ओष्ठ्य व्यंजन, तिसरें कंठ्य किंवा दन्त्य, चवथें मूर्धन्य, पांचवा स्वर इ०. यात कोणताही क्रम विवक्षित नाही. अशी स्थिति आपल्या वर्णमालेची नाही. वर्ण उच्चारले जाताना जिभेचा स्पर्श

मुखातील भिन्न-भिन्न ठिकाणी होत असतो काही ठिकाणी जिभेचें मूळ लागतें, काही ठिकाणी मध्य, तर काही ठिकाणी अग्र जिभेच्या या निरनिराळ्या भागानी स्पर्शिल्या जाणाऱ्या मुखातील स्थानाचा आरंभ कंठापासून होतो. त्यातील ओठ हे शेवटलें स्थान होय ही क्रमवार स्थानें म्हणजे कंठ, तालु, मर्धन, दात, ओठ याच क्रमास अनुसरून व्यंजनापैकी स्पर्शाची रचना आहे स्पर्श म्हणजे क–पासून म–पर्यंत व्यंजनें क–वर्ग कंठस्थानचा, च-वर्ग तालु-स्थानचा इ० ही स्पर्शाची व्यवस्था स्थानक्रमानुसार असली तरी, स्वराची व्यवस्था तशी नाही. कंठ्य अकारानंतर तालव्य इ-ई प्राप्त आहेत त्यांचेनंतर मूर्धन्य ऋ-ॠ, दन्त्य ऌ व पुढें ओष्ठ्य उ–ऊ. परंतु हा क्रम सोडून उ--ऊ हे इ--ई नंतर घेतले आहेत याचें कारण काय ? इ-ई-चे बरोबरीन उ-ऊ–चा प्रचार, महत्त्व व विकारसादृश्य आहे जसे ऋ-ऌ मध्ये विकारसादृश्य आहे तसेंच इ-उ मध्ये यामुळें इ-उ, ऋ-ऌ अशा जोड्या पडतात या जोड्या अखंडित राखण्याच्या इच्छेनें स्वरव्यवस्थेंत स्वाभाविक स्थानक्रम बदलावा लागला आहे स्पर्श व स्वर याचेनंतर आता अन्तस्थाचा विचार करू

२ **सांनिध्य कीं व्यवहार**[1]—य व र ल हे चार अन्तस्थ किंवा अर्धस्वर. याचे ग्रथन करिताना दोन मार्ग आढळतात एक स्वाभाविक मुखस्थानक्रम, व दुसरा स्वरानुसारी. स्वाभाविक तोच स्पर्शानुसारी क्रम होय स्पर्शास अनुसरावें तर,च ट त प या वर्गाचे अनुरूप अर्धस्वराचा क्रम य र ल व असा लागतो; इ-उ, ऋ-ऌ या स्वराचे अनुरूप यवरल असा क्रम लागणार अशा स्थितीत अर्ध स्वरानी कोणता क्रम स्वीकारावा ? सानिध्य पाहिल्यास स्पर्शाचे, आदेशद्वारा नातें पाहिल्यास स्वराचें, आढळतें स्वरानंतर स्पर्श, स्पर्शानंतर अर्धस्वर, तेव्हा स्पर्श जवळचे पण वारवार अर्धस्वराची, स्वताच्या जागेची देवघेव होणार ती स्वराशी. गाय-गाई, देऊळ–देवळात, इ० ठिकाणी स्वर व अर्धस्वर याचेमध्ये जागेची देवघेव होते तेव्हा येथे सानिध्य व नाते किंवा व्यवहार यामध्ये तेढ उत्पन्न होते. अशा स्थितीत आपण व्यवहारालाच जास्त महत्त्व देतों या महत्त्वास अनुस-रून आपण य र ल व असा क्रम स्वीकारिला पाहिजे

३ **आधारान्वेषण**—या वरील व्यवहाराधिष्ठित क्रमास आधार पाहू जाता। (क) दोन पाठ आढळतात कौमुदीतील (१) 'य र ल वाः अन्तस्थाः' हा भट्टोजी दीक्षिताचा पाठ, व (२) 'हयवरट् लण्' हा माहेश्वर सूत्रातील

पाणिनीचा पाठ पैकी कोणताच आपणास पोषक ठरत नाही (१) य र ल व हा तर उघड विरुद्ध आहे (२) यवरट् लण् अनुकूल दिसला तरी तसा तो मानिता येत नाही कारण या महेश्वरसूत्रातील रचना मुखस्थानाऱ्या स्वाभाविक क्रमास अनुसरून मुळीच नाही ती अष्टाध्यायीत पदोपदी लागणाऱ्या प्रत्याहाराची रचना होईल तितकी कार्यक्षम, सोपी व संक्षिप्त करिता यावी. याच माहेश्वर सूत्रातील वर्णक्रमाचे धोरणास अनुसरून आहे 'इक। यणचि' इत्यादि सूत्रात क्रमवार आदेश व्हावे एतदर्थ ही रचना आहे प्रत्याहार-सूत्र--रचनेत आपला क्रम जरी आदरिलेला दिसला, तरी तसा तो इतरत्र नाही ञम-ङणनम् यात हे ञ म अगोदर घेतले आहेत, ते केवळ ङम् हा प्रत्याहार (ञम-वर्ज) साधावा म्हणून. हीच दृष्टी इतरत्रही सवत्र आढळते तेव्हा तीच ह य व र ट् लण् या ठिकाणी प्रभावी मानिली पाहिजे साराश-माहेश्वर सूत्रातील क्रम आपणास अनुकूल वाटत असला तरी, तो तसा घेता येत नाही त्याचें क्रमतत्त्व अगदीच भिन्न आहे. (ख) वहिवाट पाहता ती य र ल व अशी आहे, तीही आपले क्रमाविरुद्धच आहे साराश-य व र ल या, आपण व्यावहारिक ठरविलेल्या, क्रमास भट्टोजी दीक्षित व वहिवाट हे दोन आधार विरुद्ध आहेत भगवान् पाणिनी उदासीन आहेत, तर सर्वातिशायी व्यवहार-सौकर्य अनुकूल आहे, अर्थात् व्यवहाराला प्राधान्य देऊन आपण य व र ल हाच क्रम स्वीकारणे योग्य दिसते

---

## ३. अनुस्वार, विसर्ग व अनुनासिक यांचीं वर्णमालेंतील स्थानें.

१ **अननुनासिक व अनुनासिक**—दात (तोंडातील) व दात (इंद्रियदमनशील) या दोन शब्दात पौर्वापर्य कसे करावें ? वर्णक्रमदृष्ट्या अगोदर कोण व नतर कोण ? आ हा स्वर दोहोंत आहे, पण एकात तो अनुनासिक आहे, तर दुसऱ्यात अननुनासिक आहे अर्थात् या दोहोचा विचार करिता अननुनासिक स्वर अगोदर, व अनुनासिक नतर, हें उघडच आहे. यावरून असें ठरतें की, (अननुनासिक किंवा) साधा स्वर ज्यात आहे असे शब्द झाल्यानतर अनुनासिक स्वर असलेले शब्द लिहावे. या तत्त्वानुसार क्रम ठरतो तो प्रथम दात (मनोनिग्रही), नतर दात (तोंडातील)

२. **व्यंजनें व अनुस्वार**–अनुस्वार व विसर्ग यास कौमुदीत श ष स-याचे बरोबर गणिलें आहे ती व्यजनें आहेत, हें तर उघडच आहे, कारण स्वराचे साह्याशिवाय त्याचा उच्चारच शक्य नाही स्वतः उच्चारास अक्षम असणें, पराधीनोच्चारता, हें व्यजनाचें लक्षणच आहे करिता अनुस्वार व विसर्ग ही व्यजनें खरी, पण व्यजनात त्याची ठिकाणें कोणती ? याचें कौमुदीतील उत्तर दिलेंच आहे,–तें 'श ष स याचेबरोबर.' व्यवहार-दृष्टीनें यात थोडा फरक करून, श ष स ह ळ याचेनंतर म्हणजे व्यजनामध्ये अगदी शेवटी त्यास स्थाने द्यावी. असें प्राप्त होतें म्हणजे कपाळ, कळवणें, कंगाल, कंस, कःपदार्थ इत्यादि क्रम ठरला

३ **अनुस्वार व परसवर्ण अनुनासिक**—संगम व सङ्गम या शब्दात पहिल्यात अनुस्वार, व दुसऱ्यात परसवर्णानुनासिक मानण्यात व लिहिण्यात आला तरी, या दोहोंचा उच्चार सारखाच होतो, निदान साप्रत तरी अनुस्वार व परसवर्णानुनासिक यात उच्चार-भेद प्रतीत होत नाही. करिता लेखनसुलभ-तेसाठी परसवर्णानुनासिकाचे स्थानी सर्वत्र ( यावच्छक्य ) अनुस्वारच आदरणें योग्य दिसतें असा अनुस्वार आदरिला म्हणजे अनुस्वारयुक्त शब्दाचा क्रम लागणार तो केवळ पुढील व्यजनानुसार हेंही उघड आहे. करिता क यातील अकारापुढें प्रथम क्-ळ् ही व्यजने, नंतर ( व्यजनच असलेला ) अनुस्वार, हें साहजिक दिसतें. तेव्हा क्रम ठरतो तो असा-कच, कट, कपि, कमळ, कर, कळ; कंक, कंठ, कंप, कंस इत्यादि

४. **सारांश**—शब्दाचा क्रम लाविताना पुढील धोरण आदरणीय ठरतें. ( १ ) कादि शब्दाचा विचार करिताना प्रथम क–नें आरंभ पावणारे शब्द पुढील व्यंजनाचे क्रमानें, ( २ ) नंतर कं–असे सानुस्वार क–नें आरंभ पावणारे शब्द पुढील व्यजनाचे क्रमानें, ( ३ ) नंतर कः–ने आरंभ पावणारे शब्द व नंतर ( ४ ) कँ म्हणजे अनुनासिक क–नें आरंभ पावणारे शब्द, अर्थात् पुढील व्यजनाचे क्रमाने ध्यानात ठेवण्याचे तें हें की क, कं, कः, कँ असा क्रम लावावा,–अननुनासिक, सानुस्वार, सविसर्ग व अनुनासिक येथें कँ यातील ँ हें चिन्ह अनुनासिकाचें दर्शक आहे, हें लक्ष्यात येईलच. या सबधात—

'शुद्धश्च सानुस्वारश्च सविसर्गोऽनुनासिकः'

ही पक्ती लक्षणीय आहे.

# ४. पाहिजे-चें व्याकरण.

१ **व्युत्पत्ति**—' पाहिजे ' हें रूप मराठीतील ' पाह ' या धातूचें कर्मणि वर्तमानकाळ, तृ० पु० ए० वचनाचें दिसतें. याची व्युत्पत्ति प्रार्थ् किंवा प्रार्ह् अशा संस्कृत धातूशींही जोडितात. अशा प्रकारें पाह-प्रार्थ्-प्रार्ह् अशा तीन धातूचें कर्मणि-रूप म्हणून निरनिराळ्या लोकाकडून हें मानण्यात येतें पैकी रूपतः विचार करिता याचा क्रम-पाह-प्रार्ह्-प्रार्थ् असा ठरतो अर्थतः विचार करिता, याचा क्रम ठरतो तो प्रार्थ्-पाह-प्रार्ह् असा अशा रीतीनें रूपार्थतः विचार केल्यास प्रार्ह् त्याज्य ठरतो, तर पाह-प्रार्थ् हे तुल्यबल प्रायः वाटतात तरी पण पाहिजे हें रूप पाह-वरून प्रत्यक्षच बनत असल्यानें, म्हणजेच ' पाहिजे ' हें रूप पाह-च्या कर्मणिरूपाशी अभिन्नच असल्यानें, पाह या मराठी धातूपासूनच पाहिजे हें रूप साधणें सापेक्षतया प्रशस्ततर दिसतें त्यात, गुजराथी भाषेत शोध करिता ही व्युत्पत्ति सशयातीतच ठरते गुजराथी ' जो ' धातूचा अर्थ पाहणें ( नेत्रव्यापार ) असा असून जोइ--ये या कर्मणिरूपाचा अर्थ बरोबर मराठीतील पाहिजे--शी समान होतो म्हणजे पाहणें एतदर्थक धातूचे कर्मणि रूपाचा प्रयोग ' अपेक्ष्यते, ' ' जरूरीचा आहे, ' अशा अर्थी होणें, या मराठीतील स्थितीस गुजराथीची पुष्टी मिळते तेव्हा पाहिजे हें रूप मराठी 'पाह' या धातूचे कर्मणि रूप होय, हे सिद्ध होते देख-देखिजे, राह-राहिजे, इत्यादि जुन्या कर्मणिप्रयोगाची उदाहरणे भाषेत क्वचित् आढळतात त्याच्याच धर्तीवर पाहिजे हे रूप बनलेलें आहे

२ **पदसंमर्श**—( अथवा Parsing ) ( क ) मला स्वातंत्र्य पाहिजे. या वाक्यातील पदाचा समर्श कसा करावा ? पाहिजे हें रूप आपण स्वयसिद्ध म्हणूनच मानणार. णें-ता-ऊन-ला-ईल-वा इत्यादि प्रत्ययान्त रूपें ( अर्थाचा विचार करिता ) पाहिजे यातील धातूची बनलेली भाषेंत नाहीत पाहिजे हें एकाकीच रूप भाषेंत आहे त्यात फक्त पुरुषवचनानुरूप फरक होतो, पाहिजेस-पाहिजेत इ० रूपात पुरुषवचनानुरोधें रूपविकार झालेला आढळतो पुरुषवच नाहून बाकीचे धर्म स्थिर आहेत अर्थात् समर्शामध्ये तें सागण्याचें कारण नाही पाहिजे-चा अर्थ ' इष्ट, आवश्यक असणें ' असा केला म्हणजे पाहिजे हें रूप कर्तरि ठरून स्वातंत्र्य इ० प्रथमान्त शब्द कर्ते ठरतात तेव्हा प्रस्तुत वाक्याचा समर्श ठरतो तो असा. **मला** मी प्र. पु सर्वनाम, पु. ए चतुर्थी,

अधिकरण पाहिजे–चें. पाहिजे--ने अपेक्षा, इच्छा, जरूरी इत्यादि धर्म बोधित होतात, या सर्वांचे अधिकरण येथें मी ही व्यक्ति आहे. करिता येथील चतुर्थी अधिकरणार्थी ठरते **स्वातंत्र्य**--स्वातंत्र्य, भाववाचकनाम, न. ए प्र, अर्थ कर्ता पाहिजे--चा. **पाहिजे** स्वयसिद्ध क्रियापद ( अकर्मक, करणरूप, स्वार्थ, वर्तमानकाळ, सामान्यलिंग, कर्तरि ) तृ पु ए, याचा नायक स्वातंत्र्य

( ख ) **मला गेलें पाहिजे** येथे पूर्ववत् मला ही अधिकरणार्थी चतुर्थी आहे. पाहिजे--चा समर्शही पूर्वीप्रमाणेंच गेले हे धातुसाधित विशेषण, नामासारखें प्रयुक्त, ए व प्रथमा, अर्थ कर्ता पाहिजे--चा

**शंका—गेलें हे विशेषण** कसे ? समाधान–मला वृक्ष तोडिले पाहिजेत.–या वाक्यात तोड धातू सकर्मक असल्यानें त्याचें ल–साधित कर्मणि झालें असून वृक्ष–शी सधर्म आहे येथे 'तोडिले' पु ब व का ? उत्तर–वृक्ष हा शब्द पु ब व. आहे म्हणून साराश–येथे तोडिले ल–साधित विशेषण आहे. ल–साधित स्वभावतःच कर्मणि असते तेव्हा सकर्मक धातूत्पन्न असल्यास तें कर्मगामी असणारच धातूस कर्मच नसल्यास, अगतिक होऊन तें कर्तरि किंवा भावे बनतें. येथें गेलें कर्तरि नाही, तसे असतें तर तें पु झाले असतें, कारण त्याचा कर्ता मी ( पु ) आहे तेव्हा न लि असल्यानें ते भावे आहे यामुळेंच असलें अकर्मक–धातुज ल–साधित नित्य न लि एकवचनीच असतें धातुसाधित भावे आहे असें म्हणणें काय, किंवा तें विशेष्याभावीं नामवत्प्रयुक्त आहे असें म्हणणें काय, एकच तात्पर्य--मूळचें विशेषण असल्याने ल--साधित नामाचें कार्य ( जसें कर्ता होणें ) स्वतः न पत्करिता, तें आपल्या विशेष्याकडे देते विशेष्याच्या अभावी मात्र त्यास नामासारखे वागावे लागून कर्ता इ व्हावें लागतें, हा नियम धातुसाधितासंबधी लक्षणीय आहे 'स्वतःच्या जातीस न झेपणारे कार्य, धातुसाधित यावच्छक्य टाळितें ' अशा रीतीनें हें धातुसाधित मूळचें विशेषण असून प्रस्तुत ठिकाणी नामवत् प्रयुक्त होऊन कर्ता बनलें आहे.

४. ( ग ) **मला वृक्ष तोडिले पाहिजेत—मला** पूर्ववत् अधिकरणे चतुर्थी **वृक्ष** कर्ता पाहिजेत--चा **तोडिले** ल-धातुसाधित विधेयाग–विशेषण. याचें विशेष्य वृक्ष ' गेलें पाहिजे ' व ' तोडिले पाहिजेत ' या दोन्ही ठिकाणी अपेक्षित काय आहे, याचा खोल विचार केल्यास, पूर्वत्र जाणें, व उत्तरत्र

तोडणे, हीच उत्तरें येतील 'गेलें पाहिजे'व 'तोडिले पाहिजेत' या दोन्ही ठिकाणी क्रिया नामाने उक्त न होता विशेषणानें उक्त आहत विशेष्य सापडल्यानें तोडिले नें त्यास कर्ता केलें, व स्वतः विशेषण म्हणून राहिले विशेष्याचे अभावी गेले- स स्वताच कर्तृपद स्वीकारावें लागलें, व तदर्थ नामकार्य करावे लागलें. म्हणूनच त्यास नामवत् प्रयुक्त असें आपण म्हटलें आहे

५ (घ) **पाऊस पडला पाहिजे**, मुलाना-मुलानी लवकर **उठलें पाहिजे. पाऊस** कर्ता पाहिजे-चा **पडला** विधेयाग–विशेषण, याचे विशेष्य पाऊस. **मुलांना** चतुर्थी, अधिकरण, पाहिजे-चे **उठले** ल-धातुसाधित, नामवत् प्रयुक्त, पाहिजे–चा कर्ता. **मुलांनीं** तृतीया, उठले-चा कर्ता

६ (ङ) मला आलें पाहिजे,–येथे आलें ( सुठीची प्रकृति ) हे द्रव्यनाम, न लि. ए व. प्रथमा, कर्ता पाहिजे–चा

**सारांश**—अशा रीतीनें आपण पाहिले की (१) पाहिजे हें पाह-चें कर्माणि-रूप आहे, अर्थात काहीसा बदल झाला आहे पाहणें-चा 'अपेक्षा करणें' हा लाक्षणिक अर्थ येथे आढळतो गुजराथी भाषेंतही असाच प्रकार आहे. (२) पाहिजे–बरोबर येणारें ल-धातुसाधित सकर्मकधातुज असल्यास, कर्माणि विशेषण असतें, अन्यथा ते नामवत् प्रयुक्त होतें अगतिक म्हणून नामवत् प्रयुक्त होणारें, हे विशेषण भावे–नाम बनतें, व अशा ठिकाणी न लि ए व हे धर्म तें कधीच सोडीत नाही

---

## ५. व्याकरणांतील एक प्रश्न.

अथवा

### श्रवण करणें यांतील श्रवण-चें व्याकरण

( १ ) **प्रश्नाचे स्वरूप**—मी राम**कथा** काल **श्रवण केली**–यातील 'श्रवण' याचें व्याकरण काय करावें ? या वाक्यात मी कर्ता, व केली हें क्रिया-पद आहे. कर्ता तृतीयान्त आहे, तेव्हा केली हें रूप कर्तरि नाही व तें स्त्रीलिंगी असल्यानें भावेही नाही, हें निश्चित होय अर्थात्, ते कर्माप्रमाणें चालणार. कर्म पाहता 'श्रवण' हें दिसतें प्रश्न–' काय करणें ? ' उत्तर–' श्रवण करणे '. चरें क्रियापदाचे रूप पहावें, तर तें स्त्रीलिंगी आहे, व कर्म–श्रवण हें नपुसक-लिंगी आहे, तेव्हा हें उघड आहे की, येथें क्रियापद श्रवण-प्रमाणें चालत नाही. अर्थात्, रूपदृष्ट्या तरी श्रवण हें कर्म ठरत नाही मग कर्म कोणतें ? केली

याशी लिंगाचे बाबतीत साधर्म्य दाखविणारा कथा हा शब्द येथें आहे, व तो साक्षात् नसला, तरी परंपरेनें **केली** याशी अन्वित आहे यावरून असें ठरतें की, रूपदृष्ट्या कथा हे केली-चे कर्म होय, व व्याकरणशास्त्र प्रायः शब्द**रूप**-प्रधान असल्यानें, कथा हेंच कर्म मान्य करणें प्राप्त आहे, तरी पण येथें असलेला रूप व अर्थ याचा विसंवाद कसा मिटवावा ? श्रवण म्हणते ' मी **अर्थतः कर्म** आहें, ' तर कथा म्हणते ' मी **रूपतः कर्म** आहें. '

( २ ) **संस्कृताचा दाखला**—वरीलसारखा विसंवाद संस्कृतांत मिळाल्यास पाहू 'रामः क्रीडितुं आरभते,'- 'नक्षत्राणि गणयितुं इच्छति. ' या वाक्यांतील ( अर्थतः ) कर्मे क्रीडितुं व गणयितुं ही हेतुवाचकें आहेत काय आरंभितो ? क्रीडितुम् या वाक्याचे प्रयोगान्तर केल्यास अशी रचना सिद्ध होते—रामेण क्रीडितुं आरभ्यते,—नक्षत्राणि गणयितुं इष्यन्ते येथें इष्यंत व आरभ्यते ही रूपें कर्मणि आहेत, हें सिद्धच आहे करितां त्याचें साधर्म्य कर्माशी असले पाहिजे असे धर्म कोणते, की जे क्रियापदाला कर्मापासून मिळतात ? पुरुष व वचन ' इष्यन्ते ' हे रूप नक्षत्राणि याशी पुरुषवचनाचे बाबतीत सधर्म आहे, तेव्हा तेच वाक्यांतील कर्म ठरतें पण हें पूर्वीचे विधानास विरुद्ध आहे कर्तरि प्रयोगावरून आपण गणयितुं हें कर्म ठरविले, पण येथे कर्मणि प्रयोगात पुरुषवचनाचे कसोटीनें ( जी कसोटी प्रत्यक्ष डोळ्याला पटण्यासारखी आहे, ) नक्षत्राणि हे कर्म ठरतें अर्थात् प्रत्यक्ष कसोटीनें खरें ठरलें तेंच खरें कर्म. सारांश, येथें—रामः नक्षत्राणि गणयितुं इच्छति—या कर्तरि वाक्यांतही नक्षत्राणि हेंच कर्म अन्ततः सिद्ध होते

आतां अर्थदृष्ट्या नक्षत्राणि-चें इच्छति शी नातें काय आहे ? इच्छति-चें कर्म गणयितुम्, व त्याचें कर्म नक्षत्राणि, म्हणजे नक्षत्राणि हें कर्माचे कर्म, किंवा शिष्य-प्रशिष्य या शब्दद्वन्द्वाप्रमाणे, **प्रकर्म** होय नक्षत्राणि हें प्रकर्म व क्रियापद इच्छति, ही ' गणयितुं ' या शब्दानें अन्तरित आहेत यावरून नक्षत्राणि यास **सान्तर** कर्म असेंही म्हणता येईल निरंतर किंवा संनिहित कर्म टाकून, इच्छति-ने नक्षत्राणि हें कर्म म्हणून कां बरें घेतलें ? उत्तर-कर्म किंवा कर्ता होणें, हा सामान्यतः सव्ययाचा अधिकार, येथें तर कर्मस्थानीय गणयितुं हें अव्यय, अतः कर्मपद होण्याला अप्रशस्त, तेव्हा, क्रियापदानें त्याला अमान्य करिताच त्यानें आपलें कर्म, बापानें प्रतिनिधी म्हणून लेकास पुढें

करावे त्याप्रमाणे, नक्षत्राणि हें पुढे केलें, इच्छति यानेंही ते पतकरिलें सारांश,
" धातुज अव्ययावर कर्मत्व स्वीकारण्याचा प्रसंग आल्यास, असा प्रसंग तें यावच्छक्य टाळितें "

रामेण क्रीडितु आरभ्यते—या वाक्यात मात्र क्रीडितु हें अकर्मकधातूत्पन्न, अर्थात् कर्महीन असल्यानें, त्यासच प्रथमान्त बनून वाक्यनायक (Subject) व्हावें लागलें आहे. येथें जाता-जाता विद्यार्थ्यांनें लक्ष्यात ठेवावें की, आरभ्यते हें जरी अशा ठिकाणी, अकर्मक हेतुवाचकाशी अन्वित असताना, तृतीय-पुरुष एकवचनी असणार, तरी तें भावेरूप नाही संस्कृतात सकर्मक धातूला भावे प्रयोगच नाही क्रीडितु हें येथें वाक्यनायक आहे, केवळ तें अव्यय असल्यानें नित्य एकवचनीच राहणार कर्तरि प्रयोगात त्याची विभक्ति द्वितीया होती, तर कर्मणि प्रयोगात ती प्रथमा असणार, तृतीया असणार नाही.

असो, कर्म म्हणून कर्मणि प्रयोगात येणारे वाक्यनायकत्व हेतुवाचक टाळतें, म्हणून वर सांगितले तसेच तें कर्ता या नात्याने येणारे वाक्यनायकत्वही यावच्छक्य टाळतें.

**दुर्जनबहुले जगति सतः क्षेमेण जीवितुं सुखम् न अस्ति ।**

**दुर्जनबहुले जगति सतः श्रेयांसि भोक्तुं सुखानि न सन्ति ।**

येथील वाक्यात अर्थतः हेतुवाचकें कर्ते आहेत, अर्थात् ती दोन्ही कर्तृपदत्व टाळण्याचा प्रयत्न करणार, पण त्यातील सकर्मकधातुजासच तें साधलें आहे, अकर्मकोत्पन्नास स्वताच कर्ता बनावे लागलें आहे अस्ति-चा कर्ता जीवितुं, तर सन्ति-चा श्रेयांसि ( सतः = सज्जनास, बहुल = भरलेले )

सारांश, येथें नियम निघतो तो—

**कर्तृता कर्मता वा चेत् स्यात्सकर्मकधातुजे ।**
**प्राप्ताव्ययेऽर्थतः, स्थाप्या तस्य कर्मणि रूपतः ॥**

**अर्थ**—सकर्मकधातूत्पन्न हेतुवाचक अर्थतः कर्ता किंवा कर्म असल्यास हे दोन्ही धर्म वाक्यरचनेंत त्याचे कर्मात प्रविष्ट करावे

( ३ ) हा अर्थावर रूपाच्या कुरघोडीचा दाखला मराठीस लावून पाहता असें दिसतें की, **'मीं** कथा श्रवण केली,' या वाक्यात श्रवण हें अर्थदृष्ट्या कर्म, तर कथा हें रूपदृष्ट्या कर्म व्याकरण हें शास्त्र रूपपर असल्यानें, कथा यासच कर्मत्वाचा मान मिळणार. विशिष्ट नाव देणे तर कथा हें ' सान्तर कर्म ' म्हणावें.

( ४ ) प्रस्तुत वाक्याचा पदसमर्श—**मीं** प्रथम पु वा सर्वनाम, पु एक-**वचन**, तृतीया, कर्ता केली–चा **कथा**–सा नाम, स्त्री एकव, प्रथमा, ( सान्तर ) कर्म केली–चे **श्रवण**–भाववाचक नाम, न लि, ए. व, प्रथमा, **भूतपूर्व**–कर्म केली या क्रियापदाचे

---

## ६ 'हें' या सर्वनामाचा प्रयोग [ खंडनपर ].

१ '**क्षमा हे शूरास भूषण आहे**' या वाक्यात हे चे जागी **ही** ठेवता **येईल** काय? ( १ ) साहजिकपणे बोलू जाता वरील वाक्यात आपण **हें**-च वापरितों ( २ ) मराठी वैयाकरण रा रामभाऊ जोशी याचे म्हणण आहे की, वरील वाक्यात **ही** पाहिजे, कारण, ते म्हणतात, क्षमा या स्त्रीलिंगी नामाबद्दल येणारा शब्द स्त्रीलिंगी पाहिजे

२ **संस्कृताशीं तुलना**—

( क ) **तां** रोहिणी विजानीहि ज्योतिषामत्र मण्डले ।
यस्तन्वि तारकान्यास. शकटाकारमाश्रितः ॥

( ख ) निधाय तक्ष्यते यत्र काष्ठे काष्ठ **स** उद्घन. (अमरकोश)

( ग ) यस्मिन् काष्ठेऽन्यानि स्थापयित्वा तक्ष्यन्ते **तद्** उद्घनः ।
(उद्घनोऽत्याधानम्–या सूत्रावरील दीक्षित-वृत्ति)

( घ ) कर्मणा यमभिप्रैति स सम्प्रदानम् । ( पाणिनि )

या उदाहरणाचा अर्थ—( क ) जो तारकापुज गाडीसारखा आहे **ती** रोहिणी समज ( ख ) ज्या लाकडावर ठेवून लाकूड ताशितात **तो उद्घन** होय. ( ग ) ज्या काष्ठावर ठेवून दुसरी काष्ठे ताशितात **ते** (काष्ठ) उद्घन (पु) होय ( घ ) कर्माचे द्वारा ज्या पुरुषाशी ( कर्ता ) सबद्ध होतो **तो** ( पुरुष ) संप्रदान (न) होय येथें तद् हें सर्वनाम अनुवादक असताना पहिल्या दोन वाक्यात विधेयाशी सधर्म आहे, तर शेवटच्या दोन वाक्यात अनुवाद्याशी सधर्म आहे.

३ आता या **प्रयोगांचे घटनेचा विचार** करू.

'क्षमा हें भूषण आहे'—असें म्हटल्यास 'हे' विधेयप्रधान ठरतें, 'क्षमा ही भूषण आहे',–असें म्हटल्यास 'ही' उद्देश्यप्रधान ठरतें ( प्रस्तुत वाक्यात क्षमा उद्देश्य व भूषण विधेय आहे )

यावरून सहज निकाल लागतो तो असा की, ज्यास प्राधान्य असेल तद्-नुरूप 'हें'-चे रूप ठेवावें

४ **द्विविध प्राधान्य**—( क ) पर्प हा ( पुलिंग ) शब्द एखाद्या मुलाचे वाचनात आला त्याचा बोध न झाल्यानें, त्यानें गुरूस प्रश्न केला—पर्प म्हणजे काय? उत्तर—**पर्प तो** होय की, ज्यावर ( गाड्यावर किंवा पीठावर ) बसून पागळे हिंडतात ( ख ) एका मुलाने पागळ्याला गाडीत बसून हिंडताना पाहिलें त्यानें जिज्ञासेनें गुरूस विचारिलें, ज्या या गाडीत पागळा बसला आहे तास काय म्हणतात? उत्तर—ज्या गाडीत बसून पागळे हिंडतात **ती पर्प** होय सारांश—वाक्यातील उद्देश्याचे किंवा विधेयाचे प्राधान्यानुसार,- हें प्राधान्य पूर्वप्रश्नद्वारा व्यक्त होते,—'हे' चे रूप अवलंबून राहील म्हणूनच अमरसिंह व भट्टोजी दीक्षित याचे उद्घन शब्दाचे व्याख्यात, शब्द तेच असता तद् याचे लिंगात भेद दर्शीस पडतो दीक्षित ( काष्ठ ) उद्देश्य यास प्राधान्य देतात, तर अमरकार उद्घन या विधेयास प्राधान्य देतात

वरील विवेचनावरून पुढील गोष्ट ठरते—प्र० शूराचे भूषण कोणतें? उत्तर—क्षमा **हें** शूराचें भूषण आहे प्र० क्षमा काय आहे? उ० क्षमा **ही** शूराचें भूषण आहे अशा रीतीनें दोन्ही प्रयोग शुद्ध आहेत

५ **प्रासंगिक विचार**—प्रस्तुत वाक्यात 'हे' हें काय आहे? सर्वनाम तर आहेच, पण कसले? दर्शक नव्हे, कारण—कोणती क्षमा?—असा प्रश्नच संभवत नाही. क्षमा एकच, तिच्यात संख्याभेद, किंवा जवळची,दूरची, इत्यादि देशभेद संभवत नाही तेव्हा ती 'हें' यानें दर्शविण्याचे प्रयोजन नाही येथें 'हें' वस्तू दाखवीत नाही, तर नामानें दाखविलेल्या वस्तूबद्दल कार्य करिते, ते दर्शक नसून दर्शित वस्तूचे जागी राहते 'हे भूषण' म्हणजे कोणते? हें काय? तर क्षमा, दुसरें काही नाही लांबची की जवळची? याचें उत्तर 'हें' देत नाही, तर केवळ क्षमा या वस्तूबद्दल प्रतिनिधीचे काम बजावते 'हें' फूल तांबडे आहे ' या ठिकाणी 'हें' चें लक्ष्य पुढे आहे. 'फूल हें वृक्षास शोभा देतें, ' या वाक्यात हे प्रतिगामी ( मागें वळलेले ) आहे

अशा रीतीनें ठरतें की—( १ ) नामोत्तर लागलेंच येणारें 'हे' प्रतिगामी किंवा अनुवादक सर्वनाम आहे, व ( २ ) त्याचें लिंगवचन प्राधान्यानुसार, उद्देश्य किंवा विधेय यापैकी एकाप्रमाणें असते अशा ठिकाणी 'हें' एखादी वस्तू दाखवीत नाही, तर मागील नामानें बोधित वस्तूचा अनुवाद करितें. एवच अशा ठिकाणी 'हें' हें **अनुवादक सर्वनाम** सिद्ध होतें.

---

# ७. अनादि = अ + नादि कीं अन् + आदि ?

## [ खंडनपर ]

( १ ) **शंकास्वरूप**—अनादि, अनीश्वर, अनुष्ण इत्यादि शब्द, अ हें नकारार्थी अव्यय आदि, ईश्वर, उष्ण इत्यादि स्वरादि शब्दास लागून बनले आहेत. येथें रा. पावशे अशी शंका काढितात की येथें अ व पुढील शब्द यामध्यें घुसणारा न् हा कोणाला लावावा ? अ-ला की पुढील शब्दाला ? पण जोंपर्यंत दोहोंपैकी कोणालाही लाविला तरी भाषेंत रूपभेद किंवा अडचण काहीच होत नाही, तोंपर्यंत तो कोणालाही लाविला तरी सारखेच. तरी पण तर्कदृष्ट्या तो कोणाला लावणें उचित आहे, व तें का, याचा विचार खाली करूं

( २ ) **व्याकरणाचें प्रयोजन**—विश्व शब्दाचें ष ब वचन बनविताना तो शब्द व प्रत्यय आम् याचेमध्यें शिरणारा स् हा प्रत्ययालाच चिकटविला पाहिजे, शब्दास नव्हे, एरवी इष्ट रूप ( विश्वेषाम् ) याची सिद्धी होणार नाही अशी एखादी अडचण वरील शब्दांत न् मागील अ-स जोडण्याचे मार्गांत रा पावशे यास दाखविता आली नाही, हें उघड आहे इष्टरूपसिद्धि व अनिष्टरूपनिवारण हे व्याकरणातील रूपप्रयोजन असल्यानें, त्यास बाध येणार नसेल तर, विशिष्ट आगम कोणास झालेला मानावा याबद्दल आग्रह धरण्याचे कारण नाही. आह इत्यादि पाच रूपें जुन्या उपयोगात नसलेल्या अह् या स्वतन्त्र धातूची अवशिष्ट आहेत, असें म्हटलें काय, किंवा ब्रू धातूच्या वैकल्पिक आदेशावरून होतात असें म्हटलें काय, सारखेंच ज्याला जो मार्ग इष्ट वाटेल तो त्याने स्वीकारावा आता या बाबतीत पाणिनीहून भिन्न-मत झाल्यानें, तद्विषयक आदर कमी होतो, अशातील प्रकार मुळीच नाही. साराश, इष्टरूपसिद्धि हेंच अशा बाबतीत प्रमाणभूत तत्त्व मानिलें पाहिजे

( ३ ) **व्यवहारदृष्टी**—अनादि यात आदि हा अवयव सार्थ आहे. त्यास भाषेत स्वतन्त्र अस्तित्व आहे. नादि याचा प्रकार याचे उलट आहे त्यास भाषाशास्त्रातच स्थान आहे, वैयाकरणातच फक्त त्याला अर्थ व किंमत, इतर लोकाना त्याची जाणीवही नाही. अशा स्थितीत अनादि शब्दाचा विग्रह अ + नादि असा मानणें म्हणजे एक अवयव सार्थ असलेला, त्यामही अनर्थक

करण्यासारखें आहे सामान्य व्यवहारात मनुष्य असेंच म्हणेल की आदि हा शब्द अर्थयुक्त आहे, तो तसाच राहू द्या. दुसरा अ हा मूळचाच स्वतोऽर्थशून्य आहे, तोच आणखी अन् या रूपानें तसा राहू द्या आमचा आदि शब्द स्वतोऽर्थवान् आहे तो आम्ही विकृत होऊ देणार नाही करिता आम्ही अन् + आदि असाच पदच्छेद करणार. शिवाय न ( न् + अ ) मधील शिलकी न् अ-मध्येंच मिळणे साहजिक दिसतें.

( ४ ) **शास्त्रदृष्टी**—आता प्रश्न असा की ही साहजिक सरणी भगवान् पाणिनीने का आदरिली नाही ? याचे उत्तर—पाणिनीच हेंच चिकीर्षित होतें की रूपसिद्धि जितकी संक्षिप्त, देता येईल तितकी द्यावी 'अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सव मन्यन्ते वैयाकरणाः'–हें तत्त्व त्याने अंगीकारल्यानें त्याचे कृतीस व्यवहारवादी दृष्टीनें नसता कृत्रिमपणा आला आहे, पण त्यास उपाय नाही. जी दृष्टी एकदा स्वीकारिली तदनुसारच वागणें कोणासही योग्य येथें पाणिनीला निसर्गदृष्टी टाकण्यास लाघवादर कारण झाला असावा ( इन्नन्तः पुंलिङ्गः करिन्–शब्द. इत्यादि–मध्ये ) इन्+अन्त=इन्नन्त, असें रूप इष्ट आहे. हें न्–द्वित्व कोणत्या नियमानें होते ? 'ङमो ह्रस्वादचि ङमुण् नित्यम्,-' या नियमाने मूळच्या न्-ला दुसरा जोडीदार मिळून, द्वित्व प्राप्त होते. हें स्वकृत शास्त्रच पाणिनीच्या आड आले असावे. अ-न्-आदि यातील न् मागील अ-ला जोडला तर अन् सिद्ध होऊन अन्नन्त या धर्तीवर अन्नादि रूप प्रवृत्त होणार, पण तें तर भाषेत अनिष्ट करिता हें अनिष्ट रूप टाळण्याकरिता न् पुढलि स्वरास जोडण्यात आला असावा साराश स्वकृत न्-चे द्वित्वाचा नियम येथे लागू होऊ नये, म्हणूनच पाणिनीला अनादि यातील नकार पुढील स्वरास जोडावा, अशी चमत्कारिक दिसणारी व्यवस्था करावी लागली असावी ही व्यवस्था लावण्यात, तदभावी न्-चे द्वित्वाशिवाय अन्यही काही अनिष्टप्राप्ती होत असल्यास तीही पाणिनीस प्रेरक झाली असावी.

( ५ ) **अन्यभाषांचा दाखला**— संस्कृतात ( नकारार्थी ) अकाराचा पुढील स्वराशी संधि होऊ नये म्हणून मध्यें न् प्रविष्ट होतो असाच काहीसा प्रकार इंग्रजीतही आढळतो A चा उच्चार पुढील स्वरापूर्वी कर काहीसे जड जातें म्हणून a हे article व पुढील स्वर याचेमध्ये n प्रविष्ट होतो. हा n मागील article मध्यें मिळून an असा शब्द तयार होतो a cow,

an ox वगैरे प्रयोगात ही गोष्ट दिसून येते ग्रीक भाषेतही anarchy, apathy इत्यादि शब्दात निषेधक a-चे स्थानी स्वरापूर्वी an असें न्-विशिष्ट रूप आलेलें आढळतें. अशा ठिकाणीही वैयाकरण a चा an होतो असें मानितात, न पुढील शब्दास लावीत नाहीत

( ६ ) **सारांश**–पाणिनीनें सक्षेपदृष्टी अगीकारिली असल्यानें, तिचे विरुद्ध स्वाभाविक दृष्टी आल्यास, ती स्वाभाविक दृष्टी त्यानें बाजूस सारिली आहे, हें योग्यच आहे अशाच कारणामुळें अनीश्वर या सारख्या शब्दात 'न्' पुढील स्वरास लावावा असे पाणिनीनें उपदेशिलें आहे पण तेवढ्यावरून न् पुढील स्वरास लावणें हें, निदान मराठीत तरी, स्वाभाविक व योग्य असें कोणी मानण्याचें कारण नाही. सक्षेपसिद्धीस तें अनुकूल एवढेंच म्हणता येईल. साराश–पाणिनीचे कृतीत स्वाभाविकतेपेक्षा संक्षिप्ततेस किमत अधिक आहे हें लक्ष्यात ठेवून त्याचे कृतीत सर्वत्रच स्वाभाविकपणा पाहण्याचा प्रयत्न करणें अयोग्य होय; ही गोष्ट अभ्यासकानी लक्ष्यात ठेवावी

---

## ८ संस्कृत भाषा व संधीची उपयुक्तता [ खंडनपर ]

१ वरील विषयावर रा ल द. जोशी, वकील, यानी आपल्या पत्रात लेख लिहिला आहे त्याचा विचार येथे करितों त्याची विधानें मुख्यत. अशी—

( क ) सस्कृतातील सधी उच्चारसौकर्याकरिता प्रवृत्त झाले आहेत ( ख ) त्यानी उच्चार कठिनतर होता कामा नये ( ग ) संधीनें लाघव साधिलें पाहिजे. ( घ ) काही सधी उच्चारिता येत नाहीत, व काही तर लिहिताही येत नाहीत. ( ङ ) सस्कृत भाषा बोली असताना काही सधी प्रचारात आले असावे व ( च ) या नैसर्गिक सधीच्या साम्यानें इतर सधिनियम पडितानी तयार केले असावे ( छ ) सध्याचे वाङ्मयातील सधि अनैसर्गिक व कृत्रिम आहेत ( ज ) त्यानी उच्चारसौकर्याची हानि होते व वर्णविस्तारही होतो. ( झ ) सधीमुळे कधी-कधी अर्थविपर्यास होतो ( ञ ) प्रस्तुत सधी बोलताना होणारे नाहीत ( ट ) येथें दर्शित केलेल्या मताना रा नात्यासाहेब केळकर व सस्कृतज्ञ प्रि. राजवाडे याची समति आहे या गोष्टीचा विचार येथें करू

२ **संधि हा शब्द** सम् + धा यावरून बनला आहे येथे धा म्हणजे ठेवणें व सम् म्हणजे एकत्र, चागल्या रीतीनें. या घटनेवरून सधी याचा अर्थ

सामान्यतः ‘उत्तम प्रकारें ठेवणें किंवा जोडणें’ असा होतो जोड म्हटला म्हणजे पूर्व व पर हे दोन्ही भाग काहीसे विरुन व्हावयाचे, कधी–कधी एखादाच होईल ही विकृति किंवा फरक सुखोच्चारार्थच असल्यामुळें तिच्या योगानें उच्चारसौकर्यच लाभावें, उच्चारकाठिन्य प्रवृत्त होऊं नये एखाद्या वर्णाची भर पडल्यास ती सुलभ उच्चारणासाठीच पडणार, एरवी पडणें शक्य नाही.

३ सनिहित असलेल्या दोन शब्दांचा सहोच्चार बोलताना होत असल्यामुळें तो सर्वच भाषा बोलणाऱ्या लोकांनी असावयाचा तो जसा सस्कृतात, तसाच मराठीत, तसाच इंग्रजीतही आढळतो मी जातों आहे, याचा उच्चार आपण प्रौढ व्यवहारात जातोंहें, व सामान्य व्यवहारात मी जातोय् असा करितों. I will याचा सक्षेप सलापनामध्यें (colloquially) I'll असा होतो I would चें उच्चारण I'd असें लिहिण्यात येतें येथील मराठीतील व इंग्रजीतील सधि किंवा धावते उच्चार **सोपा उच्चार किंवा संक्षेप** यास धरूनच आहेत असेच ते सस्कृतातही असतात, व असावयाचेच कारण निसर्ग हा सर्वच भाषा बोलणाऱ्या सबंधात एकच असणार यावरून (क) **उच्चारसौकर्य** हा सधीचा हेतु आहे हें समर्थित होतें

४. (ख) **उच्चारकाठिन्य** व (ग) **संक्षेपविरोध** हे सधीमुळें उत्पन्न होतात, ही गोष्ट चमत्कारिक भासते रा जोशी यानी त्याची उदाहरणें दिली असती तर विचार करण्यास सोपें झाले असतें इतर गोष्टींसबधीही माझा असाच प्रतिवाद (= नकार) आहे पुष्कळशी विधानें उदाहरणरहितच रा. जोशानी दिली आहेत य. उदाहरणाभावी मीच त्याची ईप्सित उदाहरणें मनानें कल्पून तद्विषयक लिहितों (१) अस्मिन् + अरण्ये = अस्मिन्नरण्ये-, येथें आगतुक वर्ण न् आलेला दिसतो, पण हा वर्ण जरी अधिक असला तरी तो नैसर्गिक दिसत असल्यानें, सोप्या उच्चारणाला विरोधी नसावा सुलभोच्चारता व सक्षेप याचा विरोध आल्यास आपली जीभ सक्षेपाचा बळी देऊन सुखोच्चारताच साधणार, मान्य पण येथील न्–ची भर निसर्गानुरूप आहे काय? तशी ठरल्यास ही वाढ स्वीकारणेंच योग्य इतर भाषात ह्या वाढीच्या नैसर्गिकतेस आधार मिळतो. Run + ing = Running असें रूप आपणास परिचित आहेच तान् + आगमान् = नानागमान्. यात आगतुक न् प्रविष्ट होत नाही. असाच प्रकार Moaning यातही आढळतो Run

मध्यें न्-चे पूर्वी-ऱ्हस्व स्वर आहे व Moan मध्यें ( उच्चारतः तरी ) दीर्घ स्वर आहे या स्वर-भेदावर न्-चा प्रवेश अवलंबून आहे. बराबर हीच स्थिति संस्कृत उदाहरणातील न्-संबंधी आहे. अर्थात् अनेकधा परस्परभिन्न अशा भाषांत शब्दजोडपद्धति ( अर्थात् संधिविधान ) एकच आढळल्यास ती स्वाभाविक मानिलीच पाहिजे, व म्हणून ती सुखोच्चारपोषकच असणार, अर्थात् तद्विरुद्ध कुरकूर करण्याचे कारण नाही

५. कदाचित् सुगण् + सु = सुगण्ट्सु येथील व्यंजनाची वाढ रा जोशांनी अपवाद्य गणिली असावी, पण ही वाढ सुद्धा इतर भाषांत आढळते अर्थात् ती नैसर्गिक असून इष्ट व ग्राह्य अशीच असणार. numBer, genDer या शब्दांतील स्थूल-मुद्रित वर्ण आगंतुक आहेत. त्यांना मूळ लॅटिन शब्दांत आधार नाही. जसा इंग्रजीत, तसा मराठीतही, अनुनासिकापुढें तद्वर्गीय व्यंजनाचा प्रवेश आढळतो. आम्र-आंबा, ताम्रकुट्ट-तांबट, अम्ल-अंबट, तुमुल-तुंबळ इत्यादि ठिकाणी ब् सर्वथा आगंतुक आहे तेव्हा या दोन ( न्-ब्-आगमाच्या ) उदाहरणांवरून संधीमुळें वर्णांचा पाल्हाळ विनाकारण होतो, हें रा जोशी यांचें म्हणणें निर्मूल ठरतें

६ रा जोशी म्हणतात—( ड, ञ, च, छ ) कांही संधी बोलतांना होतात, ते ग्राह्य, पण त्यांच्या धर्तीवर बनविलेले विद्यमान संस्कृतांतील संधी त्याज्य होत येथेंही मूळ संधी कोणते व त्यांची नक्कल असलेले कोणते, हें मुळीच सांगितलेलें नाही तसें सांगितले असतें तर 'हा सूर्य, हा जयद्रथ ' या न्यायानें भ्रमाचें माप प्रत्यक्ष पदरात टाकता आले असतें तद्भावीही मी असें सुचवितों की, रा जोशी यांनी एक तरी विद्यमान संस्कृतांतील संधि असा दाखवावा की, ज्याचें मूळ निसर्गांत नाही, नैसर्गिक उच्चारप्रवृत्तीवर जो अधिष्ठित नाही. मी असें म्हणण्यास व तसें सिद्ध करण्यासही सिद्ध आहें की **विद्यमान संस्कृतांतील प्रत्येक संधि स्वाभाविक आहे** थोडी उदाहरणें घेऊन ही गोष्ट विशद करितों. देवडीवरचा भय्या वाड्यांत शिरणाऱ्या मनुष्यांस वारवार ' मत् जाव ' असें म्हणतो. याचा एकत्र उच्चार मज्जाव असा होतो. एवढेंच नव्हे, प्रवेशबंदी अशा अर्थी मज्जाव असा शब्दच आपण योजितों हा संधि होऊन बनलेला शब्द आपण आदरितों, मग पङ्कात् + जायते=पङ्कात्ज्जायते' या संधीबद्दल विरोध का असावा ? सत्+जन=सज्जन

असा शब्द आपणात आहेच **बुधकरांचा हौद** याचा उच्चार वारवार **भुतकरांचा हौद** असा ऐकण्यात आहे येथे ध-मधील महाप्राणत्व पूर्वीच्या अक्षरात शिरलें, ही अशी परागति आपण स्वीकारतों मग दोह्+सि=धोक्षि यातील हकाराचें प्रतीचीन गमन आपण अपवाद्य का मानावें ? एक + अर्ध = **एकार्ध** याचें हिंदी रूप **एकाध** व मराठी रूप **एखाद** असे आहे येथें सुद्धा हकार-तत्त्व मागें सरकले आहे संस्कृत प्रस्तर, हिंदी पत्थर, मराठी फत्तर,--येथेंही हाच प्रकार आहे असले शब्दप्रयोग आपण राजरोस करितों, मग त्यासंबंधी व्याकरणानें सुसगत नियम दिल्यास त्यास दोष का द्यावा ? अस्तरण-अथरूण-हतरूण, यातील तिसरा उच्चार मुले करितात हा उच्चार मुलाचा असल्यामुळें, खास नैसर्गिक आहे यातही हकार-मागें सरला आहे. साराश-हकार मागें जाणे ही गोष्ट स्वाभाविक ठरते **डफ** + घाई = **डब**घाई यातील, तसाच अर्ध + शेर = अद् + शेर = **अच्छेर,** यातील नैसर्गिक सधीही बरावर व्याकरणानुसारीच आहेत या व इतर संधीत निसर्गप्रवृत्तीच प्रतिबिंबित आहे असल्याच स्वाभाविक प्रवृत्तीचें निश्चित परिछिन्न असें रूप व्याकरणात दिलेलें असते व्याकरण सधिनियम देतें तें स्वतःच्या लहरबाजीमुळें नव्हे, शिष्टान्या उच्चाराची प्रवृत्ति पाहूनच, केवळ त्याची नोंद इतरेजनाकरिता व्यवस्थित मर्यादासह व्याकरण करितें.

७. ( ज ) व्याकरणसधीमुळें उच्चार क्लिष्ट होतो, असें जोशी म्हणतात. एखादें उदाहरण ? दिलेलें नाही असें उदाहरण मी अनुमानानें घेतों स्तुवन्ति + ऋषयः= स्तुवन्त्यृषयः—असलें उदाहरण जोशानी लक्षित असावें हें उदाहरण दुरुच्चार आहे मान्य (=कबूल) असें उदाहरण व्याकरणानें का प्रवृत्त करावे ? उत्तर-(१) येथील उच्चार आपणास साधत नाही, पण पूर्वजास खास साधत असला पाहिजे, पूर्वी पठन-पाठन बहुधा तोंडातोंडींच चालत असे. तेव्हा असली उदाहरणें उच्चार्य व श्राव्य अशीच असली पाहिजेत जो उच्चार एकास साधतो तो दुसऱ्यास साधत नाही, असें आपण वारवार पाहतों. कृष्ण-चा उच्चार आपल्यातील व्यापारी लोक क्रष्ण असा करिताना आपण ऐकतों, ज्ञ-चा उच्चार आपणा महाराष्ट्रियास साधत नाही, हें स्वीकृत केलेंच पाहिजे. मद्रासी लोकांना L, M, N, या वर्णाचे उच्चार साधत नाहीत याच न्या-

यानें स्तुवन्त्यृषयः यातील उच्चार आपल्या पूर्वजास साधत असून, आपणास साधत नाही, पण म्हणून पूर्वकालीन वैयाकरणास दोष देण्याचे कारण नाही. त्यावेळी तो उच्चार लोकास साधत होता, म्हणूनच वैयाकरणानी त्यास व्याकरणात मान्यता दिली, स्वतःच्या सासुबाईपणामुळें नव्हे. तरी पण हा उच्चार काहीसा कठीण आहे, याची जाणीव त्यास झाल्यामुळें, किंवा असें भविष्यकाळचें अनुमान त्यानी केल्यामुळे, येथील संधी त्यानी वैकल्पिक ठेविला आहे येथें स्तुवन्ति ऋषय. असा प्रकृतिभावही व्याकरणसमत आहे

८ रा. जोशी म्हणतात, " रामः इच्छति = राम इच्छति येथें उत्तरत्र संधि करणे शक्य असून व्याकरण करीत नाही, हाच प्रकार कवी + इच्छतः येथें गार्गी + इच्छा येथे व्याकरण संधी इष्ट मानिते तर प्रस्तुत उदाहरणात अनिष्ट मानितें असे एकसूत्रीपणाच्या अभावाचें स्वरूप रा. जोशास अभिप्रेत असावें याचें उत्तर—कारणें भिन्न, तर कार्य भिन्न dine, die, dye या सर्व धातूंच्या अंती e आहे याची रूपें ing-पूर्वी क्रमाने din, dy, dye अशी आढळतात येथे e-चें वागणें एकविध नाही जशी परिस्थिति, तसे संधि. यात म्हणजे भिन्न-भिन्न परिस्थितीमध्ये एकसूत्रीपणाचा अभाव हाच एकसूत्रीपणा रविवारी शाळेत न जाणें व इतर वारी जाणें यात वरवर पाहता एकसूत्रीपणा दिसत नाही रविवार जसा वार, तसे इतरही वारच. तरीपण रविवारी शाळेंत न जाणे ही जशी शिस्त, तशीच इतर वारी न जाणें ही शिस्त असल्यानें, शिस्तीचे पालन हाच एकसूत्रीपणा रविवारी अनध्यायात व इतर वारी अध्यायात दिसून येतो साराश-राम+ईक्षते व उप+ईक्षते येथील पूर्व भागाच्या अन्त्यस्वराची परिस्थिति भिन्न-भिन्न असल्यामुळें ई-पासून एक विलग राहतो, तर दुसरा ई-शी सलग्न होतो यामुळे वैयाकरणान्या पदरी लहरबाजी मुळीच येत नाही **संधिभेदास परिस्थितिभेद समर्थक आहे**

९ व्याकरणोक्त संधिनियम हे केवळ निसर्ग-प्रतिबिंबें आहेत, हें वर सांगितलेंच आहे एतदर्थ आणखी काही उदाहरणें घेऊ. Support, Subject या जोडीमध्यें, पूर्वत्र b चा p झाला आहे कठोर वर्णापूर्वी मागील वर्ण कठोर बनला आहे. **जशास तसें** हें संधीचें पंचाक्षरी तत्त्व **येथें लागू पडतें**, Import, Illegal इत्यादि ठिकाणी पूर्वावयव in यातील n-चें रूप पुढील वर्णानुसारें विकृत झालें आहे. **मागील पंचम वर्णानें परसवर्ण होऊं पाहणें** हें व्याकरणात उक्त आहेच अपूर्व, अनादि या संस्कृत शब्दात

उतरत्र न् प्रविष्ट झाला आहे. हा प्रकार इंग्रजीत A horse, An hour व ग्रीक भाषेत Apathy, Anarchy अशा शब्दात आढळतो दोन स्वर **लागोपाठ** उच्चारणे कोणासही कठीण जात असल्याने, त्यामध्ये नकाराचें व्यवधान उत्पन्न करणें, हें वरील तीन भाषाच्या उदाहरणावरून नैसर्गिक सिद्ध होतें अशाच नैसर्गिक प्रवृत्ती व्याकरण व्यवस्थितपणें माडिते यामुळें वैयाकरण हे जनतेचे उपकारक होत, कोणी तरी लहरबाज निस्मारखान नव्हत, हें लक्ष्यात ठेवावें.

१० येथवर रा जोशी याचे म्हणण्याविषयी सामान्यतः विचार केला. यात बहुतेक मुद्याचा विचार आला आहे शेष मुद्याचा विचार आता करितों. रा जोशी म्हणतात-( घ ) काही संधी लिहूनच दाखविता येत नाहीत हे कसें, तें जोशीच सागू जाणे। एक वेळ एखादा संधि उच्चारता येणार नाही, पण तो संधि लिहून दाखविता येत नाही, हे मला कल्पनातीत वाटतें ( ङ ) संधीमुळें अर्थविपर्यास होतो, अशी रा जोशी तक्रार करितात, पण कधी-कधी अर्थविपर्यास हाणे हे सवत्रच सभवनीय आहे अशा ठिकाणी सद्र्भच केवळ निर्वाहक असतो काही ब्राह्मण अधेऱ्या रात्री नदीतून चालले होते त्यातला पुढील ब्राह्मण ओघाने वाहू लागला ही आपत्ति आपल्या अनुयायास कळविण्याकरिता, तो म्हणाला ' गेलों रे गेलों ' याचा अर्थ ' तो सुरक्षित पलीकडे गेला ' असा अनुयायानी केला, व त्याचे पाठच्या अनुयायानें पुढें गमन केलें. तोही वाहवला, व वाहताना पहिल्याप्रमाणेंच ' गेलो रे गेलों ' असे म्हणाला. त्याच्या मागच्या गृहस्थाचा त्याच्याप्रमाणेच गेरसमज होऊन तोही पुढें सरला व बुडाला या क्रमानें सगळे ब्राह्मण नदीत वाहून गेले. येथें बोलणाराच्या अर्थाहून निराळाच अर्थ ऐकणारानें घेतला. येथे सद्र्भही बरोबर होता, अज्ञात नव्हता, तरी पण गैरसमज झालाच असा प्रकार क्वचित्काळी व्हावयाचाच तो क्वाचित्क म्हणून पतकरिलाच पाहिजे एव सद्र्भ कळून सुद्धा गैरसमज होऊ शकतो किंवा संभवतो, ही जर गोष्ट खरी, तर संधि केल्यानें अर्थभेद होऊन गैरसमज झाल्यास त्याबद्दल संधीस दोष देण्यासारखें तें काय आहे ? एवढेंच नव्हे तर उलट, संधीच्या अशा अर्थद्वयप्रसवक्षमतेमुळें संधि हा कधी-कधी उपकारकच गणावा लागतो. पथ्ये **सति** गदार्तस्य किमौषधनिषेवणम् । ' या पक्तीचे अर्थ, संधीमुळें **असति** किंवा **सति** अशी पदें घेऊन भिन्न-भिन्न करिता येतात. यामुळें कोणत्या रसिकाचे मनास

कौतुक वाटणार नाही ' या ठिकाणी संधि काव्यास अनुकूल असाच ठरतो. तात्पर्य–संधीने अर्थभेद होऊ शकतो, ही गोष्ट मला इष्टापत्तीच वाटते एकाच शब्दरचनेने अर्थद्वय दर्शविणें हें तर काव्यानुकूलच मानण्यात येतें

११ रा जोशी म्हणतात, ( ट ) येथील संधिविषयक विचाराना रा. केळकर व राजवाडे याची संमति आहे पण हें त्याचें विधान फारच मोघम आहे रा जोशी यानी माडलेल्या प्रत्येक मुद्यास वरील विद्वद्द्वयाची संमति असणें शक्य दिसत नाही तसें असल्यास जोशी यानी स्पष्ट शब्दात तसे लिहावें रा. जोशी याचे मुद्दे विद्वत्संमत नाहीत, ही गोष्ट त्याच्याच पत्रातील विधानावरून सिद्ध होते वीस संस्कृतज्ञापैकी चौघानीच उत्तरे पाठविली व त्यातील दोघाचीच नावें पुढे आली आहेत यावरून काय अनुमान निघतें ? ज्या लोकानी उत्तरें पाठविली नाहीत त्याचे मत प्रतिकूल मानण्यास जागा आहे सत्य ब्रूयात् प्रिय ब्रूयात् **न ब्रूयात् सत्यमप्रियम्** । याच उक्तीचा आदर यातील बहुतेकानी केला असावा.

१२ रा जोशी याच्या पत्रातील एक गोष्ट ग्राह्य दिसते ती ही की, वाक्य लिहिताना त्यात पदसंधि मुळीच करू नये. ही गोष्ट प्राथमिक एक-दोन पुस्तकातून अवश्य पाळावी असाच उपक्रम दिवगत प्रि. गोळे याच्या संस्कृत पुस्तकात पाहिल्याचें मला स्मरतें याच पदसंधीच्या अभावाचा अवलंब मी एका पुस्तकात केला होता, पण सरकारी विद्याखात्यातील पुस्तक–परीक्षकानी त्या कारणाकरिता तें पुस्तक त्याज्य ठरविलें, तरी पण या गोष्टीबद्दल खटपट करणे अवश्य आहे. अशी खटपट, अर्थात् **मर्यादित क्षेत्रापुरती**, रा जोशी यानी करावी, अशी त्यास माझी आग्रहाची सूचना आहे येथील पदसंध्यभाव **केवळ नूतनाभ्यासकांकरिता** असावा, सार्वत्रिक मुळीच असू नये, तोही फिरून गद्यापुरताच असावा, पद्यात त्यास स्थान देऊ नये नाही तर संस्कृत काव्य येथून तेथून सर्वच दुर्बोध होईल गद्य वाक्यात संध्यभाव व्याकरणानुमत आहेच वाक्यात ज्या ठिकाणी आपण थाबतों किंवा विराम करितों त्या ठिकाणी संधि करिताच कामा नये अशा ठिकाणी संधि करण्याचा आग्रह धरल्यास बाणभट्ट कादंबरीतील आठ-दहा पानें लाबलेलें एखादें वाक्य एका दमात वाचावें लागल्यानें वाक्याच्या समाप्तीच्या पूर्वी वाचकाचीच समाप्ति व्हावयाची! अर्थात् अशी अनिष्ट गोष्ट व्याकरण कधीच सांगणार नाही. तें स्पष्ट म्हणतें—

मद्दितैकपदे नित्या, नित्या धातूपसर्गयोः।
नित्या समासे, वाक्ये तु सा **विवक्षामपेक्षते** ॥

१३. उपसहार— सस्कृत वाङ्मयात द्विविध सधि आढळतात,—**पोटसंधि** व **पदसंधि** रा जोशी यानी योजिलेले आतरसधि व बाह्यसंधि हे शब्द चागलेसे समर्पक नाहीत. या दोन सधीतील भेद काही ठिकाणी केवळ पारिभाषिक दिसून येतो. वाच्+अः=वाचा हा आतरसधि आहे हें उघड आहे वाच्+भ्याम् येथील सधिही तसाच आहे असें कोणी म्हणेल. पण वस्तुस्थिती अशी नाही. कारण येथं वाग्भ्याम् असे रूप सिद्ध होतें, वाज्भ्याम होत नाही वाचा व वाग्भ्याम् दोन्ही विभक्तिरूपेच आहेत पण दोन्ही निरनिराळ्या सधिनियमानी नियमित आहेत सारांश, दोन सधींमध्ये भेद आहे तो स्थूल नसून काहीसा किचकट आहे तेव्हा त्याचें नामकरण जपूनच केले पाहिजे

एकामागून एक उच्चारले जाणारे वर्ण परस्पराच्या सांनिध्याने नेहमीच सर्वच बोलणाराच्या प्रचारात विकृत होण्याचा सभव आहे पण अशा प्रवृत्ती सुद्धा परिस्थितिभेदामुळे भेद पावतात जो उच्चार एकाला स्वाभाविक वाटतो तो दुसऱ्याला कृत्रिम भासतो प्रत्येकाच्या भाषेंत अशा काही प्रवृत्ती असतातच की ज्याच्या योगाने सहोच्चारित वर्ण थोडेफार विकार पावतात सस्कृत भाषा बोली होती त्यावेळी आढळणाऱ्या उच्चाराची प्रवृत्ति पाहून तदनुरूप ग्रथित केलेली त्याच प्रवृत्तीची शुद्ध प्रतिबिंबें म्हणजेच व्याकरणातील सधिनियम होत, हें मला सागावयाचें आहे हें सत्य कोणास आकलन न झाल्यास, तो त्याचा दोष होय, वैयाकरणाचा, आपल्या पूर्वजाचा नव्हे आपणास वाटणारा दुरुच्चार भिन्न स्थितीमुळें आपल्या पूर्वजास सुखोच्चार वाटणे, सभवनीय आहे post या शब्दात ट्-चे पूर्वी स्-चा उच्चार इग्रजास निसर्गाविरुद्ध वाटत नाही, पण तो तसा आपल्या जिभेमच वाटून, तीच त्याचा उच्चार पोष्ट असा करिते हा उच्चारभेद परिस्थितिभेदावर अवलबित आहे एतदर्थ मराठी बोलणारानी इग्रजी वैयाकरणास, ट्-चे पूर्वी स-च्या उच्चारास ते हरकत घेत नाहीत म्हणून, दोष देण्याचें कारण नाही आणि खरोखरीच आपण असा दोष देतही नाही हा जो समंजसपणा आपण परकीयाबद्दल दाखवितों, तोच समंजसपणा आपल्या पूर्वजाबद्दल दाखविणें आपला धर्म नाही काय ! संस्कृत वैयाकरण व आपण

यान्यातील कालांतराचा विचार आपण केला पाहिजे. त्याची परिस्थिती निराळी, आपली निराळी या भेदामुळें उच्चारभेद सर्वथा शक्य आहेत, करिता संस्कृत व्याकरणातील नियमानी होणारे **संधी अनैसर्गिक** आहेत, आपल्या **पांडित्याची हौस** पुरी करण्याकरिता वैयाकरणानी असे नियम करून ठेवले आहेत, इत्यादि अनुदार आरोप त्याच्यावर करणे आपणास शोभत नाही भगवान् पाणिनींचे नियम पाहून पाश्चात्य पंडित केवळ विस्मय-स्तंभित होतात व मुक्तकंठानें त्याची प्रशंसा करितात आधुनिक पारंपरिक भाषाशास्त्रातील प्रगतीचे मुळाशी पाणिनिकृत वर्णविकारनियम आधारभूत आहेत, ही गोष्ट विद्वत्संमत आहे

१४. असो. मुलाना वर्ण शिकविण्याचे दृष्टीनें प म भ असला क्रम सुलभ म्हणून खुशाल आदरावा पण वैयाकरणानी दिलेला प फ ब भ म हा क्रम सदोष मानू नये संधि केल्यामुळें अभ्यासूस जड जातें करिता संधि करूच नयेत, हें म्हणणें नूतनाभ्यासकापुरतें खुशाल अवलंबावें, एवढेच नव्हे, अवश्य अवलं-बावें, पण हे संधि अभ्यासकाच्या मार्गात प्रतिबंधक होतात म्हणून त्या संधींविषयी नियम करणारे वैयाकरण **पंडितंमन्य व लहरबाज** असें म्हणणें मात्र सर्वथा सत्यापलापक आहे, एवढेंच माझें आग्रहाचें सांगणें.



## 9 What is Case in Grammar, the Form or Sense ?

An answer to this question can best be given only with copious illustrations of different forms, and for this it is necessary to deal with a language, rich in inflection, like Sanskrit, Marathi, or Hindi English is comparatively poorer in this respect I shall, however, try as far as possible to tackle the above question with the help of what few instances there may be found in English.

A person given to thinking superficially will at once argue that grammar is for the language, that in a language the sense is more important than the form, and that there-

fore the case should be determined by the sense and not by the form Before showing the invalidity of this statement, let us consider the general conception of Grammar and the order of the things treated therein

Grammar first enumerates the several parts of speech, then deals with any changes that the words may undergo, and last of all treats of the sense or use of words, with change of form where it exists The parsing follows exactly in the wake of this treatment First it tells the part of speech of a word, then the change of form if any, and lastly the relation of the word with other words, or rather with the *verb-ward* word in the sentence It is this relation that is often called the sense or use of a word in a sentence It would thus appear that, whether in the general treatment in Grammar or in parsing, the idea of sense or capacity comes last In parsing we first take what forms of words there may be, and then see what particular purpose these forms serve in the making up of the sentence Hence it is but natural to speak of *sense or use of a case*, and not of a particular case because of sense Sense or use can claim no hand in determining the case of a declinable

Against the above statement, the following objection may be raised In examples " (1) *The horse is standing* and, (2) *I ride the horse*"—*the horse* is a nominative in the first, and an objective in the second Whence this difference of case, the form being the same? The first *horse* is the subject ( or the thing spoken about ) and therefore it is in the nominative ; the second *horse* is the object, and therefore it is in the objective case Thus the use or sense *decides* the naming of a case It is the sense that predominates even in Grammar The sense precedes, and the form or name follows

All this reasoning of the *sensists* is quite illogical and beside the mark. That the sense names the form is only

half truth The sense does not name the form in all places It only decides the name of the form, and that too, only in places where it is common to two or more names The function of the sense is only अन्यतरत्वनिर्णय, or 'to decide which of the two?'

To be particular, we shall take an example *No animal is larger than a whale* Here, by adding 'a whale is large' a clause can be completed after 'than', whence *than* is a conjunction Grammarians are for calling 'than' a conjunction here They would admit it as a preposition, only in places where no clause can be completed Bearing this dogma in mind, let us think of another example '*As he was a poet sublimer than John*' Here the clause can be made up as '*than John is sublime*,' whence *than* is a conjunction and John is nominative Now take the standard example '*As he was a poet sublimer than me*' This example differs from the preceding only in having a pronoun in place of the noun But the form of the pronoun 'me' being proper to the objective case only, grammarians have to call it objective and so to parse 'than' as a preposition In these two examples, the uses of 'John' and 'me' as constituents of the sentence are quite identical, and hence both should be parsed in one and the same way But 'me' is parsed as objective Why? How can sensists explain this discrepancy? They cannot, they are helpless They must give up the cause of sense and admit that it is the form that reigns supreme in Grammar. No grammarian has ever suggested to call 'me' as nominative, no matter what function it serves in a sentence, thus admitting that use does not determine the name of a form

We shall take another illustration. In the three sentences

( i ) A nation prospers by industry

( ii) A nation prospers, if it be industrious.

and (iii) A nation must be first industrious and then only it can prosper

The senses here conveyed are pretty-much the same; but nobody ever dreams of putting the sentences in one and the same class. If the sense were the criterion in giving names in Grammar, must not the above three sentences receive one and the same name 'simple, complex or compound'?

Thus we have seen that a form is named not in accordance with the office it serves in a sentence, and that the sense decides the name of a form only in places where the form is ambiguous, and that therefore the name of a case of nouns depends on the form it has assumed In short we may say that The Form is the Case

---

## १० द्वितीयावाद [ अथवा विभक्तींची संख्या ].

१. **प्रश्नाचे महत्त्व**—द्वितीयावाद म्हणजे द्वितीयेविषयी वाद, 'द्वितीया सहधर्मिणी' असे अमरकोश सांगतो तेव्हा हा वाद कोणासही जिव्हाळ्याचा वाटणार, म्हणून आपणही येथ त्याचा विचार करू याचा निर्णय निष्पक्षपात व्हावा म्हणून, त्याविषयी कोणताही ग्रह अगोदर मनात न आणिता व म्हणूनच इतर व्याकरणकाराचीही नानाविध परस्परविरोधी मते न पाहता, आपण त्याची वाट पायरीपायरीने आक्रमू, मग ती वाट आपणास कोठेंही नेवो.

२ **वादाचें स्वरूप व विवेचनाचीं प्रमाणें व दिशा**—मराठी भाषेचे व्याकरणात द्वितीया विभक्ति आहे की नाही ? किंवा ती मानावी की नाही ? हें या वादाचें स्वरूप आहे. प्रस्तुत प्रश्न सोडविण्यास इतर भाषाकडे पाहणें जरूर आहे. आपणास परिचित भाषा म्हणजे सामान्यतः संस्कृत व इंग्रजी या होत. ( १ ) यांतील संस्कृत मराठीशी सजातीय व इंग्रजी विजातीय आहे. ( २ ) संस्कृत रूपसंपन्न आहे, तिच्यात एका शब्दाची वाक्यात अनेक रूपें होतात. मराठीतही शब्दाला विकार होऊन वाक्यात त्याची विविध रूपें होतात. उलट इंग्रजीत रूपाचें दारिद्र्य आहे. ( ३ ) संस्कृत भाषेचें

व्याकरणशास्त्र विशेष कमावलेलें आहे इंग्रजीत व्याकरणाचा विचार, तें केवळ भाषेचें नोकर, या नात्यानेंच प्रायः केला जातो अर्थात् तें व्यावहारिक आहे, शास्त्राधिष्ठित नाही करिता व्याकरण–विषयांत मराठीस मार्गदर्शक होण्याचा अधिकार संस्कृताचाच सिद्ध होतो साजात्य, साधर्म्य व शास्त्रशुद्धि या वरील कारणामुळें पुढील विवेचनात संस्कृतास अग्रमान दिला आहे. मधून–मधून इंग्रजीचा दाखला घेतलाच तर तो प्रमाणांतरानी सिद्धपूर्व अशा गोष्टींचे पुष्ट्यर्थच होय. ( १ ) मराठी व संस्कृत या दोन्ही भाषास साधारण असलेल्या सर्व गोष्टीत संस्कृताचा कित्ता गिरविणें ( २ ) रूढीला यावच्छक्य मान देणें, ( ३ ) तर्कशक्तीस अनुसरणें, व ( ४ ) अभ्यासकाची सोय पाहणें ही चतुर्विध तत्त्वें पुढील विवेचनात सारासारविचारानें (यथोत्तर बलीयः) 'एकाहून एक पुढील बलवत्तर' अशी मानिली आहेत विभक्ति म्हणजे काय? या प्रश्नाचें उत्तर प्रथम व्याख्यारूपानें न देता, त्या व्याख्येस आधारभूत जी वस्तुस्थिती तिचाच विचार आपण करूं कारण कोणत्याही वादात अंतिम निर्णय हा वस्तुस्थितीवरूनच होणार. याचकरिता या विषयावरील मराठी वैयाकरणाच्या मतामतांतराचा गलबला येथें देत नाही यानें अभ्यासक केवळ भांबावून जाणार.

३. **संस्कृतांतील वस्तुस्थिति** कशी बनली याचा विचार–'वन' शब्दाच्या द्विवचनात 'वने वनाभ्याम् वनयोः' अशी तीनच रूपें आढळतात. हीं सर्व भिन्नभिन्न विभक्तींची गणिली जातात म्हणून द्विवचनात विभक्ति जास्तीत जास्त तीनच असणार येथें रूप म्हणजे विभक्ति, हेंच तत्त्व ठरणार बहुवचनात 'वनानि वनैः वनेभ्यः वनानाम् वनेषु' अशी पाच रूपें आहेत करिता येथें विभक्ति पाच ठरणार. एकाच शब्दाच्या निरनिराळ्या वचनात विभक्तींचा मेळ पाहिजे, हें उघड आहे. हा मेळ राखण्याकरिता 'वनैः वनेभ्यः' याशी 'वनाभ्याम्', व 'वनानाम्' 'वनेषु' याशीं 'वनयोः', ही रूपें संवादी मानिली जातात, यावरून 'वनाभ्याम्' 'वनयोः' ही प्रत्येकी दोन–दोन विभक्तींची ठरतात येथें हें तत्त्व आढळतें की भिन्न-भिन्न वचनें किंवा लिंगें यात मिळाफ राखण्याकरिता, यथापेक्ष **एकच रूप एकाधिक विभक्तींचें मानावें** पुढें एकवचनाचा विचार केल्यास, तेथें 'वनम् वनेन वनाय वनात् वनस्य वने' अशी सहा रूपें उपलब्ध होतात. याशी इतर वचनातील रूपांचा मेळ घालिता पुढील स्थिति सिद्ध होते.

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| एकवचन—वनम् | वनेन | वनाय | वनात् | वनस्य | वने |
| द्विवचन—वने | वनाभ्याम् | वनाभ्याम् | वनाभ्याम् | वनयोः | वनयोः |
| बहुवचन—वनानि | वनैः | वनेभ्यः | वनेभ्यः | वनानाम् | वनेषु |

या वन शब्दाच्या रूपावरून नपुसकलिंगात सहा विभक्ति ठरतात. याच धर्तीवर पुलिंगाचा स्वतंत्र विचार केल्यास, त्यात मात आढळून येतील. ज्याप्रमाणें निरनिराळ्या वचनात विभक्तीचा मेळ असावा, त्याप्रमाणें लिंगामध्येंही असणें इष्ट आहे, यामुळें पुढील स्थिति प्राप्त होते.

प्रथमा–रामः रामौ रामाः वनम् वने वनानि
द्वितीया–रामम् रामौ रामान् वनम् वने वनानि

येथें वनम् इत्यादि रूपें पुलिंगाच्या दोन विभक्तींच्या रूपाशी सवादी मानावी लागतात, कारण सर्व लिंगात विभक्तिसख्या समान पाहिजे या लिंगाचा स्त्रीलिंगाशी मेळ घालिता सात हींच विभक्तिसख्या कायम राहते.

४. **संबोधन**—वरील रूपाविष्कारामध्यें सबोधन ही विभक्ति घेतली नाही कारण ( १ ) सस्कृत व्याकरणात ती विभक्ति स्वतंत्र नसून, शास्त्रत. प्रथमान्तर्गतच मानितात, याचें एक गमक असें आहे की सबोधनाचे प्रत्यय कोठेंही दिले नाहीत ( २ ) ( Analysis= ) वाक्यविमर्शात इग्रजी भाषेत सबोधनास मानाची जागा नाही क्रियाविशेषणाचे कचरापेटीत त्यास टाकितात. ( Parsing= ) पदसमर्शातही केवलप्रयोगी अव्ययाशी तें सगोत्र मानिलें जातें ( ३ ) विभक्तीचे विचारात जितक्या विभक्ति कमी, तितकें आपणास जास्त सोईचें

५ **अर्थविचार**—हें प्रकरण निकालात काढण्यापूर्वी आणखी एका तत्त्वाचा विचार करणें जरूर आहे 'पूर्वात् पूर्वस्मात्' ही रूपें–सर्वथा समानार्थक, व **नित्यपरिवृत्तिसह** म्हणजे केव्हाही एकमेकाबद्दल उपयोगिली जाणारी, एकाच विभक्तीची मानितात, ती भिन्नभिन्न विभक्तीची मानीत नाहीत यावरून उघड होतें की, एकाच वचानामध्ये जितकी रूपें तितक्या विभक्ति हें जरी खरें असलें तरी 'रूपें कोणती ? कशी ?' हाही विचार करणें अवश्य आहे. याचे उत्तर वरील रूपद्वयावरून मिळतें तें असें–रूपे सर्वथा समानार्थक असल्यास, ती एकाच विभक्तीची होत. म्हणजे " यावद्रूप विभक्तयः " हें तत्त्व भिन्नार्थक रूपासच लावावें.

आता भिन्नार्थक म्हणजे सर्वतः किंवा अंशतः भिन्नार्थक

**अध्ययनेन अध्ययनाय** वा विद्यामठे वसति ( फल )

**अध्ययनेन** ज्ञानं लभते ( करण ), **अध्ययनाय** स्पृहयति ( विषय )

येथें अध्ययनेन आणि अध्ययनाय ही रूपें 'फल' या अर्थाचे बाबतीत जरी समानार्थक आहेत, तरी करण व विषय याचे बाबतीत ती भिन्नार्थक आहेत व म्हणून ती भिन्नविभक्तिक मानण्यात येतात. साराश, सर्वथा समानार्थक रूपे एकाच विभक्तीची, तर थोडी फार का होईनात, भिन्नार्थक रूपें भिन्न विभक्तीची. यावरून पुढील विधानें कोणासही पटतील–

६ **संस्कृतांतील विभक्ति-व्यवस्थेचीं तत्त्वें**—

१ नित्यपरिवृत्तिसहानि रूपाण्येकविभक्तिकान्येव २ वचनैक्ये यावन्ति रूपाणि तावत्यो विभक्तयः ३ अत्र च रूपाणि सर्वतोऽशतो वा भिन्नार्थान्येव ४ लिंगादौ संवादार्थ एकमपि रूप अनेकविभक्तिक बोध्यम्.

याचेच पाठ्यरूप पुढीलप्रमाणें—

विभक्तिर्वचनैक्ये यद्रूप भिन्नार्थमन्यत. ।
परिवृत्तिसहे नित्य रूपे तुल्यविभक्तिके ॥ १ ॥

**अर्थ**—एकाच वचनात जेंजें रूप अन्यरूपाहून भिन्नार्थक तेंते स्वतत्र विभक्तीचें समजावें केव्हाही परस्पराबद्दल येणारी रूपे एकाच विभक्तीची मानावी.

७ **मराठींतील विभक्तिरूपांचें परिगणन**— ही वरील तत्त्वे मराठीस लावण्याकरिता, तिच्यातील विभक्तिरूपे घेऊ वाक्यगत इतर शब्दाशी नातें दर्शविणारी 'वाघ' याची रूपें प्रायः पुढीलप्रमाणे आढळतात–

**एकवचन**—वाघ वाघास वाघाला वाघाते वाघाने वाघें वाघाशी वाघाहून
वाघाचा–ची–चें वाघाचे-च्या-ची वाघात (हे वाघा)

**अनेक वचन**-वाघ वाघास वाघाला वाघातें वाघाना वाघानी वाघाही
वाघाशी वाघाहून वाघाचा–ची–चें वाघाचे–च्या–ची वाघात
( हे वाघानो ).

अर्थद्वारा वचनामध्यें या रूपाचा मेळ पुढीलप्रमाणें बसतो—

| **एकवचन** | **अनेकवचन** |
|---|---|
| वाघ | वाघ |
| वाघास–ला–तें | वाघास–ल –तें–ना |

| | |
|---|---|
| वाघानें वाघें | वाघानी वाघाशी–ही |
| वाघाशी | वाघाशी |
| वाघाहून | वाघाहून |
| वाघाचा–ची–चें इ | वाघाचा–ची–चे इ. |
| वाघात | वाघांत |
| ( वाघा ) | ( वाघानो ) |

या रूपदर्शनात नित्यपरिवृत्तिसह ( =सर्वथा समानार्थ ) रूपे एकाच विभक्तीत घातली आहेत अशा रूपाचा विचार करिताना त्यातील एकच रूप घेणें पुरे आहे. या एकाविषयी जे ठरेल तेंच इतरासही लागू पडेल अनुवाक ४ यास अनुसरून, सोईचें म्हणून, शेवटील संबोधनाची रूपेंही पुढील विवेचनात गाळून टाकू असा संक्षेप केल्याने कोणत्याही वचनात सात रूपें विचारार्ह ठरतात पैकी एकवचनाची रूपे अशी—

वाघ वाघास वाघाने वाघाशी वाघाहून वाघाची वाघात. याचा विचार केल्यानें, अनेकवचनाचे रूपाचा निराळा विचार करण्याचें प्रयोजन नाही, हें सागणें नकोच वरील सात रूपापैकी वाघाहून, वाघात, वाघाशी ही तीन रूपें विशेष विचारणीय आहेत

८ **हून-प्रत्यय**—ऊन व हून हे पचमीचे प्रत्यय म्हणून देतात. पैकी हून हे तर शब्दयोगी अव्यय मानणे योग्य होईल कारण—

( १ ) विभक्तिप्रत्ययाने शब्दाची वाढ झाल्यास प्रायः एकाच अक्षरानें होते, पण ‘ घराहून ’ येथें दोन अक्षरे वाढतात.

( २ ) वाघा-नें यातील भाग परस्परापासून विश्लेष्य नाहीत, तर वाघाहून यातील भाग तसे दिसतात ‘ वाघाहीहून ’ अशा रीतीने हून मागील भागापासून व्यवहितही होणेचा सभव आहे

‘ तयाहिहुनि उज्वल प्रकट कोण धामा करी ? । ’

अशा ठिकाणचा प्रयोग सापवाद दिसत नाही साराश ‘ हून ’ हा प्रत्यय न मानिता, शब्दयोगी अव्यय मानण्याकडे मनाची प्रवृत्ति होते.

९ **ऊन-प्रत्यय व पंचमीचें अस्तित्व**—ऊन-प्रत्यययुक्त रूपे भाषेंत काही आढळतात पुढून मधून समोरून खालून पासून ( =पार्श्वाहून ), घरून इ०

प्राथमिकार्थात योजिलेली सव्ययोत्पन्न रूपें, विशेषतः अवयवापासून बनलेलीं हातून, तोंडून ही–,ऊन-प्रत्ययान्त आढळतात एवच पचमीचे प्रत्यय दोन. त्यातील एक शब्दयोगी अव्ययात जमा होतो, दुसरा फक्त १०१५ उदाहरणात एकाच वचनात सापडतो अशा स्थितीत 'घरून'–सारख्या अत्यल्प रूपाकरिता मराठीमध्ये मानण्यात येणारी पचमी विभक्ति केवळ निष्प्रयोजन ठरते, तरीपण ती राहू देणे पुढील कारणास्तव इष्ट दिसते

१ ती आजपर्यंत मानण्यात आली आहे ( रूढिसमत )

२ ती राहिल्यानें कोणतीच प्रत्यक्ष हानि होत नाही. ( अनपकारक )

३ ती राहिल्याने विभक्ति–सज्ञाचा सार्थक्रम अबाधित राहण्यास मदत होते.

( सस्कृत-सवादी, सोईवार )

साराश–मराठीत पचमी मानण्यास जरी सबळ कारण नसलें, तरी ती काढून न टाकण्यास वरील चतुर्विध कारणे आहेत. यावरून ती मराठीत ठेवणें इष्ट दिसते

१० **वाधांत**—सस्कृतात 'जलस्य अन्तर्' ( =जलाचे पोटात,पाण्यामध्यें ) असा व्यस्त किंवा 'जलान्तर्' असा समस्त, प्रयोग एकाच अर्थात होतो. यातील 'अतर्' या अव्ययावरून मराठीतील 'आत' हा वर्णसघ आला आहे. हा प्रत्यय व अव्यय असा द्विविध असतो प्रत्यय असताना तो मागील शब्दास पूर्वरूपसधीचे नियमाने मिळतो व अव्यय असताना तो क्रियाविशेषण किंवा शब्दयोगी अव्यय असतो. येथे प्रश्न असा उद्भवतो की, घरात इत्यादि रूपें सप्तम्यन्त मानावी की शब्दयोगी-अव्ययान्त मानावी ?

आता अनुवाक ८-मध्ये दिसून आलेली शब्दयोगी अव्ययाची ( प्रत्ययनिवृत्त ) लक्षणे पुढील होत—

१ शब्दाची वाढ एकाधिक अक्षरानी होणें

२ मागील शब्द व शब्दयोगी अव्यय यामध्यें ऊनाधिक ( थोडें फार ) थाबण्याची शक्यता.

व ३ मागील शब्दापासून वेळेस तुटण्याचा शब्दयोगी अव्ययाचा धर्म. ही लक्षणें 'घरात' इत्यादि ठिकाणी मुळीच लागत नसल्यानें, या रूपात 'आत' हें विभक्तिप्रत्यय मानणें प्राप्त आहे

सारांश-व्युत्पत्तिदृष्ट्या पाहता 'आत' हें 'अतर्' या अव्ययावरून व 'हून' हें 'आमची वाट प्रयाग होऊन (=प्रयागाहून) काशीकडे वळली,' इत्यादि उदाहरणावरून 'होऊन' या पूर्वकालवाचकापासून निघालें आहे यातील आधुनिक मराठीतील परिस्थितीवरून शास्त्रदृष्ट्या घरात इत्यादि रूपात 'आत' हें प्रत्यय म्हणून, व 'हून' हे शब्दयोगी म्हणून, गणणे प्राप्त होतें पण येथें तत्त्वापेक्षा रूढि व सोय यास जास्त मान देऊन, 'हून' हेंही प्रत्ययात गणावे मात्र क्वचित्, 'तयाहिहुनि'-सारखा वडधटीन व्यवहित प्रयोग आल्यास तेथे हून हें शब्दयोगी अव्यय मानल्यावाचून गतिच नाही, हे उघड आहे. यावरून असें दिसतें की, व्युत्पत्तीला महत्त्व देणे ते ती वस्तुस्थितीला पोषक असेल तरच, रोधक असेल तर नव्हे.

११ **वाघाशीं** ही विभक्ती कोण?—सिंह (वाघासह=) वाघाशी लढतो इत्यादि प्रयोगात दिसत असल्याप्रमाणे, 'वाघाशी' हे नेहमीच व्युत्पत्ति व अर्थ या दोन्ही दृष्टींनी (व्याघ्रेण) = 'वाघाने'-हून सर्वथा भिन्न आहे अर्थात् अनुवाक ६-प्रमाणें ते निराळ्या विभक्तीचे मानणें प्राप्त आहे परंतु 'वाघाशी' वगैरे रूपात असणारा साहित्य किंवा सानिध्य हा अर्थ संस्कृतातील तृतीयेत संभवत नाही असें नाही कारण, 'रामः सीतया (सह) वनं गतः' इत्यादि ठिकाणी 'सह' चा लोप ऐच्छिक आहे असा लोप केला असता 'यः शिष्यते स लुप्यमानार्थभिधायी' या न्यायानें लोपलेल्या सह-चा अर्थ व्यक्त करण्याचें काम मागें शेष राहिलेल्या तृतीयेवर येऊन पडते त्यामुळें, एरवी नसलेला साहित्य किंवा सानिध्य हा अर्थ संस्कृतात तृतीयेचे गळी पडला आहे. तेव्हा (१) संस्कृताशी मिलाफ व (२) मराठी वैयाकरणाचे आनुकूल्य या द्विविध कारणास्तव 'वाघाशी' ही 'वाघानें' या रूपाबरोबरच तृतीया मानावी शिवाय तसें न मानिल्यास (१) वाघाशी-सारखी रूपें तृतीयान्य कोणत्या विभक्तीचे नावावर लादावी? हा नवीन प्रश्न समाधानकारकपणें सोडविण्याची नसती जबाबदारी उत्पन्न होणार, (२) त्यामुळे प्रस्तुत विभक्तिवाद सोपा न होता उलट अधिकच संकुल होणार, व त्याबरोबरच (३) तृतीया इत्यादि संज्ञा-तील क्रमाच्या कल्पनेची बहुधा पायमल्ली होणार सारांश-वाघाशी तृतीया मानिल्यास सोय, व न मानिल्यास गैरसोय होत असल्याने, अन्वय-व्यतिरेक या दोन्ही पद्धतींनी 'वाघाशी' हे 'वाघानें' याशी एकविभक्तिक ठरते. 'वक्षेण

सह' याचें मराठी अक्षरान्तर वस्त्रानिशी, इत्यादि थोड्या ठिकाणी आढळणारा जोडप्रत्यय निशी हा-ही शी-प्रमाणें तृतीयेचाच मानितात. वाघें ( व्याघ्रेण ) हें 'वाघानें'-याशी व्युत्पत्तितः यमल व अर्थतः अभिन्न असल्यानें समानविभक्तिक आहे, हें उघड आहे षष्ठीचा वाद प्रस्तुत द्वितीयालोपाचे वादात विचारणीय ठरत नाही.

येथपर्यंत केलेल्या विवेचनावरून पुढील व्यवस्था ठरते—

तृतीया—वाघानें, वाघें, वाघाशी

पचमी—वाघाहून.

षष्ठी—वाघाचा इ०

सप्तमी—वाघात

म्हणजे वाघ वाघास ( –ला–तें ) ही दोन रूपें, व प्रथमा, द्वितीया, चतुर्थी, या तीन विभक्ति, याची व्यवस्था लावणें शिल्लक राहिलें.

१२ **प्रथमा व द्वितीया** ( क ) **वाघ** गर्जना करितो ( कर्ता ), शिकारी **वाघ** किंवा **वाघास** पाहतो ( कर्म ), ( ख ) शिकारी **वाघास** तडाखा देतो [ सप्रदान ], ( ग ) शिकारी **वाघास** खड्डा खणतो [ प्रयोजन ], ( घ ) शिकारी **वाघास** गोळी मारितो, साखळदंड लावितो ( अधिकरण ).

इत्यादि ठिकाणावरून पाहता, वाघ हें रूप कधी कर्ता, तर कधी कर्म दर्शवितें, व वाघास हें रूप कधी कर्म, कधी सप्रदान, कधी प्रयोजन, अधिकरण, इत्यादि विविध अर्थ व्यक्त करितें

आता वाघ, वाघास या रूपद्वयास 'कर्म' हा अर्थ सामान्य असला तरी इतर अर्थ तसे नसल्यानें, ही रूपें आपसात भिन्नार्थक ठरतात. 'एका विभक्तीची' होण्यास रूपें **सर्वथा समानार्थक** असावी लागतात, परतु 'भिन्न विभक्तीची' होण्यास अशत. जरी भिन्नार्थक असली तरी चालतात.

'प्रमादात् प्रमादेन वा धन नश्यति' येथें प्रमादात् व प्रमादेन ही दोन रूपें हेत्वर्थक आहेत, तरी इतर बाबतीत समानार्थक नसल्यानें, ती भिन्नार्थ म्हणून भिन्न विभक्तीची गणिली जातात. प्रस्तुत दोन रूपापैकी वाघ हें कर्ता अर्थ दर्शवितें, हा अर्थ दुसऱ्या रूपास सामान्य नसल्यामुळें, वाघ ही प्रथमा होय व दुसरें रूप वाघास हें द्वितीया होय. ही व्यवस्था स्वाभाविक, सर्व समत, म्हणून प्रमाणातरानपेक्ष ठरते.

१४ **यथार्थ सामान्यरूप**–वाघ वाघास, केळ केळीला, वेळ वेळेचा, घोडी घोड्याना इत्यादि विभक्तिरूपात प्रत्ययग्राहक रूपे 'वाघा' 'केळी' 'वेळे' 'घोड्या' यास सामान्यरूपें म्हणतात, व तें योग्यही आहे कारण ही रूपें अनेक विभक्ति-प्रत्ययाना सामान्य आहेत. या रूपास सवादी म्हणून ( हत्ती ) हत्तीला, ( काका ) काकानें, या ठिकाणची हत्ती, काका ही रूपें जरी मूळरूपाशी सरूप आहेत तरी तीही प्रस्तुत ठिकाणी सामान्यरूपे म्हणून ओळखिली जातात. साराश–अनेक विभक्तिप्रत्यय घेणारें,–मूळरूपाशी सरूप वा विरूप जे शब्दरूप तें **सामान्यरूप** होय अशा अर्थानें सामान्यरूप ही सज्ञा या रूपात यथार्थ दिसते.

१३ **पंचविध ( ? ) सामान्यरूप**—( १ ) **वाघास** लाच उडी मारिता येते ( २ ) **वाघा** जिकू पाहे शश युक्तीनें, जरी न शक्तीने । ( ३ ) **वाघा**पुढे मनुष्य किती पळणार ? ( ४ ) हे **वाघा**, तुझे बळ कशात आहे ? ( ५ ) **नव्या** छत्रीचा मालक तू, माझे काम जुनीने भागेल येथें चार ठिकाणी वाघा हें रूप आढळते १–मध्यें ते शुद्ध ( Proper ) सामान्यरूप आहे २–मध्ये द्वितीया-प्रतिनिधी आहे ३–मध्ये ते शब्दयोगी अव्ययाच्या अर्थास जरूर असलेली ( अवधि किंवा ) मर्यादा दाखविणारें म्हणजे मर्यादक आहे ४–मध्यें ते सबोधन आहे ५–मध्ये नव्या हे पुढील प्रथमान्यविभक्तीशी समानाधिकरण आहे एवच 'वाघा' हा एकच चतुर्विध अक्षरसघ, व तत्सदृश 'नव्या' हा एकविध अक्षरसघ मिळून, सामान्यरूप पचविध आहे यातील सबोधन सोडून इतर चार ठिकाणची ही रूपे हल्लीप्रमाणें एकाच नावानें ओळखणे योग्य दिसत नाही. १–मध्यें तो पद नसून पदाचा केवळ एकदेश म्हणजे तुकडा आहे येथें सामान्यरूप ही संज्ञा योग्य आहे २–मध्यें विभक्तीचें कार्य करणारा, करिता विभक्तीपैकी अन्यतम सज्ञेसच तो योग्य आहे ३–मध्ये तो स्वतत्र रूप म्हणजे पद आहे, कारण तो पुढील **पुढें** या शब्दापासून विश्लेषक्षम आहे.

(दुर्वासा) शिष्य अयुतमित होते, गार्भिण्यापरि तया**हि**सह साजे । वन ८।३२. मरणार या**चि**पासुनि वरदर्पित खल निवातकवच रणी । ५-७८ इत्यादि ठिकाणच्या उदाहरणाप्रमाणें वाघाहिपुढे असाही प्रयोग साधु ठरेल. वाक्यात इतर शब्दाशी सव्ययाचे नातें दाखविणे हे विभक्तीचे कार्य आहे. आता मर्यादक असणें म्हणजेही शब्दयोगी अव्ययाशी नातें ठेवणेच होय;

व शब्दयोगी हा वाक्यगत शब्द आहे तेव्हा मर्यादक असताना, वाघा हें विभक्तिरूपच म्हणजे पद मानणें प्राप्त आहे ५-मध्ये नव्या हेंही पद आहे. ✓

१५ **पद व सामान्यरूप**—वाक्यात सव्यय येणार तें इतर शब्दाशी कोणत्या ना कोणत्या तरी नात्यानें,-कर्ता, कर्म इत्यादि रूपानें येणार हें वाक्यगत नातें दर्शविणारें रूप म्हणजेच विभाक्तिरूप किंवा पद. हें पुढील शब्दापासून तोडिता येते, व वाक्याचे घटक असतें वाघानें इत्यादि रूपातील सामान्यरूप 'वाघा' हे केवळ पद-प्रत्यय-ग्राहक, म्हणजे पदाचें घटक असल्यानें, तें पुढील वर्णसघापासून कधीही तुटत नाही. वाक्याचा घटक व पदाचा घटक हे जरी रूपतः यदृच्छेने सारखे असले तरी त्याची किमत एकच मानणें योग्य नाही हें सारूप्य केवळ यादृच्छिक, अंध आहे, अर्थमूलक, डोळस नाही धातुमूळरूप व आज्ञार्थ द्वि पु ए व ही दोन्ही जरी प्रायः सरूप असतात, तरी एकावर दुसऱ्याची संज्ञा लादीत नाहीत शिवाय हल्लीच्या रूढीनें सुद्धा **नव्या** छत्रीचा व **नवी**-नें या ठिकाणी भिन्नभिन्न रूपासही सामान्यरूप म्हणून ओळखितात पैकी 'नव्या' याचा उपयोग ( स्त्रीलिंग एकवचनात ) शुद्ध सामान्यरूप म्हणून विभक्तिप्रत्ययापूर्वी कधीच आढळत नाही अनेकवचनात, पदैकदेश असताना ते ( नव्यानी यातल्यासारखें ) सानुनासिक असतें, तर ( नव्या छत्र्यानी यातील ) पदभूत सामान्यरूप तसें नसतें, जसे-शाहण्यानी, शाहण्या लोकानी यावरून वर्तमान पद्धतीप्रमाणें पाहता पदभूत सामान्यरूप पदैकदेश सामान्यरूपाशी नेहमीच सरूप असत नाही साराश-वाघापुढें, वाघा जिंकितो, अशा ठिकाणी वाघा हें वाक्यघटक असल्यानें त्यास सामान्यरूप म्हणणे म्हणजे त्या सज्ञेची अर्थतः अतिव्याप्ति करणें होय तसेंच नव्या छत्रीनें, अशा ठिकाणी नव्या या रूपास सामान्यरूप म्हणणें म्हणजे त्या सज्ञेची रूपत. अतिव्याप्ति करणे होय अशा रीतीनें वाघा हें रूप वाक्याचा घटक असताना, पद म्हणजेच विभाक्तिरूप ठरतें, व प्रत्ययापूर्वी, ते पदाचा घटक असल्यानें, सामान्यरूप या सज्ञेस पात्र ठरतें

वाक्यात केव्हाही एखादा अक्षरसघ वाक्याचा तरी घटक असेल, किंवा पदाचा तरी असेल, दोन्ही नात्यानी एकदम तो असूं शकणार नाही, व यास अनुसरून त्यास काय तें एक म्हणावें. वाक्यघटक असल्यास, सव्ययाचे विकारास विभक्तिपदच मानणें प्राप्त आहे, त्यास स्थूलदृष्ट्या सामान्यरूप म्हणणें

म्हणजे आपणावरील वैयाकरण या नात्याची धूर्वाही टाळणें आहे पद-संमर्शात शब्दाचे सस्काराची, जातीची व वाक्यगत संबंधाची छाननी झालीच पाहिजे, तशी करणें नसेल तर हल्ली-इतकाही खटाटोप न करता, कोणताही शब्द 'सार्थ अक्षरसत्र' म्हणावा, म्हणजे तेवढ्यानेंही काम भागेल, कारण अक्षरसंघ ही सज्ञा कोठेही लावण्यास हरकत येणार नाही एवच वाक्य-घटक व पदघटक या दोहोंस एकच सज्ञा लावणे म्हणजे सू मदर्शित्वाचा अभाव व्यक्त करणें होय आता सूक्ष्मदर्शित्व हा तर व्याकरणाचा आत्मा आहे, तदर्थच व्याकरणशास्त्र प्रवृत्त झाले आहे करिता त्याचा लोप म्हणजे व्याक-रणावर 'मूले-कुठारः'-च होय

१६ **वाघा हे विभक्तिरूप आहे**—वरील विवेचनावरून 'वाघा' हें रूपही, वाक्यघटक असताना, विभक्ति ठरते. ही विभक्ति कोणती? अर्थात् राहिलेली म्हणजे चतुर्थी, हे ओघानेच येतें हिची वाक्यगत मुख्य नाती म्हणजे **शब्दयोगीची मर्यादा** व पुढील प्रथमान्य विभक्तीशी **सामानाधिकरण्य** ही होत पैकी संस्कृतात पूर्वत्र विभक्तिनियम नाही ग्राम प्रति, गामेण सह, तृप्तये अलम्, जन्मनः आ, वृक्षस्य उपरि, ग्रामे अन्तर् इत्यादि ठिकाणी शब्दयोगी-मर्यादक म्हणून प्रथमान्य वाटेल ती विभक्ति येते पण आताच सुचविल्याप्रमाणें हें कार्य करणारी मराठीत एकच विभक्ति ठरते. हा सस्कृताहून मराठीचा सोईचे दृष्ट्या उघडउघड उत्कर्ष आहे भल्या माणसानें इत्यादि ठिकाणी असलेल्या भल्या पदाची विभक्ति माणसानें याहून भिन्न कशी मानणार? असा दोष सामान्यरूपाचे पुरस्कर्ते आणतील, त्यास उत्तर आहे

१७. **सामान्यरूप**—वरील प्रश्नाचें उत्तर प्रश्नातरानें देता येईल प्र०—'तुम्ही भल्या-ची विभक्ति कोण मानिता?' उ० "आम्ही, सामान्यरूपाचे पुरस्कर्ते, कोणतीच विभक्ति मानीत नाही, केवळ त्यास सामान्यरूप म्हणून मोकळे होतों. अहो, त्यास प्रथम विभक्तिपद म्हणा, नतर कोणती विभक्ति हें ठरवा, इतक्या भानगडीत पडतो कोण?". पण ही धूर्वाहीची उडवाउडव वैयाकरणास शोभत नाही, करिता 'भल्या' याचा स्पष्ट निकाल लागलाच पाहिजे.

वाक्यगत तिसऱ्या पदाशी समान नाते ठेवणाऱ्या व एकच वस्तु (=अधि-करण) दाखविणाऱ्या अशा दोन समानाधिकरण शब्दाची विभक्ति समान असावी हें स्वाभाविक दिसतें संस्कृतात नेहमी अशीच स्थिति असते

'भ्रात्रा सौमित्रिणा सार्धं रामः कौशिक मन्वगात् ।'

इत्यादि ठिकाणी हा नियम नित्य पाळला जातो ( भ्रात्रा व सौमित्रिणा दोन्ही तृ आहेत. ) तसा तो मराठीतही असावा. मग 'भल्या माणसानें' यातील विभक्तिविसवाद कसा ग्राह्य धरावा ?

सामान्यरूपवादी – वरील वाक्यात भल्याची विभक्ति कोणती ?

उत्तर—( १ ) अगोदर सामान्यरूपास ( तें विभक्तिप्रत्ययापूर्वी, शब्दयोगी अव्ययापूर्वी, प्रथमान्य विभक्तिरूपापूर्वी, स्वतंत्र विभक्तिरूपस्थानी इ विविध विजातीय स्थानी येतें असें म्हणून ) कोणतीही बंधने न मानणाऱ्या लोकानी असा प्रश्न विचारणे म्हणजे, उपास मुळीच न करणाराने, उपास करणारास 'तुम्ही निरशन करीत नाही, केवळ धान्यफराळच करिता' असे म्हणून नावे ठेवण्यासारखे धाडसाचें आहे साराश—सामान्यरूपाचे पुरस्कर्त्यास 'भल्या'–ची चिकित्सा करण्याचा अधिकारच नाही

( २ ) हल्लीच्या व्यवस्थेंतही समानाधिकरण पदात विभक्तिविसवाद पत्करावा लागतोच मराठी भाषेची सरणीच तशी, तिला काय करणार ? इतर भाषाहून या बाबतीत ती निराळी ठरत असेल तर, तो तिचा विशेष होय सर्वच भाषाची व्याकरण-व्यवस्था सारखीच ठरती तर व्याकरण सर्वास सारखें लागलें असतें पण 'मूर्ती तितक्या प्रकृती' या न्यायानें विशिष्ट भाषा परस्परापासून काही बाबतीत भेद पावतात, हे भेद नमूद करणें वैयाकरणाचें कामच आहे. तेव्हां समानाधिकरण पदातील क्वाचित्क विभक्तिविसवाद मराठी वैयाकरणानी पतकरिलाच पाहिजे 'हे शिखडिनी, कोणी तुला शिखंडी केलें ?' या व्याक्यात ( शेवटील तिन्ही किंवा ) उपान्त्य दोन शब्द एकच व्यक्ति दर्शवितात, करिता त्यात विभक्त्यादिसवाद सामान्यतः पाहिजे, परंतु 'शिखडी-चा' 'तुला–शी' लिगविभक्तिभेद आहे, (तर केले–शी लिगभेद आहे),पैकी शिखडी व तुला यातील लिगभेद, दोहोंपैकी कोणीच विशेषण नसल्यानें, अपरिहार्य असला तरी त्याचा विभक्तिभेद समर्थनीय नाही, तरी प्रयोगानुरूप ग्राह्य ठरतो याच धर्तीवर पुढील समानाधिकरण पदापासून भिन्नविभक्तिक असलेल्या 'भल्या' या शब्दाची चतुर्थी क्षम्य ठरते. यावरून , 'प्रथमान्य पदाशी समानाधिकरण' हा एकचतुर्थ्यन्त पदाचा प्रधान अर्थच ठरतो 'तुला कारभारी कोणी नेमिलें ?' इत्यादि प्रयोग भृशप्रयुक्त आहेतच **कैकेयी** या लाडक्या भार्येनें दशरथाला विनति केली.–

इत्यादि वाक्यातल्याप्रमाणें उद्देशार्थी प्रथमा ही कोणत्याही विभक्तीशी समानाधिकरण असू शकते, हें सर्वसमत आहेच

१८. **चतुर्थी ही सामान्य विभक्ति**—सव्ययाविषयी बोलताना काही ठिकाणी तदुक्त वस्तूच्या संख्येची माहिती नसल्यानें, किंवा लिंगाचा निश्चय नसल्यानें, वचन व लिंग याविषयी मोघम विधान करावें लागतें अशा वेळी मोघम वचन म्हणून अनेकवचनाचा उपयोग करण्यात येतो, मोघम लिंग म्हणून पुलिंग किंवा स्त्रीलिंग यापैकी कोणाचाच उपयोग न करिता, निराळेंच लिंग, नपुसकालिंग—याचा प्रयोग करतात. [ रामभट व धोंडभट याची गाठ पडली रामभटाला मुले (एक वा अनेक) असावी, यातील काही, शून्य किंवा सर्व पुलिंगी किंवा स्त्रीलिंगी असणार, तदन्यलिंगाची असणें शक्य नाही या धोंडभटाचे यथार्थ मताप्रमाणे मुलाची संख्या अनिश्चित, व त्याचे लिंगही अनिश्चित अशा स्थितीत ] धोंडभट प्रश्न विचारतो, " अहो रामभट, तुम्हाला **मुलें** किती ?" यातील मुले हा शब्द नपुसकलिंगी व अनेकवचनी आहे यावरून उघड होतें की नपुसकलिंग व अनेकवचन ही सामान्य लिंगवचनें होत सव्ययाचे रूपविकार तीन—लिंग, वचन व विभक्ती पैकी लिंगवचनें सामान्य आहेत, तशीच विभक्तिही सामान्य असणे असभाव्य नाही अनेक विभक्तींची कार्यें वेळेस बजावणें हें काम सस्कृतात षष्ठी करितेच तिचीच मराठीतील सतति चतुर्थी, ही आईचे वळणावर गेल्यास त्यात विलक्षण असें काहीच नाही

भजे शभोश्**चरणयोः** ( द्वि ) **मम** (तृ ) सेव्यो हरिः, **भरतस्य** ( च ) राज्य यच्छति, **व्याघ्रस्य** (प )भयम्, **गंगायाः** (स ) जलम्—इत्यादि ठिकाणी षष्ठी ही प्रायः सार्वविभक्तिक कार्य करणारी आहे याच धर्तीवर मराठीत चतुर्थीही इतर विभक्तींचे कार्य करणारी, किंवा त्याशी सामानाधिकरण्य बाळगणारी असणें अगदी साहजिक आहे साराश—अशा रीतीनें अनेक विभक्तींचे कार्य करणारी म्हणून, सस्कृतात षष्ठीला जें स्थान आहे, तेंच स्थान पूरित करणाऱ्या विभक्तीची मराठीतील उणीव पद्भूत सामान्यरूप चतुर्थी मानिल्यानें उत्तम प्रकारें भरून निघते.

### १९ चतुर्थीपदाचे व्याकरण—

१ कालिया **यदुनाथा** लक्षी [ चतुर्थी, अर्थ कर्म ]

२ **मुर्खा-पुढें** वाचली गीता [ चतुर्थी, पुढें-ची मर्यादक ]

३ **जुन्या** तादुळाचा भात सुपच असतो **भल्या** माणसानें ( विशेषण,चतुर्थी, पुढील प्रथमान्यविभक्त्यन्त विशेष्याशी समानाधिकरण )

४ **गांगेया** कुरुंनी, विचार करूनी, सेनापती योजिलें।( चतुर्थी–विकार्य कर्म. ‘ सेनापती ’ प्रथमा, निर्वर्त्य कर्म )

५ **त्याच्या**-पुढें ( षष्ठ्यन्ताची चतुर्थी, पुढें--ची मर्यादक )

‘षष्ठ्यन्ताची चतुर्थी’ ही भाषा विलक्षण मानण्याचे कारण नाही. त्याच्यानें इत्यादि ठिकाणी ‘ षष्ठ्यन्ताची तृतीया ’ सर्वसमत आहेच अशा ठिकाणी षष्ठ्यन्त केवळ विशेषणतुल्य होय, व विशेषण वेळेस नामाप्रमाणें वाटेल ती विभक्ति घेतें, हें सर्वमान्य आहे ( मनीचा गर्व–यात सप्तम्यन्ताची-षष्ठी आहेच )

६ **शाहण्या** मुलीनें किंवा मुलानी ( विशेषण चतुर्थी पुढील स्त्री ए. व, किंवा न अ व प्रथमान्य विशेष्याशी समानाधिकरण )

७. **तुम्हा** पुरुषाचा ( द्वि पु सर्वनाम, चतुर्थी अनेकवचन, पुढील प्रथमान्य नामाशी समानाधिकरण ).

८ **वीरा** पुरुषाने ( नाम, चतुर्थी एकवचन, पुढील पुरुषानें–शी समानाधिकरण. )

९ **वीरां** पुरुषानी ( नाम चतुर्थी अ व, पुढील पुरुषानी–शी समानाधिकरण )

यावरून उघड होतें की, ( १ ) नामाची किंवा सर्वनामाची चतुर्थी वचनभेद दर्शविते. परतु विशेषणाची चतुर्थी, वचनभेद तर नाहीच पण लिंगभेदही दर्शवीत नाही ( २ ) विशेषणास, आकारान्त असल्यास, प्रायः दोन विभक्ति असतात,- प्रथमा व चतुर्थी

२०. वरील विवेचनाचें **निगमन**—

( १ ) सस्कृतातील विभक्तिव्यवस्था—

**विभक्तिर्वचनैक्ये यद्रूपं भिन्नार्थमन्यतः, ।**
**परिवृत्तिसहे नित्यं रूपे तुल्यविभक्तिके, ।**
**संवादार्थं च लिंगादौ एकं नैकविभक्तिकम् ॥ १ ॥**

**अर्थ**—( क ) एकाच वचनात जें-जे रूप दुसऱ्याहून भिन्नार्थक तें-तें स्वतंत्र विभक्तीचें गणावें ( ख ) जी रूपें ( कारकदृष्ट्या सर्वथा तुल्यार्थ असल्यानें) एकमेकाचे स्थानी योजिता येतात ती एकाच विभक्तीची समजावी (ग) सर्व लिंगें व सर्व वचनें यात मेळ राखण्याकरिता, एकच रूप अधिक विभक्तींचें मानावें

( २ ) वाघास, वाघाला, इत्यादि द्वितीयेची गणलीं जाणारी रूपें सर्वथा समानार्थक अथवा नित्यपरिवृत्तिसह असल्यानें, ती एकाच विभक्तीची-द्वितीयेची ठरतात

( ३ ) **वाघें** हें रूप सर्वथा तुल्यार्थक असल्यानें, पण **वाघाशीं** तसें नसूनही रूढीखातर, **वाघानें**-याशी तुल्यविभक्तिक-तृतीयान्त गणलें जातें

( ४ ) वाघाहून-मधील ' हून ' हें कार्यत. शब्दयोगी अव्यय आहे, व ऊन हा प्रत्यय बहुधा ' धरून ' 'तोंडून' इत्यादि अत्यल्प सव्यय-उदाहरणात आढळतो, म्हणून मराठीत पचमी शशशृगवत् अविद्यमान ठरते तरी पण रूढीस अनुसरून मराठीत तिचे अस्तित्व मानावें

( ५ ) **वाघांत** यातील शेवटला भाग जरी **अंतर्**-पासून निघालेल्या **आंत** या अव्ययाचेच प्रच्छन्न रूप आहे, तरी एरवी तो प्रत्यय-समानच वागत असल्याने, वाघात ही विभक्तिच [ सप्तमी ] मानावी

( ६ ) वस्तुस्थितीला पोषक असेल तेथेंच व्युत्पत्तीला महत्त्व, रोधक असेल तेथें मुळीच नाही

( ७ ) शब्दयोगी अव्ययाची विशिष्ट लक्षणें—

[ क ] एकाहून अधिक अक्षरानी मागील रूपाची वाढ करणें

[ ख ] मागील रूपाला घट्ट चिकटून नसणें

[ ग ] मागील रूपापासून ' ही ' वगैरे अव्ययानी कधी कधी व्यवहित होणें

( ८ ) सव्ययाच्या वाक्यगत रूपास विभक्ति-सज्ञा देताना रूढि, वैयाकरणाचा विरोध-परिहार, व संज्ञाचा अर्थनिर्वाह याकडे लक्ष्य दिलें पाहिजे.

( ९ ) विभक्ति मूलतः रूपाधिष्ठित असल्यानें, एक रूप एकाच विभक्तीचें असतें, जरी त्यानें भिन्न-भिन्न अर्थ दर्शविले तरी, तसेंच समानार्थक नसलेली रूपें भिन्नविभक्तीची, जरी त्यानी **वेळेस** एकच अर्थ दर्शविला तरी जसें—**वाघ**

ओरडतो [ प्रथमा, कर्ता ], मी **वाघ** ( प्रथमा कर्म ) किंवा **वाघास** [ द्वितीया कर्म ] पाहतों **सर्वथा समानार्थक रूपे नित्य एकाच विभक्तीचीं**

( १० ) सामान्यरूप हे विभक्तिपदाचें घटक आहे, तर विभक्तिरूप हें वाक्याचें घटक आहे

( ११ ) सामान्यरूप हें पद-घटक म्हणून प्रवृत्त झालें असल्यानें, त्यास पद गणणें योग्य नाही

( १२ ) वाक्यगत इतर शब्दाशी नाती दर्शविण्याकरिता जी रूपें सव्यय धारण करिते, ती विभक्तिरूपें होत

( १३ ) **वाघा** इत्यादि रूपे पाच प्रकारची आढळतात—

वाघानें, वाघा पाहतों, वाघापुढें, हे वाघा, वाघा यमास पाहुनि—येथें क्रमानें सामान्यरूप, द्वितीयादि—विभक्त्यर्थ—निर्वाहक, मर्यादक, सबोधन व प्रथमान्य-समानाधिकरण ही कामे ' वाघा ' हें रूप बजावितें

( १४ ) समानाधिकरण असलेले शब्द नेहमीच समान विभक्तीत असतात असा नियम मराठीत दिसत नाही ( जसे—नकुल **कुंतीस आई** म्हणतो, दशरथाच्या **राम** या **मुलानें** वनवास स्वीकारिला )

( १५ ) वाघ शब्दाची विभक्तिरूपें—

| | ए व | अ. व | अर्थ |
|---|---|---|---|
| प्रथमा | वाघ | वाघ | कर्ता, कर्म, प्रमाण, उद्देश इ |
| द्वितिया | वाघास—ला—तें | वाघास-ला-ना तें | कर्म, सप्रदान, निमित्त, अधिकरण इ० |
| तृतीया | वाघानें-वाघें-वाघाशी | वाघानी—ही—शी | कर्ता, करण, साधन, सानिध्य इ० |
| चतुर्थी | वाघा | वाघा | कर्म, मर्यादक, प्रथमान्य-समानाधिकरण |
| पचमी | वाघाहून | वाघाहून | अपादान, तुलना, उपमान |
| षष्ठी | वाघाचा—ची इ | वाघाचा—ची इ. | संबध, अधिकरण |
| सप्तमी | वाघात | वाघात | अधिकरण |
| संबोधन | वाघा | वाघानो | संबोधन |

## द्वितीयावादाचे आनुषंगिक विचार.

२१. **उक्तीचा कृतीशीं मेळ**—हल्ली संस्कृताशी परिचय वाढत असल्यानें, प्रथमा, द्वितीया हे शब्द उच्चारताच, त्यातील गर्भित क्रम मनात आल्याशिवाय रहात नाही करिता ही क्रमाची भावना, विभक्तिरूपात संज्ञा देताना निर्बाध राखणें इष्ट आहे. याकरिता एक तर ( सप्तमी ही विभक्ति-संज्ञा सर्वसंमत म्हणून राहणार असल्यानें, ) सात विभक्ति व त्याचीं क्रमवार नावें राखणें यावच्छक्य जरूर आहे, नाहीतर ही नावें टाकून दुसरी काही बोधशून्य नावें विभक्तीस देणें जरूर आहे. पैकी उत्तरोक्त प्रकार जोंपर्यंत प्रवृत्त होत नाही व होणेंचें तादृश प्रयोजनही दिसत नाही, तोंपर्यंत विभक्तीची सात ही संख्या, व त्याचा अन्वर्थक्रम, दुसरा कोणताही मोठा दोष येत नसेल तर, राखणें जरूर आहे अन्यथा विभक्ति क्रमानें असावी पाचवी आणि तिला म्हणावें [ षष्ठी म्ह ] सहावी, असें झाल्यानें दौरात्म्य पदरी यावयाचें 'मनस्यन्यद्वचस्यन्यत्कार्यमन्यद्दुरात्मनाम् । ' ही उक्ति प्रसिद्धच आहे डिसेंबर हा इंग्रजी महिना अर्थतः १०–वा पण रूढितः १२-वा आहे

२२ **व्युत्पत्तीला महत्त्व**—ती विचारसरणिला पोषक असेल, तेव्हाच यावें, केवळ अमुक रूप विशिष्ट संस्कृत रूपाची छाया म्हणून त्या दोहोंमध्यें विभक्तीचा अभेद मानणे योग्य नाही व्युत्पत्तीला अशा रीतीनें महत्त्व दिल्यास [ स व्याघ्रस्य–षष्ठी इची रूपें घेऊ ] वाघास ही षष्ठी मानावी लागेल साराश-व्युत्पत्तीनें आपली तर्कशक्ति निगडित होऊ देऊ नये

२३. **लोपली कोण, द्वितीया कीं चतुर्थी** ?—संस्कृतातून मराठी भाषा निघाली ती सामान्यतः प्राकृताच्या द्वारे या प्राकृतात षष्ठीने चतुर्थीला खाऊन टाकिलें आहे अर्थात् त्या षष्ठीचे पोटातून ( व्याघ्रस्य ) वाघास या–सारखी मराठीत आलेली रूपें व्युत्पत्तितः चतुर्थीची ठरतलि, तरीपण त्याचा साप्रत मराठींतील उपयोग पाहून तदनुसारच त्यास सज्ञा दिली पाहिजे रूपाचे व्युत्पत्तीकडे न पाहता, त्याचे मराठीतील कार्यालाच महत्त्व दिलें पाहिजे. ' कि जन्मना ? ' ही उक्ति प्रसिद्धच आहे ' शिकारी वाघ सोडितो ' किंवा ' वाघास सोडितो ' इत्यादि ठिकाणी ' वाघास ' हें रूप जर प्रथमेच्या ' वाघ' या रूपाशी अर्थदृष्ट्या समान आहे, तर तें जवळच्या द्वितीयेचेंच, दूरच्या

चतुर्थीचे नव्हे, मानणे योग्य होईल. शिवाय कर्त्याचे खालोखाल कर्माचें महत्त्व असल्यानें, त्याच्या विभक्तीही क्रमानें जवळजवळ असाव्या, हें ओघानेच येतें. **वाघास** हे प्रस्तुत वाक्यात कर्मच आहे संस्कृतातलि विभक्तीचा क्रम त्याचे अर्थाचे महत्त्वास अनुसरून लाविला आहे, हें सहज अनुमेय आहे करिता लोपली मानावयाचीच तर ती चतुर्थी, द्वितीया नव्हे कर्म हा अर्थ व्यक्त करण्याचा मान द्वितीयेचाच आहे साराश, व्युत्पत्तीने परवान् बनून, पदोपदी तिचा परवाना मागत बसू नये

२४ **द्वितीयेचा लोप** समर्थित करण्याम "सस्कृतात द्वितीया काही नामाची राहिली होती, **पुष्कळांची** लोपली होती, करिता सस्कृतात केवळ ती सोईकरिता मानिली" इ० रा अपटे-कृत विधानें गणितापुढें टिकत नाहीत द्वितीया प्रथमेशी सरूप असते ती एका नपुंसकलिगात बाकीच्या दोन्ही लिगात त्या विभक्ति ठणठणीतपणें परस्परभिन्न आहेत तेव्हा रा. अपटे याचें विधान वस्तुस्थितीला विरुद्ध आहे सस्कृतात द्वितीया काही नामाची लोपली आहे, **पुष्कळांची विद्यमान** आहे करिता सस्कृतात द्वितीया लोपली हें विधान गैरहिशेबी अतएव त्याज्य होय उलट चतुर्थीच मध्यवर्ती प्राकृतात लोपली हें सर्वसमत आहे.

२५ **विभक्ति या शब्दाचा अर्थ**-सस्कृतात वाक्यगत इतर शब्दाशी भिन्न-भिन्न सबध दर्शविण्याकरिता माला हा शब्द अनेक रूपात आढळतो. या रूपाची **वांटणी**, त्याच्या अर्थास किवा अर्थसंघास अनुसरून तीन-तीन वचनात केली जाते, व त्यामुळें **इतरांपासून ऊनाधिकांशानें भिन्नार्थक पण आपसांत सर्वथा अभिन्नार्थक** अशा रूपाचे वचनानुसार निरनिराळे समूह तयार होतात या समूहास विभक्ति म्हणतात. म्हणजे कोणतीही विभक्ति घ्या, तिची रूपें परस्पराशी सर्वथा समानार्थक, पण इतरापासून थोडीफार तरी भिन्नार्थक, अशी असणार वि-भज् या धातूस 'ति' हा प्रत्यय लागून 'विभक्ति' हा शब्द बनला आहे, त्याचा अर्थ वि-भज् धातूनें दार्शित क्रियेचा परिणाम किवा फल असा होतो साराश—अर्थतः **रूपें वांटून बनविलेले समूह** असा विभक्ति शब्दाचा अर्थ आहे. पागोटें बाधणें, कोट शिवणें इत्यादि ठिकाणाप्रमाणें प्रस्तुत ठिकाणीही, विभक्ति अथवा रूपसमूह हें विभजन क्रियेचें निर्वर्त्य कर्म आहे. असो, या

भिन्न भिन्न विभक्तिरूपात एखादें माला-सारखें रूप प्रत्ययरहितही असू शकेल. त मूळ शब्दाशी सरूप असूच नये असा आग्रह चालणार नाही. एखाद्या प्रत्ययान्त रूपापासून जसें तद्भिन्नप्रत्ययात रूप निराळे, तसेंच प्रत्यय-रहित निराळें निराळेपणास प्रत्ययभेदच असला पाहिजे, असे नाही. अशा रीतीनें सप्रत्यय रूपाबरोबर माला हें रूप अप्रत्यय असूनही विभक्तीचे सदराखाली येणें यात काहीच गैर दिसत नाही. करिता ' अप्रत्यय विभक्ति शक्यच नाही ' हें व्याकरणप्रबोधकाराचें विधान अप्रबुद्ध आहे संस्कृतातही जर अप्रत्यय विभक्ति, ढळढळीत डोळ्याळा दिसते ( माला, वारि, मरुत् इ. रूपें पहा ) तर मराठीतच असा निर्बंध का असावा, की तीत विभक्ति सप्रत्ययच असली पाहिजे ? शिवाय खाब, वाघ, सुतार, तेली, कोळी, माळी, इत्यादि हजारों रूपे, मूळ रूपाशी सरूप असलेली दिवसा-ढवळ्या मराठीत वावरत असता त्याकडे डोळेझाक करून मराठीत विभक्ति सप्रत्ययच असली पाहिजे हे म्हणणे ' कोण जाणता साहे ? '

२६ **विभक्ति रूपश्रित कीं अर्थाश्रित** ?—याचे उत्तर आतापर्यंत केलेल्या विवेचनात आलेच आहे १ ऊनाधिकाशाने ' अन्यतो भिन्नार्थक ' ( अर्थात् वचनभेद सोडून ) जितकी सव्ययाची रूपें तितक्या विभक्ति २ भिन्न-भिन्न वचनात, लिंगात व शब्दात, विभक्ति कमजास्त भरतील तर अर्थानु-सधानाने कमी विभक्तीच्या जागी जास्त विभक्ति मानाव्या. अशा रीतीने रूप-भेद, अर्थभेद व सवाद या तीन तत्त्वावर विभक्तिव्यवस्था प्रतिष्ठित आहे.

२७ **विभक्तीचे वचन कीं वचनाची विभक्ति** ?—विभक्तीचे पोटात वचन की उलट प्रकार ? विभक्ति म्ह वाक्यगत शब्दातराशी भिन्न भिन्न नाती दर्शविणारे एखाद्या सव्ययाचे रूप, वचन म्हणजे वस्तूची एक किंवा अधिक संख्या दर्शविणारे रूप, परिस्थित्यनुरूप सख्या कायम ठेवून नातें बदलणें व नातें कायम ठेवून सख्या बदलणें, यातील पहिली स्थिति पुरोगामी होय झाडें उगवली, झाडास फुलें आली, झाडानी छाया केली, इत्यादि ठिकाणी वस्तू त्याच, मात्र वेळोवेळी त्याचा व्यवहार निराळा. उलट—झाड लावलें, झाडें लाविली, इत्यादि ठिकाणी व्यवहार तोच, पण वेळोवेळी वस्तूच कमजास्त होतात यातील पहिला सोपा दिसतो, प्रथम वस्तूची सख्या ठरली म्हणजे मग त्याचे निरनिराळे प्रथम वस्तु, मग व्यवहार, म्हणजे

वचन अगोदर, विभक्ति नंतर. साराश, वचनाचे पोटात विभक्ति मानावी, हें अर्थदृष्ट्या विहित दिसतें.

माळेस–माळास येथे नातें कायम, तर माळाना-माळानी येथें सख्या कायम पहिल्या जोडीतील रूपापेक्षा दुसऱ्या जोडीतील रूपात साधर्म्य अधिक आहे का बरें असावे ? त्यात वचन कायम आहे म्हणून. साराश--एकाच विभक्तीतील रूपापेक्षा, एकाच वचनातील रूपात सारूप्य अधिक सापडते, म्हणजे वचनाचा विकार झाल्यानंतर, तो थोडाबहुत कायम राहून, भिन्न-भिन्न विभक्तीत भिन्न-भिन्न प्रत्यय लागतात संस्कृतातही रामम् रामौ रामान् अशा एकाच विभक्तीच्या भिन्न वचनरूपात काहीच विकारसाम्य सापडत नाही सर्वेभ्यः- सर्वेषाम्--सर्वेषु अशा एकाच वचनाच्या भिन्न विभक्तिरूपात बरीच समता आहे, यावरून रूपदृष्ट्याही वचनविभक्तीचें पौर्वापर्य सिद्ध होतें. करिता 'चतुर्थीचें अनेकवचन' असा प्रयोग न करिता 'अनेकवचनाची चतुर्थी' असा प्रयोग करावा. वचनालाही स्वतंत्र प्रत्यय असतात घोडा घोडे इत्यादि ठिकाणी कदाचित् कोणी 'ए' हा प्रथमेच्या अनेकवचनाचा प्रत्यय म्हणेल, तर तो तसा नसून नुसत्याच अनेकवचनाचा आहे, हें वरील विवेचनावरून सहज पटण्यासारखें आहे.

२८ **इत्यर्थ**—अशा रीतीनें माझे मतें, मराठीत द्वितीयेचें व चतुर्थीचेही अस्तित्व सम्यक् सिद्ध होतें. द्वितीया ही कोणत्या ससागी मनुष्यास इष्ट व आवश्यक नाही ? करिता तिच्या रक्षणार्थ केलेला हा विचारोपन्यास सर्वसंमत होईल अशी आशा आहे हा विभक्तिवाद फार जुना आहे मराठी व्याकरणाचे जन्मापासूनच हा बहुधा चालू आहे तो सोडविण्याचा माझा हा यथामति प्रयत्न आहे या वादाचे निर्णयास साहाय्य व्हावें म्हणून यावर विद्वानानी आपले अभिप्राय व्यक्त करावे, एतदर्थ हा त्याचेपुढें मी माडीत आहें

## द्वितीया–वादाचें सार

२९. (१) संस्कृतातील विभक्तिव्यवस्था पाहिल्यास असें दिसतें की, एखाद्या शब्दाची वाक्यगत रूपें जेवढी **सर्वथा तुल्यार्थक**, तेवढी एकाच विभक्तीची मानावी, जसें–मत्यै,-मतये, मात्र सर्व लिंगाचा व वचनाचा मेळ राखण्याकरिता, एकच रूप एकाधिक विभक्तीचें मानावें; जसें–वनम् हें नपुसकलिंग रूप, रामः व रामम् या पु रूपाशी संवाद राखण्याकरिता, प्रथमा व द्वितीया

या दोन विभक्तींचें मानितात. अशा दृष्टीनें वाघास–वाघाला ही रूपें नित्यपरिवृत्तिसह, म्हणजे नेहमी परस्पराबद्दल येणारी, म्हणजेच सर्वथा तुल्यार्थक असल्यानें, एकाच विभक्तीची होत, वाघानें व वाघे हीही याच कारणाकरिता एकविभक्तिक ठरतात

( २ ) ही संस्कृतातील व्यवस्था–मराठीकरिता आदर्शभूत म्हणून घेतली जाणारी–पुढील पद्यानें सागता येईल—

**विभक्तिर्वचनैक्ये यद्रूपं भिन्नार्थमन्यतः ।**
**परिवृत्तिसहे नित्यं रूपे तुल्यविभक्तिके ।**
**संवादार्थं च लिंगादौ एकं नैकविभक्तिकम् ॥**

( ३ ) प्रथमा, द्वितीया इ. सज्ञातील क्रमाला बाध न यावा म्हणून विभक्ति सात राखणें, व त्याचा क्रम त्याचे नावाप्रमाणें ठेवणें या दोन गोष्टी यावच्छक्य साधाव्या

( ४ ) रूढीस मान देऊन, वाघानें व वाघाशी ही रूपें जरी भिन्नार्थक आहेत तरी एकविभक्तिक मानावी. ‘घरून’ सारखी खरी पचम्यन्त रूपें अत्यंत विरलप्रयुक्त असली तरी, पचमी विभक्ति रूढि व सज्ञाक्रमानुकूल्य या दोन कारणास्तव मराठीत राखणें प्राप्त आहे कोणतेंही रूप प्रायः एकाच विभक्तीचें मानणें प्राप्त असल्यानें, वाघास इ. रूपें एकाच म्हणजे द्वितीया विभक्तीचीच होत

( ५ ) वाघ व वाघास ही रूपें एकाच म्हणजे कर्माचेच अर्थानें **नियमानें** उपयोगिली जात नसल्यानें, ती भिन्न विभक्तीची होत

( ६ ) हल्ली सामान्यरूप या संज्ञेने ओळखिलें जाणारें रूप बहुविध आढळतें, तें मुख्यतः दोन नात्यानीं–पदघटक म्हणून,व स्वता पद म्हणून पैकी पदागभूत असताना मात्र तें खरें सामान्यरूपः;इतरत्र,पदाचें कार्य करीत असताना, म्हणजे शब्दयोगींचें नियामक, इतर विभक्तीचा प्रतिनिधि, किंवा प्रथमान्यविभक्तिरूपाशी समानाधिकरण असताना-तें विभक्तिरूप मानणें प्राप्त आहे. कारण विभक्तिरूपाची व्याख्याच अशी आहे कीं–**वाक्यगत ,इतर शब्दांशीं सद्ययाचें नातें दाखविणारें रूप.** अशा दृष्टीनें आज सामान्यरूप ज्यास म्हणतात तें जेव्हा-जेव्हा स्वयपद असेल तेव्हा-तेव्हा कोणत्या तरी विभक्तीचें मानणे प्राप्त

आहे. इकडे वाघास इ. रूपे केवळ द्वितीयेची ठरत असल्यानें, चतुर्थी ही संज्ञा रिकामी पडते, करिता ही विभक्ति व वरील आजपर्यंत सामान्यरूप म्हणून गणिली जाणारी वाघा-सारखी वाक्यगत रूपें यांचें समीकरण ओघानेंच प्राप्त होतें, म्हणजे पदभूत सामान्यरूप हीच चतुर्थी होय.

( ७ ) शिवाय-मराठी भाषेंत सामान्यलिंग म्हणजे नपुंसकलिंग, सामान्य-वचन म्हणजे अनेकवचन, अगोदरच व्याकरणसंमत आहेत. सव्ययाचे तीन विकारापैकी जर दोन विकारामध्यें सामान्योपयोगी संज्ञा विद्यमान आहे तर तिसऱ्या विकारातही तशी असणें रास्त आहे. आजपर्यंतच्या व्यवस्थेप्रमाणें, सामान्यरूप हें प्रथमाभिन्न वाटेल त्या विभक्तीचे कार्य करू शकतें हें सर्वसंमतच आहे, म्हणजेच सामान्यरूप सार्वविभक्तिक आहे, किंवा तें सामान्यविभक्ति आहे, हेंच पर्यायानें म्हटल्यासारखे होतें हा पर्यायाचा पडदा बाजूस सारला म्हणजे वरील विधानाचा अर्थ आपले विधानास मिळता होतो. साराश-चतुर्थी ही संस्कृतातील षष्ठीप्रमाणें मराठीतील सामान्यविभक्ति होय. अशा रीतीनें सामान्य लिंग व वचन याचे पक्तीत विभक्तीचाही प्रवेश होतो, हें योग्यच आहे.

( ८ ) **सारांश**—वाघ हा शब्द घेतल्यास त्याची विभक्तिव्यवस्था पुढील-प्रमाणें दर्शविता येईल वाघ प्रथमा, वाघास-ला द्वितीया, वाघानें-शी, वाघें इ. तृतीया, वाघा-चतुर्थी, वाघाहून पचमी, इ.

---

## ११. आपल्या स्त्रियांची चढाई.

आपण ( म्हणजे आपले पूर्वज ) पूर्वी संस्कृत भाषा बोलत होतो, त्यावेळी पुलिंगी व स्त्रीलिंगी अशा शब्दांच्या समुदायाचा निर्देश एका शब्दानें करिताना आपण पु. शब्दाची योजना करीत होतों, जसें-**तौ** गुरुर्गुरुपत्नी प्रतिननन्दतुः ( रघु. १.५७ ) ( गुरु वशिष्ठ व त्याची पत्नी अरुधती यानी त्या दोघाचें अभिनन्दन केले ) या वाक्यात राजा व राणी याचेबद्दल पु तौ हा शब्द योजिला आहे. नपुसकलिंगी किंवा स्त्रीलिंगी **ते** शब्द योजिला नाही. राजा व राणी याचा एकत्र निर्देश एका पुं. शब्दानें होण्यास व्यवहारतः पुरुषाचें वर्चस्व पाहिजे, स्त्री-शब्दानें होण्यास स्त्रीचें पाहिजे,

च न शब्दानें होण्यास पुरुष व स्त्री दोघेही तुल्यबल पाहिजेत, हें उघड आहे. अशा स्थितीत, संस्कृत भाषेत हा निर्देश पु शब्दाने केला जातो, यावरून उघडच आहे कीं, पूर्वकाळी आपल्या समाजात पुरुषाचा वरपगडा होता. कालांतरानें आपली भाषा संस्कृताची मराठी झाली याच कालावधींत समाजातील सापेक्ष वर्चस्वातही फरक होऊन मिश्रलिंगी समुदायाचा एकत्र निर्देश करण्यातही फरक पडला कसा ? संस्कृतात राजा व राणी **हे दोघेजण** अशा रचनेचा प्रयोग होत असे, तर मराठीत राजा व राणी **हीं दोघें** असा प्रयोग होऊ लागला. येथें मराठीत काय दिसून येतें ? समुदायाच्या घटकात नपुसकलिंगी शब्द मुळीच नाही, तरी पण या एकत्र निर्देशात नपुंसकलिंगाचा प्रवेश कसा झाला ? अर्थात् ' तुला नाही मला नाही, घाल कुत्र्याला ' या न्यायानें, कोणासही दुसऱ्याचे वर्चस्व सहन न झाल्यानें, तिसऱ्यालाच मान्यता देण्यात आली आहे ही समाजातील क्रांती अशीच चालू राहिल्यास, म्हणजे स्त्रीजातींचें वर्चस्व वाढत राहिल्यास, आणखी काही पिढ्यांनी कदाचित् असा प्रसंग येईल की, मिश्रलिंगी समुदायाचा निर्देश पु शब्दानें तर नाहीच, न. शब्दानेही नाही, तर तदन्य स्त्रीलिंगी शब्दानें होऊ लागेल ' राजा व राणी **या दोघी** आल्या' असा प्रयोग करावा लागेल. हे भविष्य खरें वा खोटें होणें, हें सर्वस्वी पुरुषांच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे काय होईल हें भविष्य कालच दाखवील

सारांश—( क ) राजा व राणी हे दोघे ( पु. ) आले—
एतद्रूप **संस्कृत** रचना,
( ख ) राजा व राणी हीं दोघे ( न ) आली—
असली वर्तमान मराठी रचना,
तर ( ग ) राजा व राणी ह्या दोघी ( स्त्री ) आल्या—
अशी भविष्यकालीन मराठी रचना,
काळाच्या ओघावरून अनुमित होते.

---

## १२. मराठींतील संयुक्त क्रियापदें.

**विषयभाग**–१ वादाचें स्वरूप, २ वादांतील पक्ष, ३ यौगिक विरूद्ध रूढ, ४ अर्थ विरुद्ध रचना, ५ काही शब्दयोगाचे परीक्षण, ६ सहायधातूचें प्रयोजन,

७ सहायधातूचे प्रकार, ८ अपूर्णादि काळ का मानावे ? ९ अस–हो–कर हे धातू, १० सयुक्तक्रियापद या सज्ञेचा अर्थ, ११ सयुक्तक्रियापदाची कसोटी, १२ सस्कृतात सयुक्तक्रियापदाची जिज्ञासा, १३ निगमन, १४ साराश

१ **वादाचें स्वरूप**—तो गेला आहे, पाऊस पडत होता, पुस्तक जपून ठेवावें, तो बडबडू लागला, कळ फिरविली गेली, इत्यादि वाक्यात उद्देश्यासबधी जें काही सागितलें आहे ते दोन शब्दानी व्यक्त केलेलें दिसतें. पुष्कळ वाक्यात दोहोपेक्षाही जास्त शब्दानी क्रिया सागितलेली आढळते. मी लेखणी करून ठेवणार होतों ? या वाक्यात तीन शब्द क्रिया सागत आहेत, असें दिसतें, अशा सर्व ठिकाणी धातु कोणता मानावा ? क्रियाद्योतक शब्दसमुच्चयातील कोणत्या शब्दातील धातु मुख्य मानावा ? ‘ पडत होता ’ यात पड धातु मुख्य मानिल्यास, तें सयुक्त क्रियापद मानावे लागेल, ‘ अस ’ हा धातु प्रधान मानिल्यास, ‘ होता ’ एवढेच क्रियापद ठरून तें केवळ किंवा **शुद्ध** क्रियापद होईल ‘ करून ठेवणार होतो ’ यात धातु कर, ठेव, की अस, मानावा ? कर मानिल्यास क्रियापद त्रिपद, ठेव मानिल्यास द्विपद, व अस- मानिल्यास एकपद किंवा शुद्ध मानावें लागेल साराश–जेथे वाक्यगत क्रिया एकाधिक धातुशब्दानी उक्त दिसते, तेथें क्रियापद त्या सर्व शब्दानी किंवा त्यापैकी काही–एक वा अनेक–शब्दानी घटित मानावें, हा येथें प्रश्न आहे

२ **वादांतील पक्ष**—( १ ) क्रिया कितीही शब्दानी बोधिली असो, त्यातील एकच शब्द, अर्थात् शेवटला,—क्रियापद मानावा, व सयुक्त क्रियापदास पूर्णतः खो द्यावा, कारण या क्रियाबोधक एकाधिक शब्दाच्या समुच्चयातील अर्थभेदास अनुसरून आपण सयुक्त क्रियापदें मानू लागल्यास, त्यातील सहाय धातूची सख्या बेसुमार वाढेल, व कोणता धातु सहाय म्हणून स्वीकारावा, या बाबतीत फार मतभेद उत्पन्न होतील करिता एकाधिक शब्दघटित, म्हणजेच **सयुक्त**, क्रियापद न मानिता, दिसणाऱ्या समुच्चयातील फक्त शेवटचा शब्द क्रियापद मानावा, असें एका पक्षाचें म्हणणें आहे.

( २ ) तो खेळत होता, जेवून बसणार होता, झोंपून घेतो, घर बाधू लागणार आहे, इत्यादि सर्व शब्दसमुच्चय सयुक्त क्रियापदें मानावे, त्यातील पहिल्या पदातील धातु तो मुख्य, व पुढील पदातील धातू ते सहाय कल्पावे, कारण अशा समुच्चयगत शब्दाचा अर्थ सुट्या शब्दाच्या अर्थाच्या वेरजेपेक्षा काहीसा

निराळा होतो तो पुस्तक घेतो, यातील घे–चा अर्थ 'निजून घेतो' यातील अर्थाहून निराळा आहे करिता असे क्रियाशब्दघटित समुच्चय–ज्यात घटक शब्दाचा समस्त अर्थ व्यस्त अर्थांच्या समुच्चयाहून थोडाफार निराळा होतो असे,–सर्वच संयुक्त क्रियापदें, मानावे, असा दुसरा पक्ष आहे.

या वादात इतरही पक्ष आहेत व संभवतीलही पण ते सर्व या कोटिगत दोन पक्षाच्या अतरालातच कोठें तरी पडतील या सबधात ही गोष्ट लक्षणीय आहे की, मराठीच्या व्याकरणास आदर्श म्हणून घेतली जाणारी संस्कृत व इंग्रजी व्याकरणें संयुक्त क्रियापदें फार काटकसरीनें मानितात मराठीत मात्र खेर–साररख्या वैयाकरणानी याची सख्या फारच फुगविली आहे

३. **यौगिक विरुद्ध रूढ**—तू नदी उतरताना सागडीला लाग, कामाला लाग, वाचायला किंवा वाचू लाग, इत्यादि तिन्ही ठिकाणी **लाग** हाच धातू आहे त्याचा अर्थ मात्र थोडथोडा भिन्न होत गेला आहे पण या सर्व ठिकाणी स्पर्श ही कल्पना–लाग धातूत मूलतः असलेली,–अनुस्यूत आहे. आता प्रश्न असा की, तू सागडीला लाग, व वाचू लाग, या दोन्ही ठिकाणी लाग एवढेंच विधेय घेता येईल की नाही? सागडीला लाग, यात लाग हें विधेय, व 'सागडीला' हा (एक्स्टेन्शन् ऑफ् द् प्रेडिकेट्=) विधेयप्रपच, कोणासही मान्य होईल. पण अशी मान्यता वाचू यासंबधी देण्यास कदाचित् कोणी कचरतील. तूं लाग, कशाला? सागडीला. अशा प्रश्नोत्तरादिरूपानें, सागडीला ही भर विधेयात मागून पडते तशीच भर 'वाचू' यानें पडते की नाही? तू लाग (=प्रवृत्त हो, कामात व्यापृत हो), कशास? वाचू (=वाचण्यास किंवा वाचण्यात) अशा रीतीनें 'वाचू लाग' यातही 'वाचू' ही विधेयात पडलेली भरच आहे 'तूं वाचू लाग' यात लाग हें विधेय आहे, व त्या एकाच शब्दानें विधान पुरें होतें, फक्त त्याची दिशा किंवा तपशील वाचूं यानें ठरतो. आता, सागडीला लाग, येथें स्पर्शक्रिया चाक्षुष आहे, तर वाचू लाग येथें ती मानस आहे, इतकाच भेद पण विधानदृष्ट्या उभयत्र 'लाग' हा शब्द स्वयपूर्ण दिसतो. चाक्षुष की मानस, हा भेद व्याकरणात पाहण्याचें कारण नाही. डोळ्यानी पाहतो, मनानें चिंतितो, या दोन्ही वाक्याचें व्याकरण सारखेंच होणार. साराश--प्राथमिक अर्थानें वा द्वैतीयीक अर्थानें असो–लाग हा शब्द, सागडीला

लागणें किंवा वाचू लागणें, अशा उभयस्थानीं स्वयपूर्ण विधानक्षमच घेतला पाहिजे. मूळ अर्थाहून अंशतः **भिन्न** असे **अर्थ** झाले म्हणून, लाग याची विधानक्षमता विकृत होते असें नाहीं, करितां अशा लाक्षणिक अर्थांच्या स्थानीं, 'वाचू लागणें' यासारखें क्रियापद संयुक्त मानण्याचें कारण नाहीं दीपगृहातील दिवा फिरतो, आकस्मिक सपत्तीनें त्याचे डोळे फिरले, उन्हात चालण्याने माझे डोकें फिरते, त्याच्यावर दुर्दैवाचा इगा फिरला, पेढी बुडाल्याचें ऐकून त्याचे डोके फिरले, इत्यादि सर्व ठिकाणी फिरण्याचे यौगिक किंवा लाक्षणिक, प्राथमिक किंवा तदुद्भूत, अनेकविध अर्थ असले तरी, ते सर्व व्याकरणदृष्ट्या सारखेच होत; सर्वत्र फीर हा धातु अकर्मक आहे यौगिक वा लाक्षणिक, हा अर्थभेद अलकारशास्त्र मानितें, व्याकरणशास्त्रास तो केवळ उपेक्ष्यच आहे हा बेरड चारदां तुरुंगात जाऊन आला आहे, तो कारावकारी नुकताच **तुरुंगांत जाऊन आला** या ठिकाणी व्यवहारदृष्ट्या बेरडाचें व काराधिकाऱ्याचे 'तुरुगात जाणें' या शब्दप्रयोगात अर्थभेद असला तरी, व्याकरणास तो भेद केवळ अज्ञातच होय

चिखलात गेल्याने मुलगा चिखलानें **भरला**, हें पाहून बाप त्यावर (रागानें=) रागें **भरला** या दोन्ही ठिकाणी भरणे ही क्रिया आहे, चिखल हे मूर्त द्रव्य आहे, तर राग हा अमूर्त मनोविकार आहे पण मुलाचे ( अथवा त्याच्या शरीराचे ) व्यापले जाणें, तसेच बापाचे ( किंवा त्याच्या मनाचें ) व्यापलें जाणें, या दोहोंमध्ये कर्तृ–कृति हा सबंध सारखाच आहे अर्थात् त्या क्रियेचीं करणें सुद्धा व्याकरणदृष्ट्या एकाच कोटींतील. मुलगा भरला, कशानें? चिखलानें येथील 'भरला' व 'चिखलानें' यातील सबधाप्रमाणेंच, 'रागे भरला' या शब्दद्वयात विधेय तत्प्रपच सबध आहे, चिखलानें व रागे, हे **विधेयप्रपंच** होत, भरला हें क्रियापद उभयत्र स्वयपूर्ण विधेय आहे लाक्षणिक अर्थ जरी निराळा भासला तरी त्याची व्याकरणव्यवस्था यौगिकाप्रमाणेंच लागणार **रथेन** नगरं याति, व **मनसा** हरिं व्रजति,–या दोन्ही वाक्याचें व्याकरण सारखेंच होणार. पोटभर जेवला व पोटभर पोहोला, या दोन्ही वाक्यात पोटभर याचें व्याकरण-मूल्य एकच. आपण फार शहाणे आहां, या वाक्यास अलकारशास्त्रात दोन किंमती असतील, पण व्याकरणात त्यास,–अर्थ कोणता का असेना, तो यथोक्त असो वा विपरीतलक्षणाप्राप्त असो, किंमत एकच लक्षणामूलक

अर्थाची छाननी करणें हें अलंकारशास्त्राचें, तर रूपरचनादिकाचें परीक्षण करणें हें व्याकरणशास्त्राचें, क्षेत्र होय. लाक्षणिक अर्थाच्या पाठीस लागून, चिखलानें भरणें व रागें भरणें यात भेद पाहणें म्हणजे व्याकरणानें अलकार-शास्त्राच्या क्षेत्राचें अतिक्रमण करणें होय.

४ **अर्थ विरुद्ध रचना**—मला श्लोक येतो,गाणें येतें, पोहोता येतें,– या सर्व ठिकाणी येतो किंवा येतें हें स्वयपूर्ण विधेय आहे,व श्लोक, गाणें, पोहना, ही क्रमानें उद्देश्यें आहेत. अर्थात् पोहोता येतें, हे सयुक्त क्रियापद मानण्याचे कारण नाही, तसेंच, ये हा सहाय धातु ठरत नाही येथें **शंका**–' हा पकडलेला पोपट सोडून दे' यात क्रिया कोणती आहे? सोडण्याची तिची पूर्णता किंवा अनिवर्तित्व 'दे' याने दर्शविलें जातें मग येथे 'सोडून दे' एवढें सयुक्त क्रियापद मानावे की, नाही? दे हा सहाय धातु आहे की नाही ? **समाधान**-सोडणे-यातील क्रियेची पूर्तता 'फिरून स्वीकार न करण्यात' आहे दे–चा अर्थही 'आपली मालकी निवृत्त करून' एखाद्या वस्तूस दुसऱ्याजवळ कायमचे रहा-वयास लावणें, असा आहे. तेव्हा सोडण्याच्या पूर्ततेस अपेक्षित असलेला 'आपला सबध सर्वस्वी तोडणें' हा अर्थ दे--च्या मूळ अर्थास धरूनच आहे. 'सोडून दे' या शब्दप्रयोगात हाच अर्थ 'दा' धातु धारण करित आहे यावरून ठरतें की, पोपट सोडून दे व सीता रामास दे,- या दोन्ही वाक्यातील दे--चा अर्थ व्याकरणदृष्ट्या अभिन्न आहे करिता उत्तरत्र जसा दा मुख्य धातु आहे, तसाच तो पूर्वत्र मानणे प्राप्त आहे **लाक्षणिक अर्थाच्या प्रवेशानें शब्दाचें व्याकरणमूल्य बदलत नाहीं** सोडून देणे यातील दे–चा प्रयोग अर्थदृष्ट्या सोडण्याचें पूर्णत्व दाखविण्याकरिता जरी आला असला,तरी रचनादृष्ट्या तो मुख्य असून 'सोड' हा धातु गौण आहे, म्हणजे गौणप्रधानत्वाचा,अर्थ–व्याकरणाच्या दृष्टीनें येथें अन्योन्यविपर्यय आहे सोडणें–च्या अर्थाच्या बहुलीकरणाकरिता देणें आला आहे, तर कसा देणे? केव्हा देणे? वगैरे देणेची अर्थविषयक आकाक्षा पुरविण्याकरिता सोडणे आला आहे साराश–येथें अर्थ व रचना यांच्या धोरणात विरोध आहे अशा ठिकाणी व्याकरण, अर्थास गौणत्व देऊन, रचनेच्या तंत्रानें चालणार. संस्कृत, इंग्रजी वगैरे भाषातही हाच प्रकार आढळतो. 'अतिथि-विशेषः (= अतिथींना विशेषः) याचा अर्थ 'विशिष्ट अतिथि' असा कर्मधारयासारखा आहे, तरी तो समास षष्ठीतत्पुरुष आहे, 'विशिष्टा-

निधि' व 'अतिथिविशेषः' या दोहोंचा अर्थ जरी समान आहे, तरी त्यांत समासभेद आहे 'इन्द्रोऽपि स्वयं प्रख्यापितैर्गुणैर्लघुता याति'या वाक्यात 'गुणाची स्वतः टिमकी वाजविण्यानें' असा अर्थ आहे हा अर्थ 'गुणाना स्वयं प्रख्यापनेन' अशा रचनेनें व्यक्त होण्यासारखा आहे पण येथें रचना तशी नाही, 'स्वयंप्रख्यापितैर्गुणैः' अशी आहे यात गुणाचें प्रख्यापन हा अर्थ विवक्षित असल्यानें, अर्थदृष्ट्या जर गुणास गौणत्व आहे, तर व्याकरणदृष्ट्या 'प्रख्यापिलेल्या गुणानी' अशा रचनेनें प्रख्यापनक्रियेस गौणत्व आहे. सारांश-संस्कृतात व्याकरणाचें गौणप्रधानत्व अर्थपरतन्त्र नसतें 'द् स्ट्रेंग्थ् ऑफ् एजॅक्स् लेड् हिम् डाउन्' येथें 'बलवान् एजॅक्स्-नें त्यास लोळविलें,' असा अर्थ विवक्षित आहे, तरी व्याकरणदृष्ट्या स्ट्रेंग्थ् हाच शब्द प्रधान आहे. व्याकरणात, रचनेस प्राधान्य असल्यानें, समान अर्थ व्यक्त होत असला तरी, एक शब्दप्रयोग कर्तरि तर दुसरा कर्मणि आढळतो तेव्हा 'सोडून देणें' या शब्दप्रयोगात जरी सोडण्याचें अनिवर्तित्व दर्शविण्याचें काम देणें करीत आहे, तरी आहे या रचनेंत, दे हाच प्रधान धातु आहे व सोड गौण आहे

५ **कांहीं (Idioms-) शब्दयोगांचें परीक्षण**—अटून जाणें, राखून ठेवणें, विकत घेणे,-देणे,-आणणें, पिळून काढणें, मारीत सुटणें, देऊ लागणें, देऊन टाकणें, करू पाहणें, खाऊन बसणें, लिहिण्यास चुकणें, लिहून चुकणें, घोकीत राहणें, इ अनेक ठिकाणी पुढील क्रिया मागील क्रियेच्या अर्थाचेंच वर्णन करणारी असते. अशा ठिकाणी ती पुढील क्रिया दाखविणारा धातु आपल्या मूलार्थापासून थोडेंसे अर्थांतर पावलेला दिसतो, पण एवढ्यावरून तो स्वयपूर्णविधानक्षम नाही, असें होत नाही 'येथून देवळाच्या पायरीपर्यंत नमस्कार घालीत जा' या वाक्यात जा हा दृश्य-गमनाचा वाचक असून, त्या गमनानें आक्रमिलेला अवकाश देशरूप आहे, अर्थात् दृश्य आहे यामुळें येथें 'जा' हा धातु स्वतन्त्रविधानक्षम कोणीही मानील याचेच दुसरें उदाहरण—आजपासून हनुमज्जयतीपर्यंत नमस्कार **घालीत** जा—या वाक्यात जा-ची गति दृश्य नाही, काल-प्रतिष्ठित असल्यानें अदृश्य आहे. पण त्यावरून जा-च्या स्वयविधानक्षमत्वाला बाध येत नाही. देश व काल दोहोंची जात व्याकरणात एकच, जसें **जेथें** तसेंच **जेव्हांही**, क्रियाविशेषण

आहे. चार कोस जा, यात कोस याचें जें व्याकरण, तेच चार घटिका धाव, यातील घटिका-चें आहे फक्त देशाधिष्ठित अर्थ गम्-चा मूळचा, प्राथमिक, व कालाधिष्ठित नंतरचा, लाक्षणिक. या दोहों अर्थांची परस्परसंगति स्पष्टच आहे. ही संगति कोठें स्पष्ट असेल, कोठें अस्पष्ट असेल, तर कोठें कल्पनागम्य असेल, पण अगदी नाही असे होत नाही. दिवा लावणें ही क्रिया करिताना, खरोखरच एक दिवा वात पुढें करून दुसऱ्या दिव्याशी लावीत असत 'प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्' येथें हीच वस्तुस्थिति कालिदास सांगत आहे पुढें काडीच्या स्पर्शानें आपण दिवा लावूं लागलों हाच दिवा वैद्युत् असल्यास, केवळ किल्ली हलविल्यानें तेंच कार्य घडतें, तरीपण त्यांत सुद्धा एक प्रकारचा स्पर्श आहेच सारांश-लावणें या शब्दाचा अर्थ वस्तुस्थित्यनुसार बदलत चालला आहे तरीपण प्राथमिक वा अंतिम कोणताही अर्थ असताना लावणें याची किंमत व्याकरणदृष्ट्या एकच. आटणें व आटून जाणें-पैकी पहिल्या ठिकाणी अर्थ नुसता उष्णतेनें कमी होणें, व दुसऱ्या ठिकाणी वारंवार उष्णतेनें कमी होऊन **पार नाहींसें होणें**, असा आहे. म्हणजे येथे आटणें-चें निःशेषत्व जा दाखवितो, उलट-जाणें-( ज्याचा मूलार्थ नाहींसें होण्याला सर्वस्वी अनुकूल आहे-) याचें वर्णन 'आटून' करितो. कसे जाणें ? कोणत्या प्रकारे नाहींसें होणें ? आटण्यानें. सारांश-अर्थदृष्ट्या ' जा ' गौण, तर रचनादृष्ट्या ' आट ' गौण व्याकरणात अर्थापेक्षा रचनेस महत्त्व असल्यानें व्याकरणदृष्ट्या ' जा ' हीच क्रिया प्रधान ठरते, 'आट' ठरत नाही.

६. **सहाय धातूचें प्रयोजन**-सहाय धातूची जरूर कोणास ? क्रियापदास. ती कशाकरिता ? त्याची काही कामें करण्याकरिता. क्रियापदाची कार्यें कोणती ? अर्थ, काळ, प्रयोग इत्यादिकांचें प्रकाशीकरण क्रियापद नुसती क्रियाच सांगत नाही, तर त्या क्रियेचे अर्थकालादि धर्मही त्यास सांगावे लागतात. अर्थात् हेच धर्म व्यक्त करण्यास जर त्याबरोबर एखादा धातु येत असेल तर तो सहाय धातु होय. अधिशिक्षक ( हेडमास्तर ) याचे हाताखाली सहायशिक्षक असतात, ते कशाकरिता ? त्याची मुलें खेळविण्याकरिता ? मडई करण्यासाठी ? मुलीच्या लग्नाची खटपट करण्याकरिता ? नव्हे शिक्षक या नात्यानें मलास शिकविणें व शाळा चालविणें हे जे दोन शिक्षकधर्म ते पार पाडण्यास मदत करणें

हें सहाय-शिक्षकाचें काम होय. अधिशिक्षकाच्या व्यक्तिनिष्ठ कार्यास मदत करणें हें सहाय शिक्षकाचें काम नव्हे. या दृष्टान्तावरून उघड होतें कीं, सहाय धातू मदत करणार ती धातूच्या व्यक्तिनिष्ठ अर्थामध्यें न्यूनाधिक्य करण्यास नव्हे, तर त्या अर्थाच्या **विधानांत** येणाऱ्या अर्थकालादि धर्मांच्या व्यक्तीकरणास. 'नमस्कार घालीत जा' यांत घालणें या क्रियेचें सातत्य जा दर्शवितो; म्हणजे घालण्याच्या व्यक्तिनिष्ठ अर्थामध्यें तो सातत्याची भर टाकितो. कालादींचें व्यंजन तो करीत नाही. करितां 'जा' हा सहाय धातु ठरत नाहीं. व्याकरण धातूच्या अर्थाची छाननी करीत नाहीं; तर तें त्या अर्थाचें अर्थप्रयोगादिद्वारां विधान कसें केलें जातें, एवढेंच पाहतें. ओढणें, फाडणें यांत ओढण्याच्या पलीकडचा अर्थ फाडणें दर्शवितो, तरी व्याकरणांत दोहोंची किंमत एकच. धातूनें आपला अर्थ घेऊन यावें, त्या अर्थांत कमीजास्ती व्याकरण करीत नाही. प्रत्येक क्रियारूपांत तो मूळ अर्थ अनुस्यूत ठेवून, फक्त अर्थप्रयोगादिचिंता व्याकरण करितें. करितां सहाय धातु होणार तो अर्थप्रयोगादि-व्यंजनास मदत करणाराच असला पाहिजे. या दृष्टीनें सहाय धातूंनीं दिल्या जाणाऱ्या मदतीच्या स्वरूपानुसार त्यांचे प्रकार ठरतील; जसें-काल व्यक्तीकरणास मदत करील तो कालसहाय धातु इ.

**७. सहाय धातूंचे प्रकार**—अपूर्णादि काळ मराठींत मानणें असतील तर-व तें वाजवीही दिसून येईल--अस व त्याबरोबर तत्प्रतियोगी नस, हे सहाय मानावे लागतील. अभावदर्शक नस--बरोबर रूप हा धर्मही व्याकरणांत उत्थित होतो.अस्त्यर्थप्रधान क्रियापदाचें करणरूप व नास्त्यर्थप्रधान क्रियापदाचें अकरणरूप. कर्मणि प्रयोगाकरितां 'जा' हा सहाय धातु अपेक्षित आहे. अकरणरूप दर्शविण्याला स्वार्थांतील नस-च्या जोडीला, आज्ञार्थांतील 'नको' व विध्यर्थांतील 'नये' यानाही सहाय धातू गणिलें पाहिजे. अशा रीतीनें-अस, नस, जा, नको, नये हे ५-च धातू सहाय ठरतात. एतद्घटित शब्दयोग संयुक्त क्रियापदें होत. सारांश-संयुक्तक्रियापदें मराठीत मानणें तीं फक्त एवढीच होत. बाकीचे सर्व क्रियायोग हे तद्बाह्य होत. त्यांतील उत्तर शब्द तो क्रियापद व पूर्वशब्द (पुढील 'पडून'-प्रमाणें) तो केवळ धातुज होय. पडून राहिला, दडपून बसला, रडूं लागला. इ. शब्दयोग संयुक्त क्रियापदें नव्हत. अशा रीतीनें मराठीत सहाय धातू त्रिविध होतात,—कालसहाय, रूपसहाय व प्रयोगसहाय.

८ **अपूर्णादि काळ कां मानावे?**—तो जातो–हा स्वार्थ वर्तमान, जात आहे–हा स्वार्थ अपूर्ण वर्तमान अशा ठिकाणी अपूर्ण काय? क्रिया की काल? काळाच्या ठिकाणी पूर्णापूर्ण संभवतच नाही तो नित्य चालूच आहे भविष्यकाळ पुढं धावत आहे, त्याच्या मागें भूत भुतासारखा लागलाच आहे. दोहोंमधील विभागरेषा हाच केवळ वर्तमानकाळ. यावरून भूतकाळ निरंतर वर्धिष्णु, भविष्य क्षयिष्णु, तर वर्तमान भूमितिगत रेषेप्रमाणें विस्तारशून्य, रुंदी नसलेला व्याकरणात क्रियागत पूर्णादि अवस्था काळाच्या ठिकाणी आरोपित करण्याचा प्रघात पडला आहे, इतकेंच जा धातूचा अपूर्ण वर्तमान म्हणजे जा धातूच्या अपूर्णावस्थेचा वर्तमान, हें समीकरण व्याकरणात उक्त नसलें तरी, गृहीत असतेंच अपूर्ण हें विशेषण क्रियावस्थेच्या ऐवजी काळास लावितात पण वस्तुतः पाहता, काळ व अवस्था हे दोन्ही धर्म क्रियेचेच होत असो आजपर्यंतच्या रूढीस अनुसरून हे अपूर्णादि काळ मानिल्यास, अस हा सहाय धातु प्राप्त होतो, कारण तो क्रियेची म्हणजेच काळाची अवस्था दर्शवितो

क्रियावस्था दर्शविणे हें सहायधातूचें कार्य मानिल्यास, ‘ चेंडू देऊन टाक ’ येथील टाक धातु जा देणे–क्रियेची समाप्ति दर्शवितो तो सहाय का मानूं नये? तो अशाकरिता मानू नये की टाक हा धातु क्रियाविशेषाचा वाचक आहे, त्यास मागील क्रियेची पूर्णावस्था दर्शविणे, हा अर्थ लक्षणेनं प्राप्त झाला आहे, त्यात पूर्णतेशिवाय त्याग, हातावेगळा करणें, ही क्रिया थोडीबहुत दडून बसलेली आहेच, तिची सर्वस्वी फारकत होत नाही, म्हणजे अशा ठिकाणी पूर्व धातूनें दर्शित दान, व उत्तर धातुदर्शित त्याग, या दोन क्रिया क्रियापदात संभवतात. आतां क्रियापदानें तर एकच क्रिया दर्शविली पाहिजे, दोन क्रिया जेथे डोकावतात तेथें परक्रिया मुख्य ठरून पूर्वक्रिया तिला गौण होणार असा प्रकार अस या धातूसंबंधानें घडत नाही म्हणूनच तो अपूर्णकाळाचा सहायधातु बनला आहे.

९. **अस, हो, कर**—तो प्रधान आहे, तो प्रधान होतो, राजा त्यास प्रधान करितो–अशा ठिकाणी अस, हो, कर हे धातू क्रमाने सांप्रतावस्था, नवीन स्वयंप्राप्तावस्था, नवीन अन्यकृतावस्था, इतकाच अर्थबोध करितात उदाहरणभूत वाक्यात तो–संबंधी प्रधानत्वाचें विधान करण्यापलीकडे काहीही अधिक अर्थनिष्पत्ति या धातूपासून होत नाही चोरयाम्–आस–बभूव–चकार इत्यादि

ठिकाणी हे धातू सहाय का मानावे ? संस्कृत वैयाकरण भट्टोजी दीक्षित उत्तर देतात की " कृभ्वस्तयः क्रिया**सामान्य**वाचिनः, आम्-प्रकृतयश्च क्रिया**विशेष**वाचिनः, अतस्तदर्थयोरभेदान्वयः " म्हणजे कृ, भू, अस् हे धातू क्रियामात्र सामान्यतः दर्शवितात, तर चुर्-सारखे धातू क्रियाविशेष दर्शवितात. अशा रीतीनें व्यापकव्याप्य असलेल्या या दोन अर्थांचें ऐक्य जमतें विशेष हा केव्हाही सामान्यात अंतर्भूत होतोच. त्यामुळें त्यास केव्हाही सामान्य संज्ञा देता येते अशाच कारणानें मनुष्य हा केव्हाही प्राणी म्हटला जातो विशेषसामान्याचे ऐक्य मानून-विशेषार्थी चुर् व सामान्यार्थी अस् इत्यादि धातू याचे ऐक्य मानून, दोहोंचे मिळून एकच विधान मानावे, म्हणजेच दोन्ही मिळून एक संयुक्त क्रियापद होय अशा रीतीनें अस्-धातूच्या सहायत्वाला संस्कृत व्याकरणाचीही मान्यता आहे, व ती असणारच, कारण दुसऱ्या धातूच्या विधानास मदत करिताना अस् धातु कोणताही आपला म्हणून निराळा अर्थ त्यात मिसळीत नाही, असा विशेष अर्थच त्यास नाही पाण्यात जो रंग मिसळावा तद्वर्ण पाणी बनतें, त्याच्या रंगास तें मुळीच विकृत करीत नाही सामान्यतः, इतर कोणताही द्रव घेतला तरी त्यास स्वतःचा म्हणून काही तरी रंग असतोच, तसा पाण्यास मुळीच नाही. ' जल तेरा रंग कैसा ? जिसमें मिला वैसा ' हें पाण्यासंबधानें रंगाच्या बाबतीत जसें विधान, तसेंच अस्-संबधानें क्रियाविशेषाच्या अर्थाच्या बाबतीत जाणावें पाणी वर्णविकार करीत नाही मराठीतही अस पूर्वधातूच्या अर्थात ढवळाढवळ करीत नाही, म्हणून अस हा सहाय होण्यास सर्वस्वी योग्य आहे. हा धातु मराठीत क्रियेच्या अपूर्णावस्था दर्शविताना योजितात या क्रियावस्था आपण कालावर लादितों,जसे-तो लिहीत आहे येथें लिह्-च्या **अपूर्णावस्थेचा वर्तमान** न म्हणता, आपण लिह-चा **अपूर्ण वर्तमान** म्हणतों. या प्रकारच्या कालावरील आरोपामुळें, अस हा कालसहायधातु ठरतो हो व कर सहाय या नात्यानें मराठीत उपलब्ध नसल्यानें, येथें ते विचारबाह्यच होत.

१०. **संयुक्त क्रियापद या संज्ञेचा अर्थ**—संयुक्त क्रियापद म्हणजे समस्त क्रियापद नव्हे, तर सुट्या शब्दाचें मिळून बनलेलें क्रियापद. हे दोन वा अधिक शब्द जोडलेले नसतात, त्याच्यामध्यें च-सारखी अव्ययें येणें शक्य

आहे. हे दोन्ही घटक शब्द विकार्य असू शकतील. तो आला आहे, ते आले आहेत इ. ठिकाणी **आर्थ** धातू ये व **सहाय** धातू अस आहे या दोघाची रूपें लिंगवचनाकरिता विकृत झाली आहेत सारांश–संयुक्त क्रियापद म्हणजे क्रियापदसमास नव्हे, तर आर्थ व सहाय धातूची रूपें जवळ–जवळ राहून बनलेला समुच्चय अथवा जोड–क्रियापद होय

११ **संयुक्त क्रियापदाची कसोटी**–आर्थ धातूमध्यें सहाय धातूचें रूप मिळून सयुक्त क्रियापद होतें तो–तो क्रियाधर्म व्यक्त करण्यास लागणाऱ्या सहाय धातूस, तत्तद्धर्मानुसार नावें प्राप्त होतात धात्वर्थात भर घालणें हें सहायाचें काम नाही इंग्रजीतहि टेन्स् ऑक्झिलिअरी, मूड् ऑक्झिलिअरी, व्हॉइस् ऑक्झिलिअरी या संज्ञा आहेत पण सेन्स् ऑक्झिलिअरी, अशी सज्ञा मुळीच नाही सारांश–कालादिद्योतास साह्य करण्यावरून धातु सहाय ठरला म्हणजे नंतर तद्युक्त असलेलें क्रियापद सहाय क्रियापद ठरेल करिता सहाय म्हणवून घेणारा धातु कोणता धर्म व्यक्त करितो, हें पाहिले पाहिजे. यावरून आपणास सयुक्त क्रियापदाची कसोटी मिळेल ती अशी–ज्या जोडक्रियापदात अन्त्य पद काल, अर्थ वगैरे धर्म व्यक्त करण्याकरिताच केवळ येतें ते सहाय क्रियापद. ही कसोटी स्वीकारून काही क्रियापदें पारखून पाहू १ गेलें पाहिजे, २ ओरडत राहिला, ३ रडावयाचा थांबेल, ४ करू पाहतो, ५ पदें गाता येतात इ (१) पाहिजे पूर्वधातूक्त क्रियेची **आवश्यकता** येथें दाखविते, तरी–पण मला विश्रांति पाहिजे, झोंप पाहिजे, इ ठिकाणाप्रमाणे प्रस्तुत वाक्यातही पाहिजे एवढेंच क्रियापद असून त्याचा कर्ता गेलें हें धातुनाम आहे करिता पाहिजे हा सहाय धातु नाही (२) राहिला हें भूतकाळाची कल्पना (ला–प्रत्ययाचे योगानें) व्यक्त करितें खरें, पण त्याशिवाय सातत्य ही कल्पनाही त्यात स्फुरित होते, त्यामुळे **धात्वर्थात भर** पडते, धात्वर्थात भर घालणें हे सहाय धातूचें काम नाही,करिता राह हा सहाय धातु नाही. (३) थांबेल हें अकरणरूपाचा अर्थ द्योतित करितें, पण त्याशिवाय **विराम हाही अर्थ** व्यक्त होतो करिता थांब हा सहाय धातु नव्हे (४) पाहतो यानें करण्याची उद्दिष्ट अवस्था जरी व्यक्त झाली तरी अवसर, सवड, वगैरे **मिळविण्याचा यत्न** हा अर्थ अभ्याधिक व्यक्त होतो; म्हणून पाह हा धातु सहाय नाही (५) येतात हें जरी सहोक्त क्रिया

गाणें याच्या कर्माशी अन्वित आहे, तरी त्याचा मूळचाच अर्थ 'साधणें' असा स्वतंत्र आहे, व त्यापरूनच त्याचा कर्माशी अन्वय होतो, सबब येथील ये हा सहाय धातु नव्हे या पाच उदाहरणाशी क्रमानें पुढील उदाहरणें तोलावी–जाऊ नको, ओरडत होता, राहणार नाही, करणार आहे, पदे गाइली जातात, या पाच उदाहणात पूर्व–धातूक्त क्रियेच्या रूपकालप्रयोगाचें व्यक्तीकरण एवढेंच उत्तरधातूचें कार्य दिसतें, यावरून या उदाहरणातील क्रियापदें सयुक्त ठरतात. साराश–तें क्रियापद सयक्त होय की, ज्यातील पूर्वपदगत धातूच्या अर्थास उत्तर-पदगत धातु विकृत न करिता केवळ, तदुक्त क्रियेच्या कालादिकापैकी एक वा अधिक धर्म सागण्यास साहाय्य करतें

१२. **संस्कृतांत संयुक्त क्रियापदाची जिज्ञासा**–तो जाऊं इच्छितो ( स गन्तु वाछति ), जायला सापडतें ( गन्तु लभते ), जायला धजतो ( गन्तु धृष्णोति ), जाऊं देतो ( गन्तु ददाति ), जायला लाजतो ( गच्छन् लज्जते ), जात राहतो ( गच्छन् तिष्ठति ), गात बसतो ( गायन् आस्ते ), पेरून ठेवतो ( विकीर्य दधाति )—या ठिकाणच्या सस्कृत वाक्याच्या विचारावरून दिसतें की, यातून कोणत्याही ठिकाणी सस्कृतात सयुक्त धातु किवा क्रियापद मुळीच मानीत नाहीत तेव्हा संस्कृत व्याकरण प्रमाण मानणें असल्यास, या व सदृश ठिकाणी मराठीतही संयुक्त क्रियापद मानणे युक्त नाही.

१३. **निगमन**–औषध घेऊन टाक, या वाक्यात ' टाक ' एवढेंच क्रियापद आहे. घेऊन हें त्यातील क्रियेचें विशेषण, अर्थात् क्रियाविशेषण आहे. टाक–चा अर्थ या ठिकाणी लाक्षणिक आहे, यौगिक नाही, कारण येथें त्याग नसून, औषधाचा स्वीकारच विवक्षित आहे त्यानें मागील क्रियेची एक प्रकारची पूर्णता द्योतित होते प्राथमिक व लाक्षणिक या अर्थात भेद करण्याचें व्याकरणास प्रयोजन नाहीच. अर्थदृष्ट्या जरी टाक हें घे–करिता आलें असलें तरी रचनेच्या म्हणजेच व्याकरणाच्या दृष्टीनें ' घे ' 'टाक '–करिता आलें आहे, रूप, काळ वा प्रयोग यातून एकाकरिताही ते आलें नाही; करिता तें सहाय क्रियापद ठरत नाही पाणी जसें सर्वथा वर्णहीन द्रव्य, तसा अस हा धातू स्वतः अर्थविशेषशून्य, केवळ सामान्यार्थी असल्यानें तो सहाय होतो. टाक हा धातु तथाविध नसल्यानें तो सहाय ठरत नाही विशेषार्थी

असूनही 'जा' मात्र प्रयोगसहाय बनला आहे. पण तोही तसा केवळ अलीकडे, इंग्रजी भाषेच्या संसर्गानें बनलेला दिसतो मोरोपंत इत्यादि पुराणकवींत तो सहाय म्हणून प्रयुक्त प्रायः आढळत नाही नको व नये हे रूपसहाय ठरतात

१४ **सारांश**—अर्थ यौगिक वा लाक्षणिक असो, प्राथमिक असो वा द्वैतीयिक असो, त्याची व्याकरणात किंमत एकच अर्थ व रचना यात विरोध आल्यास, व्याकरण रचनेस महत्त्व देतें रूप, काळ (अवस्था), प्रयोग एवढ्याचसाठी सहाय धातूची अपेक्षा असते सहायधातु-घटित म्हणजेच संयुक्त क्रियापद होय. अर्थात् अस, नस, नको, नये व जा यानी घटित असेच क्रियापदप्रयोग संयुक्त क्रियापद या संज्ञेस प्राप्त होतात सहाय धातूसंबंधी संस्कृत धोरणही येथल्याप्रमाणेच आहे हाच सर्व विषय पुढील पद्यात साररूपानें ग्रथित केला आहे—

**भेदो व्याकरणे गण्यो न यौगिकतदन्ययोः ।**
**अर्थयोः, प्रबलाऽर्थेन विवादे रचना मता ॥ १ ॥**
**धातुनापेक्ष्यते साह्यं रूपकालप्रयोगतः, ।**
**सहायधातुना भाव्य क्रियासामान्यवृत्तिना ॥ २ ॥**

**अर्थ**—व्याकरणामध्यें यौगिक व लाक्षणिक अर्थ यातील भेद पाहण्याचें कारण नाही. अर्थ व रचना याचा विरोध आल्यास, रचनेस महत्त्व द्यावें. सहाय क्रियापद धातूस साह्य करतें तें रूप, काळ व प्रयोग याच संबंधांत होय. सहाय धातूचा अर्थ अत्यंत सामान्य असला पाहिजे, त्यानें एखाद्या विशिष्ट क्रियेचा बोध होता कामा नये.

---

## 13 Parenthesis in Sanskrit.

In the recent issue of the Quarterly, Prof. Paranjpe, in his contribution, has made an assertion to the effect that 'Parenthesis' is almost entirely absent from Post-Vedic literature; and he attaches special importance to this on the ground that its ignorance has led many scholars

off the scent in their attempts at finding out the true meaning of Vedic passages

This inference, however, is not warranted, based as it is on an uncertain foundation In the नलोपाख्यान, there occur many parentheses such as may well compare with any found in English, in elegance and completeness.

In the नलोपाख्यान we have—

गच्छ राजन्नितः सूतो बाहुकोऽहमिति ब्रुवन् ।
समीपमृतुपर्णस्य स हि चैवाक्षनैपुणः ॥ १ ॥
अयोध्यानगरीं रम्यामद्य वै निषधेश्वर ।
स तेऽक्षहृदयं दाता राजाश्वहृदयेन वै ॥ २ ॥
इक्ष्वाकुकुलजः श्रीमान्मित्रं चैव भविष्यति ।
भविष्यसि यदाक्षज्ञः श्रेयसा योक्ष्यसे तदा ॥ ३ ॥
समेष्यसि च दारैस्त्वं मा स्म शोके मनः कृथाः ।
राज्येन तनयाभ्यां च, सत्यमेतद् ब्रवीमि ते ॥ ४ ॥

The clauses in small type are obviously parenthetical and may appear such to any careful reader, and it is not unlikely that many more may be gathered from the vast पौराणिक literature And the inevitable conclusion following is that सायण and his school of Oriental scholars, to say nothing of the Occidental, were in a position to detect the parenthesis in the Vedas where it really exists, and that they must have their own grounds for not admitting, as engrafted, clauses which some may be disposed to stamp ' parenthetical '

---

## १४. प्रो. बनहट्टी यांचा व्याकरणविषयक लेख. [ खंडन ]

### लेख १–व्याकरणांतील संज्ञा

प्रो बनहट्टी यानी साहित्य–पत्रिकेच्या गेल्या संक्राति–अंकामध्ये मराठी व्याकरणासंबंधानें एक विचारपूर्ण लेख लिहिला आहे या लेखामुळें त्यांनी या

विषयावरील चर्चेस चागला आरभ केला आहे. या गोष्टीचा फायदा घेऊन काही ओळी आपणाकडे प्रसिद्धीसाठी पाठवीत आहें, त्यास कृपा करून आपल्या पत्रात लवकर जागा द्यावी, म्हणजे संमेलनापूर्वी, त्या ओळी विद्वानाचे हाती पडून त्याचा विचार करणें त्यास शक्य होईल. या माझ्या लेखात काही गोष्टीत मला प्रो. बनहट्टी याचे मताशी विसंवाद करावा लागेल. तरी हा विसवाद सात्विक बुद्धीनेंच प्रवृत्त झाला आहे, हें लक्ष्यात आणून त्याचा यथायोग्य विचार ते व इतर विद्वान् करतील अशी सर्वास आपुलकीची सूचना करून प्रस्तुताकडे वळतों.

१ प्रस्तुत लेखात विचारणीय गोष्टी मुख्यत: पुढीलप्रमाणें आहेत–

( क ) विभक्ति, व्यय, प्रयोग, वाच्य, सामान्य, इत्यादि संज्ञाचे अर्थ.

( ख ) ' ग्रथावरून व्याकरण ' अथवा ' पदसमर्श ' याचें स्वरूप

( ग ) मराठीतील प्रयोग

( घ ) हिंदी व्याकरणातील संज्ञा

याविषयी काही विचार येथें प्रकट करीत आहें

२ **विभक्ति**—म्हणजे नामाचे वा सर्वनामाचे, वाक्यांतील क्रियापदाशी किंवा इतर शब्दाशी असणारें नातें दाखविणारें रूप **विभक्ति म्हणजे रूप** हें रा बनहट्टींचें मत ( पान ८७ शेवट ) सर्वथा ग्राह्य आहे. आता–गृह ( कर्म ) प्रविशति, निवास ( कर्म ) प्रविशति, गृह ( नायक ) प्रविष्ट, निवासः ( नायक ) प्रविष्टः–ही उदाहरणें घेऊ येथील नामरूपाची तुलना केल्यास असें दिसतें की, गृह व निवासम् याचे कारक (अर्थ) कमजास्त आहेत. गृह हें कर्म असून नायक ( Subject )–ही होतें, तर निवासम् केवळ कर्मच होऊं शकतें **'यावद्रूपं विभक्तिः'** या प्राथमिक तत्त्वानें निवासः–निवास ही ( भिन्नार्थक ) रूपें भिन्न विभक्तीची होतात, म्हणजेच विसर्गान्त रूप प्रथमेचें व मकारात रूप द्वितीयेचें ठरतें. आता येथें नपुंसक[illegible]चा विचार केल्यास पुंलिंगातील विसर्गांत व मकारान्त अशा दोन रूपाचे कारक–अर्थ नपुसकलिंगी मकारान्त एकच रूप दर्शवीत आहे, म्हणून वनम् हें एकच रूप प्रथमा व द्वितीया अशा दोन्ही विभक्तींचें मानण्यात आलें आहे. येथें **' एकं नैकविभक्तिकम् '** हें तत्त्व सर्वच लिंगांमध्यें विभक्तींची सख्या कायम असावी, एतदर्थ स्वीकारलें आहे वचनाच्या बाबतीतही असेंच करावें लागतें.

ग्रामात् आगतः, ग्रामाभ्या आगतः, ग्रामाय-ग्रामाभ्याम् याति,-येथील नामरूपाचा विचार केल्यास असें दिसते की, ( १ ) ग्रामाय व ग्रामात् या निरनिराळ्या विभक्ती आहेत व ( २ ) ग्रामाभ्याम् हें एकच रूप ग्रामाय किंवा ग्रामात् या दोन्ही रूपानी बोधित अर्थ दर्शविते, करिता ग्रामाभ्याम् हें एकच द्विवचनी रूप, एकवचनाशी मेळ राखण्याकरिता, एकाधिक विभक्तींचें मानावें लागते. हा निष्कर्ष पुढीलप्रमाणें दर्शविता येईल—

**विभक्त्यैक्यं रूपयोर्ये अनूनाधिककारके।**
**संख्यालिङ्गान्तरैक्यार्थमेकं नैकविभक्तिकम्॥**

**अर्थ**--अशा दोन रूपाची विभक्ति एकच होय की, ज्याचे अर्थ (कारकें) सर्वस्वी समान असतात परतु सर्व लिगात व सर्व वचनात विभक्तींची संख्या सारखी व्हावी म्हणून, एकच रूप एकाधिक विभक्तींचें मानावें लागतें

येथें ग्रथित केलेल्या तत्त्वानुसार विभक्तिव्यवस्था लावणें ती अशी--

( १ ) प्रत्येक रूप ही भिन्न विभक्ति गणावी, नतर

( २ ) ज्या रूपाचें कारक सर्वथातुल्य ती एकाच विभक्तीची मानावी, आणि शेवटी

( ३ ) सर्व लिगात व वचनात मेळ रहावा म्हणून एकच रूप यथापेक्ष अनेक विभक्तींचें समजावे

अशा रीतीनें विभक्ति ठरविण्यात अर्थाचा विचार होतो तो फक्त अशा रूपासबधी की,जें लिगवचन-संवादासाठी एकाधिक विभक्तीचे अगोदरच मानलेले असतें. उदाहरणार्थ ' बाण सोडीत धावला कर्ण, **दो बाणीं** विधिले त्याचे कर्ण, ' 'सर्वा **बाणीं** एकचि लोह' येथें बाणी हें एकच रूप (मूळचेंच एकाधिक विभक्तींचें ) नक्की कोणत्या विभक्तींचें हें अर्थानुसारें ठरतें. बाणी ( विधिलें ) ही तृतीया, तर बाणी ( लोह ) ही सप्तमी. साराश--विभक्ती ठरविण्यात कारकाचा संबध फक्त अनेकविभक्तिक रूपापुरता येतो

३. **व्यय**—संस्कृतात व्यय अशा विकाराला म्हणतात की, जो लिग, वचन, व विभक्ति या निमित्तानी होतो. धातूस क्रियापद बनताना होणाऱ्या विकारासही जरी हा स्पष्टपणें लाविलेला दिसत नाही, तरी क्रियापदें

विभक्तिरूपे मानिल्यास त्या विकारासही व्यय म्हणता येईल येथें सांगितलेला हा व्यय शब्दाचा अर्थ पुढील पद्यांत आढळतो

**सदृशं त्रिषु लिङ्गेषु सर्वासु च विभक्तिषु ।**
**वचनेषु च सर्वेषु यन्न व्येति तदव्ययम् ॥**

या पद्यांत वि+इ हा धातू योजिला आहे त्याचा अर्थ 'रूपविकार पावणे' असा आहे हा रूपविकार म्हणजे कोशांतून शब्द घेऊन त्यास वाक्यांत बसविण्याकरितां जो फरक करावा लागतो तो, अर्थात् कौशिक शब्दाचें ज्या विकारानें पद बनतें तो व्यय कोशांतून शब्द निघून जो संस्कार पावून तो वाक्यांत येतो त्यास व्यय म्हणतात हा संस्कार लिंग, वचन, विभक्ति, प्रयोग, काल, पुरुष इत्यादि कारणांनी घडतो तेव्हां यापैकी कोणत्याही कारणानें होणाऱ्या रूपविकारास व्यय म्हणतां येईल हा अर्थ जमेस धरून पाहिल्यास असें दिसतें की, अव्ययाचें, अर्थात् क्रियाविशेषण, उभयान्वयी, शब्दयोगी व उद्गारवाची यांचें, जें रूप ( मग, आणि, पर्यंत, वाः । इ ) कोशांत असतें, तेंच न बदलतां वाक्यांत येतें, म्हणून या शब्दजातीस अव्ययें म्हणण्यांत येतें. ह्याचे उलट-वाघ असें रूप कोशांत आहे, तर वाघ, वाघानें, वाघाहून इ. ( विकृताविकृत ) रूपें वाक्यांत आढळतात. येथें विभक्त्यनुसार व्यय घडला आहे, ह्यावरून वाघ हें सव्यय ठरतें अंबा असें रूप कोशांत सांपडतें. तर वाक्यांत अंबे असेंही सांपडतें. येथील रूपविकार किंवा व्यय वचनमूलक आहे. काळा-काळी-काळे असा एकच शब्द कोशांत आढळतो, तर त्यांतील काळी असें रूप विशिष्ट स्थळीं आढळतें. येथील निवडीचें तत्त्व व्यय हें लिंगाश्रित आहे, ज्यावरून काळी हें सव्यय ठरतें. लिह ( धातू ) हें रूप कोशांत सांपडणार, लिहीन, लिहितों, लिहितो, लिहिली इ. रूपें वाक्यांत आढळणार. येथील रूपविकार, काळ, पुरुष, प्रयोग, वचन, लिंग, इ. कारणांनी घडलेले आहेत, ज्यावरून लिह हा शब्द सव्यय ठरतो.

( क ) व्यय म्हणजे कोशगत शब्दास वाक्यांत येतांना होणारा विकार.

( ख ) क्रियाविशेषणादिकांची अव्यय ही संज्ञा.

या दोन गोष्टी लक्ष्यांत घेतल्या म्हणजे अव्ययभिन्न शब्द जातीस सव्यय ही संज्ञा सहजच प्राप्त होते, म्हणजे नाम, सर्वनाम, विशेषण व धातू या शब्द-जाती **सव्यय** ठरतात.

**विकारी** या शब्दात असलेला विकार हा शब्द शास्त्रीय नाही व्यय हा शब्द जसा विशिष्ट रूपविकारासच लागतो, तसा विकार हा लागत नाही शास्त्रामध्यें संज्ञा योजणें ती जितकी निश्चितार्थ असेल तितकी चागली. तिचा अर्थ मोघम किंवा सामान्य नसावा, विशिष्ट, नियत, ठराविक असा असावा, या दृष्टीनें ( बनहट्टीनी सुचविलेल्या ) हिंदीतील विकारी या संज्ञेपेक्षा सव्यय ही संज्ञा प्रशस्त ठरते शास्त्रातील संज्ञा यावच्छक्य पारिभाषिक असावी. व्यय व विकार याची तुलना केल्यास व्यय हा शब्द पारिभाषिक आहे, तसा विकार नाही, हें कोणासही पटेल हिंदी भाषेतील संज्ञा उचलताना संस्कृतात कोणत्या संज्ञा आहेत, त्या कितपत उपयुक्त आहेत, त्यावरून कोणत्या संज्ञा सहज सिद्ध होतील, इत्यादि गोष्टींचा विचार प्रथम अवश्य करण्यात यावा हिंदी संज्ञा उपयुक्ततर वाटल्यास, ती अवश्य घ्यावी, हें मान्य, पण केवळ नवीनत्वासाठीच हिंदी व्याकरणातील संज्ञा पसत करणें योग्य नाही. संस्कृतात अव्यय संज्ञा आहे, याच एका गोष्टीवरून सव्यय ही संज्ञा संस्कृत-परंपरेस धरूनच आहे, असें म्हणता येईल अमूक जाती जर अव्यय, तर बाकीच्या कोण ? अर्थात् सव्यय. करिता हिंदी व्याकरणाचा आदर वाजवीहून अधिक करूं नये, असा इषारा देणें मला योग्य वाटतें आपण हिंदी या बहिणीपेक्षा संस्कृत, जी मराठीची आई, तिचाच अभिमान जास्त धरणें साहजिक दिसते

४ **प्रयोग**—या शब्दास मराठी व्याकरणात पारिभाषिक अर्थ प्राप्त झाला आहे. अशी स्थिति संस्कृतात नाही. हा शब्द मराठीत इतका रूढ आहे की, त्याचें उच्चाटन करणें किंवा त्यास गौणत्व देणे सर्वथा अनिष्ट दिसतें. कोणाच्या मतें त्यानें दर्शित गुणसमुच्चय ( Connotation ) जरी रूढार्थास पूर्णपणें अनुकूल नसला, तरी त्याचे जागी ( बनहट्टींनी सुचविलेल्या ) कर्तृत्वाच्यान्तर्गत कर्तरि, कर्मवाच्यान्तर्गत कर्मणि इत्यादि बोजड किंवा सकुल संज्ञा योजणें योग्य होणार नाही. ' जुनें तें सोनें ' हें मत वारंवार व्याकरणात अंगीकृत आढळतें. समासाच्या रूढ संज्ञा या काय इष्टार्थवाहक आहेत ? त्यांचे जागी अनुरूपार्थ संज्ञा भगवान् पाणिनीला योजिता आल्या नसत्या काय ? पण त्यानें रूढपूर्व म्हणूनच त्या अंगिकारिल्या, त्याचे जागी दुसऱ्या योजिल्या नाहीत, अन्यथा, अभ्यासकाचा घोटाळा झाला असता हाच मार्ग

आपण मराठीत अनुसरून, प्रयोग ही सज्ञा गौणार्थक ठरवूं नये, असें मला वाटते असो. तिचा अर्थ मराठीत काय आहे ?

राम जातो–यात जातो–चा प्रयोग कर्तरि आहे कारण काय ? जातो–चें साधर्म्य रामाशी आहे, व 'राम' जाणें या क्रियेचा **कर्ता** आहे म्हणजे ठरते की, **प्रयोग** म्हणजे **क्रियापदाचें साधर्म्य** या अर्थावरून स्पष्ट होतें की, प्रयोग ही सज्ञा केवळ रूपप्रधान आहे कर्ता किवा कर्म याचे अर्थदृष्ट्या कमजास्त महत्त्वाशी तिचा काहीएक सबध नाही देय दीनजनाय च वित्तम्–अशा ठिकाणी 'देय' हे रूप कर्मणि आहे कारण त्याचें साधर्म्य वित्तम्–या नामाशी आहे व वित्त हें नाम दानक्रियेच्या कर्मभूत वस्तूचें वाचक आहे. देय या कर्मणि ( Participle ) उपाख्यातास अनुरूप असे कर्तरि उपाख्यात भाषेंत नाही तरी सुद्धा असल्या रूपास कर्मणि एवढेंच म्हणतात, कर्तृवाच्य कर्मणि म्हणत नाहीत येथे कर्तरि रूपच नसल्याने, कर्त्यास प्राधान्य असो वा नसो, नेहमी हीच कर्मगामी रूपें योजण्यात येणार अशा स्थितीत या उपाख्यातास कर्तृवाच्य की कर्मवाच्य,-काय म्हणावें ही चिता संस्कृतात केलेली नाही मराठीतही निदान पदसमर्शापुरती तरी तिची जरूरी नाही. कर्तरि, कर्मणि, भावे इत्यादि सज्ञाचा अर्थ मुळात उघड–उघड रूपप्रधान असल्यानें त्या कर्तृकर्मांच्या सापेक्ष महत्त्वाकडे मुळीच लक्ष्य देत नाहीत. शिवाय विवक्षितार्थ–निर्वाहास त्या सर्वथा पर्याप्त आहेत करिता त्या सज्ञाच्या डोक्यावर कर्तृवाच्य इत्यादि नवीन सज्ञाविभाग लादण्याचें कारण नाही. कर्तृ कर्मांच्या अनुवाद्य–विधेयत्वाकडे लक्ष्य देणे हा केवळ वाक्यविमर्शाचा ( = वाक्यपृथक्करणाचा ) विषय आहे.

**५ वाच्य***––रामो राक्षसान् हन्ति,-येथें हन्ति हें क्रियापद ( सस्कृत परिभाषादृष्ट्या ) कर्तृवाच्य आहे. कारण हन्ति या क्रियापदाच्या पुरुष व वचन या धर्मांनी कर्त्याचे पुरुष व वचन उक्त होतात, ज्यावरून वाच्य ही संज्ञा केवळ रूपप्रधान ठरते. 'हन्ति इति रूपम् स्वपुरुषवचनाभ्या कर्तुः पुरुषं वचनं च, ततश्च तद्वन्तं कर्तारं वक्ति.' साराश अशा रीतीनें क्रियापद कर्तृवाच्य म्हटलें काय, कर्तरि म्हटलें काय, किवा कर्तृगामी म्हटलें काय, तिहीचा अर्थ एकच

*कर्ता वाच्य. येन यस्य वा तत् । स्वै पुरुषवचनादिभि. समानधर्मत्वात् कर्तुः बोधः येन जायते तत् कर्तृवाच्यम् । इति फलितोऽर्थ

तेव्हा वाच्य या संज्ञेच्या उपयोगानें आपण नवीन धर्म बोधित करू शकत नाही. करिता ही संज्ञा मराठीस नको आहे शिवाय ती, संस्कृतातच असल्यानें, घेणेंच तर प्रत्यक्ष आईकडूनच घेता येईल, तिचेकरिता बहिणीच्या तोंडाकडे पाहण्याचें कारण नाही. म्हणजे येथें सुद्धा हिंदी व्याकरणाची मदत मराठीला मुळीच होत नाही. शिवाय प्रधान अशा अर्थी 'वाच्य' संज्ञा रा बनहट्टींच्या मतानुसारें योजिल्यास, कर्तृवाच्य इत्यादि संज्ञा वापरणें हें तर सर्वथा गैर, कारण त्यायोगे संस्कृतांतील कर्तृवाच्य इत्यादि सर्वमान्य व चिररूढ संज्ञांशी त्याचा विरोध येऊन, सुबोधतेचे ऐवजी घोटाळाच होणार

६ **जाति विरुद्ध सामान्य**—कोणत्याही जातीच्या सर्व वस्तूमध्यें असा एखादा विशिष्ट धर्म आढळतो की, जो सर्वात समान रूपानें असतो. अशा एखाद्या धर्माशिवाय जाती बनणेंच शक्य नाही यासच सामान्य धर्म म्हणतात. **सामान्य धर्मामुळें जाति ठरते, व जातीच्या प्रत्येक व्यक्तींत सामान्य धर्म आढळतो**, असा दोहोंचा, दृढ अन्योन्यसंबंध आहे अशा स्थितीत जातीतील सर्व व्यक्तींचें समुच्चयानें बोधक म्हणून जातिनाम किंवा सामान्यनाम यापैकी कोणतीही संज्ञा योजिली तरी त्यामुळें मोठासा फरक होतोसें दिसत नाही मग रा बनहट्टींनी आपल्या वैयाकरणांची परंपरा सोडण्यास कां पहावें, समजत नाही. सारांश सामान्यनाम ही चिरपरिचित व इष्टार्थबोधक संज्ञा टाकून, जातिवाचक नाम ही संज्ञा घेणें प्रशस्त दिसत नाही

---

## खंड २. पदसंमर्श (Parsing)

**पदसंमर्श** (parsing)—आपण एखाद्या (ऐतिहासिक) पुरुषाचें वर्णन करितों त्यात सामान्यतः त्रिविध गोष्टींचा विचार करितों (१) तो पुरुष कोण होता? (२) त्याला काय-काय संस्कार झाले, तो कोण–कोणत्या पेशानी वागला? (३) त्याचें इतिहासात स्थान कोणतें? अशीच त्रिविध पाहणी वाक्यातील शब्दांची यथासंभव होते ' यवनानें दिल्ली घेतली '--हें वाक्य घेऊ. यातील यवनानें—चा पदसमर्श असा होईल. यवनानें (१) यवन--सामान्यनाम, अकारान्त, पुलिंग (२) एकवचन तृतीया विभक्ति. (३) अर्थ—कर्ता, घेतली या क्रियापदाचा येथें (१) प्रथम कोशगत रूप सांगून त्याची जाति

सांगितली, ती अशी–पुलिंगी सामान्य नाम,नंतर ( २ ) या शब्दास दृश्यादृश्य झालेले विकार ते म्हणजे एकवचन, तृतीया विभक्ति. शेवटी ( ३ ) हें पद वाक्यात कोणतें काम करीत आहे हें कर्ता या शब्दानें सांगितलें नामाच्या जातीबरोबर त्याचें लिंगही सांगितलें कारण नामाचें लिंगही स्वयम्भू असतें. विशेषणाचे लिंग मुळात अनिश्चित असतें. तें वाक्यात विशेष्याच्या धर्मानुसारें ठरतें. कोशात नामासबधानें समजतात ते धर्म म्हणजे जाती व लिंग, वचन व विभक्ति हे त्याचे धर्म वाक्याधीन असतात हे दोन्ही विकार क्वचित् जरी प्रत्ययसिद्ध नसले तरी संवादरक्षणार्थ त्याचें अस्तित्व नेहमी स्वीकारण्यात येतें. यवन–चें अनेकवचन यवन–असेच जरी असले, म्हणजे येथें अनेकवचनाचा प्रत्यय दिसला नाही तरी, अवा–अवे इत्यादि ठिकाणी वचन–द्वय रूपभेद-द्वारा प्रत्यक्ष असल्यानें, सर्वच नामाना वचनद्वय मानण्यात येतें अशीच प्रथमेची स्थिति. प्रथमेचे रूप प्रायः मूळरूपाहून भिन्न नसलें तरी प्रथमा विभक्ति मानण्यात येते प्रथमा विभक्तीच्या ऐवजी 'मूळरूप' असा प्रयोग व्याकरणात करीत नाहीत ( १ ) जातीमध्यें शब्दाच्या आठ जाति व त्यान्च्या उपजाति याचा निर्देश होतो. ( २ ) रूपविकार किंवा व्यय यात नामाच्या कोशोद्धृत रूपास होणारे विकार सागण्यात येतात हे विकार म्हणजे वचन, विभक्ति, व बदलत असेल तेथें, लिंग. लिंग बदलत नसल्यास त्याचें कथन जातीबरोबरच करणे बरें. घोडा या नामाचें घोडे असे अनेक-वचन म्हणणें म्हणजेच घोडे या विकारास अनेकवचन म्हणणें तसेंच घोड्यास या रूपविकारास विभक्ति म्हणतों विभक्ति म्हणजे रूपविकारच या रूपविकाराची निवेशना वचनाबरोबर झाल्यानतर, ( ३ ) तिसरे भागात आपण त्याचें वाक्यगत स्थान, किंवा प्रयोजन सागतों दिल्ली घेतली–यातील घेणें या क्रियेचा यवन कोण लागतो ? यवन कर्ता लागतो, तो घेणारा आहे कर्ता हा अर्थ **नें** या प्रत्ययानें द्योतित होतो. अशा द्योतित अर्थाला कारक म्हणतात वाक्यातील क्रियापदोक्त क्रिया घडण्यात ज्या-ज्या गोष्टीचा किंवा वस्तूचा संबध येतो, त्या-त्या गोष्टीस वा वस्तूंस कारकें म्हणतात. कोणी ती क्रिया करितो, कोणावर ती क्रिया घडते,कोणी साधन असतो, कोणी जागा होतो, तर कोणी प्रयोजन बनतो इ. असली भिन्न-भिन्न नातीं विभक्ति–प्रत्ययद्वारा बोधित होतात. थोडक्यात **रूप म्हणजे विभक्ति व नातें म्हणजे कारक.** साराश–अगोदर विभक्ति रूपविकार' या सदरात सागून,

नंतर संबधकथनातच कारक सागणें योग्य दिसतें एकच विभक्ति भिन्न-भिन्न ठिकाणी भिन्न-भिन्न कारकें बोधित करू शकेल. मी **रामाला** ( कर्म ) बोलावितों चार **पैशांला** (करण) पाच अंबे मिळाले. **डोक्याला** ( अधिकरण ) टोपी घाल अशा रीतीनें 'ला' प्रत्ययान्त रूप तीन कारकें व्यक्त करू शकतें अशा ठिकाणी विभक्ति मुळीच न मानिता केवळ कारकेंच मानिल्यास, आपण ज्यास विभक्तिरूपे म्हणतो त्याविषयी माहिती विद्यार्थ्यांस कशी देणार? नुसती कारकेच मानिल्यास कोणती अडचण येईल, याचें दिग्दर्शन येथें करू

| घर | एकवचन | अनेकवचन |
|---|---|---|
| कर्तृकारक | घरानें, घर, घरास-ला | घरानी, घरें, घरास-ला-ना |
| कर्मकारक | घर, घरास, घराला, पायात ( जोडा घाल ) | घरें, घरास-ला-ना पायात |
| करणकारक | घरानें-घराला | घरानी-घराला-ना |
| सप्रदान | घरास-घराला | घरास-घराला-ना |
| अपादान | घरून | घरून |
| अधिकरण | घरी, घरात, घराला-घरास दिवसाचा ( निजतो ) | घरीं, घरात घराला,घरास |

**घराला हे रूप-१ घराला** हा भार सोसणार नाही येथें कर्तृकारक आहे. २. एका **घराला** ( एक घर देऊन ) काय मिळणार? येथें करणकारक आहे, कारण तें साधन दर्शवितें. ३ **घराला** चार दरवाजे आहेत येथें अधिकरण आहे ४ **घराला** हें रूप कर्म व संप्रदान वारवार असतेच ही अशा प्रकारची रूपव्यवस्था असल्यानें रा. बनहट्टी घराला हें रूप कोणतें कारक म्हणणार? घोटाळा भासतो म्हणून विभक्ति या संज्ञेस अजिबात टाळणें योग्य नव्हे. तर्कशास्त्राधारें घोटाळा काढून टाकणें हें तर वैयाकरणाचें काम आहे. **माझें** गिऱ्हाईक ( नपु ) थाबलें आहे, **त्याचे** वडील ( अ. व ),-अशा ठिकाणी रूप व अर्थ यात विसंवाद दिसतो म्हणून, नामाचें लिंग व वचन मुळीच सागू नये, हें म्हणणें योग्य होईल काय? गिऱ्हाईक हा शब्द नपुसकलिंगी तर तद्बोधित व्यक्ति पुलिंगी ( पुरुष ) किंवा स्त्रीलिंगी ( स्त्री ), वडील शब्द अनेकवचनी, तर तदुक्त व्यक्ति बाप एकच, असला विसंवाद वस्तुतः विसंवादच नाही वाक्यातील शब्दाचें लिंग म्हणजे नियमानें व्यक्तीचेंच लिंग,

असे नव्हे. संस्कृतादि भाषांत व्यक्तीप्रमाणे नामशब्दांसही स्वतःचें लिंग असतें. वचनाचीही गोष्ट अशीच. लिंग–वचन–विभक्ति रूपविकाराचीं नांवें आहेत, तीं स्वरूपावरूनच ठरणार, त्यांचा बोधित वस्तूशीं मेळ असेल वा नसेल. मागें सांगितलेली विभक्तीची व्याख्या लक्ष्यांत ठेविल्यास एकच विभक्ति कधीं एक, तर कधीं दुसरें, कारक बोधित करतांना आढळेल. विभक्ति अजिबात न सांगितल्यास घोटाळा होणार नाहीं काय? एकच कारक कधीं एक, तर कधीं दुसऱ्या प्रत्ययानें उक्त होईल. घरांत हें रूप अधिकरण दर्शवितें, तर घराला (खांब आहेत) हेंही तेंच करितें. सारांश–घोटाळा जर उरणारच, तर पूर्वपरंपरागत व्यवस्था कां सोडा? शिवाय विभक्ति संज्ञा पूर्णतः गाळल्यास वाक्यांत आढळणारीं नामाचीं रूपें कोणत्या तत्त्वानुसार विभागणार, तीं मुलाकडून पाठ कशीं करविणार?

घर, घरास–घराला–घरातें—कर्तृकारक

घरीं, घरांत–घराला–घरास—अधिकरणकारक

घरानें, घराला–स ... करणकारक

असें विद्यार्थ्यांस घोकावयास सांगणार काय?

घराला हें एकच रूप (सुमारें पांच म्हणजे) अनेक ठिकाणीं येत नाहीं काय? शिवाय, कोणतेंही रूप वाक्यांत आल्याशिवाय,त्याचें कारक तरी निश्चयानें कसें ठरणार? वाक्याचे बाहेर, अभ्यास करितांना या रूपांना अस्तित्वच नाहीं काय? सारांश–विभक्ति ठेवण्यापेक्षां ती गाळण्यानेंच घोटाळा अधिक होणार, करितां विभक्तिसंज्ञा सर्वथा रक्षणार्ह आहे, असें दिसून येईल (१) लिंग-वचनाप्रमाणें विभक्ति हा एक रूपविकार आहे, व (२) कारक हें नामबोधित वस्तूंचें क्रियेशीं असलेलें नातें आहे, एवढ्या दोन गोष्टी लक्ष्यांत ठेविल्यानें विभक्ति व कारक यांचा घोटाळा उडण्याचें कारण नाहीं. (Parsing=) पदसंमर्शामध्यें विभक्ति–निर्देश दुसऱ्या सदरांत करण्यांत येतो, तर कारक किंवा अर्थ हा तिसऱ्यांत सांगण्यांत येतो. पूर्वोक्त पदसमर्शाचें त्रिविधत्व यथार्थपणें लक्ष्यांत घेतल्यास विभक्ति व कारक या दोन्ही गोष्टी परस्पर-भिन्न व परस्परपूरक आहेत हें कोणासही पटेल.

---

## खंड ३. प्रयोग व हिंदींतील व्याकरण-संज्ञा.

१ **प्रयोग-विचार**—(१) माजर उंदीर पकडितें
(२) माजराने उंदीर पकडिला,
माजराकडून उदीर पकडला जातो,
किंवा पकडण्यात येतो.
(३) माजरानें उदिरास पकडिलें

येथील प्रयोगाचा विचार करू

१ **पकाडिते** न लिंग का ? माजर नपुसकलिंगी म्हणून पकडणें या क्रियेचे मांजर कोण लागतें ? कर्ता म्हणून पकडितें हें रूप कर्तृवाच्य किंवा कर्तरि किंवा कर्तृगामी, व पकडिते-चा प्रयोग कर्तरि

२ **पकाडिला** पुलिंग का ? उदीर पुलिंगी म्हणून उदीर कोण ? पकडलेला, म्हणजे पकडणें या क्रियेचें कर्म तेव्हा पकडिला याचा प्रयोग कर्मणि **पकडला जातो, पकडण्यांत येतो** ही क्रियापदे पुलिंगी का ? उदीर पुलिंगी म्हणून उंदीर कोण ? कर्म म्हणून याचा प्रयोग कर्मणि माजराकडून असें तृतीयाभिन्न पद जरी येथे विद्यमान आहे तरी तें कर्त्याचाच बोध करीत आहे, ज्यावरून ठरतें की कर्ता प्रथमेनें, तृतीयेने किंवा 'कडून' या शब्दयोगी अव्ययांनेंही व्यक्त केला जातो, व जा, ये हे प्रयोगसहायधातू होत A mouse is caught by a cat यातील by a cat हा पदयोग कर्त्याचाच बोध करितो

३ **पकडिलें** नपुसकलिंगी का ? स्वतत्र म्हणून सबब पकडिलें-चा प्रयोग भावे (१) मी दार उघडितों –(२) मला दार उघडतें या वाक्यात उघडणें ही क्रिया आहे. ही क्रिया करणारा कोणी तरी पाहिजे, हें कबूल दार हें या क्रियेचा (मूळ) कर्ता असणें शक्य नाही. पहिल्या वाक्यात मी कर्ता आहे, दुसऱ्या वाक्यात मूळचें कर्म असलेलें दार हेंच कर्ताही मानण्यात आलें आहे येथें **मला** या रूपानें उघडण्यास लागणारी शक्ति सांगितली आहे, म्या किंवा मजकडून अशा रूपानें कर्ता सांगितला नाही. अर्थात् मला यानें कर्ता बोधित नसून शक्तीचा आधार बोधित होतो. सारांश 'मला दार उघडतें' यात दार हेंच कर्म व तोच कर्ता अशी स्थिति आहे. दार असें आहे

की, तें बाह्य शक्तीस आपणास उघडू देतें, ज्यामुळें उघडण्याचें कर्तृत्व एका प्रकारें दाराकडे येतें यामुळें ' उघडतें ' प्रयोगास कर्मकर्तरि म्हणतात उघड-सारख्या आणखीही काही सकर्मक धातूवरून कर्मकर्तरि प्रयोग होतात. मी हरबरे **चावतों** ( कर्तरि ), मला हरबरे **चावतात** ( कर्मकर्तरि )

जाता-जाता येथें दोन विभक्तिरूपाचा विचार करू वाऱ्यानें दार उघडलें; हा प्रयोग कोण ? कर्मणि नव्हे, तर कर्मकर्तरि मग वाऱ्यानें या तृतीयेचा अर्थ काय ? येथें उघडण्यात वारा हा काय काम करीत आहे ? वारा केवळ निमित्त होत आहे म्हणून वाऱ्याने ही निमित्तार्थी तृतीया होय वाऱ्यानें दार उघडतें, उघडेल असेंही वर्तमान-भविष्यकाळी प्रयोग होतात या दोन काळी तर तृतीयात कर्त्यानें युक्त असा कर्मणि प्रयोग कधीच नसतो तेव्हा ही दोन्ही क्रियापदें, म्हणजे उघडतें, उघडेल ही, कर्म-कर्तरि होत याच्या धर्तीवर उघडलें हेंही कर्मकर्तरीच मानिलें पाहिजे चाकरानें दार **उघडिलें**, हा मात्र कर्मणि प्रयोग आहे मला दार उघडतें, येथे उघडण्यास लागणारी शक्ति कोठें आहे ? ती कोणती ? याचें उत्तर **मला** हें आहे करिता मलाही **शक्त्यर्थी** चतुर्थी होय.

२ **भाषात्रय-प्रयोग-तुलना.**

| संस्कृत | मराठी | इंग्रजी |
|---|---|---|
| १ **कर्तरि** | **कर्तरि** | **Active** |
| अहं द्वार उद्घाटयामि | मी दार उघडितों. | I open the door |
| २ **कर्मणि** | **कर्मणि** | **Passive** |
| मया द्वार उद्घाट्यते | मी दार उघडिलें, मजकडून दार उघडिलें गेलें, किंवा उघडण्यात आलें | The door was opened by me |
| ३ **कर्मकर्तरि** | **कर्मकर्तरि** | ( Nil ) |
| अकीर्तिः अतिरिच्यते नागराजः अन्तरधीयत | मला दार उघडतें हें जातें मला ओढत नाही | The book is printing. The stone feels rough. |
| ४ ( शून्य ) | **भावकर्तरि** | **Impersonal** |
| | त्याला उजाडलें. | It dawned |
| ५ **भावे** | **भावे** | ( Nil ) |
| पापैः म्रियेत | पाप्यानी मरावें. रामानें राक्षसास मारावें. | |

२. **कांहीं शब्दजातींचीं नांवें**-(१) इंग्रजीत धातूस Verb म्हणतात, व वाक्यगत धातूच्या रूपास म्हणजे क्रियापदासही तीच संज्ञा देतात goes हें Verb, तर to go हेंही तेंच. इंग्रजी भाषेत कोशगत शब्द व वाक्यगत पद याच्या रूपात विरळा फरक पडत असल्यानें दोहोंसही एकच संज्ञा देण्यानें विशेष बिघडत नाही पण मराठीत तशी स्थिति नाही त्यामुळें शब्द व पद याच्या संज्ञात भेद करणे मराठीस प्राप्त होते. जा हा शब्द धातू आहे. तर जातो हें पद क्रियापद आहे. मराठीत असा संज्ञाभेद इष्ट आहे धातूचे स्थानी हिंदी भाषा क्रिया हा शब्द योजतें, ते (रा. बनहट्टीस योग्य वाटत असलें तरी) चूक आहे. जा हा शब्द काय आहे? तो काय क्रिया आहे? मुळीच नाही शब्द क्रिया कसा असेल? जा हा शब्द जातो, जाणार इत्यादि पदाचें मूळ असल्यामुळें धातू आहे. तेव्हा क्रिया हा शब्द धातूचे ऐवजी योजणे, हा हिंदीचा गचाळपणा आहे. धातूस क्रिया, तर नामास वस्तू म्हणणार काय? शब्द-जातीमध्यें क्रियापदाचा समावेश आद्य व्याकरणकार दादोबा यानी केला आहे. पण त्याचे स्थानी धातू हाच शब्द समर्पक असल्यानें, आपण योजिला पाहिजे (२) उद्गारवाचक हा शब्द चिररूढ असल्यानें रक्षणार्ह आहे अर्थाच्या नीटनेटकेपणाकरिता त्याचे ठिकाणी दुसरा शब्द योजणेंच तर, (बनहट्टीनी सुचविलेला) **विस्मयादिवाचक** न योजिता, भावनाबोधक किंवा भावनावाचक असा एखादा शब्द योजणें बरें. एखादी वस्तू **अमूक आहे**, असे सागणें हें केव्हाही ती अमक्या प्रकारची आहे, अमक्यामध्यें जमा होतें, असे सागण्यापेक्षा बरें. विस्मय वगैरे काय आहेत? उत्कट भावनाच की नाही? मग भावना न म्हणता, विस्मय वगैरे म्हणणे गैरसोईचें दिसते 'देव आले' असें म्हणणें केव्हाही 'इंद्र वगैरे आले' असें म्हणण्यापेक्षा जास्त समर्पक. देव यानें 'कोण?' याचें उत्तर मिळतें. पण 'इंद्र वगैरे' यानें कोण याची आकाक्षा अपुरी राहते. तेव्हा, माझ्या मतें, क्रियापदस्थानी धातू व उद्गारवाचकाचे स्थानी भावनाबोधक या संज्ञा योजाव्या उद्गारवाचक ठेवण्यास माझी हरकत नाही परतु, तो बदलणेंच तर त्याचें जागी विस्मयादिबोधक ठेवू नये. उद्गारवाचक बदलण्यास दुसरें एक मोठें कारण असें आहे की, संस्कृतात उद्गार याचा अर्थ ढेंकर, फवारा असा आहे. दादोबानी Exclamation -च्या घटनेंतील उपसर्ग-धातूस अनुलक्षून ही संज्ञा योजिलेली दिसते पण ती संस्कृतातील रूढार्थानुसारें अनिष्टार्थबोधक असल्यानें समर्पक नाही.

३ **उपसंहार**—येथवर सांगितलेल्या गोष्टींचें संक्षिप्त कथन. ( क ) ज्या वाक्यगत नाम-सर्वनामाच्या रूपाचा अर्थ ( कारक ) नेहमी तुल्य असतो, ती रूपें एका विभक्तीची, मात्र लिंग व वचन याशी मेळ राखण्याकरिता एकच रूप अनेक विभक्तींचें मानावे. ( ख ) व्यय म्हणजे कोशगत शब्दास पदत्व देणारा रूपविकार. यानें सव्ययें म्हणजे नाम, सर्वनाम, विशेषण व धातू यास होणारे लिंग, वचन, विभक्ति, काळ, पुरुष,-एतदर्थ विकाराचा बोध होतो ( ग ) अव्यय शब्दाहून भेद दर्शविण्यासाठी सव्यय ही संज्ञा योजावी. ( घ ) प्रयोग म्हणजे क्रियापदाचें साधर्म्य-कर्त्याशी, कर्माशी किंवा भावाशी ( अथवा स्वतन्त्र ) ( ङ ) जातिनामाचा अर्थ व्यवहारतः सामान्यनाम यानें सम्यक् बोधित होत असल्यानें सामान्यनाम ही संज्ञा टाकण्याचें कारण नाही. ( च ) Parsing किंवा पदसमर्श यात तीन गोष्टी समाविष्ट होतात ( १ ) अमूक पद कोणत्या शब्द जातीचें आहे ? ( २ ) त्याचे रूपास विकार झाले असल्यास ते कोणते ? ( ३ ) वाक्यात जवळच्या प्रधान शब्दाशी त्याचें नातें काय आहे ? यात विभक्तीचा विचार ( २ )-मध्यें व कारकाचा विचार ( ३ ). मध्ये पडतो ( छ ) विभक्ति ही सज्ञा गाळणे व्यावहारिक नाही कारकानें विभक्ति या सज्ञेचें काम भागावयाचें नाही कारक अर्थपर, तर विभक्ति रूप-पर, संज्ञा आहे यामुळें त्या परस्परास पूरकच ठरतात, व्यावर्तक होत नाहीत. ( ज ) मराठीतील प्रयोग-( १ ) कर्तरि-मी जातों. ( २ ) कर्मणि-रामानें रावण मारिला, रामाकडून रावण मारिला जातो किंवा मारण्यात येतो. ( ३ ) कर्मकर्तरि-मला दार उघडतें ( ४ ) भावे-रामानें वनास जावें,-रावणास मारावें ( ५ ) भावकर्तरि-मला उजाडले असे प्रयोग एकदर पाच आहेत. ( झ ) वाच्य या संज्ञेची, प्रयोग या संज्ञेच्या-व्यापक किंवा समावेशक विभागाकरिता म्हणून, मुळीच जरूरी नाही. शिवाय कर्तृवाच्य इत्यादि संज्ञाचे अर्थ कर्तरि इत्यादिकाच्या अर्थाहून मुळीच भिन्न नाहीत. कर्तृवाच्य इ० संज्ञा संस्कृतात रूपप्रधानच आहेत. ( ञ ) क्रियापदाचे स्थानी धातू, व उद्गार-वाचकाचे स्थानी ( संज्ञातर योजणेंच तर ) भावनाबोधक अशा संज्ञा योजाव्या.

अशा रीतीनें रा बनहट्टी य च्या लेखातील मुख्य-मुख्य गोष्टींविषयी मीं आपली मतें येथें सक्षेपतः माडिली आहेत हा लेख संपविण्यापूर्वी एका गोष्टी-कडे वाचकाचे लक्ष्य वेधणें मला जरूर वाटतें

४. पान ९१ मध्ये रा बनहट्टी म्हणतात, " त्याला गाणे आवडतें, " यात त्याला हे कर्त्याचे अर्थी सप्रदानकारक आहे, म्हणजेच सप्रदान कर्ता आहे. अशा प्रकारचा विरोध न यावा म्हणून तर पाणिनीनें विभक्तिसंज्ञा काय, किवा कालसज्ञा काय, केवळ क्रमाधिष्ठित योजिल्या आहेत, हें मर्म वैयाकरणानी स्मरणीय आहे एरवी ' विलङ्घ्य लङ्का निकषा हनिष्यति ' अशा ठिकाणी हा भविष्यकाळ भूतकाळ आहे असें म्हणण्याचा प्रसग आला असता रा बनहट्टीचे म्हणण्याचा आशय असा दिसतो की, त्याला ही ( रूढभाषेत ) चतुर्थी विभक्ति, अर्थ कर्ता. पण येथें आवडणें ही क्रिया अकर्मकच असल्यानें, 'त्याला' हा कर्ता घेतल्यास गाणें कर्म ठरणार, व वर्तमानकाळी कर्मणि प्रयोग होणार पण अकर्मक क्रियेला कर्म येणार कोठून ? आवडणें हें जसें व्यक्तीच्या तसेंच आवडणाऱ्या वस्तूच्याही गुणावर अवलबून असतें म्हणून आवडणेचे कर्तृत्व वस्तूकडे जाण्यास हरकत दिसत नाही आवडणारे काय ? तो मनुष्य की तें गाणें ? उत्तर-गाणें तर गाणे हाच कर्ता होईल रा बनहट्टी याची विचारसरणी येथे घेतल्यास, **मला** स्वप्न **पडलें**, ठेंच **लागली**, प्रचीती **आली**, पत्र **मिळालें**, चेंडू **सांपडला**, भुकेला कोंडा **चालतो**,(मला) छत्री (वर्षभर) **टिकते**,शंभर रुपये दरमहा **पुरतात**, ह्या सर्व ठिकाणी सुद्धा 'मला'हा कर्ता मानावा लागेल असा कर्ता मानण्याची त्याची तयारी आहे काय ? मला वाटतें, प्रस्तुत चूक इग्रजीतील to like या धातूशी आवड-ची समानार्थकता मानिल्यामुळें झाली आहे पण आवडणें म्हणजे to like नव्हे, तर to be liked हें लक्ष्यात ठेवावें मराठीत ' णार-प्रत्ययात धातुज ज्याशी समानाधिकरण होईल तोच कर्ता. ' ही व्याख्या नेहमी ध्यानात ठेवावी. कोणत्याही भाषेंत कर्ता काय, कर्म काय-या दोन्ही सज्ञा प्रायः रूपप्रधानच असतात. त्या अर्थप्रधान असत्या तर समानार्थक धातू सर्व भाषातून एकजातीय असते. पण तसा प्रकार नेहमीच आढळतो असें नाही.

मराठी-गाय वाघाला भिते ( अकर्मक ) सस्कृत गौः व्याघ्रात् बिभेति

इंग्रजी-A cow fears a tiger ( सकर्मक )

अशी भेदयुक्त रचना भिन्न-भिन्न भाषात आढळते.

सारांश-येथें **मला** ही चतुर्थी, अर्थ अधिकरण. **गाणे** भाववाचक नाम, प्रथमा, कर्ता आवडतें-चा **आवडतें**-धातु आवड . प्रयोग कर्तरि

**येथें** लिहिलेल्या गोष्टीचा विचार विद्वानानी करावा

---

## १५ व्याकरणसमितीची योजना. [ दोषनिरूपण ]

प्राथमिक शिक्षण, मार्च १९२९,-मध्यें प्रसिद्ध झालेल्या ' व्याकरणाचा नवीन अभ्यासक्रम व योजना ' यावरील **आक्षेप**-

१. **आक्षिप्त गोष्टींचे परिगणन**- (क) मुलगा अंबा खातो, यातील **अंबा** ही द्वितीया, (ख) मला **जावयाचें आहे** यातील **जावयाच आहे** हें संयुक्त क्रियापद, ( ग ) द्रव्यनामाचा अभाव ( घ )अपूर्ण, पूर्ण रीति ( = आवृत्त ) या काळाच्या पोटभेदांचे पंक्तीत **उद्दिष्टाचा** अभाव ( ङ ) तत्पुरुष, बहुव्रीहि **वगैरे** समासाचे श्रेणीत मध्यमपद लोपीचा समावेश, ( च ) प्रयोगाचे बाबतीत अर्थाकडे दृष्टि ठेवावी ( छ ) रूढीवर शास्त्राची कुरघोडी अनिष्ट, ( ज ) संज्ञा व रूपे-क्रियापद, साहाय्य, पुलिंग

२ **वरील गोष्टींचे खंडन**—( क ) मुलगा अंबा खातो यातील **अंबा** ही प्रथमा आहे मुलें परीक्षेला बसताना, त्याचा काही एक क्रम ठरलेला असतो, नंतर परीक्षा झाल्यावर त्याचा गुणानुरूप निराळा क्रम लावण्यांत येतो हा उत्तरोक्त क्रम पूर्वीच लावून ठेवणें शक्य नाही मुलें जशी येतील तशी, किंवा आल्यावर त्याच्या नावाच्या आद्य वर्णाच्या क्रमानें, यादीत घातली जातात कोणता मुलगा गुणानुरूप कितवा असेल, हें अगोदर मुळीच पहात नाहीत अशीच व्यवस्था व्याकरणात आहे. नामाची रूपें आढळतात तशी, काही एक क्रमानें (त्याच्या उपयोगाच्या महत्त्वाच्या मानाने) माडण्यात येतात.येथें फक्त रूपविकाराचा प्रश्न नंतर वाक्यात त्या रूपाचे उपयोग ठरतात. एकच रूप अनेक उपयोगात आढळतें उलट अनेक रूपाचेही काही उपयोग मिळते आढळतात. प्रथम नामाची रूपें एका विशिष्ट क्रमानें लावून, त्यास संज्ञा देतात, त्यांसच विभक्ति म्हणतात नंतर अर्थाचा विचार होतो त्यात आढळणाऱ्या अर्थास सामान्यतः कारक म्हणतात रूपें म्हणजे विभक्ति घेऊन, त्याचा उपयोग किंवा कारक वाक्यातील अर्थानुसार ठरवितात म्हणूनच

व्याकरणात अमूक **विभक्तीचे अमुक अर्थ** अशी व्यवस्था आढळते, अमूक अर्थाच्या अमूक विभक्त्या अशी आढळत नाही तेव्हा अगोदर रूप व नंतर अर्थ, प्रथम विभक्ति व नतर कारक, हा क्रम ठरतो

३ तो **दशमीला** परत येईल, दशरथानें **भरताला** राज्य दिलें, **भुकेला** कोंडा चालतो, **मला** ही बोरें चावतात, इत्यादि ठिकाणी ला-प्रत्ययान्त रूप निरनिराळी कारके दर्शविते,-अधिकरण, सप्रदान, निवार्य, कर्ता इ० तरी पण त्या-त्या कारकानुसारें विभक्तिसञ्ज्ञा बदलीत नाहीत. ला-प्रत्ययान्त रूप चतुर्थीच मानितात म्हणजे **रूप हीच विभक्ति** हें सिद्ध होते उलट-तो **रात्रीचा** जागतो, **रात्रीं** अधार असतो, बोटात **अंगठी** घालितो, **दाराला** कडी आहे, इत्यादि ठिकाणी अधिकरण हा एकच अर्थ भिन्न-भिन्न-प्रत्ययात रूपानी व्यक्त केला आहे तरी पण, अर्थानुरूप सर्व रूपाना एकच विभक्ती न मानिता, त्यास तत्तत्प्रत्ययानुसार निरनिराळ्या विभक्ती मानितात,--षष्ठी, सप्तमी, प्रथमा, चतुर्थी, इत्यादि

४ अर्थावरून म्हणजे कारकावरून विभक्ती मानिल्यास, कारके-कर्ता, कर्म, करण, प्रयोजन, सप्रदान, अपादान, अधिकरण व ( केवळ ) अभिधेय अशी कमीत कमी नऊ असल्यानें निदान ( सबोधनाखेरीज ) इतक्या तरी विभक्त्या मानाव्या लागतील. पण त्या सातच मानण्यात येतात. का ? तर एवढीच भिन्नभिन्न नामाची रूपें सस्कृतात आढळतात म्हणून. यावरून सस्कृत व्याकरणाच्या आधारेंही **रूप म्हणजे विभक्ती** हें सिद्ध होते 'भजे शंभोश्चरणयोः' अशा ठिकाणी चरण जरी कर्म आहे, तरी तदनुरूप त्याची विभक्ति द्वितीया न मानिता, षष्ठीच मानितात

५ इंग्रजीतही असाच प्रकार आहे as a poet he is sublimer than me अशा ठिकाणी, than हें सामान्यतः उभयान्वयी अव्यय गणिलें असूनही, त्याकरिता me ही प्रथमा न मानिता, ( रूपानुरूप ) द्वितीयाच मानितात व तदर्थ उलट than हें येथें शब्दयोगी घेतात. यावरून इग्रजीतही विभक्तिसंज्ञा रूपतंत्र आहे, असेंच ठरतें. साराश-व्याकरणात संज्ञा रूपतत्रच असतात आमचें कुटुंब, आमचे वडील आले, इत्यादि ठिकाणी कुटुंब हा शब्द स्त्रीव्यक्तीचा बोधक असूनही, रूपानुसार नपुंसकलिंगीच मानितात, वडील हा शब्द अर्थदृष्ट्या एकाच व्यक्तीला लागत असूनही येथें अनेकवचनीच मानितात.

६ मुलगा **पिकलेल्या** अंब्याला चुफितो–या वाक्यात अंब्याला ही द्वितीया आहे प्रथमान्य विभक्तीची निशाणी म्हणून त्याच्या मागील विकार्य विशेषणाचे सामान्यरूप झालें आहे असा प्रकार '**पिकलेला अंबा खातो**' यात झाला नाही. येथें मराठी भाषेनेंच स्वतः प्रथमा व तदन्य विभक्ती यात भिंत घातलेली दिसते. आकारान्त विशेषणाच्या अविकृत रूपापुढील विभक्ती ती प्रथमा, व विकृतरूपापुढील ती द्वितीया

७ व्याघ्रो वनं प्रविशति, वन वर्धते–येथें पहिल्या वाक्यात वनं हें द्वितीया आहे, कारण तें कर्म आहे. दुसऱ्या वाक्यात तें प्रथमा आहे, कारण तें नायक आहे येथें, अर्थावरून विभक्ती ठरते, असें कोणी म्हणेल, पण तो केवळ भ्रम आहे. ग्रामः–ग्रामम् या पुलिंगी रूपाशी मेळ राखण्यासाठी, सर्व लिंगात विभक्ती सारख्या असाव्या,एवढ्याचसाठी-वनम् हें एकच रूप प्रथमा व द्वितीया मानण्यात येतें मुळातच तें दोन विभक्तींचें मानण्यात येत असल्यानें, विशिष्ट ठिकाणी त्याच्या अन्यतरत्वाचा निर्णय अर्थानें होतो इतकेंच. मुळात नसलेली विभक्तिसंज्ञा अर्थानें प्राप्त होत नाही. 'प्राशनात् पञ्चगव्यस्य दहत्यग्निरिवेन्धनम्' या पद्यार्धात जे 'प्राशनात्' असा पाठ घेतात ते प्राशनात् हें नायक आहे म्हणून, प्रथमा मानित नाहीत, तर पंचमी प्रथमास्थानी योजिली आहे असेंच म्हणतात. साराश–अर्थ, मुळात नसलेली विभक्तिसंज्ञा रूपास देत नाही, तर असलेल्या एकाधिक संज्ञापैकी विशिष्ट ठिकाणी कोणती, एवढेंच सागतो

'वाघाला ही विभक्ति कोण ?' असें विचारल्यास अर्थवाद्याच्या मताप्रमाणें ( वाघाला धाववते–कर्ता ) प्रथमा, ( वाघाला पाहतो–कर्म ) द्वितीया, ( वाघाला शंभर रुपये पडले–संप्रदान) चतुर्थी, ( वाघाला दगड मारतो–अधिकरण ) सप्तमी, अशी विविध उत्तरें प्राप्त होतील. हें योग्य ठरतें काय ? शिवाय वाघ शब्दाची प्रथमा सागा, असें विचारल्यास **वाघ** ( चालतो ), **वाघानें** ( शेळी मारिली ), **वाघाला** ( धाववते ), अशी उत्तरें वाघ कर्ता असल्यानें अर्थवाद्याच्या मतानुसार प्राप्त होतात; ती ग्राह्य आहेत काय ? नाहीं. तेव्हां **रूपच विभक्ति** हें सिद्ध होतें फार काय ? अर्थवादीच हें तत्त्व न कळत कबूल करितात **रामानें** अंबा खाल्ला–या वाक्यात अंबा कर्म असूनही, तें द्वितीया न मानिता प्रथमाच मानितात का ? तर, प्रयोगाचे उपपत्तीकरिता.

तसेंच, विशेषणाचे सामान्यरूपाचे उपपत्तिकरिताही, रामा पिकलेला अंबा खातो, यातील अंबा ही प्रथमाच मानणें प्राप्त आहे सारांश-व्याकरणविषयाची प्रतिपादनाची सरणी, संस्कृत, इंग्रजी इ अन्य भाषांशी तुलना, मराठी भाषेची प्रवृत्ति, इत्यादि विविध कारणांनी ' रामा अंबा खातो ' यातील अंबा ही प्रथमा ठरते

९ [ ख ] **मला जावयाचे आहे**—यातील 'जावयाचे आहे' हें संयुक्त क्रियापद नाही जावयाचे हें भाववाचक धातुसाधित नाम, व आहे हें क्रियापद मला ही चतुर्थी, अर्थ अधिकरण **पूर्वपक्ष**-(संयुक्त क्रियापद मानणारे म्हणणार) जावयाचें आहे, या दोन शब्दांनी कोणती क्रिया सांगितली जाते ? जाणे हीच करिता दोन्ही शब्द मिळून एकच संयुक्त क्रियापद मानावें असेंच, पत्रें ' लिहून टाकिली '-यातील लिहून टाकिली हें संयुक्त क्रियापद मानावे **उत्तर-पक्ष**-( धातूपासून निघालेल्या ) दोन शब्दांनी **एकच क्रिया** दर्शित होत असल्यास,-ते दोनही शब्द मिळून एक संयुक्तक्रियापद मानावें, असें म्हटल्यास-हत्तीचा कळप, शाळेची इमारत, पुष्करणीचा हौद, माणसाची दाटी, मित्रेपणाची कमाल ( = मोठा मित्रेपणा ) इत्यादि पदयोगही **संयुक्त नामें** मानावी लागतील. हत्तीचा कळप म्हणजे हत्तीच, दुसरें काय ? उंट नाहीत, बैल नाहीत, घोडे नाहीत, झाडें नाहीत पण असें कोणीच मानीत नाही, तुम्हीही मानणार नाही तेव्हा दोन शब्द मिळून एक क्रिया व्यक्त होते म्हणूनच ' जावयाचें आहे ' हें संयुक्तक्रियापद आहे, हें ठरत नाही

१० **'जावयाचें' हें काय आहे** ? मम गन्तव्यमस्ति, I have to go अशी भाषांतरें येथे कोणीही कबूल करील यात गन्तव्य व To go, ही नामें आहेत तर त्याचाच बरोबर मराठी पर्याय असलेलें 'जावयाचें' हेंही नाम का नसावें ? ' वाचण्या**चें**-वाचावया**चें**-**पठितव्यं** पुस्तकम् 'a book to read,' यातही, धातु सकर्मक असतानाही, **चें**-प्रत्ययान्त रूप तव्य-प्रत्ययान्ताचा पर्याय होतें संस्कृतात गन्तव्य हें नाम व पठितव्य हें विशेषण होते हें **तव्य**-प्रत्ययान्त रूप मूळचें विशेषणच त्यातील धातु अकर्मक असल्यास विशेष्याचे अभावी त्यास नामपणा प्राप्त होतो असाच प्रकार मराठीत मानून ( अकर्मक ) जावयाचे हें नाम का मानू नये ? व्रीडितव्यमपि ते सचेतसः ( किरात ) येथें ' व्रीडितव्यम् अस्ति ' असा स्पष्ट प्रयोग आहे,

अडचण एवढीच कीं ( विशेष्याभावी ) अव्ययासारखें दिसणारें 'जावयाचें' हे नाम कसें मानावें ? मूळचें **विशेषण** असलेलें शब्दरूप **विशेष्याभावीं नाम होणारच.** तो पूर्व दिशेस किंवा पूर्वेला गेला, यात 'पूर्व' स्वयमेव असलेलें, विशेषण आहे, तर पूर्वेला यातील नाम आहे अशा रीतीनें 'जावयाचें आहे,' यातील जावयाचें हें धातुविशेषण, नामासारखें प्रयुक्त, प्रथमा, अर्थ कर्ता, आहे–चा. करिता या वाक्यात सयुक्त क्रियापद किंवा भावे प्रयोग मुळीच नाही मला पुस्तक वाचावयाचें आहे–यांतही तीच स्थिति. पुस्तक कर्ता, वाचावयाचें विधिविशेषण, आहे हें क्रियापद, प्रयोग कर्तरि ( अकर्मक ) आहे, कर्मणि किंवा भावे नव्हे.

११ **संयुक्त क्रियापद कोठें मानावे** ? पदसमर्श ( किंवा parsing )–चें काम कोशापासून वाक्यापर्यंत. कोशातून शब्द घेऊन तो वाक्यात योजणे हें व्याकरणाचें काम अर्थात् पदसमर्शामध्यें शब्दाचा विचार होतो तो शब्दाची जाती, त्यास झालेले रूपविकार ( काही झाले असल्यास ), व त्याचें वाक्यातील स्थान किंवा ( पुढील ) शब्दातराशी संबध कोशात धातू सापडतात, आपण ते घेऊन वाक्यात त्याचा उपयोग करितों तो क्रिया दर्शविण्यासाठी. हा क्रियाशब्द क्रियेबरोबर आणखी माहिती देतो ती रूप, अर्थ, काळ, पुरुष, लिग, वचन, प्रयोग एवढीच सप्तविध होय. काळामध्यें क्रियेची अवस्था पूर्ण किंवा अपूर्ण इत्यादिकाचाही विचार करण्याचा सप्रदाय आहे. काही धर्मांची माहिती क्रियापदें केवळ स्वतःचे रूपावरूनच देतात, तर काहीची माहिती देण्यास धात्वंतराची मदत लागते अशा धात्वतराचे योगानें बनलेलें क्रियापद म्हणजेच संयुक्त–क्रियापद होय.

१२. तो जातो, तो जात नाही. येथें पूर्वत्र एका शब्दानें क्रिया सागितली आहे, तर उत्तरत्र दोन शब्द योजिले आहेत नाही हें पद निराळें क्रियाविशेषण म्हणून घेता येत नाही, कारण तसें घेतल्यास जात यास स्वतत्र अस्तित्वच नसल्यानें **जात** या पदाची व्यवस्था लाविता येत नाही. म्हणून ' जात नाही ' असें जोडपद घ्यावें लागतें. यात क्रियेचा निषेध केला आहे. अशा रीतीनें क्रियापद **रूपावरून भावाभाव** दर्शवितें, हें मानणें प्राप्त झाल्यानें (१) ( करण किंवा अकरण ) **रूप** हा क्रियापदाचा धर्म ठरला. (२) धातुबोधित क्रियेसबधी आज्ञा, विधि इत्यादि कल्पना स्वरूपावरून

बोधित होतात. यास क्रियापदाचे अर्थ म्हणतात. ( ३ ) 'गेला' अशा रूपात भूतकाळ स्पष्टच आहे, ज्यावरून क्रियापदाच्या रूपात **काळ** हा धर्म घुसला. 'जातो' यात जाणें या क्रियेची सामान्य अवस्था आहे, तर 'जात आहे' यात ती क्रिया अपूर्ण आहे. यामुळें **अवस्था** हाही क्रियापदाचा धर्म मानणें प्राप्त होतें, परंतु त्याचा अंतर्भाव काळातच करितात. क्रियेचे पूर्णत्वादि धर्म काळाच्या सज्ञेंतील विशेषणावरून व्यक्त केले जातात. इतर चार धर्मांची उत्पत्ति वाक्यगत प्रथमान्त पदाचे साधर्म्यानें व बोलणाराचे विवक्षेनें उपपादिता येते. साराश–क्रियापदाला धर्म लागतात ते रूप, अर्थ, काळ, पुरुष, इत्यादि यापैकीं संयुक्त क्रियापदाच्या रूपाचे विचारात संबंध येतो, तो प्रायः अर्थ व काळ याचा. एका तासात सारी पत्रें लिहून टाकिली-यात लिहून टाकिली एवढें संयुक्त क्रियापद मानिल्यास, सहाय धातु टाक हा ठरणार. आता प्रश्न असा की टाक धातू क्रियापदाचे कोणते धर्म व्यक्त करितो ? काळ की अर्थ ? टाक हा धातू लिहिण्याच्या (१) ( वैयाकरण ) अर्थाची किंवा काळाची फोड मुळीच करीत नाही, ( २ ) अवस्थाही दर्शवित नाही, कारण अवस्था दर्शित होते ती धातूचे लिहीत, लिहिला इत्यादि ठरीव धातुसाधितानी त्या अवस्थाही ठराविकच आहेत. अपूर्ण, पूर्ण, उद्दिष्ट व आवृत्त काळ दर्शविला जातो तो धातूस लागलेल्या प्रत्ययानी. टाक हा धातू आहे, प्रत्यय नाही. करिता सहाय धातूचें कोणतेंही कार्य,– काळ, अर्थ इत्यादि दर्शविणें हें,–'टाक' करीत नाही, ह्यावरून लिहून टाकणें हें सयुक्त क्रियापद नाही, हें सिद्ध होतें.

१३. **पूर्वपक्ष**--लिहून टाकिली म्हणजे लिह धातूची पूर्णावस्था दर्शित होते. करिता लिहून टाकली हें संयुक्त क्रियापद मानावें.

**उत्तर-पक्ष** येथें एकप्रकारें पूर्णावस्था दर्शित असली तरी, ती व्याकरणात मानितात ती नव्हे लिहिलें आहे–हा पूर्णवर्तमानकाळ मानितात, तो का ? तर त्यानें लिहिलेल्या क्रियेची पूर्णावस्था दर्शित होते म्हणून. पण लिहून टाकलीं म्हणजे 'लिहिली आहेत' एवढेंच नव्हे, तर आणखी या जोड शब्दात पत्रें या कर्माशी **संबंधविच्छेद** ही कल्पना आहे. ही कल्पना क्रियापदाचे काळार्थादि धर्मांत कोठेंच समाविष्ट झालेली नाही. रूप, अर्थ इत्यादिकामध्यें सबंधविच्छेद ही गोष्ट मुळीच नाहीं. करिता टाक हा धातू सहाय धातूच्या ठरीव धर्मापैकी कोणताच व्यक्त करीत नसून, नवीनच एक धर्म व्यक्त करितो;

म्हणून तो सहाय धातू होऊं शकत नाही तोच **सहाय धातू** होय की जो अर्थ, काळ इ० ठरीव धर्मांपैकी एक वा अधिक धर्म,- याहून इतर कोणताच नव्हे-प्रस्तुत क्रियेसबंधानें सूचित करितो 'लिहीत होता'याशी लिहीत राहिला,-बसला, चालला यांची तुलना केल्यास दिसून येईल की, 'लिहीत होता' यात लिहिणें या क्रियेची केवळ भूतकालीन अपूर्णावस्था बोधित होते, याहून जास्त काहीही बोधित होत नाही तसा प्रकार इतर जोड-रूपाचा नाही लिहीत राहिला यात सातत्य व लिहीत बसला यात चिकाटी, लिहीत चालला यात खडाचा अभाव, हे भाव अधिक व्यक्त होतात. असले आगन्तुक भाव व्यक्त करणें हे सहाय धातचें काम मुळीच नव्हे सहाय धातूचें काम नियमित आहे तें एवढेंच की अर्थ व काळ इ० धर्मांपैकी एक वा अनेक धर्म प्रस्तुत क्रियेसबधी सागणे. याहून इतर कोणत्याही गोष्टीचा त्यात वासही येता कामा नये. करिता लिहून टाकिली हें संयुक्त क्रियापद नव्हे

१४. **अन्य भाषांचा दाखला**–He kept talking (संस्कृत,) स आलपन्नास्त, तो बोलत राहिला. या तिन्ही वाक्याचा अर्थ एकच आहे. बोलत हा शब्द talking व आह्वयन् याचा पर्याय आहे येथें इंग्रजीत किंवा संस्कृतात संयुक्त क्रियापद मानीत नाहीत. मग मराठीतच तें कोणत्या विचारसरणीनें मानावें ? इतर भाषात येथें क्रिया दोन मानितात. तद्वतच त्या मराठीत का मानू नयेत ? साराश–पौरस्त्य व मराठीची प्रभवभूत अशी **संस्कृत** व पाश्चात्य, उत्तम कमावलेली, आधुनिक अशी **इंग्रजी**, या दोन्हीही भाषा सातत्य ही कल्पना क्रियान्तरोक्त मानितात, तसेच मराठीत मानून, बोलत राहिला, इत्यादि संयुक्त क्रियापदें न मानिता, त्यातील राहिला इ० ( केवळ ) साधी क्रियापदें मानावी

१५. ( ग ) **द्रव्यनामाचा अभाव**—पाक, ( साखरेचें ) चित्र, ( एखादें देवता मानिलेलें चित्र ) गौर या तिहीत मूळ साखरच आहे तरी पण गौर हें विशेषनाम, चित्र हें सामान्यनाम, व पाक हें द्रव्यनाम आहे. **द्रव्यनाम** म्हणजे असें नाम की ज्यानें बोधित झालेल्या वस्तूचें परिमाण किंवा प्रमाण नुसत्या संख्यावाचकानें सागता येत नाही. दहा चित्रें म्हणता येईल, तर दहा **शेर** पाक असें म्हणावें लागेल. किती चित्रें ? दहा. किती पाक ? दहा शेर. अशा रीतीनें ज्याचें परिमाण सागण्यास संख्यावाचकाबरोबर मापाचे वाचक

शब्दाचा प्रयोग करावा लागतो, तद्बोधक नाम **द्रव्यनाम समजावें.** तें न मानिल्यास, पाक यासारख्या नामाची व्यवस्था काय करणार !

१६ (घ) जात आहे, गेला आहे, जात असतो, जाणार आहे, ही रूपें एकाच श्रेणींतील आहेत पहिली तीन सयुक्त काळ म्हणून ग्राह्य, तर चौथेंही तसेंच पाहिजे करिता जात आहे हा अपूर्ण वर्तमान काळ, तर जाणार आहे हा **उद्दिष्ट वर्तमानकाळ** मानणें जरूर आहे

१७ (ङ) समासात तत्पुरुषाचे पोटात कर्मधारय, त्याचे पोटात द्विगु, इ० प्रकार आहेत. परतु उत्तरोक्त दोन्ही प्रकार विशेष महत्त्वाचे व स्वतंत्र दिसत असल्यानें त्याचें गणन तत्पुरुषान्या जोडीनें केलेलें वेळेस चालेल, पण तत्पुरुष, बहुव्रीहि याचे पक्तीस मध्यमपदलोपी बसविणें केवळ अशास्त्रीय आहे. असे वर्गीकरण म्हणजे घोडा, बैल, वाघ, मासजीवी, तणभक्षक, इत्यादि-सारखें होय. तत्पुरुष–बहुव्रीहीमध्यें **वर्गीकरणतत्व** पदाचा परस्परसंबध आहे, तर मध्यमपदलोपीमध्यें लोप हें निराळेंच तत्त्व आहे कोणत्याही वर्गीकरणात तत्त्व एकच असलें पाहिजे तसें नसल्यास तें वर्गीकरण वर्गी-करणच नव्हे.

१८. (च) **प्रयोगाचे बाबतींत अर्थाकडे दृष्टी ठेवावी** (१) याचा अर्थ काय ! प्रयोग म्हणजे क्रियापदाचें साधर्म्य तें कर्त्याशी असल्यास तद्विशिष्ट क्रियापदाचा प्रयोग कर्तरि,कर्माशी असल्यास कर्मणि इत्यादि व्यवस्था व्याकर-णात होणार. येथे अर्थाचा सबध काय ? ‘ त्यानें स्नान केलें ’ हा कर्मणि, तर ‘तो अंघोळ केला ’ हा कर्तरि प्रयोग केलें-चा मिलाफ कर्माशी म्हणून केलें हा कर्माणि प्रयोग,केला–चा मिलाफ तो–शी म्हणजे कर्त्याशी,म्हणून केला हा कर्तरि प्रयोग प्रयोग सर्वांशी रूपसाधर्म्यावर अवलबून आहे, त्यात अर्थाचे विचारास जागाच नाही. प्रस्तुत दोन्ही वाक्याचा अर्थ एकच आहे, तरी पण रूपवशात् प्रयोग भिन्न मानणें प्राप्त होते येथें अर्थसाम्यानें एकच प्रयोग मानणार काय !

१९ (छ) **रूढीवर मिथ्याशास्त्राची कुरघोडी अनिष्ट**–मी घर केलें, ग्रथ केला, बाग केली, असें बोलणें रूढी आहे, तशीच ‘ मी अंघोळ केलों ’ असें बोलणेंही रूढीच आहे. दोन्ही सारख्याच शिष्टाद्दत. मग त्यातील पूर्वोक्त ग्राह्य व उत्तरोक्त अग्राह्य का ? सर्व रूढी सारख्याच साच्याच्या असल्या पाहिजेत काय ? त्यात भिन्नत्व असूच नये ? इग्रजीन सर्व धातू Weak

conjugation-चेच असले पाहिजेत असा आग्रह चालेल काय? बुध्-बोधति असें होतें म्हणून, युध्-योधति असें झालें पाहिजे, असा आग्रह कोण मान्य करील? जेवढ्या शिष्टादृत रूढी तेवढ्या प्रमाण मानून व्यवस्था लाविली पाहिजे. रूढींपैकी काहीकडे दृष्टी मुळीच न देता, व्याकरणानें नियम करावे, व सुटलेल्या रूढी त्यात बसत नाहीत म्हणून त्याना चूक म्हणावें हा खासा न्याय? शुक्रवारी शाळा असते म्हणून, Good-Friday-चे दिवशी सुद्धा शाळा असलीच पाहिजे, असा आग्रह चालेल काय? ज्या धर्मशास्त्रानें रविवार ही सुट्टी ठरली, त्याच शास्त्रानें Good-Friday-ही सुटी ठरली. दोन्ही सुट्या सारख्याच मान्य. तसाच प्रकार रूढीसंबंधानें त्यातील माझे नियमात अमुक रूढी बसत नाही, म्हणून ती त्याज्य, असें व्याकरणानें म्हणणें असमंजसपणाचें आहे. अह एना विस्मृतः-असें वाक्य 'मया एषा विस्मृता'-चे बरोबरीनें प्रशस्त मानितात, तें चूक कोणीच म्हणत नाही चूक व अपवादभूत यातील भेद लक्ष्यात आणिला पाहिजे. अपवादभूत म्हणजे चूक नव्हे मी अंघोळ केलों येथें केलों-हें रूप कर्तरि आहे सकर्मक धातूत्पन्न असल्यानें तें प्रायः कर्मणि असावें, पण तें येथें कर्तरि आढळते, हा अपवाद आहे, प्रमाद नव्हे. 'तो सगळें अन्न जेवला' असेंच आपण म्हणतों, त्यानें सगळें अन्न जेवलें, असें म्हणत नाही करिता **जेवला** याचेच पक्तीस बसणारें (अघोळ) **केला** हें रूपही शुद्धच मानिलें पाहिजे साराश-रूढीवरून नियम करावयाचा, व त्यानेंच रूढी चूक ठरवावयाची हा अन्याय आहे शिंप्यानें अगावरून कपडा बेतावा, तो कपडा बेतण्यातील चुकीमुळें अगाला न आल्यास, आग चूक म्हणण्यासारखें आहे साराश-रूढी असेल तशीच वैयाकरणानें घेतली पाहिजे तदनुरूप नियम बनविणें, व विशिष्ट रूढीकरिता अपवाद मानणें, हेंच व्याकरणाचें काम आहे.

२० (ज) नाम, सर्वनाम, विशेषण याचे श्रेणीत **धातू** हा शब्द पाहिजे, क्रियापद नको राम-ची रामास ही विभक्ति किंवा विभक्तिपद, तसें-जा हा धातू याचें जातो हें **क्रियापद** इग्रजीत धातू व क्रियापद याचे रूपात बहुधा फरक नसल्याने, तेथें एकाच संज्ञेनें काम भागतें, तसें मराठींत भागावयाचें नाही.

तो जात आहे यात 'आहे' हें सहाय क्रियापद आहे. (सह्+इ किंवा अय्) सहाय=बरोबर येते ते. अर्थात् येथें अस-सारख्या धातूस सहाय धातू म्हटलें पाहिजे, सहाय-चे स्थानी साहाय्य हें भाववाचक नाम वापरणे योग्य नाही.

पुँल्लिङ्ग किंवा पुलिङ्ग अशी संस्कृतांत रूपें आहेत. मराठीचे अनुस्वार–लेखनानुसार यांत अवश्यक तो फरक केल्यास मराठींत क्रमानें पुँल्लिग किंवा पुलिंग अशी रूपें होतील, पण पुल्लिंग असें होणार नाहीं, करितां ते त्याज्य मानावें

२१ याप्रमाणें मुख्य असे मतभेद येथे नमूद केले आहेत त्यांचा (विद्याधिकरणानें=) शाळाखात्यानें व विद्वानांनी अवश्य विचार करावा, व सोपेपणाकरितां म्हणून शास्त्रीय शुद्धतेचा बळी देऊं नये खरें पाहिल्यास शास्त्र-शुद्धता व सोपेपणा यांत विरोध मुळींच नाहीं, असेंच दिसून येईल व्याकरणा-सारख्या शब्दरूपप्रधान विषयांत अर्थाला नसतेंच महत्त्व सर्वत्र देत सुटल्यानें ‘मूले कुठारः’ अशीच आपत्ति प्राप्त होते

---

# भाग ५. पर्यायसमीक्षण.

## १ आजन्म कीं आजीव ?

( १ ) **विवक्षित अर्थ**—एखाद्या संस्थेचे कोणी सभासद होतात, ते मरे-पर्यंत सभासद म्हणून राहण्याच्या उद्देशाने होतात, कोणी निरनिराळ्या मुदती-पर्यंतचेही होतात अशा सभासदांत निरनिराळे प्रकार असतात पैकी प्रथमोक्त सभासदास **आजन्म** असें विशेषण लावितात. येथें विचार करावयाचा तो या गोष्टीचा की विवक्षित अर्थाचा बोध करण्यास आजन्म हें विशेषण योग्य आहे काय ?

( २ ) **विशेषणाचा अर्थ—आ** म्हणजे पासून, पर्यंत किंवा भर, जन्म म्हणजे जनन, उत्पत्ति किंवा जननाची वेळ ही वेळ म्हणजे एक विशिष्ट क्षणच असल्यानें या वेळेशी भर–चा अन्वय संभवत नाही तेव्हा आजन्म-चा अर्थ होईल तो 'जन्मापासून किंवा जन्मापर्यंत'. पैकी '**जन्मापासून**' हा अर्थ संभवत नाही, कारण सभासद कोणी होतो तो आपल्या आयुष्यात केव्हा तरी, उपजताच ( प्रायः ) नव्हे. **जन्मापर्यंत** याही अर्थाचा निर्वाह येथें होत नाही; कारण यातील जन्म कोणता ? पुढील. पण सभासदत्व मरणाबरोबरच संपणार; ते मरणोत्तर येणाऱ्या जन्माशी मुळीच संबद्ध नाही. यावरून उघड होते की विवक्षित अर्थाचे द्योतनास आजन्म हा शब्द सर्वथा अक्षम आहे.

( ३ ) **सुचविलेला शब्द**—जीव किंवा जीवन याचा अर्थ जिवत राहणें किंवा तत्सूचित अवधि असा आहे, हा अर्थ जन्मन्–चाही होतो, पण तो केवळ गौण होय आता 'जिवत राहण्याच्या अवधि-भर' '**जिवंत असेपर्यंत**' असा अर्थ आपणास व्यक्त करावयाचा आहे हाच अर्थ मुख्यार्थानें आजीवन किंवा ( संक्षेपार्थ ) आजीव या समासानें उक्त होत आहे. करिता प्रचारात आजन्म–स्थानी **आजीव** ( सभासद ) असा प्रयोग करावा.

---

## २. एकमत व ऐकमत्य.

( १ ) 'हा ठराव एकमतानें पसार झाला' असा प्रयोग आपण वारवार ऐकतों. येथें **दोन अर्थ संभवतात,**—( १ ) प्रतिकूल मताहून एकाधिक

अनुकूल मते पडल्यानें, आणि (२) सर्वच सभासदांची मतें अनुकूल पडल्यानें. या अर्थद्वयामुळें वाचकाचा घोटाळा होण्याचा संभव आहे. हा घोटाळा टाळण्याकरिता येथील उत्तरोक्त अर्थी ऐकमत्य या शब्दाचा प्रयोग करावा

(२) **ऐकमत्य** हा शब्द कसा बनला आहे? एकमताना भावः ऐकमत्यम्। एकमत असणें म्हणजेच ऐकमत्य हे एकमत कोण? मतें देणारे सभासद. एक मत येषां ते = एकमताः, एकच मत धारण करणारे ते एकमत, व अशाचा भाव (असणे) म्हणजे ऐकमत्य 'अत्र विषये सर्वेषा ऐकमत्यम्' असे प्रयोग सस्कृतात प्रचारात आहेतच असो, ऐकमत्य या शब्दानें सर्वच मतदार एकाच म्हणजे समान मताचे आहेत ही गोष्ट **असंदिग्ध** रीतीनें सूचित होते.

(३) **एकमत** शब्दाची घटना–एक मत = एकमतम्. येथील एक शब्दाचे अर्थ दोन संभवतात (१) अनेक नव्हे ते, व (२) समान, एकविध अशा रीतीनें एकमत याचा अर्थ 'एकच मत, भिन्न नसणारें, सर्वांचें सारखें,' असा होऊ शकतो 'श्रवणकटु नृपाणामेकवाक्यं विवव्रुः।' या कालिदासाच्या वचनात एक याचा अर्थ एकविध असाच आहे म्हणून 'एकमतानें पसार' म्हणजे 'विनाविरोध स्वीकृत' असा अर्थ चुकीचा नाही परतु एका पक्षास दुसऱ्यापेक्षा एकच मत अधिक पडून ठराव पास झाला तर त्याच्या वर्णनातही 'एकमतानें पसार' अशीच भाषा येणार. 'चार मतानी पास' अशी भाषा प्रचारात आहेच अशा रीतीने एका शब्दप्रयोगावर दोन अर्थ, ज्याचा परस्पर घोटाळा होण्याचा फार सभव आहे असे, बोधित करण्याचा प्रसग येणार, अर्थात् त्यामुळें अर्थसशय उत्पन्न होणार

(४) ही सशयाची आपत्ति टाळण्यास पुढील व्यवस्था करावी एक अधिक मत अशी विवक्षा असता **एकमतानें** हा शब्द, व सर्वांचें मत एकविध अशी विवक्षा असता **ऐकमत्यानें** असा शब्द योजावा

(५) येथें कदाचित् कोणी असें सुचवील की, पूर्वोक्त ठिकाणी एक मत असा व्यस्त प्रयोग करावा, व उत्तरोक्त ठिकाणी एकमत असा समस्त प्रयोग करावा. ही सूचनाही सर्वथा त्याज्य नाही पण हिच्यापासून सोईबरोबर गैरसोयही आहे. ऐकमत्य या बोजड शब्दाला एकमत हा शब्द

सो देईल ही सोय; तर उलट, शब्द जोडलेला किंवा तोडलेला याच गोष्टीवरून इष्ट तो अर्थबोध वाचकाच्या लक्ष्यात अचूक येईलच असें सांगता येत नाही, ही गैरसोय. शिवाय मुद्रकाकडूनही हा जोडतोडीतील भेद सर्वदा पाळला जाईल असा भरंसा नाही. अशा रीतीनें येथें सोईपेक्षा गैरसोयच मोठी आहे शब्दाचा बोजडपणा पतकरावा, पण अर्थसंदेह अवश्य टाळावा या विचारसरणीनें वर सुचविलेलीच शब्दाची विभागणी योग्य दिसते

( ६ ) **सारांश**—एकमतानें म्हणजे 'अधिक किंवा उणें एक मत पडून' व ऐकमत्यानें म्हणजे 'सर्वांचीच मतें सारखी पडून' असे अर्थ मराठी लेखकानी मान्य करावें व तदनुरूप शब्दप्रयोग करावे, अशी त्यास विनति आहे. **ताजाकलम** ( = लेखपुच्छ )–उदाहरण–२६ सप्टेंबर रोजी मध्यप्रांत कायदेमंडळाच्या अध्यक्षाचे निवडणुकीत रा. काळे याचा **प्रतिप**क्षापेक्षा एकमत कमी पडून, पराजय झाला. एतत्संबंधी लेखाचे शीर्षकात 'श्री. काळे याचा **एकमतानें** पराजय' असा ज्ञानप्रकाशात उल्लेख आहे

---

## ३ कल्चर्ड मोत्यांचा वाद.

कालव या प्राण्याकडून अलीकडे बनवून घेण्यात येणाऱ्या मोत्याला काय संज्ञा द्यावी, याबद्दल वाद सांप्रत चालू आहे त्याच्या समाधानार्थ पुढील ओळी लिहीत आहें—

( १ ) **संज्ञायुग्म**—संज्ञा देणें ती नवीन प्रकारच्या मोत्याला नवें तें मोती, तसेंच जुनेंही मोतीच. हा मोतीपणा दोघास सामान्य असल्यानें त्यांचा भेद दर्शविण्यास नुसत्या एका संज्ञेनें काम भागणार नाही भेददर्शक उपपद दोन्ही संज्ञात असलें पाहिजे. नव्यास उपमोती म्हटलें तर जुन्यास मोती एवढेंच म्हणून चालणार नाही. तदर्थ मुख्य, प्रधान इत्यादि शब्द मोती या शब्दापूर्वी योजिला पाहिजे. एखाद्या वर्गाची एकच तुकडी असताना तिच्या संज्ञेंत काहीच उपपद योजावे लागत नाही पण त्या वर्गाची दुसरी तुकडी पडल्यास तिच्या नामकरणाबरोबर पहिलीसहि विशिष्ट नाव द्यावें लागतें.–पहिली क व दुसरी ख इत्यादि एकच मुलगा असल्यास त्याला 'धाकटा'

किंवा 'थोरला' असलें विशेषण लावावें लागत नाही पण त्यास भाऊ होताच पहिला तो थोरला, व दुसरा तो धाकटा, मुलगा असा व्यवहार सुरू होतो. या विचारसरणीनें नव्या मोत्याबरोबर जुन्यासही नाव देणें जरूर आहे.

( २ ) **उमेदवार संज्ञांचें बाहुल्य**—आपणास संज्ञा जरी दोनच–म्हणजे त्याची एकच जोडी–पाहिजे आहे, तरी बऱ्याच जोड्या पुढें देत आहें, अशा-करिता की, ( क ) त्यातून वाटेल ती जोडी वाचकाने यथारुचि स्वीकारावी. व ( ख ) एकच जोडी पुढें ठेविल्यास ती कितीही चागली असली तरी सहसा पसत पडत नाही. ती खुलून दिसण्यास तिला इतर जोड्याचा परिवार पाहिजे. वस्तु पसत करताना ती इतराहून चागली आहे असें पाहूनच आपण पसंत करितों एकच एक वस्तु असल्यास ती चागली असली तरी तिचे गुण डोळ्यात भरत नाहीत मोत्यें ही दोनचारच घ्यावयाची झाली तरी आपण पन्नासपाऊणशें मोत्यें उलटीसुलटी फिरवून पाहतों जी मोत्याची गोष्ट तीच त्याच्या सज्ञाची

( ३ ) **धर्माची निवड**—एकाच वस्तूला नाव पडताना व्यक्तिगत, देश-गत इत्यादि अनेक भेदामुळें, त्याच वस्तूच्या भिन्नभिन्न धर्माच्या आधारावर संज्ञा तयार होतात. पाणी हा एकच पदार्थ, पण तो भिन्न परिस्थितीमुळें भिन्न नावें पावला आहे प्यावयाचें म्हणून ( **पानीय** )=**पाणी**, गार लागतें म्हणून (जड) **जल, सरतें** म्हणून **सलिल**, खाली धावतें म्हणून ( **नि+ईर्** ) **नीर**; मूळ उच स्थानापासून येत असल्यास खालून वरही जातें म्हणून (उद्-अञ्च्) **उदक**, तान्हेनें कासावीस झालेल्या माणसास अत्यत मधुर लागतें म्हणून **अमृत**, मूर्च्छित मनुष्यास वेळेस परत जीव आणून देतें म्हणून **जीवन**. अशा रीतीनें मोत्यासही सज्ञा देण्यात तत्तद्धर्मानुसार भिन्नभिन्न जोड्या खाली दिल्या आहेत.

( ४ ) **सज्ञांच्या जोड्या**—पुढील जोड्यातील पहिला शब्द जुन्या प्रकारच्या मोत्याचा वाचक व दुसरा शब्द नवीन प्रकारच्या मोत्याचा वाचक समजावा ( क ) पितामही ( मोती ) व विश्वामित्री ( मोती ) ( ख ) देशी व विलायती. ( ग ) अस्सल व नक्कल ( घ ) स्वयंभू व निर्मित. ( च ) तयार किंवा ठरीव व करीव. ( छ ) दर्यामोती व दारमोती. ( ज ) सागरमोती व आगरमोती ( झ ) देवमोती व माणुसमोती

(५) **वरील जोड्यांतील धर्म**—(क) आपल्या सृष्टीतील पूर्वीपासून परिचित असलेल्या वस्तू आपण ब्रह्मदेवानें निर्मिल्या असें मानतों, तर नवीन वस्तू विश्वामित्रानें अन्य द्वीपातून आणिल्या असे समजतों. अशा दृष्टीनें जुनें मोती तें **पितामही** व नवें तें **विश्वामित्री** ठरतें (ख) मूळच्या वस्तू ह्याच देशातील म्हणून त्या देशी व नवीन वस्तू, मग त्या विलायतेंतून किंवा अन्य परदेशातून येवोत किंवा येथेंच नवीन प्रकारें पैदा केलेल्या असोत, त्यास आपण सरसकट विलायती म्हणतों या विचारसरणीनें जुनें तें **देशी** व नवें तें **विलायती**. (ग) एखादी वस्तु नवीन बनवितों तेव्हा ती पूर्वीच्या एखाद्या वस्तूच्या नमुन्यावर बनविलेली असते. नवीन मोती हें जुन्याची नक्कल असल्यानें नक्कल **मोतीं** ठरतें, तर जुनें तें **अस्सल मोतीं** ठरतें. (घ) घोडा व गाढव यातील भेद निसर्गनिर्मित्त असल्यानें त्यास आपण स्वयंभू म्हणतों. तर काळ्या–गोऱ्या माणसातील (योग्यतेसंबधी) भेद (युरोपियन) माणसानी कल्पिलेला असल्याने तो निर्मित ठरतो या धर्तीवर **स्वयंभू** वा सहज व **निर्मित** वा कृत्रिम संज्ञा मोत्यास क्रमाने लाविता येतील (च) पृथ्वीमध्यें तयार मोती सापडतात, ती नेहमीच्या ठरीव पद्धतीनें बनलेली असतात, तर नवीन प्रकारची मोती आपण कालवाकडून मुद्दाम तयार करून घेतों दुकानातील जोडा तो तयार जोडा, तर मुद्दाम बांधून घेतों तो बांधीव, म्हणून प्रस्तुत मोत्यासही क्रमानें **ठरीव** व (करून घेतलेलें) **करीव** अशी नावें देता येतील. (छ) रानातील केळीला आपण रानकेळ म्हणतों व घराजवळ दाराशी मेहनत करून लावलेल्या केळीस दारकेळ म्हणतों जुनें मोती दर्यात सापडतें, तर नवें मोती मुद्दाम तयार केलेल्या दाराजवळील तळ्यात सापडतें, म्हणून **दर्यामोतीं** व **दारमोतीं** या संज्ञा इष्ट वाटतात. (ज) जुनी मोती सागरात तयार होतात, तर नवीन मोती आपण आगरात बनवितो, या कारणामुळें त्यास यथाक्रम **सागरमोतीं** व **आगरमोतीं** असें म्हणावें. (झ) जुनी मोती ती देवानें उत्पन्न केलेली, तर नवीन माणसानें बनविलेली, म्हणून त्यास नावें **देवमोतीं** व **माणूसमोतीं** अशी द्यावी.

**प्रशस्तीचीं धोरणें**— अशा रीतीनें अनेक जोड्या वर सुचविल्या आहेत. त्यातील संज्ञांची निवड करताना पुढील गोष्टी लक्षात घ्याव्या. (क) संज्ञेपासून इष्टार्थ बोध सहज व लवकर व्हावा. (ख) अन्योन्यविरोधी संज्ञाचे

**अर्थ** यावच्छक्य परस्परव्यावर्तक असावे ( ग ) संज्ञा कानाला गोड लागण्यास **त्यांच्या** घटनेमध्यें शक्य तर यमक साधलेलें असावे ( घ ) जुन्या मोत्याची **संज्ञा** नवीन मोत्याच्या संज्ञेहून सरस अर्थ दर्शविणारी असावी. ( च ) साधल्यास दोनही संज्ञा एकाच भाषेतील असाव्या.

( ७ ) **निगमन**—माझ्या मते पुढील संज्ञा प्रशस्त होत सामासिक संज्ञा पाहिजे असल्यास **सागरमोतीं** व **आगरमोतीं**, आणि व्यस्त संज्ञा पाहिजे असल्यास **अस्सल मोतीं** व **नक्कल मोतीं** येथें असें सुचवावेंसें वाटतें की, येथल्याप्रमाणें भेददर्शक विशेषण पाहिजे असल्यास सागरी व व आगरी अशी विशेषणें नवीन तयार करून योजावी सारांश–दृढसंज्ञा म्हणून सागरमोती व आगरमोती असे समास योजावे व खंडसंज्ञा म्हणून **सागरी व आगरी** ही विशेषणें योजावी त्याप्रमाणेंच, मिठाचे खाचरास मिठागर म्हणतात. त्या धर्तीवर आगरी मोत्यासंबंधानें मुक्तागर हा शब्द साधिता येईल. Genuine व Cultured या शब्दांचें प्रतिबिंब व्युत्पत्तिद्वारा त्यांच्या मराठी पर्यायांत पडावें अशी इच्छा असल्यास ( जात्य किंवा ) **जातीय** वा **जातिवंत** व कल्पित, **कृत्रिम** वा **कृतक** अशा संज्ञा प्रशस्त ठरतील

---

## ४ जबाबदार, उत्तरदायी व धूर्वह [ परस्परतुलना ]

### खंड १

अलीकडे हिंदी इत्यादि संस्कृतप्रभव भाषांत उत्तरदायी हा शब्द रूढ झाला आहे. माझे मित्र रा विनायकराव सावरकर यांनीही तो मराठीत स्वीकारिला आहे यांच्या इष्टानिष्टत्वाबद्दल येथें विचार करीत आहें.

१. राज्यारोहण, सिंहासनारोहण, राज्याभिषेक, किरीटधारण ( = Coronation ) इ शब्द मराठीत एकाच गोष्टीचे द्योतक आहेत हे सर्व शब्द एकाच विधीची ( गोष्टीची ) भिन्नभिन्न अंगे दर्शवितात, तरी पण सर्वांचा रूढ अर्थ एकच झाला आहे. एखादी वस्तु किंवा कल्पना यांचा बोध, त्या वस्तूच्या किंवा कल्पनेच्या निरनिराळ्या अंगांच्या उल्लेखानें वेगवेगळ्या शब्दांनी करिता येतो हत्ती हा प्राणी विशिष्ट दातांनी व चमत्कारिक हातानें युक्त असून तो **सोंडेने** पाणी आकर्षून नंतर **तोंडानें** ओढून म्हणजे **दोन** साधनांनी **पितो**.

या वस्तुस्थितीतील त्या-त्या अंगामुळें हत्तीला दन्तिन्, करिन्, द्विपः इ. संज्ञा देण्यात येतात भिन्नभिन्न भाषांतही एकाच वस्तूच्या निरनिराळ्या अंगामुळें निरनिराळ्या संज्ञा प्रवृत्त होतात

२. ज्या दिवशी शाळा बंद असते त्या दिवसाला संस्कृतांत अनध्यायदिन, मराठींत सुट्टीचा दिवस व इंग्रजींत (Holi-day) उपासनादिन असें म्हणतात या तिन्ही शब्दांतील कल्पना विवक्षित अर्थामध्यें गर्भित आहेत. तरी पण प्रत्येक भाषेंत एकेकाच कल्पनेला प्राधान्य देण्यात येऊन तन्मूलक संज्ञा प्रवृत्त झाली आहे. सारांश-एखादी कल्पना किंवा वस्तु हिचा बोध एका भाषेंत ज्या अंगानें होतो त्याच अंगानें इतर भाषांत होतो असा नियम नाही.

३. एखादें कार्य क्ष-वर सोंपविण्यात आलें आहे. या कार्याचा भार तो वाहतो, तें कार्य शेवटास पोंचवितो, तें कार्य योग्यायोग्य रीतीनें पार पडल्याबद्दल किंवा मुळींच न घडल्याबद्दल त्याला प्रश्न विचारण्यात येतो, तो त्याचें उत्तर देतो अशा स्थितीमध्यें या क्ष-मनुष्यास इंग्रजी भाषेंत Responsible, यवनी भाषेंत जबाबदार, जिम्मेदार इ. म्हणतात. हिंदी भाषेंत व मराठींतही जबाबदार हाच शब्द एतदर्थी रूढ होता. कालांतरानें स्वत्वाभिमान जागरित होऊन स्वकीय शब्दाचा प्रयोग आपणास इष्ट वाटून, आपण तदर्थ चिंता करूं लागलो अशा मनुष्याच्या कर्तृत्वाच्या कोणत्या अंगावर संज्ञा अधिष्ठित करावी, याचा विचार करिता यवनी भाषेंतील अंगालाच अग्रस्थान देण्यात येऊन उत्तरदायी हा शब्द हिंदींत रूढ करण्यात आला. या शब्दाचे स्थानी अर्पितभर, निर्वाहक, भारवान्, भारवह, प्रष्टव्य, उत्तरदायक, असेही पर्याय शक्य आहेत

४. येथें असा विचार येतो की प्रस्तुत कल्पना संस्कृत बोलत असतांना आपल्या डोक्यांत कधी आलीच नाही काय ? आली असली पाहिजे खास. मग तदर्थ स्वतंत्र, सुटसुटीत असा शब्दही संस्कृतांत असलाच पाहिजे अशा शब्दाचा विचार करतां धुर्य, धुरीण, धूर्वह, धुरंधर, इ. अनेक शब्द संस्कृतांत आढळतात या सर्व शब्दांत कार्याचा भार वाहणे ही कल्पना ग्रथित आहे अशा स्थितींत हे शब्द टाकून उत्तरदायी-सारखा बोजड शब्द वापरणें योग्य दिसत नाही असा शब्द द्विधा सापवाद आहे. एक दोष हा की तो अवजड व दुसरा हा की याची घटना यवनी शब्दाच्या अनुकरणावर प्रतिष्ठित असल्यानें, आपणास

अंगावर कार्य घेऊन छातीठोकपणें तें शेवटास पोंचविण्याची संवय नव्हती, असा अस्पष्ट ध्वनि या नवसंज्ञेच्या उत्पादनातून उमटतो. अर्थात् हा ध्वनि वस्तुस्थितीच्या विरुद्ध असून आपणास हीनता आणणारा आहे 'आज्ञापत्र समस्त राजकार्य**धुरंधर** विश्वासनिधि' इ. प्रकारें सहस्रावधी ऐतिहासिक पत्रातून धुरंधर हा शब्द गर्जना करिताना आढळतो व जबाबदार या यवनी शब्दानें विवक्षित असलेल्या कल्पनेचा बोध केवढ्या तरी दणदणाटानें व्यक्त करितो!

५ आता **धुरंधर** हा शब्द आपल्या मनी–मानसी राजकारणी पुरुषाचें विशेषण म्हणून खिळलेला आहे यामुळें घरीदारी सर्वत्र वापरण्यास तो सोइस्कर नाही त्याच्याशी ग्रथित झालेल्या कल्पना फारच उच्चतर आहेत करिता विवक्षित अर्थामध्ये सार्वत्रिक शब्द म्हणून **धूर्वह** या शब्दाचा प्रयोग मला प्रशस्त वाटतो. या शब्दात उत्तरदायी या शब्दाच्या निर्माणाच्या मुळाशी असलेली स्वत्वाची कल्पना तेवढी आहे पण त्याने केलें जाणारें यवनी भाषेतील अगाचें अनुकरण नाही उत्तरदायी हा शब्द जरी सर्वथा अवयवद्वारा संस्कृत असला तरी त्यातील अंगभूत--कल्पनाद्वारा तो यवनचि ठरतो हें उघड आहे.

६ परभाषेच्या शब्दाला मराठी पर्याय योजणें झाल्यास त्यातील केवळ अंगाचा विचार न करिता, व्यक्त करावयाच्या एकदर कल्पनेचा विचार करावा, व या सामान्य कल्पनेचा बोध, इतर अगानें का होईना आपल्या भाषेत होत आहे किंवा नाही, हें पहावें एतदर्थ भाषेतील भूतपूर्व शब्द शोधून त्यातून एखादा योग्य शब्द स्वीकारावा, तसा शब्द न सापडल्यास नवीन शब्द निर्माण करणें भाग आहे. साराश–एखाद्या कल्पनेचा बोध मराठीत करणें असल्यास शब्दाचें निवळ भाषातर न करिता, आपल्या भाषेस परिचित अशा त्या कल्पनेंतील विशिष्ट अंगाचा बोधक शब्द योजावा. धूर्वह व उत्तरदायी या दोन्ही शब्दात कल्पना एकच आहे, पण उत्तरदायी हा शब्द त्या कल्पनेंतील यवनी अंगाचें अंधानुकरण करीत आहे, तर धूर्वह हा शब्द अशा दोषापासून सर्वस्वी अलिप्त असून, आपुलकीनें भरलेला आहे. सारांश–परभाषेंतील शब्दाचें भाषातर त्याच्या घटकद्वारा न करिता, त्यांतील संकलित कल्पनेंतील स्वपरंपराप्राप्त अशा अंगास धरून योग्य अशा संस्कृतातील शब्दानें करावें, भाषातर विशिष्ट कल्पनांगाचें करावें, शब्दघटकाचें नव्हे.

७. Sympathy या शब्दाचें घटकद्वारा भाषांतर सहानुभूति असें करितात. येथेंही वरील दोष प्राप्त होतो. दीन मनुष्याला पाहून ( १ ) त्याप्रमाणें आपणही दुःखी होतो, ( २ ) दुःखानें **कांपूं** लागतों, ( ३ ) वेळेस **आक्रोशही** करितों तिन्ही कार्यें एकाच सामान्य कल्पनेची अंगें आहेत. पहिल्या अंगावर इंग्रजींतील शब्द अधिष्ठित आहे, तर दुसऱ्या व तिसऱ्या कल्पनेवर क्रमानें अनुकंपा व अनुक्रोश हे संस्कृत शब्द अधिष्ठित आहेत. यापैकीं अनुकंपा-मधील कल्पनांग किती तरी सहृदय आहे! येथें अनुकंपा हाच शब्द Sympathy याचा पर्याय म्हणून योजण्यास योग्य आहे सहानुभूति हा शब्द घडवितांना घडविणारानें असा प्रश्न स्वतास केलेला दिसत नाहीं कीं, यांतील कल्पना आपल्यांत पूर्वी नव्हतीच काय? आपण परदुःखानें दुःखित होत नव्हतोच काय? असा प्रश्न जर त्याचे मनांत उद्भवता, तर त्यानें संस्कृत कोश चाळून त्यांतून अनुकम्पा हा शब्द खचित उचलिला असता गत न शोच्यम् यापुढें तरी परभाषेच्या शब्दांतील कल्पना मराठींत व्यक्त करितांना, पुढील दक्षता राखावी आपणास असा प्रश्न करावा कीं ही कल्पना आपणांत आहे कीं नाहीं? जर असेल, आणि कल्पना ही प्रायः असणारच, तर तदर्थक शब्द भाषेंत असलाच पाहिजे, हे गृहीत धरून संस्कृतांत किंवा जुन्या मराठी वाङ्मयांत तदर्थं शोध करावा म्हणजे असा शब्द निश्चयानें सांपडेल. कल्पनाच नसल्यास भाषांतरांत कोणतेंही अंग घेण्यास हरकत नाहीं हें उघडच आहे

## खंड २

( १ ) जबाबदारी इ शब्दांनीं बोधित होणारी मिश्र कल्पना वर्तमान मराठींत आपण कशी व्यक्त करितों? उत्तरार्थ पुढील ओळी पहाव्या.

दादा—( धाकट्या भावास ) बाळ्या, तू पाण्यांत इतका वेळ डुबूं नको. आजारी पडशील बाबा कुटुंबाचा भार मजवर टाकून गेले आहेत. ते आले म्हणजे बाळ्या आजारी कां पडला, म्हणून **मला विचारतील** येथील वाक्यांत स्पष्ट दिसतें कीं एखादें सोंपविलेलें कार्य बिघडल्यास, ते तसें कां बिघडलें म्हणून त्यासच विचारण्यांत येतें, ज्यावर त्याचा **भार टाकलेला** असतो. म्हणजे वर्तमान मराठींत उत्तरदायी किंवा धूर्वह या शब्दांनीं बोधित करावयाची कल्पना ‘ ज्यास विचारावयाचें तो ’ अशा रूपानें व्यक्त करण्यांत

येते. तेव्हां ही कल्पना 'सोंपविण्यापासून तों उत्तर देणें' या विविध गोष्टींपैकीं कोणत्या गोष्टीच्या उल्लेखानें व्यक्त करावी असें विचारल्यास 'विचारावयास योग्य' या गोष्टीच्या उल्लेखानें व्यक्त करणें प्राप्त होतें.

( २ ) एतदर्थक स्फुटस्फुटींत शब्द पाहतां प्रच्छ् व अनुयुज् हे धातू मनांत येतात. यांवरून विध्यर्थक उपाख्यातें ( Participles ) अनुयोज्य-योक्तव्य, प्रच्छनीय-प्रच्छ्य-प्रष्टव्य इत्यादि विवक्षितार्थवाहक ठरतात. यांतील **प्रष्टव्य** हा शब्द विशेष समर्पक दिसतो. करितां तो विद्वानांनी आदरावा, अशी माझी नम्र सूचना आहे.

( ३ ) एखादी कल्पना व्यक्त करण्याचे प्रकार जितके अधिक असतील तितकी भाषेला संपन्नता येते. प्रष्टव्य या शब्दावांचून आज आपलें अडतें असें नाही. यासंबंधात 'बाबा तुला विचारतील' असें आपण म्हणतोंच; पण हीच गोष्ट प्रकारांतरानें व्यक्त करण्यास प्रष्टव्य हा शब्द खास सोईचा आहे. एखादी कल्पना व्यक्त करण्याचे भाषेंतील प्रकार वाढविणें हें विद्वानांचें धोरण असावें.

( ४ ) 'आज पहाटे मी जागा झालों नाही' असा बोलण्याचा एकच प्रकार कोंकणांत रूढ आहे; तर देशावर ( नाशिकाकडे ) याचे जोडीला पुढील प्रकारही आढळतो. तो म्हणजे 'मला जाग आली नाही.' यांत **जागा** या विशेषणाचे जोडीला ( जागृति या अर्थी ) **जाग** या नामाची भाषेंत इष्ट अशी भर पडली आहे. अर्थात् हें अभिनंदनीय आहे. मनांतील अर्थ व्यक्त करण्यास भाषेला हातपाय जेवढे पसरितां येतील तेवढे पसरूं द्यावे. या विचारसरणीनें प्रष्टव्य या शब्दाची मराठीत इष्टता कोणासही पटेल.

या संबंधांत मला आलेल्या कांही पत्रांत प्रस्तुत शब्दाची विवक्षितार्थ व्यक्त करण्यास तादृश अपेक्षा नाही असें कथन आहे, तर कांहींत धूर्वह शब्द तितकासा पसंत नाही असें आहे; या दोन्ही गोष्टींचें उत्तर वरील ओळींत दिलें आहे तें समर्पक ठरेल, अशी आशा आहे.

---

## ५. परांजपे कीं परांजप्ये,—कानाला कोणतें संमत?

" सत्यं ब्रूयात्प्रियं ब्रूयान्न ब्रूयात्सत्यमप्रियम् । ".

'परांजपे' शुद्ध कीं 'परांजप्ये' शुद्ध ? हा वाद केवळ एका आडनांवाच्या रूपाचा खल या दृष्टीनें महत्वाचा नाही. नांवापासून जोंपर्यंत व्यक्तीचा निर्देश

बिनचूक होतो तोंपर्यंत व्यवहारात त्याचे रूपास हरकत घण्याचें कारण नाही; परतु त्या नावाकडे, मराठी भाषेचा एक शब्द या दृष्टींने पाहिल्यास या रूपा-संबंधीच्या वादास महत्व येतें. ही गोष्ट लक्ष्यात आणून पुढील चार आळी लिहीत आहे

१ **रूपशुद्धी**—एकादी भाषा बोलणाराची स्थिति, राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक, इ एका किंवा अनेक बाबती बदलल्याने, त्याचे भाषेत फरक पडतो. अशा विविध कारणानी अनेक सस्कृत शब्दाचें मूळरूप सुटून ते उत्तरोत्तर सुलभ किवा सुखोच्चार रूप धारण करीत, आज प्रचलित असलेली रूपे पावले आहेत अर्थात् मूळ सस्कृत रूप व हल्लीचें रूप याचे दरम्यानची रूपे त्या-त्या मधील काळामध्ये शुद्धच होती. उदाहरणार्थ 'अष्टवार' या शब्दापासून 'आठवार-आठवरा-आठवडा' अशा परपरेने, आठवडा या रूपापेक्षा 'आठ-वरा' हे रूप मूळरूपास जरी सनिध असलें, तरी साप्रत काळी ते अशुद्धच आहे 'चक्र' हा शब्द संस्कृतातून मराठीत येताना मध्ये काही काळ तरी 'चक्क' या रूपाने प्रचारात असलाच पाहिजे म्हणून हे रूप 'चाक' या रूपापेक्षा सस्कृतास जवळचें आहे, हेंही चक्क आहे परतु एवढ्या-वरून ते आज शुद्ध मानिता येत नाही हल्ली 'चाक' हेंच शुद्ध मानिले पाहिजे कोणत्याही विशिष्ट काळी शिष्ट लोकाचे कान जें रूप बिन-विरोध ग्रहण करितील तेंच त्या काळचें शुद्ध रूप होय अशा दृष्टीने 'पराजय्ये' हें रूप शिष्टाचे कानाला गोड वाटत असेल तर तें शुद्ध, परतु ते तसे साप्रत वाटत नाही, असें मला वाटतें, पण नुसत्या व्यक्तिशः वाटण्याला विचारतो कोण ? अशा ठिकाणी म्हणजे मतभेदाचे प्रसगी, प्रमाणातर पाहिलें पाहिजे. असे प्रमाण म्हणून, काळाच्या ओघाचा विचार करणे अयुक्त होणार नाही

२ हा ओघ साप्रत कर्णकटु किवा बोजड भासणारी रूप, शब्दप्रयोग किवा रचना याचे विरुद्ध आहे धोंड्या, हणमत, खडेराव, वगैरे नावें सुशिक्षित लोकातून लुप्त होत जाऊन, त्याची जागा वसंत, चद्रसेन, रमाकात, वगैरे नावे पटकावीत आहेत 'तुम्हाला' मागें सारून 'आपण' आपलें घोडें पुढें ढकलीत आहे. कधीं-कधी दोन वृद्धाची गांठ पडली असता त्याच्या प्रेम-संवादात 'अरे' 'तू' वगैरे एकवचनी शब्दप्रयोग ऐकू येतात. परतु इकडे शाळातून पहावें तों, लगोटी लावण्याचे वयातही धोतरें किवा विजारी नेसून

मुलें एकमेकाना बहुवचनाने सबोधिताना आढळतात, व तें पाहून मनास एक प्रकारचे कौतुकही वाटते या सर्व स्थित्यतराची कारणें सागण्याचें येथें कारण नाही परतु या गाष्टीवरून भाषेची प्रवृत्ती पारुष्य सोडून मार्दवाकडे किंवा लालित्याकडे वळत आहे हे निःसशय आहे एखाद्या मुलाचे नाव ' रामा ' असूनही, व्याकरणाच्या स्थूल नियमानें प्राप्त होणाऱ्या ' राम्या ' या नावानें त्यास हाक न मारिता, ' रामा ' अशीच हाक मारण्याकडे मनाची प्रवृत्ति होते, व ती कृतीनही उतरते

या सर्वांचा निष्कर्ष काय ? तर, अत्याक्षर कर्णकटु ' य ' वर्ण येऊन जोडाक्षर बनत असेल तर, त्या यकारास फाटा देणें. असो, यावरून शब्दाची व्युत्पत्ति व काळाची प्रवृत्ति या दोहोंच्या छेदनबिंदूत जे रूप शिष्ट लोकाचे दृष्टीने सापडेल ते शुद्ध, मग ते अन्य रूपापेक्षा मूळचे रूपास सनिकृष्ट असो वा विप्रकृष्ट असो (१) माझें पण्ण ( पान ) कोठे आहे ? असा पूर्वपरपरेचा अयथार्थ अभिमानी म्हणेल तर, तो केवळ हास्यास्पद होईल २ ) जुन्या सस्कृतात ' शृग ' याचें ' शृगा ' असें बहुवचन आहे, म्हणून विदग्धवाङ्मयात '–ही " शृगाणि यस्यातपवन्ति सिद्धाः " या व इतर ठिकाणी शृगा हे रूप कोणीच योग्य मानणार नाही ( ३ ) लेले, दामले, डोंगरे, वाघमारे, घाटे, शौचे वगैरे नावात अन्त्य स्वरापूर्वी ' यकार ' उच्चारण्यास जीभ कचरत नाही काय ? रविवर्मा हे प्रथमेचें रूप मान्य असताना, तद्नुरूप बनणारे ' रविवर्म्या ' हें कर्णोद्वेजक सामान्यरूप टाकून ' रविवर्माची चित्रें ' हा शब्दप्रयोग करण्यात हेतु कोणता आहे बरें ?

३ **संस्कृताचा आधार**—यकारोत्तर सयोग हे अनिष्ट मानण्याची प्रवृत्ति सस्कृतातही काही ठिकाणी आढळते, उघडच आहे की, जी घटना जिभेस बिकट वाटते, कानास कठोर लागते, व मनास अनिष्ट भासते ती पाणिनीसारखे परिणतप्रज्ञ व्याकरणकार तरी लोकावर का लादूं पहातील । ' स्तुवन्ति + ऋषयः ' याचा व्याकरणाचे सामान्य नियमानी होणारा स्तुवन्त्यृषयः हा सधि केवळ श्रवणानें दुसऱ्यास त्याचे यथार्थ ग्रहण होईल असा, उच्चारणें जड जातें. अशा ठिकाणी वैकल्पिक प्रकृतिभावाची सवड पाणिनीनेंच करून ठेविली आहे ' मत्स्य ' या शब्दाचें स्त्रीरूप सामान्यतः कुर्मी, व्याघ्री याचे धर्तीवर ' मत्स्यी ' असें प्राप्त होतें, परतु तें दुरुच्चारतेनें दूषित असल्यानें

त्यातील य–चा लोप करून ‘मत्सी’ हे सुखोच्चार व श्रुतिसमत रूप व्याकरणकारानी दिले आहे. ‘गार्ग्य’ याचेंही ‘गार्गी’ हेच रूप पठित आहे करिता मराठीतही शिष्टास इष्ट त्या ठिकाणी य–ला रजा देण्यात काही दोष दिसत नाही

४ **मनस्तुष्टि**–शास्त्रे झाली, पुराणें झाली, तरी विशिष्ट प्रसगी कसें वागावे, हें कोडें अनेक वेळा येऊन पडतेंच अशा समयी अतिम-निर्णयस्थान स्मृतिकार मनूनें ‘आत्मनस्तुष्टिः’ हेच सागितले आहे. ‘ऐकावें जनाचें, करावें मनाचें,’ ‘मन.पूतं समाचरेत्’ इत्यादि वृद्धवाक्यातही स्वताच्या सदसद्विवेकशक्तीचेंच प्राधान्य मान्य केले आहे पराजप्ये या रूपाचा अभिमान वाहणाराना, मी एवढेंच विचारतो की, हें रूप ‘पराजपे’ या रूपापेक्षा तुमच्या कानाला बरें लागतें ना? आपल्या मनाच्या मनास विचारून उत्तर द्या, विकारवशता, असदाग्रह, पक्षाध्य वगैरे सोडा बरें, आणि द्या उत्तर उत्तर कसे देणार? तें नकारार्थीच आले पाहिजे

अशा रीतीनें, व्याकरणशुद्धि, काळाचा ओघ, सस्कृताचे साम्य, पाणिनीची समति, व मनस्तुष्टि याना ऐकमत्याने अनुकूल असलेले ‘पराजपे’ हेच रूप प्रशस्त ठरते, मग या उप्पर कोणी ‘पराजप्ये’ हे रूप खुशाल घट्ट धरून बसो! त्यास हरकत कोण करू शकणार?

५ आडनावाचा सामान्यतः विचार करता आढळते की,

( अ ) आचार्य, पडित, विद्वास, इत्यादि **प्रशंसापर**—

( आ ) घमडे,चावळे,खुळे, गोळे,आगलावे,महाशब्दे इत्यादि **निंदाव्यंजक**–

( इ ) भस्मे, लगोटे, रोडे,लट्ठे,सावळे,भोपळे,काकडे इत्यादि **विनोदमूलक**–

( ई ) टकले, काणे, सुळे, काळे, गोरे, हिरवे इत्यादि वस्तु**स्थितिदर्शक**—

( उ ) शौचे, घाणेकर, इत्यादि कुत्साप्रभव–

( ऊ ) घंटाघोळ इत्यादि वैचित्र्यरसजन्य–

अशी अनेक आडनावें असख्य भिन्नभिन्न कारणानी प्रवृत्त झाली आहेत. त्याचे मुळाशी म्हणजे जाडा संस्कृत शब्दच असला पाहिजे असा आग्रह धरण्याचें काही कारण नाही. जी व्युत्पत्ति प्रथमोपस्थित व साहजिक वाटेल तीच ग्राह्य. अशाच धर्मानी युक्त असल्यानें, रा. जोशीबुवानी दिलेली ‘परा जपे तो पराजपे’ हीच व्युत्पत्ति ग्राह्य ठरते.

६ ( ता क = ) लेखपुच्छ–वरील पत्र लिहिल्यानतर रा. ‘ भारद्वाज ’ याचें पत्र आढळलें यातील द्वितीयालुक्‌समास या सज्ञेपासून विद्यार्थी लोकाचा समासाच्या नावान्या बाबतीत वृथा घोटाळा होण्याचा सभव असल्यानें, त्याचे निरासाकरिता पुढील मजकूर लिहीत आहें.

( १ ) एखादा प्रयोग शिष्टसमत असल्यावर, त्याचे निर्वाहास व्याकरणाचे विद्यमान नियम अपुरे पडत असतील तर, त्यात भर घालणें इष्ट आहे करिता ‘ गळे कापतो तो ’ गळेकापू, ‘ धक्के खातो तो ’ धक्केखाऊ, ‘ कपडे चोरतो तो ’ कपडेचोर,–एतत्सिध्यर्थ बनविलेल्या नियमाच्या आधारें ‘ परा जपे तो ’ पराजपे–असा शब्दप्रयोग मानणें अयुक्त नाही मुख्य मुद्दा ‘ द्वितीयालुक् ’ या शब्दाविषयी आहे. या शब्दाने दर्शवू इच्छिलेली चीज सस्कृतात पाणिनीयाचे संग्रहात तर नाही परंतप इत्यादि शब्दात अतर्निविष्ट अनुनासिक द्वितीयेचा प्रत्यय नाही, तसें असते तर त्याचेच धर्तीवर भुजग, आत्मभरि ही रूपे सिद्ध झाली नसती. अशा शब्दातील अनुनासिक हा स्वतत्र आगम आहे करिता ‘ द्वितीयालुक् ’ ही सज्ञा सस्कृत व्याकरणात न घुसडता, पाहिजे तर ती मराठीत काही सोईकरिता मानावी सस्कृत व्याकरण अशा समासास केवळ, ‘ कृदन्त–तत्पुरुष ’ किंवा ‘ उपपद–तत्पुरुष ’ एवढ्याच नावानें ओळखितें

---

## ६ शालीय कीं शालेय ?

**प्रास्ताविक**—आपल्या पत्रात शालेय हें रूप चूक, व शालीय हें बरोबर आहे, असें रा पावशे यानी लिहिलें आहे, यासबधी पुढील ओळी छापण्याची कृपा व्हावी

या प्रश्नाचा विचार दोन प्रकारानी केला पाहिजे—(१) दोन्ही रूपाची तुलना, (२) त्याची सापेक्ष शुद्धता, आणि (३) Text–Book या अर्थी मराठी पर्याय म्हणून या रूपाची सापेक्ष ग्राह्याग्राह्यता.

**(१) रूपद्वयाची तुलना**—( क ) शालीय व शालेय–शाला शब्दाहून ‘ ईय ’ प्रत्यय लावून शालीय असें रूप कौमुदीमध्यें सिद्ध केलेलें आहे. शालेय हें रूप होण्यास ‘एय’ या प्रत्ययाची जरूरी आहे हा ‘ एय ’ प्रत्यय पअत्यार्थी

लावण्यात येतो. (गंगा) गांगेय, (राधा) राधेय, अशी रूपें भाषेंत आढळतात. त्याचे धर्तीवर शालेय हें रूप सिद्ध होईल मात्र येथें अर्थाकरिता ओढाताण करावी लागेल अशी ओढाताण संस्कृत व्याकरणात अश्रुतपूर्व नाही पृथा शब्दावरून होणारें ' पार्थ ' हें रूप अपत्यार्थी नसूनही, तदर्थी वारवार प्रयुक्त आढळतें. अशी सवड येथें घेतल्यास शालेय हें रूप वर्णतः व अर्थतः शुद्ध मानिता येईल **स्त्रीभ्यो ढक्**–यावरून साधलेलें ' अपत्यार्थी रूप अन्यार्थी प्रयुक्त मानावे '

(ख) **अनपत्यार्थी शालेय**- ' वाडवेयः ' ' दार्वेयः ' इत्यादि शब्द आकारान्त स्त्रीलिंगी शब्दावरून ' नद्यादिभ्यो ढक् ' या सूत्रानें सिद्ध होतात. याच्या धर्तीवर ' शालेय ' रूप साधिता येईल. पण येथें अडचण अशी की, या सूत्रातील नद्यादिगण आकृतिगण नाही, व या गणात शाला शब्द पठित नाही. यामुळें शालेय हें रूप प्रस्तुत सूत्राधारें निष्पन्न होत नाही **वृद्धाच्छः** या सूत्रावरून निष्पन्न होणारें रूप शालीय असें आहे साराश–**शालेय** हें रूप स्त्रीभ्यो ढक् याने अपत्यार्थी होईल, व **शालीय** हें रूप वृद्धाच्छः यानें अनपत्यार्थी होईल आपणास मार्गणीय आहे तें **अनपत्यार्थी शालेय** हें रूप.

(२)(क) **शालेय हें रूप शुद्ध आहे.** सद्यःकथित नद्यादिगण आकृतिगण सिद्ध झाल्यास शालेय हें रूप आपोआपच शुद्ध ठरेल अमरकोशामध्यें ' मैरेय आसवः शीधुः ' इत्यादि मद्यविशेषाच्या संज्ञा दिल्या आहेत. पैकी ' मैरेय ' ही संज्ञा महेश्वर व क्षीरस्वामी या दोघांही टीकाकाराच्या मतें देशविशेष ( किंवा ओषधिविशेष ) **मिरा** या शब्दावरून निष्पन्न झाली आहे येथें मिरा शब्दास **एय** हाच प्रत्यय लागला आहे. या प्रत्ययास सूत्राधार पाहता ' नद्यादिभ्योढक् ' याहून अन्य सूत्र दिसत नाही अर्थात् ' मैरेय ' रूप तर लोकसिद्ध, अतएव शुद्ध मानिलेंच पाहिजे. कारण तसें नसतें तर कोशकारानें व टीकाकारानीहि त्याचा आदर केला नसता मिरा शब्दाचें ग्रहण नद्यादिपाठात, दृष्ट नसल्यानें, अनुमित होतें. महेश्वरानें तर हेंच सूत्र आधारार्थ दिलें आहे. तेव्हा असें म्हणणें प्राप्त होतें की ( १ ) नद्यादि गणांत मिरा शब्द पूर्वी पठित असला पाहिजे, किंवा ( २ ) तो गण आकृतिगण स्वीकारिला पाहिजे. पैकी कौमुदीच्या प्रचलित आवृत्तीत नद्यादिगणात मिरा शब्द सापडत नसल्यानें, उत्तरोक्त अनुमान म्हणजे नद्यादिगण

हा आकृति गण आहे, हें प्राप्त होतें. अशा रीतीनें प्रस्तुत गण आकृतिगण ठरत असल्यानें त्यात शाला शब्दाच्या समावेशास प्रत्यवाय उरत नाही. तेव्हा शाला शब्द प्रस्तुत गणात अंतर्भूत होऊन, शालेय हें रूप त्यावरून निर्बाध ठरतें.

( ख ) **सदृशरूपें**—संस्कृतामध्यें शाला, शालि–ली असे शब्द, व मराठीत शाल ( लोंकरी वस्त्र ) असा शब्द आहे. पैकी शाला या शब्दावरून वृद्धाच्छः –एतत्सूत्रसिद्ध ( कौमुदीगत ) शालीय व नद्यादिगणसिद्ध शालेय अशी रूपें साधतात. शिवाय शालेय हें रूप शाली या शब्दावरूनही होतें. मराठीतील शाल या शब्दावरून कोणी विशेषणरूप साधिल्यास तें शालीय असे होण्याचा संभव आहे एवच शालीय हे रूप शाला व शाल यावरून व शालेय हें रूप शाला–ली यावरून सिद्ध होते. अर्थात् संस्कृत व्याकरणदृष्ट्या शाला शब्दावरून व्युत्पन्न या दृष्टीनें शालेय हें रूप शालीय या रूपाच्या बरोबरीनें शुद्ध ठरतें ( मी हे रूप प्रथम पाहिलें तें रा. फर्के याच्या एका शालोपयोगी पुस्तकाच्या संज्ञेत )

( ग ) **मराठी भाषेस लागलेलें वळण**—मराठीत शालेय हें रूप बनविणारानें ते शाला शब्द मनात ठेवूनच, बनविले असलें पाहिजे शालीय, शालेय व ( माला माल्य या धर्तीवर ) शाल्य यातून कोणतेंही रूप बनविण्यास तो मोकळा असता त्यानें शालेय हेच रूप आदरिलें. यावरून त्यात त्याचे मतें शालीय इत्यादि रूपापेक्षा शालेय हेंच रूप **भाषेच्या वळणास अनुरूपतर** असलें पाहिजे आपणही पूर्वाग्रहशून्य अशा मनानें बनवू गेल्यास शाला-वरून शालेय हें रूप बनवू असें मला वाटते हें भाषेचें वळण कशानें पडलें असावें ? (गगा) गागेय अशासारखी रूपे कानास व जिभेस परिचितपूर्व असल्यानें, अशी एय-प्रत्ययान्त रूपे आपणास साहजिक वाटतात.

( घ ) **संस्कृतासच शालीय नापसंत**—संस्कृताचा विचार करिता ( गगा ) गागेय व ( माला ) मालीय अशी द्विविध रूपें व्याकरण देते अशा स्थितीत गागेय अशाच रूपाचा आदर मराठीतल्याप्रमाणें संस्कृतातही आढळतो. शालीय, मालीय—अशी रूपें व्याकरणोक्त असूनही ती लोकाना संमत झालेली दिसत नाहीत यास प्रमाण-त्याचा प्रचार भाषेंत आढळत नाही, आढळत असल्यास, तो शून्यप्रायच. सारांश–संस्कृत व्याकरणदृष्ट्याही आकारान्त शब्दावरून एय-प्रत्ययान्त शब्द साधणें हेंच प्रशस्त ठरतें

( ३ ) Text Book चा **पर्याय**—म्हणजे ' पाठशाळेंत चालणारें पुस्तक ' एतदर्थी जसा शालेय तसा शालीय हा शब्दही, त्याज्यच आहे, कारण या शब्दाचा अर्थ 'घरात किंवा कोणत्याही बांधलेल्या आच्छादित जागेत चालण्यास योग्य ' इतकाच आहे विद्या शब्दाच्या अर्थाचा त्यात मुळीच समावेश नाही समग्रार्थदर्शक शब्द बनविणेंच तर तो ' पाठशालार्ह ' किंवा ' पाठशालोचित ' असा बनवावा लागेल सारांश—प्रस्तुत संज्ञात पाठ हा (विवक्षितार्थातील मुख्य अंग दर्शविणारा ) अवयवच लुप्त असताना शेष संज्ञेमध्ये ई व ए यातील भेदावर वाद करणें हें पाहिल्यानें, 'विक्रीतें करिणि किमंकुशे विवादः ? । ' या चरणाचें स्मरण होतें संपूर्ण अवयवाची हानि स्वीकारावी, पण ई—चे स्थानी आलेल्या त्याच्या गुणाचा ए-चा त्याग करावा, हें चमत्कारिक दिसतें. पाठ या अवयवाच्या लोपापुढें ई—ए यातील भेद केवळ उपेक्षणीयच ठरतो आता केवळ संभाव्य गोष्टीचा विचार करणें तर उभय संज्ञास साधारण असलेला हा लोप त्या संज्ञाची तुलना करताना दृष्टीआड करणे प्राप्त आहे मग प्रश्न केवळ शाला शब्दावरून कोणता शब्द साधावा एवढाच उरतो. याचे उत्तर, शालेय हाच शब्द साधावा, असें येते याची कारणे वर सांगितल्याप्रमाणें थोडक्यात अशी आहेत ( १ ) ' नद्यादिभ्यो ढक् ' येथील नद्यादिगण आकृतिगण सिद्ध असल्याने ( मिरा ) मैरेय या धर्तीवर ( शाला ) शालेय हें रूप शास्त्रशुद्ध ठरतें ( २ ) शाला-शालीय—सारखी कौमुदीदृष्ट रूपें लोकांतून गळाली असल्यामुळे, ती संस्कृतातच शिष्टसंमत दिसत नाहीत, मग मराठीत तरी कशी होणार ? सारांश—शालीय रूप केवळ शास्त्रशुद्ध आहे, तें शिष्टादृत नाही, किंवा रूढिसंमतही नाहीं उलट-शालेय हें रूप शास्त्रशुद्ध, शिष्टजनादृत व रूढिप्रशस्त असें आहे अर्थात् ते शालीय-च्या तिप्पट ग्राह्य ठरतें.

( ४ ) **निगमन**—प्रस्तुत रूपासंबंधी त्रिसूत्रीचा विचार—( क ) **स्त्रीभ्यो ढक्** हें सूत्र अपत्यार्थविषयक असल्यानें येथे अप्राप्त ( ख ) **वृद्धाच्छः** या सूत्रानें शालीय रूप सिद्ध झालें तरी, शाला—शब्दाचे नद्यादिगणातील समावेशास हें सूत्र बाधक होत नाही. दार्वासारखे वृद्ध शब्दही नद्यादि गणात पठित आहेतच. ( ग ) **नद्यादिभ्योढक्** या सूत्राने नद्यादिगण—शब्दास एय प्रत्यय लागून शालेय हें रूप इष्टार्थक सिद्ध होतें. नद्यादिगणात अदृष्ट अशा मिरा—सारख्या शब्दावरून मैरेय—सारखी रूपें होत असल्यानें, नद्यादिगण आकृतिगण ठरतो. म्हणून शाला शब्द नद्यादि ठरून शालेय हे रूप निर्बाध सिद्ध होतें.

---

# भाग ६ मराठी भाषा.

## १. मराठी-भाषेचें शुद्धीकरण [टीकात्मक]

१ **उपोद्धात**—या विषयास माझे मित्र श्री तात्याराव सावरकर यानी अलीकडे चालन दिलें आहे त्यात त्याचा मुख्य कटाक्ष यावनी शब्दावर दिसून येत आहे. त्याच्या जाज्वल्य देशाभिमानास सर्वथा अनुरूप अशीच ही गोष्ट आहे देशार्थ त्यानी केलेल्या तपश्चर्येमुळे व भोगिलेल्या कष्टामुळें, या बाबतीतील त्याचा अधिकारही एकप्रकारें सर्वसमत आहे देशाभिमानाच्या गोष्टी बोलण्यासही मनुष्य अधिकृत असावा लागतो, व या संबधात श्री सावरकर हे प्रथम श्रेणीतच गणनार्ह आहेत आता, एखाद्या गोष्टीसबंधानें आतड्यास पीळ पडत असला म्हणजे तिजविषयी विचार करताना, माणसाचे मनात विमर्शापेक्षा भावनाच बलवत्तर होते, व त्यामुळें विमर्शाचा समतोलपणा जातो, हा मनुष्यधर्म आहे तदनुसार तात्यासाहेबाचा समतोलपणा बिघडावा यात विशेष काहीच नाही परतु सत्यान्वेषण केवळ विमर्शाधीन असल्यानें तेथें भावना प्रबळ होता कामा नये यामुळेच तात्याच्या विचाराशी काहीसे विसंवादी असे विचार आपणाकडे प्रसिद्धीसाठी मला पाठवावे लागत आहेत.

२ **भाषाशुद्धीच धोरण**—मराठीसारख्या अप्रौढ भाषेच्या शुद्धाशुद्धतेचा विचार करिताना इंग्रजीसारखी एखादी प्रौढ भाषा उदाहरणार्थ घेणे सोईचें आहे सेपरेट् या इंग्रजी शब्दाचा वर्णविन्यास (Separate चे स्थानी) Seperate, Gross याचा उच्चार **ग्रॉस**, The bridge *over* the river यात सदृशार्थक on याचा उपयोग, In compliance with यात The चा समावेश, To do *honour* to यात पर्यायभूत Respect याची योजना, I write a letter याचे ऐवजी I a letter write असें पदाचें स्थानांतर,—हे सर्व प्रकार आपण अशुद्ध मानितों In the jungle, the pandit said, the Mahatma presided इत्यादि ठिकाणचे संस्कृतोत्पन्न शब्दाचे प्रयोग कोणी अशुद्ध मानीत नाही. या गोष्टीच्या आधारानें भाषेची शुद्धि म्हणजे काय याची अटकळ आपणास करता येते

३ **भाषा म्हणजे संकेत**—अमूक आकाराचा अमूक उच्चार करावा. अमूक शब्दाचा अमूक अर्थ करावा, अमूक वाक्यघटक अमक्या ठिकाणी ठेवावा, अशा प्रकारचे सकेत प्रत्येक भाषेंत बनलेले असतात. अशा सकेतानीच एकाचे विचार दुसऱ्यास कळतात अशा सकेताच्या अभावी सर्वच गोंधळ माजेल धनी गुळाचे खड्यास ढेप म्हणत असला तर, चाकरालाही हा सकेत ज्ञात असला पाहिजे. तो घाण्यात नल काढून राहिलेल्या तीळ वगैरेच्या निःसार चोथ्याचे वडीस जर ढेप शब्द लावील, तर धन्याने पक्वान्नाकरिता गूळ आणण्यास सांगितल्यास, तो गुराचें खाद्य आणणार, असा प्रकार अगदी नैसर्गिक आहे नव्हे, कोकणातून गेलेला धनी व नाशिकचा गडी अशी जोडी जमल्यास हा प्रकार अपरिहार्यच आहे कोकणात ढेप म्हणजे गुळाची समजतात, तर नाशिककडे ढेप म्हणजे गुराचे खाण्याची समजतात तेव्हा अर्थाचे बाबतीत सर्वसमत सकेताचे अभावी दुर्बोधता, अर्थविपर्यास, इत्यादि अनिष्ट प्रकार होणार हे उघड आहे हाच प्रकार वर्णविन्यास ( Spelling ), शब्दयोग ( Idiom ), रचना वगैरे संबधातही लागू पडतो. हे सर्व संकेत म्हणजेच भाषेचे सप्रदाय होत. एका भाषेंतील सप्रदाय दुसरीशी प्रायः मिळत नाहीत तसेंच, एका प्रातातील संप्रदायही सर्वच दुसऱ्या प्रातात सापडतात असें नाही. भाषेचें मुख्य कार्य आपले विचार दुसऱ्यास कळविणें हे वरील सप्रदाय नसल्यास सर्वस्वी अशक्य आहे आकाशातील बापाच्या स्वर्गगत किल्ल्यावर स्वारी करण्याचें एकदा माणसानी मनात आणिलें. तदर्थ बेबल् या गावी उंच मनोऱ्याची उभारणी सुरू झाली तो बराच उंच झाला, तेव्हा बापाला भीति पडली त्यावेळी त्याने आपल्या अद्भुत सामर्थ्यानें, त्या कामकरी माणसाचे भाषेंतील संप्रदाय एकविध होते ते यावद्व्यक्ति भिन्न केले, म्हणजे पार मोडून टाकिले, त्यामुळें मनोऱ्याचें काम अर्धवट राहून, बापाची काळजी दूर झाली गवड्यानें आपल्या मतें वीट मागावी, त्याचा अर्थ खालील मजुरानें पाणी असा करावा, अशा कारणानें वरचे माणसास इष्ट त्या वस्तू मिळणें कठीण झाल्यानें काम बद पडलें साराश-भाषेंत सप्रदाय एकविध पाहिजेत "कानडीनें केला मराठी भ्रतार" तर परस्पराचें मनोगत परस्परास कळणें दुर्घट व त्यामुळें संसार नीट होणें दुष्कर. तेव्हा भाषा सर्वथा कार्यक्षम होण्याला, तीतील संप्रदाय एकविध पाहिजेत.

अशा रीतीनें संप्रदायाचें महत्त्व पटलें म्हणजे भाषाशुद्धि कशास म्हणाव हेंही सहज लक्ष्यात येईल.

४ **भाषाशुद्धीचा अर्थ**—भाषेची शुद्धि म्हणजे ती भाषा बोलणाऱ्या शिष्ट लोकानी आदरिलेले सप्रदाय सम्यक् पाळणे हे होय अन्य भाषेतील शब्द शिष्टानी उपयोगात आणिला म्हणजे तोही सर्वसमत होतो, व त्याचा उपयोग सप्रदायात मोडू लागतो. (१) वर्ण व अक्षरे याचे लेखन व उच्चार, (२) शब्दाचें शिष्टसमतत्व व उच्चार, व ( ३ ) त्याचे वाक्यगत स्थान, इतर पदाशी योग या सर्व गोष्टीत सप्रदायानुसरण म्हणजे भाषाशुद्धि व सप्रदायभग म्हणजे भाषादूषण होय अर्थात् परकी भाषेतील शब्दाचा त्याग हे नियमानें भाषा-शुद्धीचें अग बनतेंच असे नाही

५ **शब्दांचे महत्त्व**—सर्वसामान्य विचार करिता, भाषेचे स्वरूप वर्ण, अक्षर, शब्द, वाक्य, व अनुवाक (पॅराग्राफ्) असें पचविध दिसते पैकी, शब्द हा मध्यवर्ती असल्यानें, त्यास विशेष महत्व आहे वर्ण व अक्षरे ही अशिक्षितास अज्ञानप्रायच असतात, अनुवाक वाक्याचे घडलेले व वाक्यें शब्दाची घडलेली असतात करिता मुख्यतः भाषेचे घटक म्हणजे शब्दच होत त्यामुळें भाषेचे विचारात शब्दाचा विचार करणें हे निसर्गतः प्रधान ठरतें. शब्दाचा विचार करणे तो प्रायः त्याचें लेखन, उच्चारण, प्राशस्त्य, शब्दयोग (= Idiom ) व वाक्यगतस्थान एतद्विषयक म्हणजे पचविध असतो याचा क्रमशः विचार करू

६ **लेखनाची शुद्धि**—वर्णलेखन शुद्ध असणें म्हणजे ज्या उच्चाराचा जो वर्णाकार आज शिष्टसंमत आहे तदर्थ त्याचाच अवलंब करणे आज ए, ऐ असे आकार प्रचारात आहेत. त्याचे स्थानी अे अै असे वापरणें हा दोष होय कालातरानें असे आकार जर शिष्टस्वीकृत झाले तर त्यावेळी ते योजणें शुद्ध होईल वर्णाकार जो शिष्टसमत तोच शुद्ध आता शिष्टप्रयुक्त असूनही कचित् एखादा वर्णाकार अनवधानानें अशुद्ध असू शकेल तो शिष्टाचे नजरेस आणून त्यास त्याची अशुद्धता पटवून दिली म्हणजे, ते इष्ट ती सुधारणा त्यात करतील असें झाल्यानें नवीन सुधारित रूप तेंच शुद्ध होय. शुद्ध, सिद्ध, मट्टा, लक्ख, पत्थर इत्यादि शब्दात सयोगाचे आद्य घटक द्, द्, ट्, क्, त्, असे आहेत. करिता त्याच्या लेखनात याहून निराळे आद्य घटक

दर्शविन्यास, तो दोषच होईल कधी-कधी आढळणारे व वेळी शिष्टप्रयुक्तही ध्ध, द्ध, ख्ख, ध्व, एतादृश संयोग दूषणीयच होत. त्याचें शुद्धीकरण हें भाषाभिमान्याचें कर्तव्य होय एखाद्या ध्वनीचा अमूक (अक्षररूप) आकार, असा संकेत ठरला म्हणजे तद्विरुद्ध जाणें चूक होय. ध्ध किंवा त्थ या आकारास अनुरूप ध्वनीच भाषेंत नाहीत करिता जो अशक्योच्चार म्हणून निरुपयोगी असा आकार, त्याचा त्याग युक्तच होय. तसेच बैल इत्यादि शब्दांत बै लिहिताना दोन मात्रांचा उपयोग होतो परंतु सदृशोच्चार ऐक यांतील ऐ लिहिताना आपण एकच मात्रा योजितों या विसंवादामुळें मुलांची वारंवार चूक होते ही टाळण्याकरिता कोणी ऐ,–ऐ किंवा अे–अै असे आकार सुचविन्यास व ते शिष्टसंमत झाल्यास,तेंच शुद्ध गणले जातील ठरीव चकारीचे बाहेर संप्रदायातिक्रमाचे भीतीने जाऊंच नये असें नाही, पण जावें ते विशेष कारणाकरिताच संप्रदाय बाजूस सारण्याची अशी सभा शिष्टसंमतच आहे तदभावी जगांत कोणतीच सुधारणा होणार नाही जग हें चलस्वभाव असल्यानें, त्यांत बदल हा घडणारच मात्र तो थोडा-थोडा सुखसोईचेच दृष्टीनें घडला पाहिजे जो उठला तो बदल करूं पाहील तर कशाचाच मेळ राहणार नाही या तत्त्वास अनुसरून पाहता ख–चा आकार भ्रामक आहे तो वेळी र व अशा दोन अक्षरांची शंका उत्पन्न करतो यांत सुधारणा केल्यास, ती इष्ट होईल पण हें काम शिष्टसमवायाच्या मान्यतेनेंच संप्रदायशुद्ध गणलें जाणार अशा प्रकारची सुधारणा वारंवार होऊनच लिपीस प्रस्तुतचे रूप प्राप्त झालें आहे सारांश–संप्रदायशुद्ध आकारानें वर्ण लिहिणें हे भाषाशुद्धीचें पहिले अंग होय

७ **वर्णोच्चारण**–शब्दांचे उच्चार काळाबरोबर वारंवार बदलत जातात इंग्रजी 'एफ्' चा उच्चार आपणास अलीकडे विशेष परिचित झाला असल्यानें वाफ, गोफ, फेस इ० मराठी शब्दांतही याचा उच्चार वारंवार ऐकूं येतो फायदा, माफक, साफ वगैरे यवनी शब्दांत जरी तो उच्चार इष्ट असला, तरी शुद्ध संस्कृतोत्पन्न शब्दांत त्याचा उपयोग सदोष आहे. संस्कृतोत्पन्न व तदितर असे हे द्विविध उच्चार एकाच फ या आकारावर हल्ली लादले जातात. अशा स्थितीत एक तर नवीन उच्चाराला मनाई केली पाहिजे, किंवा नवीन उच्चार व्यक्त करण्यास फ–ला निराळें रूप दिलें पाहिजे. उत्तरोत्तर, अशा

रूपांतराचे अभावी, भाषेत घोटाळा होणार. फ–चा उच्चार फळ यांतील उच्चाराप्रमाणें होणें हा जो आपला संप्रदाय त्यास बाध येणार. संप्रदायाशी सर्वथा संवाद हे भाषाशुद्धीचें तत्त्व असल्यानें, तें पाळण्याकरिता नवीन उच्चारास नवीन आकार कल्पिणे जरूर आहे. विद्यमान आकारातही थोडासा फरक केला तरी चालेल. साराश–भेद दर्शविणें भाग आहे, मग ते कोणत्याही प्रकारें साधावें भिन्न भाषेशी परिचय झाल्यानें व अवातर कारणानीही उच्चारात अतर पडूं लागतें तदनुरूप शब्दलेखनात फरक करावा लागतो इग्रजी भाषेंत असा फरक उच्चारात फार झाला आहे, मात्र तदनुरुप वर्ण-विन्यास बदलला नाही यामुळें या दोहोंमध्ये पुष्कळ शब्दाचे बाबतीत विसवाद उत्पन्न झाला आहे वर्णविन्यास क्लिष्ट होण्याच्या कारणापैकी हें एक प्रधान कारण आहे Night (नक्त), Know (ज्ञा), hour, (hora, होरा) इत्यादि शब्दाचे उच्चारात क्रमाने घ् क् ह् या वर्णाचा मागमूस नसून, ते लेखनात आहेत हे लेखन व्युत्पत्तीस अनुसरून आहे, असें दिसून येईल. मूळ उच्चार व लेखन यात संवाद होता पुढे फक्त उच्चार बदलल्याने, तो सवाद नाहीसा झाला

अशा रीतीनें लेखनानें उच्चाराशी साहचर्य न ठेविल्याने मराठीतही विसवाद उत्पन्न झाला आहे इग्रजीत लिहितात दाघ्तर् (daughter), पण वाचतात डॉटर् मराठीत लिहितात देहात, उद्या, पण वाचतात देहॅात, उद्यॉ सस्कृतातील उच्चाराशी येथील **हा** व **द्या** याचे, तसाच उ–चाही, उच्चार मिळते नाहीत शात यातील नासिक्य उच्चाराशी देहात यातील उच्चार कागदावर सारखा दिसतो, पण वस्तुतः तो भिन्न आहे. उद्यान यातील उच्चाराशी उद्या यातील द्य–चा उच्चार लेखनात सारखा दिसतो, पण वस्तुत. तो भिन्न आहे साराश-प्रस्तुत शब्दाचें लेखन सस्कृताशी मिळतें नाही सस्कृताशी फारकत करणें शक्य व इष्टही नसल्याने, त्याच्याशी संवाद राखणें मराठीचें कर्तव्यच ठरतें अर्थात् सस्कृतात ज्या आकाराचा जो उच्चार त्या आकाराचा तोच उच्चार मराठीत असला पाहिजे काल, वेला, कदली इत्यादि शब्दातील ल–चा उच्चार मराठीत बदलला त्याचे करिता लेखातही (वेदकालीन) ळ—चा उपयोग उच्चारानुरूप करण्यांत आला आहे. पण असे भिन्न आकार इतर नवोद्भव मराठी उच्चारास लाभले नाहीत. ते तसे तयार करण्याकडे कोणी लक्ष्य देत नाही, हें योग्य नव्हे.

८ **लेखनांतील उणीवा**—अशा प्रकारच्या मराठीच्या लेखनातील उणीवा मुख्यतः पुढीलप्रमाणें आहेत—

(१) देहात ( मरण या अर्थी ) व देहात ( शरीरामध्ये )

(२) उद्यान व उद्यां अथवा माल्य व दिल्यानें

(३) गर्जन्हरिः व उन्हामुळें

(४) मुलाला जपणें व रामनाम जपणें ( असेच च, झ याचे द्विविध उच्चार )

(५) सगमरवर इत्यादि ठिकाणी आढळणारे षड्विध, व अॅ-चे आद्याक्षरातील एक, मिळून सप्तविध आकार

या वरील ठिकाणी असदेहाकरिता भिन्न वर्णाकाराची आज वाण आहे

९ **परदेशी वस्तूंच्या परदेशी संज्ञा**—जो अर्थ व्यक्त करावयाचा त्याचा बोध सुखाने व्हावा, या धोरणानें शब्दाची योजना करण्यात येते. अर्थात् हें काम जसें स्वभाषेतील शब्दानें होईल, तसें परभाषेतील शब्दानें होणें नाही या सामान्य धोरणानें शब्द यावच्छक्य स्वभाषीय वापरण्याकडे विद्वानाची प्रवृत्ति असते. अलीकडे दळणवळणाची साधने नवनव व अधिकाधिक कार्यक्षम पैदा होऊ लागल्यामुळे कोणताही देश परास्पृष्ट, सोवळा राहणें शक्य नाही यामुळे वाढत्या दळणवळणानें नवीन-नवीन वस्तू व कल्पना देशामध्यें बाहेरून सारख्या येत आहेत आता या वस्तू व कल्पना नुसत्या फारच येणार ? त्या आपल्याबरोबर स्ववाचक शब्दही घेऊन येणार. कारणाने महायुद्धाचे काळात नुसत्या इंग्रजी भाषेत कितीतरी नवीन शब्द प्रविष्ट झाले आहेत त्याची सख्या शेकड्यानी नव्हे तर हजारानी सागावी लागेल अशा रीतीनें नवीन शब्दाची जरूरी मान्य झाल्यावर, असा प्रश्न उत्पन्न होतो की, हे शब्द स्वदेशी असावे की परदेशी ? याचें उत्तरही धोपटपणें, उलट प्रश्नानेंच काढिता येईल परदेशी वस्तू बटाटा हा पोटाला, उपासाला चालतो, मग तद्वाचक शब्द जिभेला, उच्चाराला का चालू नये ? अर्थात् चालावा, तेव्हा येथील शब्दग्रहण निरपवाद ठरतें रबर हा परदेशी पदार्थ पाहिजे, तर त्याचा बोधक शब्द का नको ! अशाच नकळत अंगीकृत विचारसरणीनें बटाटा, रबर, कॉफी इ० शब्द मराठी झाले आहेत. परदेशी वस्तू देशात प्रविष्ट नसूनही, त्याचा व्यवहार कधी-कधी आपणास

करावा लागतो. पौंड, शिलिंग, पेन्स इ० वस्तू आपण वापरीत नसून त्यासंबधी उठाठेव, हिशेब आपणास करावे लागतात. अर्थात् तदर्थक शब्द योजणें आपणास प्राप्त आहे अशा विदेशी वस्तूंच्या पुडक्यात, त्याबरोबर आलेले शब्द सर्वच भाषा वापरितात इंग्रजानी आपला रुपया, पैसा, फार काय कवडीही उचलली आहेच इंग्रज लोक नैसर्गिक किंवा कृत्रिम वस्तूबरोबर शब्दही उचलतात. अशा वेळी परकीय शब्द-योजनात कधी–कधी अज्ञानानें उपहास्य चुकाही होतात. इंग्लंडात इराणातून नारिंग नेलें त्याबरोबर नारिंग हा शब्दही गेला. त्याचा उल्लेख आरंभी सहजच ( ए नॉरेंज् ) असा केला गेला हा लिखित उल्लेख ( an orange असा ) सदोष वाचण्यात आला आद्य n मागील उपपदास जोडण्यात आला n-चे पुढे स्वर असल्याने, सहजच a व n मिळून an हे उपपदच समजण्यात आले झाले, तेव्हापासून इंग्रजीत नारिंग फुटून त्याची n ही साल उडून तें उरिंज् ( orange ) बनले, व त्याच रूपानें ते हल्ली बोधिलें जातें टोबॅको हा शब्द मूळ अमेरिकेत चिलमीचा वाचक असून इंग्रजी भाषेत तो तद्गत ओषधीचा वाचक बनला आहे हाच शब्द तंबाखू या रूपानें मराठीतही घुसला आहे चिरपरिचयाने बटाटा, तंबाखू, पायरी ( आंबा ) हे शब्द स्वदेशीच वाटतात अशा शब्दाचे उपयोगावरून, इंग्रजीत काय वा मराठीत काय, कोणत्याही भाषेंत परदेशी वस्तूबरोबर परदेशी शब्दाचें ग्रहण निरसूयपणे करण्यात येतें, हे स्पष्ट दिसते

१०. **सोनाराचे चिमटे**—वस्तूस किंवा नैसर्गिक कल्पनेस बोधित करण्याकरिता मराठीचे भरतीला आलेले परभाषीय शब्द, सोनाराचे दुकानात तुल्यप्राय आकाराचे अनेक चिमटे भिंतीवर लटकताना दिसतात, तरे दिसतात ते पाहून प्रथम असा विचार मनात येतो की हे एवढे चिमटे कशाला ? पण थोडा वेळ त्या सोनारास काम करताना पाहिलें म्हणजे निरनिराळ्या रीतीनें वस्तू पकडताना निरनिराळ्या चिमट्याची जरूर बुद्धीस पटते. सारांश—पकडणें हेंच एक काम चिमट्याचें असलें तरी त्या एका पकडण्यातच अनेक प्रकार असतात. या प्रकारभेदामुळें चिमट्यातही प्रकार उत्पन्न होतात अशीच गोष्ट भाषेंतील शब्दाची आहे दहा प्रकारच्या चिमट्याचें काम पाचाकडून करविणें म्हणजे अडचण भासते, तसेंच भाषेंतील एका सामान्य कल्पनेचे विशेष प्रकार दर्शविण्यास शब्दविशेष असल्यास

सोईचें जातें. इंग्रजी भाषेंतील aunt या शब्दाचें कार्य मराठीत मावशी व काकी हे पृथक् शब्द करतात पण त्यामुळें सोयच होते भाषेचें कार्य विचार व्यक्त करणें मग हे विचार निःसंदेह व्यक्त करण्यास जे-जे प्रकार उपयुक्त ते--ते आदरणीयच होत अशाच दृष्टीने इंग्रजीत पर्यायशब्दास फार महत्त्व देण्यात येतें एकाच स्थूल कल्पनेची भिन्नभिन्न अंगें जितकी सूक्ष्मपणें व्यक्त करिता येतील, तितकें भाषेंत शक्तिपाटव (ॲक्युरसी) येते हें साधण्यास शब्दाचा भरणा पुष्कळ पाहिजे, म्हणजे त्यात व्यवस्था लाविता येते कपडे पुष्कळ असल्यास बाहेर लोकात जाताना, घरात हिंडताना, काम करिताना, निजताना, जेवताना, अशा विविध प्रसंगी भिन्नभिन्न कपड्याची योजना करता येईल अशी योजना कोण इष्ट म्हणणार नाही ? ही कपड्याची श्रीमंती जशी माणसाची, तशीच शब्दाची संपत्ति भाषेची, होय तिला निरनिराळ्या प्रसंगी निरनिराळे शब्द का नकोत ? आपली मातृभाषा श्रीमंत असावी असें इच्छिणारानें तिला शब्दरूप वस्त्रालंकार विपुल देणें जरूर आहे त्यात कित्येक विदेशीसुद्धा प्रसंगानुसार चालतील

११ **विदेशी व परदेशी**—पृथ्वीच्या पोटातून निघालेल्या पार्थिव वस्तु ज्या मानानें आपण परदेशी घेऊ लागू त्या मानानें स्वदेशी वस्तु मागें पडतील आपण दहा परदेशी चाकू घेतले, तर तेवढा स्वदेशी चाकूचा खप आपण आपल्या हातानें कमी केला असें होईल पण अशी स्थिति शब्दाची नाही **पार्थिव** वस्तूंना जरूरीच्या व संपत्तीच्या मानानें जशी सीमा आहे किंवा सीमा शक्य आहे आणि म्हणून त्याची वाढ ठरीव मर्यादेपलीकडे जाऊ शकणार नाही, तशी स्थिति शब्दाची म्हणजे **वायव** वस्तूची नाही एकाच कल्पनेचे वाचक अनेक शब्द जमल्यास, तितकी अंगे कल्पनेची पडू शकतात प्रत्येक शब्दास सवता सुभा मिळतो. उपासमार कोणाचीच होत नाही सुगृहिणी जशी मुलास खाद्याची वाटणी करून देते, तशीच भाषा शब्दास क्षेत्रविभाग करून देते मग ते शब्द कितीही असोत, कोणत्याही देशातले व काळातले असोत भाषेचे दरबारात शब्दास मज्जाव नाही काही शब्दास खो मिळालाच तर तो बहुधा स्वदेशी-परदेशी या भेदानुसार मिळत नाही तो मुखोच्चार, रूपशुद्धि, बोलणाराचा शिक्षणसंस्कार, एतदनुसार मिळतो. आरंभीच्या मराठी क्रमिक पुस्तकात कुमक, पारिपत्य,

यासारखे काही शब्द होते ते आज आपल्या व्यवहारात कोठेंच दिसत नाहीत इंग्रज–पूर्वकालातील यावनी भाषेचा परिचय सुटून, सांप्रत संस्कृत व इंग्रजी यांचा परिचय वाढत असल्याने, या उत्तरोक्त भाषातील शब्दांपुढें काही यावनी शब्दांनी पळून जावें यास मराठी बोलणाराचा नवीन व्यासंगच सर्वस्वी कारण आहे, म्हणजे भाषेत शब्द येणे हे प्रायः निसर्गतःच बोलणाऱ्याच्या नकळत होत असते.आपण पाहणें तें एवढेंच की, **औरस पुत्राचें स्थान कृतक पुत्र बळकावीत नाहीं ना** ? औरस व कृतक यांची संख्या कितीही होवो, त्या सर्वांस भाषेंत अवकाश मिळतो अशा रीतीने परभाषेंतील शब्द घेणें हें क्षेत्रविभागास उत्तेजक असल्याने सर्वथा इष्ट ठरतें

१२ **शब्दांतील अर्थक्षेत्रविभाग**—राजास **पुत्ररत्न** झालें, व्यास हा पराशराचा **पुत्र** होय, गोपाळरावाचा **मुलगा** सदाचारी आहे, भिकाऱ्याचा **पोर** दारात बसला आहे, ह्या दुष्ट **पोरट्यास** काय करावें ?, हा चोरटा पोर कोणाचा **कार्टा** ? हा देशद्रोही कोणाची **अवलाद** ? या उदाहरणात मुलगा ही सामान्य कल्पना भिन्नभिन्न सात शब्दांनी बोधिली आहे यांचे भरतीस आणखी जरी शब्द असते तरी तितक्यांचा निरनिराळा उपयोग—या सातांचा झाला आहे त्याप्रमाणें—भाषेंत झाला असता. **अर्थच्छटा निराळी, शब्द निराळा**. हें तत्त्व सर्वसंमत आहे यानेंच भाषेस जोर येतो शब्दबाहुल्य असेल, तरच समर्पक शब्दयोजना शक्य होते वरील शब्दांपैकी, अवलाद हा शब्द यवनी आहे तो घेतल्याने काहीच हानी झालेली दिसत नाही. नवा जोडा असल्यास, आपण जुना जोडा अमंगल ठिकाणीच वापरणेस घेतो; तद्वतच अवलाद हा यवनी शब्द अवमर्य संबंधात भाषा योजिते कसाही वेडा-वाकडा शब्द आला तरी त्यास भलेंबुरें स्थान भाषा देते ती सर्वसंग्राहक आहे चांगल्याप्रमाणें वाईटही अर्थ भाषेंत व्यक्त करावे लागतात. करिता सर्व प्रकारचे शब्द तिला लागतात भाषा शब्दांना

'गुणा न म्हणता उणा अधिक आदरें सेविती ।'

प्रस्तुत शब्दसमुच्चयात, अवलाद यानें पुत्र शब्दाच्या उच्च पवित्र क्षेत्रास हात न लाविता एका घाणेरड्या कोपऱ्यातील जागा व्यापिली आहे. त्यामुळें पुत्रप्रभृति शब्दांची काहीच हानी होत नाही. उलट घाणीत जावयाचें वाचल्यानें त्यांची शुद्धी उज्वल राहते. "आपण अल्लाची अवलाद

आहा." एतदर्थक यवनी वाक्यात अवलाद् या शब्दात निंदा मुळीच गर्भित होत नाही परंतु तो शब्द मराठीत शिरताना मराठीनें त्याला बजाविलें 'तुला येणेंच, तर त्या घाणेरड्या कोपऱ्यात बसले पाहिजे' तें त्यास पत्करलें व तो मराठीनें घेतला. यात मराठीचा तोटा मुळीच नसून उलट भूतदयेचें पुण्य तिला लाभले आहे सारांश–परकी भाषेतील शब्द बेशक घ्यावे, मात्र त्याची योजना विचार्य करावी औरस शब्दाचे हक्कावर गदा न आणिता, त्याची सोय बोलणारानी लावावी उत्तरोत्तर क्षेत्रविभागाला शब्दाची जरूर वारवार लागते, नव्हे, किती शब्द झाले तरी क्षेत्रविभागाची धाव त्यान्यापुढेंच ठेव-लेली. ह्यासाठीच भाषाही शब्दवर्धनार्थ पुष्कळ धडपड करीतच असते आपण परकी शब्द घेतो त्याने नकळत, याच भाषेच्या नैसर्गिक प्रयत्नास आपण मदत करीत असतों

अर्थाचा क्षेत्रविभाग स्वाभाविक आहे, एवढेंच नव्हे, तर जीवत भाषेचें तें असामान्य लक्षण आहे जीवत भाषेत प्रत्येक शब्दाने भिन्न भावना उदित होते ज्या दिवशी संस्कृतात उदक, वारि, जल हे सर्वस्वी आपसात परिवृत्ति-क्षम बनले, म्हणजे त्याचे श्रवणानें भिन्नभिन्न कल्पना मनात येईनाशा झाल्या, त्याच दिवशी ती मृतभाषा बनली हल्ली तिच्यातील पर्यायसंपत्ती केवळ कुजत पडली आहे अशा रीतीनें पर्यायशब्द मृत भाषेत फुकट जातात, तर जीवन भाषेंत ते उत्तरोत्तर सार्थ राहून वाढत जातात अर्थाचे क्षेत्र-विभागास नवीन शब्द इष्ट होत व हे भिन्नभिन्न प्रभवापासून आल्यास, त्याचे क्षेत्रविभागाची दिशा सापडून अर्थविभजन करणें सोपें व सयुक्तिक होतें करिता परभाषेंतून पर्यायार्थ शब्द घेण्यास मुळीच हरकत नाही हे सिद्ध आहे

१३ **पर्यायव्यवस्था**—इंग्रजीत air, wind, climate, weather असे चार शब्द आहेत हे शब्द मूळ एकाच भाषेतील नाहीत सोईवार म्हणून इंग्रजीनें त्याचा संग्रह केला आहे हे सर्व एकाच द्रव्याचे वाचक आहेत, पण प्रत्येकाच्या प्रयोगाचा उपाधि भिन्नभिन्न आहे वाढत्या भाषेस उपाधि–भेदाने शब्दभेदाची जरूरी लागते. मराठीत हे चारी उपाधि व्यक्त करण्यास संस्कृत शब्द नाहीत. वाताचे पर्याय संस्कृतात पुष्कळ आहेत, पण त्यात उपाधिभेद नसल्याने त्याचें बाहुल्य व्यर्थ ठरतें. प्रस्तुत अडचण वारण्यास मराठीत पुढील योजना केली आहे. वरील शब्दास

समानार्थक म्हणून क्रमानें वात (निर्वात वगैरे शब्द पहा) किंवा हवा, वारा किंवा वायु, हवापाणी, हवामान हे शब्द योजितात यात हवा हा शब्द यवनी दिसतो, त्यास पवित्र करुन त्याचें मान या शब्दाशी लमही लावण्यात आलें आहे संस्कृताशी सोयरीक झाल्यानें त्याचा यवनीपणा जाऊन तो मराठीत येण्यास सर्वथा पात्र बनला आहे, हें उघड आहे यांतील हवापाणी हा शब्द अर्थदृष्ट्या अपवाद्य दिसतो पाणी ही कल्पना त्यानें दर्शवू पाहिलेल्या अर्थात नसून, त्याचे रुपात मात्र आहे तेव्हा येथें अर्थवैशद्याकरिता काही निराळा शब्द सुचवावासा वाटतो. तो शब्द म्हणजे वातातप हा शब्द द्विविध दृष्टीनें योजिला आहे- एक तर वाग्भटादि संस्कृत वैद्यकग्रथात, इष्ट असलेल्या अर्थात तो योजिलेला आढळतो व दुसरे ' हवेची स्थानविशिष्टावस्था ' अशा अर्थवाचनास आपणास स्वतन्त्र शब्द मिळतो वातातप यातील घटक क्रमाने हवा व ( स्थानगत ) सूर्याची उष्णता याचे वाचक आहेत. असो. अशा रीतीने द्रव्यार्थक म्हणून हवा हा परकी शब्द घेतल्यानें व वातातप हा पुन्हा प्रवृत्त केल्याने भाषेचा शब्दकोश वाढून, तिला सूक्ष्मदर्शित्वही लाभते साराश-मिळतील तिकडून नवीन-नवीन शब्द भाषेत घेत जा, मग ते संस्कृतापासून बनवा म्हणजे आजोळाहून आणा किंवा आयते परभाषेतून घ्या ह्या पर्याययोजनेत उच्चार व अर्थ या दोन्ही दृष्टीनी यावच्छक्य औचित्य साधावें, हे उघड आहे परकी शब्दावरही वाटल्यास स्वीयत्वाचा छाप मारा. हवा असें का म्हणावे ? ( १ ) नर तो पदार्थ प्रत्येकास हवा म्हणून किंवा ( २ ) वाहते ती हवा येथील वर्णविपर्ययाने हवा शब्द सिद्ध होतो अशा रीतीने भू किंवा वह् या धातूपासून हवा शब्द निष्पन्न होतो

साराश-शब्द येणें म्हणजे व्युत्पत्ती, विभक्तिवचनादि संस्कार, व उच्चार-सौकर्य, ह्या सर्व प्रकारानी त्यास मराठीची दीक्षा पुरी द्यावी व तो सर्वांच्या कानास मराठीच भासेल असा प्रयत्न करावा येथे कदाचित् कोणी व्युत्पत्तीस हरकत घेईल, त्यासही उत्तर आहे वारवार, व्युत्पत्ति अनुमित असते, ती वास्तवच असेल अशी खात्री देता येत नाही अश्व-आस्प, श्वेत-सफेद अशी शब्दसाम्ये आढळतात यातील कोण कोणापासून निघाला ? कदाचित् दोघेही स्वतंत्रपणे उद्भवले असतील हवा या शब्दात तरी मूळ वह् असा धातू नसेल कशावरून ? तसा असल्यास आज जो हवा हा शब्द आपण मराठीत घेतों, तो केवळ भूतपूर्व संस्कृतोद्भवच होय, म्हणजे आपल्याच वस्तूची ओळख आज

आपण नव्यानें करून घेत आहो, असें होइल. जखम हा शब्द आपण यवनी म्हणतों, पण तोही कदाचित यक्ष्मन् ( रोग, क्षयरोग, क्षतक्षय, क्षत ) यावरून निघाला असण्याचा संभव आहे सारांश—नवोपात्त शब्दांचे व्युत्पत्तीविषयी लढविलेलें अनुमान नेहमीच प्रामादिक असेल, असें नाही, मात्र अशा स्थितीत यथासंभव खरी म्हणून गणलेली व्युत्पत्ति देऊन दुसरी केवळ सुचवलेली आहे, असें स्पष्ट नमूद करून ठेवावें म्हणजे सत्यापलापाचा दोष पदरी येणार नाही

१४ **शब्दनिर्मिति**—भाषेत शब्दांनी प्रायः पदार्थ, कल्पना किंवा संस्था व्यक्त होतात पैकी परदेशी वस्तूचे शब्द जगातील व्यवहाराकरिता जरी मूळचेच वापरणें जरूर असले, तरी अंतर्देशीय व्यवहारात त्याना नवीन शब्द बनविल्यासही इष्ट आहे कल्पना-व्यंजनास तर हे अवश्यक आहे Bicycle दुचाकी, Dairy दुधाळें, One anna piece आणेली, Dread-naught येडर, इत्यादि यौगिक शब्द, Waggon वागीण, Chimney चिमणी, ( मोटारचा ) cleaner किनर, Quarantine करंटी इ० रुपापभ्रष्ट, अशा प्रकारचे द्विविध शब्द,—काही बुद्धिपुरःसर उत्पादित व काही यदृच्छोत्पन्न झालेले—आढळतात काही ठिकाणी नादानेंही मनुष्य चकतो. admiral या इंग्रजी शब्दाबद्दल मराठीत दर्यासारंग हा वापरण्यात आला आहे पण हे दोन्हीही परदेशी, एक इंग्रजी तर दुसरा यवनी मराठीत पर्याय योजणंच तर ( अमीर-अल्-बहार एदर्थक ) सागराधिप किंवा सागरेश्वर हे योजणें इष्ट ठरते. पण दर्यासारंग हा शब्द कानास मधुर व डौलदार भासत असल्यानें, तोच पसंत ठरला, तरी पण हें दृष्टीआड होऊ देता कामा नये की, इंग्रजी शब्दास पर्याय योजणे तो यवनी नसून संस्कृतोत्पन्न असावा, त्यातच आपलेपणा आहे पूर्वीच्या संस्था पाहून Governor याचा पर्याय **सत्रप** असलेही शब्द मराठीत पुन्हा रूढ करावे असले शब्द लोकात आणणे हे जरी कोशाचे काम असले, तरी कोश वारंवार होत नसल्यानें हें काम नियतकालिकानी करावें त्यानी वारंवार मराठी पर्यायापेक्ष अशा इंग्रजी शब्दाची यादी सुचविलेल्या पर्यायशब्दानी सहित वा रहित प्रसिद्ध करावी, म्हणजे इष्ट ते पर्याय जनतेस आयते मिळतील किंवा ती बनवील या उपायानें भाषेत नव-नव शब्दाची भर पडत राहील

१५ **पूर्वींचा दाखला**-आपले पूर्वज केवळ परदेशी वस्तूचेच शब्द ग्रहण करीत असत असें नाही, तर नवीन-नवीन कल्पना परक्याकडून आल्यास

त्यांन्याही संज्ञा वारंवार स्वीकारीत असत. अशा संज्ञा ज्योतिषासारख्या जुन्या शास्त्रात पुष्कळच आहेत. Hora होरा, Diametion जामित्र, या अशा दोन संज्ञा आहेत. उघड-उघड हे दोन्ही शब्द आर्येतर भाषांतून आलेले दिसतात. ग्रीक भाषेंत तर त्याची व्युत्पत्ति निःसंदेह आढळते तेव्हां शब्द सोईचा वाटल्यास, मग तो परका असला तरी, घेण्यास आपले पूर्वज तयार असत, हें स्पष्ट दिसतें आतां असे शब्द घेतांना ते कसाबसा आपलेपणाचा छाप त्या शब्दावर मारीत असत ही केवळ मखलाशी होय. ती आपण उचललीच पाहिजे असे नाही तो अभिरुचीचा प्रश्न आहे होरा हा शब्द अहोरात्र ह्या शब्दातील आद्यंताक्षरें लोपून बनला आहे, असें म्हणण्यात येतें तसेंच जामित्र हा शब्द जायामित्र यावरून निघाला आहे, असें मानितात ही व्युत्पत्ति केवळ हठोत्पत्ति आहे, हें प्रथमदर्शनीच स्पष्ट होईल. सारांश-परकीय भाषेतील शब्द खुशाल घ्यावे, हें पूर्वपरंपरेस सोडून नाही. मात्र असे शब्द घेतल्यावर त्यांना संस्कृतासारखें नीटनेटकें उपयोगक्षम असें रूप द्यावें. अमरकोशात हिंगु, रामठ हे शब्द हिंगाचे वाचक दिले आहेत. टीकाकारांनी तर हिंगु-चीसुद्धां व्युत्पत्ति दिली आहे रेशमी वस्त्राचा चीनांशुक हा शब्द संस्कृत काव्यांत भृशप्रयुक्त आहेच.

१६ **शुद्धिभ्रम**—उच्चारसौष्ठवाकरिता काही कठीण संस्कृत शब्दांचे मराठीत सोपें रूप होतें सूत्र–सूत, सम्र–मान, काल–काळ इ० पण एवढ्यावरून कोणताही सुखोच्चार शब्द संस्कृत नसलाच पाहिजे अशी कल्पना करून घेऊ नये या भ्रांत कल्पनेनें पुढील विषमोच्चार शब्द मराठीत रूढ होत आहेत, त्यास खो द्यावा, म्हणजे ते मूळच्या शुद्ध सोप्या रूपानेंच वापरावे. धिक्कार, दुष्ट, वैयाकरण, पुलिंग हीच रूपें शुद्ध आहेत अर्थात् प्रचारात वारंवार आढळणारी एतद्-भिन्न रूपें त्याज्य होत 'र-'वर्णाचा निर्देश रेफ यानें करणें योग्य आहे क्वचित् 'र'कार असाही निर्देश क्षम्य होईल, 'कार' पुढें जोडून होणारें रूप सदोष होय.

१७ **शब्दयोग**—( किंवा Idiom ) ह्या संबंधांतही शुद्धीची जरूरी भासते एखादी गोष्ट **करणें** असे वक्तव्य असतांना तद्दर्शक नामापुढे अनुरूप-क्रियेचा दर्शक शब्द योजणें नैसर्गिक आहे. उडी–फेकणें–टाकणे, पैज–बांधणें इ.

प्रयोगात त्या त्या धातूचे ऐवजी मारणें धातूचा उपयोग चिन्त्य दिसतो हा प्रघात कदाचित् परकीय भाषेंतून उचलला असणेचा संभव आहे असें असल्यास मराठीत त्याचा उपयोग गैर आहे कारण मराठीत त्याचें काम भागविणारे शब्द असून, त्याना खो देऊन, मारणें हा अन्यथार्थक धातु प्रगत घुसलेला दिसतो मारणें हा रूपतः जरी संस्कृतोद्भव असला, तरी टाकणें, फेकणें इत्यादि अर्थात त्याचा प्रयोग संस्कृत-सदृश नसून, परकीय भाषेच्या वळणावर गेलेला दिसतो बुडी मारणें, हाक मारणें, बात मारणे ह्या प्रयोगाची संगतीही अशीच दुष्कर दिसते करिता ह्या शब्दयोगाची शुद्धी करणें, तर हाक-फोडणे-करणे,बुडी घालणें-घेणे-करणें इ० प्रयोग युक्त दिसतील परंतु वहिवाटीचा हक्कही उपेक्षणीय नसल्याने, हे प्रयोग, घेताना अशुद्ध असले तरी, सांप्रत चिर-रूढ म्हणून रक्षणार्ह आहेत पदरी पडल पवित्र झाले-हे धोरण येथे ठेविलें पाहिजे साराश-अशुद्धतेला चिररूढी ग्राह्य करू शकते.मारणे यास वरील व तादृश शब्दप्रयोगात **करणे** हा नवीन अर्थ देऊन ता रूढीनें सर्वसंमत केला आहे करिता आता जो अबहिष्कार्य आहे त्यास बहिष्कारणें आरंभीच शक्य होतें जपणें तें वेळीच जपावें लागतें मागून हाका मारण्यात काय अर्थ ? हाक मारणें हा प्रयोग तुकोबानीहि केला आहे, करिता हाक करणे हा प्रयोग आता केल्यास, त्याचा तुकोबासारख्याच्या कृतीशी विसंवाद होणार, व संवाद हा तर भाषेचा आत्मा करिता तो राखण्यास चिररूढ शब्दयोग आदरणेंच योग्य आहे यापुढें, शब्दयोग शुद्ध राखावा, अशी दृढ इच्छा असेल तर हल्ली इंग्रजी प्रयोगाचे धर्तीवर मराठीत उभारिल्या जाणाऱ्या शब्दयोगात मराठीतील प्रयोगाशी विसंवाद आढळल्यास तो टाळणें इष्ट आहे. ' अमक्या कमिशनवर रा. लजपतराय याची नेमणूक झाली आहे ' ' अमकें पुस्तक बक्षिस-पुस्तकाचे यादीवर घातले आहे ' असले प्रयोग मराठीशी विसंवादी होत शुद्ध मराठी कानास यानें इष्टार्थाचें द्योतन होणार नाही कमिशनवर म्हणजे कमिशनाचा मुख्य म्हणून, यादीवर म्हणजे यादीच्या वहीच्या वरील पृष्ठावर असे अर्थ इंग्रजी न जाणणारा करील साराश-येथें, मराठीतील रूढीशी विसंवादी म्हणून असले प्रयोग अशुद्ध होत वहिवाटीचा हक्क बळावण्यापूर्वीच त्यास बहिष्कृत केलें पाहिजे प्रस्तुत प्रयोगात कोणास काहीं अपवादार्ह दिसत नसल्यास, आणखी पुढील प्रयोग त्यानें पहावे ' गाय वाघापासून

भिते. ' ' धनी चाकराशी रागावला ' हे प्रयोग-कोणीही अशुद्धच मानील-जर दूषणीय, तर ' कमिशनावर नेमणें ' हाही तसाच नव्हे काय ? इंग्रजी प्रयोगाचे डायरेक्ट इंग्रजी चष्म्यातून न पाहता, शुद्ध मराठी चष्म्यानें पाहिलें पाहिजे. वाघापासून भिते, हा प्रयोग कदाचित् ( संस्कृतोद्भव ) म्हणजे माहेरचा म्हणून मराठीस तितका अपवादार्ह वाटणार नाही, पण इंग्रजी ही कोण ? आई तर नाहीच, केवळ परकी तिचा प्रयोग मराठीस कसा रुचावा ? ' कारखाना मोठ्या प्रमाणावर काढिला पाहिजे ' इ ठिकाणी मराठी कानास **प्रमाणांत** हेंच शुद्ध लागतें असले प्रयोग करणें सर्वथा टाळिलें पाहिजे. काळजी वाहणें ( सर्व प्रकारची जबाबदारी घेणे ), काळजी करणे ( =परवा करणे ) इ प्रयोग मराठीला सर्वसमत असून, अलीकडे इंग्रजी प्रयोगाची छाया म्हणून ' काळजी घेणें ' असा प्रयोग रूढ होऊं पहात आहे येथे, असल्या शब्दयोगापासून काय बिघडते ? असे कोणी विचारल्यास त्यास उत्तर, ' अशानें रूढीशी विसवाद येतो' हे होय आजपर्यंत 'जपणें' यानें व्यक्त होणारा अर्थ, त्यास बाजूस सारून, 'काळजी घेणें' अशा बोजड प्रकारानें दर्शविणे म्हणजे मराठीतील आजपर्यंतच्या प्रयोगास, काही फायदा नसता विना-कारण पदच्युत करणे होय जपणे हा सुटसुटीत चिरपरिचित शब्द टाकून, काळजी घेणें-हा बाडगा पदयोग का वापरावा ? नवीन अर्थ दाखविणे असेल, तर नवीन प्रयोग क्षम्य व इष्टही आहे. पण त्याच्या अभावी रूढिपूत शब्द केवळ इंग्रजीचे अंधानुकरणाने टाकणे हे केव्हाही क्षम्य होणार नाही सारांश-सर्वथा नूतनार्थाचे प्रकाशनास नवीन शब्दयोग बनवा, परंतु तदभावी केवळ आळसानें, आपला शब्दसंग्रह न तपासता, इंग्रजी शब्दाचे भाषांतरात त्याच्या अर्थाचे छायेनुसार शब्द योजणें, हे गर्हणीय आहे, चिन्ता वह्, कृ-इत्यादि प्रयोग संस्कृतात आहेत, तदुद्भूत मराठीतही आहेत ( कोण करील माझी चिंता ? । इ० ) पण काळजी घेणें यास बिंबभूत असा प्रयोग दिसत नाही. निष्कारण का होईना, अनुकरण करणेंच, तर संस्कृताचें करा, परकीय भाषेचे नको कथा निवेदन करणें असले प्रयोग जरी सापवाद असले, तरी ते देशजात व रूढिपूत असल्यानें, त्यास पदभ्रष्ट करणे योग्य नाही असल्या प्रयोगास हिंदी या भगिनी-भाषेचाही दाखला आहे " जो प्रयत्न आरंभ किया है " ( केसरी ४-८-२५ ) हा असलाच प्रयोग होय

१८ **वाक्यगत स्थान**—या संबधात इंग्रजी भाषेचा पगडा मराठीवर मुळीच बसलेला दिसत नाही (१) संस्कृत पंडिताच्या प्रौढ भाषा बोलण्याऱ्या फाजील आवडीमुळें क्वचित् पुढीलसारखे प्रयोग आढळतात. 'विना स्वतः गेल्याशिवाय', 'विना केल्याने' काम होणार नाही अशा ठिकाणी शिवाय, वाचून इ एकाच शब्दानें काम भागत असून, पंडित वृथा पाल्हाळ लावितात, हें गैर आहे. पण त्यासंबधी विशेष विचार नको असल साडबर प्रयोग सर्वसामान्य जनतेत नाहीत पंडिताच्या तोंडातूनही ते निघून जाण्याचेच बेतात दिसतात. संस्कृतात कधी–कधी **विना** हे अव्यय नियमिताचे पूर्वी ठेवितात, त्याच धर्तीवर मराठीतील वरील प्रयोग आहेत (२) स न गतः। याचें भाषांतर 'तो न गेला' असे न करिता, 'तो गेला नाही' असे आज सर्व-संमत आहे याच्या मुळाशी कानडी भाषेचें अनुकरण आहे, असें म्हणतात. तसे असल्यास तें निंद्य होय पण वहिवाटीचे हक्कानें आता तें स्थाना-पासून अविचाल्य आहे सारांश–पदक्रमाचे याबतीत या येथील दोनच गोष्टी मराठीतील सामान्य धोरणास विसवादी आढळतात एरवी मराठीचा पदक्रम बहुधा निर्बाध राहिलेला दिसतो करिता तो जास्त विचारणीय नाही.

१९. **निगमन**–मराठी भाषेचें शुद्धीकरण पाहिजे ते पुढील प्रकारानी घडवून आणावे

(१) संस्कृतात नसून मराठीत आलेले उच्चार दर्शविण्यास स्वतंत्र वर्णा-काराची योजना.

(२) शब्दयोग (Idiom) इंग्रजी किंवा अन्य भाषेच्या छायेने दूषित होऊ न देणे

(३) भाषेत इकडून–तिकडून जमणाऱ्या शब्दांची अर्थविभाग करून व्यवस्था लावणे

(४) (Periodicals =) कालपत्रातून, किंवा कालिकातून वर्तमान-काली जरूर भासणाऱ्या इंग्रजी शब्दांचे पर्याय, मुख्यतः संस्कृताचे आधारें तयार करून, वेळोवेळी प्रसिद्ध करणें

या चार उपायानी इष्ट कार्य साधेल असें वाटतें

# २. मराठींतील शुद्धिभ्रम इत्यादि

१ **मथळ्याचा अर्थ**—काही शब्द योग्य कारण नसताही लोकाकडून वेडे-वाकडे उच्चारिले जातात, उदाहरणार्थ—सान्त्वन-चे जागी शातवन, कर्जत-चे जागी कर्जत अशा शब्दाची मूळरूपें उच्चारावी, असा साहजिकच विद्वानाचा आग्रह पडतो, व तदनुसारें ते मूळरूपें प्रवृत्त करू पाहतात या प्रयत्नास भाषेच्या शुद्धीचा प्रयत्न असें म्हणतात हा प्रयत्न कधी-कधी चुकीचे समजुतीवर आधारिलेला असतो, अशा प्रयत्नानें सुचविली किंवा केली जाणारी शुद्धि म्हणजे केवळ शुद्धिभ्रम होय असा प्रकार प्राय सर्वच भाषांत थोडाफार आढळतो याची काही उदाहरणें खाली देण्याचे योजिले आहे

२ **रूपांतराचीं कारणें**—बदल हा सृष्टीचा एक दांडगा नियमच असल्याने, शब्दाचे उच्चार, व तदनुसारें त्याचीं रूपही नेहमी थोडीफार हळूहळू बदलत असतात याच प्रवृत्तीमुळे मराठीत अनुनासिकबाद माजून राहिला आहे एके काळी जे अनुनासिक स्पष्टोच्चारित हाते ते आज **निभृत** होत चालले आहेत, व कालान्तरानें पार अस्तगतही होतील विंशति-मधील अनुस्वाराचे रूपातर प्रथम अनुनासिक झालें असले पाहिजे आज आपण त्याचे रूपातर असलेला वीस हा शब्द सर्वथा निरनुनासिक असाच उच्चारितों व लिहितों उच्चारातील फरक वारवार ऐकण्यात येऊन, तो शिष्टसमत झाला म्हणजे त्यास लेखनात मान्यता मिळते, मग कोणी आग्रहानें उच्चारातील तो फरक मान्य करोत वा न करोत लोकमान्याचे काळी व त्याचे लेखणीतून नेहमी (तीं) **जात्ये**, बोलत्ये अशी य-कारविशिष्ट रूपें ऐकू येत असत, तर आज तीच य-कारहीन उच्चारिली व लिहिली जातात जी य-काराची गति येथें झाली, तीच अनुनासिकाची क्रमानें होणार सावळा हा शब्द कोणी उलट आग्रह धरिला तरी आ निरनुनासिकच उच्चारला व लिहिला जाणार

३ **उदाहरणें**—नैसर्गिक प्रवृत्तीस अनुसरून शब्दाची रूपान्तरें नेहमीच होत राहणार यास कोणी हरकत घेत नाही पण अशी रूपान्तरे जेव्हा गैरसमजानें प्रवृत्त होतात, तेव्हा त्यास विरोध करणें प्राप्त आहे अशी काही उदाहरणें पुढील होत—

(१) शब्दात्मक—अधकार, चरित, दुष्ट, धिक्कार, निद्रित, पुलिंग, (तद्भव) ब्राह्मण, मशहूर, लाजहोम, रेफ, लागलेंच, वैयाकरण, शतक्रतु, सपुट, सीमान्तपूजन

इ०. या शब्दाचे ठिकाणी क्रमशः अधःकार, चरित्र, द्रुष्ट, धि:कार, निंद्रिस्त, पुल्लिंग, ब्राह्मण, महशूर, लज्जाहोम, रफार, लागलीच, वैय्याकरण, शतकृत्य, सपुष्ट, श्रीमतपूजन इ० असे शब्द येतात ही सर्वच उदाहरणें आक्षेप्य नाहीत याचा क्रमानें परीक्षा करू (क) अधःपात वगैरे काही संस्कृत समास सविसर्ग असून, मराठीत आले आहेत त्याच्याशी नसताच संबंध कल्पिण्यात येऊन, अधकार, धिक्कार, हाहाकार या शब्दात विसर्ग मानण्यात आला आहे. अर्थात् या शब्दातील विसर्ग केवळ अज्ञानमूलक असल्यानें तो लोपार्ह आहे. (ख) मराठीतऱ्यापेक्षा संस्कृतात जोडाक्षरें पुष्कळ अधिक असल्यानें दोन सदृश रूपातील जोडाक्षरांनी युक्त स्वरूप संस्कृत असले पाहिजे असें मानण्यात येऊन, चरित्र, द्रुष्ट, निंद्रिस्त ही अपरूपं प्रचारात आली आहेत. येथेही रूपांतरास अज्ञानाव्यतिरिक्त कारण नसल्यानें, येथील रूपांतरें सर्वस्वी त्याज्यच होत संस्कृतात-चरित म्हणजे जन्मापासून मरणापर्यंतचा इतिहास, एखाद्या व्यक्तीचा सर्व वृत्तान्त, आणि चरित्र म्हणजे चरिताची सरणी त्र हा प्रत्यय धातूस करणार्थे लागतो, ज्याने चरित ठरविलें जातें तें चरित्र चरित हा शब्द कर्मबोधक, तर चरित्र हा शब्द करणबोधक आहे मराठीत कर्मबोधकाचे जागी, जोडाक्षरयुक्त शब्द संस्कृत असला पाहिजे अशा भ्रमानें, चरित्र हा करणबोधक शब्द आला आहे अर्थात् तो भ्रममूलक, म्हणून त्याज्य आहे. पुंलिंग असा एकलकारात्मक संस्कृत शब्द असून, वरील भ्रमाने मराठीत तो पुल्लिंग असा योजण्यात येतो सपुटचे सपुष्ट हें रूपांतरही वर्जनीयच होय वैयाकरण यात विनाकारण दोन य-कार लिहितात सारांश—येथील शब्द चरित, दुष्ट, निंद्रित, पुलिंग, वैयाकरण, सपुट असेच लिहिले पाहिजेत

४ **समर्थनीय रूपांतरे**— संस्कृतात कल्हार हा शब्द सोडून (ज्याचेंही कल्हार असें वैकल्पिक रूप आहेच) इतरत्र जोडाक्षरात इतर व्यंजनाच्या (र सोडून, ज्याचेही बाबतीत दोन्ही प्रकार आहेत) **पूर्वी हकार** येतो, नंतर येत नाही अर्थात् ब्राह्मण अशा शब्दात ह पूर्वी उच्चारला जातो पण हा उच्चार मराठी बोलणारास फार कष्टप्रद वाटतो, व ते त्यातील व्यंजनाची उलटापालट करितात करिता **उच्चारसौकर्य** हें योग्य कारण मुळाशी असल्यानें **ब्राम्हण** असेंच तद्भव रूप लिहिणें योग्य ठरते. कोणी संस्कृताभिमानी ब्राह्मण असेंच लिहील व उच्चारील, तर त्यास मुभा आहेच, कारण हा प्रकार

मूलानुसारीच आहे. सीमान्तपूजन हा शब्द विवाहांतील एका समारंभाचा वाचक आहे नवरदेव नवरी वरण्याकरिता तिचे गावी येतो, तेव्हा त्या गावाचे सीमेचे प्रदेशी (=सीमान्ती) त्याचे पूजन करितात, त्यास सीमान्तपूजन म्हणतात पूजन वराचें, तेव्हा ते श्रीमती थाटाचेंच असणार या आगतुक पण **प्रशस्त कल्पनेने** श्रीमतपूजन हे रूप प्रचारात आलें हें आगतुक का होईना, पण इष्ट अशाच कल्पनेचें द्योतक असल्याने, सर्वथा त्याज्य ठरत नाही. अशी स्थिति लाजहोमाचे जागी प्रयुक्त होणाऱ्या लज्जाहोम या शब्दाची नाही. लाजहोम केल्यानें लज्जेचा होम होतो ही गृहीत कल्पनाच भ्रांत व आचरट आहे करिता लज्जाहोम हा शब्द आक्षेपार्हच ठरतो भूलोकाहून स्वर्ग श्रेष्ठ, तेथेंही सर्वांत इन्द्र श्रेष्ठ, इद्राचें पद सर्व जगात अत्यंत वैभवसपन्न मानिले जाते तदर्थ करावयाचें कृत्यही मोठे, कष्टसाध्यच असणार. हे कृत्य म्हणजे शत क्रतु अथवा यज्ञ हे शभर यज्ञ पूर्ण करण्याचे कृत्य सामान्य नसल्यानें **शंभर कृत्यांत (मुख्य)** कृत्य गणलें जाण्यासारखे आहे या कल्पनेनें शतक्रतु–चें रूपातर शतकृत्य असें झाले येथील रूपानराचे मुळाशी असलेली कल्पना, शब्दाचा अर्थ त्याचे अवयवार्थावरून काढण्याचे प्रयत्नानें प्रवृत्त झाली असल्यानें, काहीशी आदरणीयच वाटते दिसते त्याचे पलीकडे जाण्याची माणसाची प्रवृत्तीच असते इद्रास इन्द्रपद मिळाले आहे ते कशानें ? शतकृत्यामुळें मोठे वैभव मोठ्या अचाट कृत्यानें मिळणे, सुसगत भासते तेव्हा इन्द्रपदाचे साधनीभूत कृत्यास शतकृत्य म्हणणे ओघानेच प्राप्त झाले साराश– अवयवार्थापासून शब्दार्थ काढण्याची प्रवृत्ति डोळस आहे, तेव्हा ती भ्रमाश्रित झाली तरी तितकीशी गर्हणीय नाही यवनी शब्द **मशहूर** ‘ प्रसिद्ध ’ अशा अर्थाचा बोधक आहे पण हा अर्थ या शब्दास कसा आला असावा ? असा प्रश्न मनात उभा राहून, त्याचें समाधान अक्षराच्या उलटापालटीनें सहज होण्यासारखें आहे हे पाहून, कोणी मराठी बोलणाराने त्याचे रूपातर महशूर असें केले यातील मह–चें वर्णदृष्ट्या महा -शी नाते, व शूर याचा ‘ छातीचा ’ हा उन्नत, स्पृहणीय अर्थ,--या दोनही गोष्टी ‘ प्रसिद्ध ’ या विवक्षित अर्थाशी संवादी असल्यानें, **महशूर** हे शब्दरूप राजमान्य झाले आहे येथेंही **अवयवार्थनिष्कर्ष व कल्पनासंवाद** या द्विविध कारणास्तव महशूर हे रूपातर सग्राह्यच ठरतें.

**५ हताः पाणिनिना वयम्**—( १ ) 'किल्ली दिली की घड्याळ लागलेंच चालू होईल, ' असल्या वाक्यात लागलेंच हें **क्रियापदाचें विशेषण** असल्यानें, यावच्छक्य त्याशी समधर्म असणार, क्रियाविशेषण लिंगवचनात क्रियापदाशी मिलाफ पावतें परंतु ही रीत 'लागलेंच' याचे बाबतीत कधीं-कधी पाळण्यात आलेली दिसत नाही याचें कारण तर्खडकरकृत भाषांतरपाठ-मालेंतील **लागलींच** या शब्दाचा प्रयोग **सामान्य ठिकाणीं नपुंसक-लिंगाची प्राप्ति** उचित असल्याने Immediately-चा मराठी पर्याय म्हणून **लागलेच** हें रूप प्राप्त होतें पण लहानपणापासून कर्त्यांचे तोंडी बसलेल्या भाषे-नुसार, लागलेच याचे स्थानी लागलींच हे रूप आलें,व तें विद्यार्थ्यांमध्यें, अर्थात् सुशिक्षित १।२ पिढ्यात, बरेंचसें रूढ झाले आहे यामुळें 'लागलेंच'-चे ठिकाणी प्रामादिक लागलींच हें रूप प्रवृत्त झाले आहे अर्थात् हें लेखकाचे ससर्गदोषामुळे उत्पन्न झालें असल्याने, सर्वथा त्याज्य आहे अशा रीतीनें ग्रंथकाराकडून चागलें वळण लावण्याचे ऐवजी वाईटच वळण लोकापुढें ठेविले गेलें आहे ग्रंथकार उपकारकाचे ऐवजी अपकारक ( अर्थात् एवढ्या बाबी-पुरता ) ठरला आहे भगवान् पाणिनीलाही मनस्*शब्दाचे लिंगाचे सबंधात विनो-दानें काहीसा अशाच प्रकारचा दोष देण्यात आला आहे वर्णाचा उल्लेख **कार** हा प्रत्यय पुढे लावून करण्याचा संस्कृत व्याकरणाचा नियम आहे. यास अनुसरून च् हें व्यजन च-कार म्हणून बोधित होतें तसें, र् हे व्यजन रकार म्हणून बोधित व्हावें, पण संस्कृतात त्याचा उल्लेख रेफ या स्वतंत्र शब्दानें करण्यास व्याकरण सागत तदनुरूप मराठीत तें **रफ** या सज्ञेने किंवा सामान्य नियमानुसार **रकार** या सज्ञेनें उल्लिखित व्हावे, पण काही ग्रंथकार त्याचा उल्लेख रफार या सज्ञेनें करितात हाही 'हता पाणिनिना वयम्' याचाच एक नमुना, पण सर्वथा अनिष्ट नमुना आहे भाषांतरपाठमालेत upon या अव्ययाचे उपयोग सागताना टेक् शब्दाचा प्रयोग केला आहे, पण भाग्य मराठीचें की हा ग्राम्य शब्द विद्यार्थ्यांचे द्वारा शिष्ट भाषेंत रूढ झाला नाही साराश—ग्रंथकार व लेखक यानी शब्द योजणें ते फार जपून योजावे, नाहीतर वरीलप्रमाणें भाषादूषणाचे ते धनी व्हावयाचे

---

*मनो नपुसकमिति प्रियायै प्रहित मया । हन्त तत्रैव रमते, हता पाणिनिना वयम् ! ॥

**अर्थ**—(पाणिनि-सारख्या वैयाकरणाचे विधानावरून) मी मन न लि समजून प्रियेकडे पाठविलें ते (बेटें) तेथेंच रममाण होत अरेरे ! अशा रीतीनें पाणिनानें आमची घात केला.

६. **प्रामादिक शब्दयोग**- -[ १ ] एखाद्या कामाकरिता काही जमाव करावयाचा असला म्हणजे काही लोक आपण नेमितो या लोकाचा तो जमाव बनतो येथे जमाव व लोक यामध्ये व्यापक-व्याप्य, समावेशक-समावेश्य, अंगिन्-अंग अशा प्रकारचा संबध असतो या कळपात २० गाई आहेत, या वर्गात ३० मुले आहेत, या **मंडळांत** १० मनुष्ये आहेत, असले शब्दप्रयोग आपण करितो. सारांश-' घटक जमावात घातले ' अशी भाषा आपण योजणार, पण बरेच लोक, शिष्टसुद्धा, ' या कमिटी**वर**, कमिशन**वर** अमुक गृहस्थ नेमले आहेत ' अशी शब्दयोजना करितात, ही आक्षेप्य दिसते **घटक आंत असतो**, ही गोष्ट मनात वागवून येथे प्रयोग आत-चा व्हावा, वर-चा करणे गैर आहे. येथे वर योजिल्याने आणखी एक प्रमाद होतो, तो हा की, हा प्रयोग घोटाळा उत्पन्न करणारा होणार. कारण **कमिटीवर नेमला** या शब्दप्रयोगाचा मराठी वाचक असाच अर्थ करील की कमिटीवर मुख्य-अधिकारी म्हणून नेमिला, पण हा अर्थ तर येथे विवक्षित नाही यामुळें येथें **मराठीभाषासरणीभग** व **संदेह-संभव** असे दोन दोष उत्पन्न होतात म्हणून ' कमिटीत अमक्यास नेमिलें ' अशीच रचना त्या कमिटीचे घटकासबधानें करावी ( २ ) व्यायाम घेणें, काळजी घेणे, इत्यादि प्रयोगात घे हा धातु आक्षेपार्ह आहे. संस्कृतात व्यायाम कृ, चिन्ता कृ, असे प्रयोग होतात ' कोण करील माझी चिंता ? । ' अशा ठिकाणी जुन्या मराठी वाङ्मयातही चिंता ( काळजी ) करणे असाच प्रयोग होतो, व्यायाम, काळजी, परिश्रम,-करणें असले प्रयोग शुद्ध मानावे, इतर अशुद्ध समजून टाकावे ' कारखाना मोठ्या प्रमाणावर काढणे, ' येथें मला वाटतें, **प्रमाणांत काढणे** हेंच मराठीत उचित होईल

७ **पेक्षां-पुढें अधिक-चा दुरुपयोग**—पाण्यापेक्षा पातळ, विषापेक्षा कडू, सोन्याहून पिवळें, दगडापेक्षा वीट मऊ, असे असंख्य प्रयोग मराठी वाङ्मयात पदोपदी आढळतात, व आपण बोलतानाही करितो पण येथें हून व पेक्षा याच्या पुढें इंग्रजीच्या रिवाजाला अनुसरून वारंवार **अधिक** पदाचा उपयोग करण्यात येतो तो माझे मतें दूषणीय आहे, करिता सोनें रुप्यापेक्षा जड असतें, असाच प्रयोग करावा, त्यात ' अधिक ' किंवा ' जास्त ' हें पद घालण्याचें कारण नाही.

८ **नादसाम्य हें प्रमादास कारण**— ही गोष्ट त्याला **हस्तामलक** (=अत्यंत सोपी) आहे तळहातावरील ( आमलक = ) आवळा जसा सर्वतः पाहता येतो व त्यामुळे तो पूर्णतः ज्ञात होतो,त्याचे आकलन सोपें जातें, तशी जी वस्तु सहज जाणता येते, अत्यत सुकर असते, अशा वस्तूस हस्तामलक अशी उपमा देतात या उपमेनें त्या वस्तूचा सोपेपणा सूचित होतो हाच अर्थ पुढील वाक्यात आहे ' विप्रेण शिरपि निहितकरा दासी प्राह–अहमद्य समस्त-वाङ्मयजात **हस्तामलकवत** पश्यामि ' ( भोजप्रबन्ध, पान ६३ ). असल्या वाक्यात, मला वाटते, हस्तामलक याचा उच्चार, हातचा मळ असा अज्ञ जनाकडून केवळ ध्वनिसाम्यानें मानण्यात येऊन, त्याच्या 'अत्यत सोपी गोष्ट' अशा अर्थी **हातचा मळ** हा प्रयोग प्रचारात आला आहे हे रूपातर केवळ प्रामादिकच असल्यानें, त्याचे जागी मूळरूप वापरणे योग्य दिसतें करिता हातचा मळ याचे ठिकाणी हस्तामलक हाच प्रयोग करावा **गाडगें** धुवून कढी करणें, ही कार्पण्यसूचक म्हण हल्लीच्या भलत्याच रूप-विपर्यासातून काढून प्रचारात आणण्यालायक आहे. येथील विपर्यासासही नादसाम्य हेच कारण झालेले दिसते

९. **व्याकरणांतील कांहीं संज्ञा**—( १ ) सस्कृतात विभक्तिप्रत्ययाचा प्रत्याहार सुप् असा आहे, ज्यावरून विभक्तिपद्रास **सुबन्त** ही सज्ञा क्रमप्राप्तच ठरते मराठीत असा सुप् प्रत्याहार नाही करिता मराठीत विभक्तिपदास सुबन्त म्हणणें मूर्खपणाचे आहे इग्रजीतील going असल्या ing–प्रत्ययात शब्दाला ऊन–प्रत्ययात धातुसाधित अव्यय म्हणणे जितपत शोभेल, तितपतच मराठीतील विभक्तिपदास सुबन्त म्हणणे शोभेल ( २ ) इग्रजीत कोशगत शब्द व वाक्यगत पद यात फरक फारच थोडा होत असल्याने, तेथें त्यातील भेद मानीतच नाहीत, असें म्हटलें तरी चालेल मराठीतील स्थिति निराळी आहे. करिता इग्रजीत to go याला verb म्हणतात म्हणून, ' जा ' याला क्रिया-पद म्हणणें योग्य नाही, त्यास **धातूच** म्हटलें पाहिजे.सव्ययाचे भेद नाम, सर्व-नाम, विशेषण व धातू असेच सज्ञित केले पाहिजेत ( ३ ) सस्कृत भाषेंत आपण पौरस्त्य आपल्या परोपकारी प्रवृत्तीस अनुसरून विशिष्टक्रमानें पुरुषसंज्ञा योजितों संनिहित नसलेल्या माणसास, तो ती इत्यादिकास, **प्रथम**पुरुष, तूं तुम्ही यास **मध्यम**पुरुष, ( असनिहित किंवा पाहुणा व सबोध्य याची सोय

झाल्यावर, मग आपली पाहणें चर्ये, या प्रवृत्तीस अनुसरून ) मी, आम्ही यास उत्तम ( =शेवटला ) पुरुष अशाच संज्ञा आहेत पण मराठी व्याकरणकारांनी, विशेषतः दादोबांनी, त्या इंग्रजीतील पुरुषाशी जुळत्या करण्याकरिता त्याचा वेडावाकडा विपर्यास केला तरीपण याचे मुळाशी एक प्रकारची सोय असल्यानें ही नवीन संज्ञापद्धति रक्षणीय दिसते, ती बदलण्याचें कारण दिसत नाही

---

## ३. मराठी आणि कानडी.

### रा शिंदे यांच्या मतांचे खंडन

१—रा शिंदे म्हणतात—( ज्ञानप्रकाश ) 'भूतकालीन कृदन्ताचा प्रत्यय संस्कृतात **त**, बंगालीत व मराठीत **ल**, आणि कानडीत **द** आहे द—चे जागी न, र, हेही येतात यापुढें ते म्हणतात मराठी 'ल' कानडी 'द'—वरून आला असावा '

**खंडन**—वरील अनुमान पंगू दिसतें जर संस्कृत त—पासून उद्भूत ल बंगालीत आहे, तर तसाच तो मराठीत का असू नये ? त्याला कानडी द्—ची जरूरी का भासावी ? केवळ एखादे प्रकारात दोन भाषांत साम्य आहे म्हणून, एकीनें दुसरीवरूनच तो उचलला असला पाहिजे,—असें अवांतर पुराव्याचे अभावी निःसंदेह सिद्ध होत नाही शिवाय प्रस्तुत प्रकाराविषयी तर उलटच अनुमानास चांगली जागा आहे संस्कृत त—चा तत्सभूत भाषांत ल होणें हे बंगालीचे उदाहरणावरून समत ठरतें करिता मराठी भूत—विशेषणाचा प्रत्यय हा कानडीचे द्वारा न येता, स्वतन्त्रपणे संस्कृत त—चे साक्षात् रूपान्तर ठरतो

२ " संस्कृत क्रियापदांत लिंगाचें अस्तित्व नसता मराठीतील क्रियापदांत, लिंगप्रादुर्भाव कानडीचे साहचर्यानें झाला आहे " हें विधानही अयुक्त दिसते. गोड पेरू, गोड साखर, गोड डाळिंब, अशा उदाहरणावरून अकारान्त विशेषणाला मराठीत लिंग—विकार नाही, संस्कृत त—चा ल होऊन बनलेलें भूत विशेषण अकारान्त होणार; व गोड या विशेषणाप्रमाणें तेंही लिंग—विकारातीत व्हावें, म्हणून भूतविशेषणावरून बनलेली क्रियापदेंही निर्लिंग असावी, करिता त्यास प्राप्त झालेला लिंगविकार कानडीचे अनुकरणावाचून अन्यथा संभवत नाही, असें रा. शिंदे यांचें अनुमान आहे

**खंडन**—वरील अनुमान कच्चें दिसतें दादोकृत व्याकरणात बकरा, मेंढा, अंबा ही आकारान्त नामाची उदाहरणें आहेत. ही सव बर्कर, मेढ्र, आम्र अशा सस्कृतातील अकारान्त नामावरून प्रवृत्त झाली आहेत जर अकारान्त सस्कृत नाम मराठीत आकारान्त बनतें तर विशेषणास तगी तसे होण्यास का प्रतिबध असावा ? बरा, काळा, भला ही आकारान्त विशेषणेंही सस्कृत 'वर' 'काल' 'भद्र' या अकारान्त विशेषणावरूनच साधलेली आहेत, तशी भूत विशेषणेंही साधली असावी, हे मला सरळ अनुमान वाटतें. एवढेच नव्हे, तर मराठीतील आकारान्त पुलिगी नामें व विशेषणे याचे मूळ अकारान्त शब्दातच आहे, असें मी बिनधोक म्हणतों

३. 'तीन विसा अन् दहा' असें ( सत्तरऐवजी ) कुणबी लोक म्हणतात, तें कानडीचेंच अज्ञात अनुकरण होय असें रा. शिंदे याचे विधान आहे

**खडन**—सामान्यतः सख्या व्यक्त करण्याला कोणत्याही भाषेत **दहा** चिन्हाचा म्हणजेच आकड्याचा उपयोग करतात, पहिल्या दहा वस्तू प्रत्येकी स्वतत्र शब्दाने गणिल्या म्हणजे पुढील दहा वस्तू क्रमाने दहाचे वाचक शब्दात एक, दोन अशी भर टाकून, तद्‌द्वारा मोजितात, व हे केवळ साहजिक आहे. मनुष्यास बोटेंच दहा आहेत व त्याचा उपयोग मनुष्य मोजण्याकडे स्वभावतःच करितो त्यामुळें सर्वच भाषात सख्याची उभारणी दहाचे पायावर झाली आहे दहा बोटे आत व बाहेर दोन्ही प्रकारानी मोजल्यास, वीस सख्या सिद्ध होते. तिचाही प्रचार स्वाभाविक दिसतो. मग असा स्वाभाविक प्रचार एका भाषेनें दुसरीपासून घेतला असावा हें म्हणणें सयुक्तिक दिसत नाही कानडी बोलणारास दहा बोट, मराठी कुणब्यासही तितकीच, त्यानें उलट-सुलट बोटें मोडून विसाची गणती केली, तशी यानेंही केली, दोघाचे व्यापारही निसर्गोपदिष्ट करिता 'तीन विसा अन् दहा' इत्यादि सख्यानप्रकार कानडी-मूलक नसावे असें वाटतें.

४. थोडें विषयातर करितों मागें (लेख ५, पान ४०) मी, उदच्, अवाच् या शब्दाचें रूढार्थ उत्तर, दक्षिण-यावरून असें अनुमानिले होतें की, आपलें आर्याचें मूलस्थान हिदुस्थानातच हिमालयाचे दक्षिणचे प्रदेशात असावें. या अनुमानास रा. शिंदे याचे लेखातील माहितीवरून अतर्कितपणें पुष्टी मिळते.

तामिल भाषेचे मूलस्थान दक्षिण हिंदुस्थानात म्हैसूरचे पूर्वेस असलेला किनाऱ्याकडील प्रदेश होय. या प्रदेशातून एखादा मनुष्य किनाऱ्याकडे जाऊ लागला की, त्याचा मार्ग **उतरता** होणार व **पूर्वेकडे** वळणार साहजिकपणें या भाषेंत 'एकेन तुल्ययोर्मिथस्तुल्यत्वम्' या भूमितिदृष्ट न्यायानें उतरता एतदर्थक शब्द पूर्व याचा व चढता एतदर्थक शब्द पश्चिम याचा पर्याय बनावा, हाच प्रकार तामिल भाषेंत आहे वरलीकडे व खाललीकडे एतदर्थक शब्द पूर्वेकडे व पश्चिमेकडे असे अर्थ व्यक्त करतात ( शिंदे ) साराश- एखाद्या प्रदेशाच्या त्या-त्या दिशेला असलेल्या उच-सखल भूभागावरून त्या प्रदेशात तदनुरूप त्या त्या दिशेस संज्ञा प्राप्त होते, हे माझें अनुमान दृढ होतें.

——

# भाग ७ विविध.

## १. कानाडोळा करणें.

१ **प्राथमिक व लाक्षणिक अर्थ**—'सकल' शब्दाचा प्राथमिक अर्थ कलानी युक्त, सोळाव्या अशानी युक्त असा आहे सापत त्याचा उपयोग 'संपूर्ण' अशा अर्थी करितात हा उपयोग करिताना अशाचा विचार मुळीच केला जात नाही विवक्षित वस्तूला अश असोत वा नसोत, ती सपूर्ण असली म्हणजे तिला सकल–सगळा हा शब्द लावण्यात येतो. कलायुक्त-चा सपूर्ण-शी अर्थात् काय सबंध आहे बरें ? कलायुक्त याचा अर्थ सपूर्ण का होऊ लागला असावा ? सकल चा कलायुक्त हा अर्थ प्राथमिक आहे, तर सपूण हा लाक्षणिक आहे येथील अर्थांतर होण्यास अशी एखादी परिथिति असली पाहिजे की जीत प्राथमिक अर्थ अटीचे रूपाचा व लाक्षणिक अर्थ परिणामाचे रूपाचा आहे. प्राथमिक अर्थ विद्यमान असेल तरच लाक्षणिक अर्थ संभवेल, अशी स्थिति पाहिजे **प्राथमिक अर्थ समय** (म्हणजेच अट) व **लाक्षणिक फल** (किंवा अटीचा परिणाम) **असला पाहिजे**

**दोन्ही अर्थांचे सहावस्थान**—चंद्र सपूर्ण केव्हा असतो ? तो पूर्ण असण्याला कसा असावा लागतो ? चंद्राच्या सर्व कला जेव्हा विद्यमान असतात तेव्हा चद्रास पूर्ण म्हणतात चद्राचे सबधानें असे म्हणता येईल की चद्र, कलायुक्त असल्यास, पूर्ण असतो येथें प्राथमिक अर्थ कलायुक्त हा, लाक्षणिक अर्थ संपूर्ण याचा, समय किवा अट झाला आहे साराश-येथें कलायुक्त ही पूर्ण होण्याची अट आहे अशा रीतीनें कधी-कधी प्राथमिक अर्थावरून लाक्षणिक अर्थ प्रवृत्त होत असतो दोन अर्थांमध्यें संबध असणारच. हा सबध समय–फल किवा अट–परिणाम, अशा रूपाचा कधी कधी असतो.

२. **प्रस्तुत उक्तिविशेषाचे अर्थ**—सस्कृतात काण म्हणजे अध तरी पण हा शब्द एकच डोळा अधळा असेल तर अशा डोळयास लावितात, लक्षणेनें एकडोळ्या माणसासही लावितात. शुक्रः काणः, धृतराष्ट्रः अन्धः

असे प्रयोग आढळतात. अवयवाचा विशेषणभूत असलेला हा शब्द येथें व्यक्तीस लाविला आहे. आता, एखाद्या मनुष्यास एकच डोळा डोळस आहे, व दुसरा अंधळा आहे, अशा स्थितीत त्याला वस्तु पहावयाची असल्यास त्यानें त्या वस्तूकडे डोळस डोळा वळावला पाहिजे, जी पहावयाची नसेल तिच्याकडे काणा, एकाच वेळी दोन्ही ठिकाणी कमी-अधिक लक्ष्य ठेवणें कधी-कधी जरूर पडतें. अशा स्थितीत काणा, एक डोळ्याचा, मनुष्य काय करील बरें? ज्याची हेळसाड करणे, त्याकडे तो कानाडोळा करील सारांश-कानाडोळा करणें याचे फल दुर्लक्ष्य ठरतें. तो कानाडोळा करतो म्हणजेच तो दुर्लक्ष्य करितो. प्राथमिक व लाक्षणिक अर्थ जेथें समानाधिकरण ठरतात अशी एखादी प्रसिद्ध, सर्वविदित गोष्ट मुळात असते ती गोष्ट आपल्या प्रसिद्धीमुळें, हा दोन अर्थातील संबंध श्रोत्याचे मनात त्वरित, अनायासें भरवून देते व अशा रीतीनें प्राथमिकार्थवाचक शब्दाचा उपयोग लाक्षणिकार्थी राजरोस प्रवृत्त करितें. अशी गोष्ट एकडोळ्या हरिणीची आपल्या परिचयाची आहे पण ती इसापनीतीतून आली असल्यानें, येथें दोन अनुमानें निघतात. ती अशी (१) या गोष्टीचे परिचयानंतर कानाडोळा करणें ( =दुर्लक्ष्य करणे ) हा उक्तिविशेष मराठीत प्रवृत्त झाला असावा, किंवा ( २ ) तीच गोष्ट आपल्या लोककथामध्यें कोणत्याना कोणत्या तरी रूपानें पूर्वींच प्रचलित असावी कोणतेंही अनुमान केलें तरी अशी एकादी गोष्ट प्रस्तुत अर्थांतराचे मुळाशी असावी हें निर्विवाद होय.

**सारांश**—एखाद्या गोष्टीकडे दुर्लक्ष्य करावयाचें असल्यास, तें त्या वस्तूकडे अंधळा डोळा वळविल्यानें साधतें, या वस्तुस्थितीस अनुलक्षून प्रस्तुत अर्थांतर प्रवृत्त झालेलें दिसतें.

---

## २ तक्रं शक्रस्य दुर्लभम्.

### ( चुकीचा अर्थ )

हें वचन पुष्कळ वेळा लोकांच्या बोलण्यात येतें त्याचा अर्थ बहुधा पूर्वापर संबंधास अनुसरून करण्यात येत नाही हें वचन ताकाची थोरवी गाणारे वारंवार पुढें आणितात. ताक गुणकारक असेल,–नाही, आहेही, पण त्याची ही थोरवी फाजील मानिली जाते. यास कारण पाश्चात्याचें मत असावें असें दिसतें

अलीकडे आपल्या लोकात, अनेक कारणामुळें, स्वतः विचार करण्याची संवयच दिसत नाही. अमेरिका, जर्मनी, फ्रान्स वगैरे पाश्चात्य देशात अनेकविध शास्त्रीय व अनुभविक प्रयोग करून सत्यान्वेषण चालू असतें. अशा प्रयत्नात ज्याच्या जें सत्य हाती लागतें–मग तें ऐकान्तिक असो किंवा देशकालादींनी मर्यादित असो–तें तो प्रकाशित करितो त्यामुळें अनेक वेळा परस्परविरोधी गोष्टी सत्य म्हणून प्रतिपादिल्या जातात. आता ब्रम्हाप्रमाणें सत्य हें केव्हाही अद्वैतच असणार, म्हणून या दोहोतील एक किंवा दोन्हीही गोष्टी खोट्या असणार परंतु स्वतंत्र विचाराची सवय, व प्रयोग करून पाहण्याचा दम, नसल्यानें अशा अन्योन्यविरुद्ध गोष्टीपैकी ज्यास जी सोईवार वाटते तो त्या गोष्टीची, सत्य म्हणून, टिमकी वाजवितो

आपले राजकीय पुढारी प्रजेचें मीठ कर वाढवून तोडलें म्हणून सरकारला दोष देतात, तर कित्येक शारीरशास्त्री म्हणवून घेणारे मीठ महागलें ही इष्टापत्ति मानितात त्यान्च्या मतें मीठ शरीरपोषणास उपाय करीत नसून अपाय करितें. अर्थात् या त्याच्या ह्मणण्यास एखाद्या पाश्चात्य विद्वानाच्या मताचा आधार असेलच जनतेनें एवढें मात्र लक्ष्यात ठेवावे की, प्रकाशीकरणाच्या सौलभ्यामुळें, अपुऱ्या अनुभवावर वारंवार अनेक गोष्टी पश्चिमेकडे सत्य म्हणून सहज प्रतिपादिल्या जातात, व त्याची कालांतरानें निवड होऊन,त्यातील वस्तुतः सत्य असतील त्याच पुढें रूढ होतात करिता अशा प्रत्यही ‘उत्पद्यन्ते विलीयन्ते’ या कोटीतील गोष्टीच्या मागें धावताना दूरवर विचार करावा

भाषेच्या दृष्टीनेंही या मतातील उलथापालथी लक्षणीय आहेत. मीठ तोडणें, to prove true to the salt वगैरे विद्यमान पद्प्रयोगाचे अर्थही अशा नवीन पसरणाऱ्या ग्रहांनी, ते कायम झाल्यास, बदलण्याचा संभव आहे. असा प्रसंग आजच्या मथळ्यातील वचनावर आलेला दिसतो. हें वचन मूळ पुढील समस्यापूरणार्थक सुभाषितात आढळतें तें असें—

**घृतं न श्रूयते कर्णे, दधि स्वप्नेऽपि नोच्यते, ।**
**मुग्धे! दुग्धस्य का वार्ता? तक्रं शक्रस्य दुर्लभम् ॥**

एक भटजी गरीब यजमानाकडून जेऊन आला असता, त्याची पत्नी त्यास विचारिते, ‘भोजनाचा बेत कसा काय होता?’ यावर भटजीनें उत्तरादाखल वरील श्लोक म्हटला. त्यात यजमानाचें दारिद्र्य वर्णिलें आहे. त्यात ‘ताक

प्रत्यक्ष देवाचा राजा इंद्र यास सुद्धा मिळालें नसतें' असें विधान आहे. यावरून उघड आहे की, 'तक्रं शक्रस्य दुर्लभम्' या चरणात ताकाचे गुण वर्णित नसून, केवळ दुभत्याच्या अभावाचें वर्णन आहे. करिता ताकाचे गुण वर्णिताना, हें प्रतीक उदाहृत करणें अज्ञानमूलक आहे, हें उघड आहे

---

## ३. रामरक्षेविषयीं अधिक माहिती.

(१) शोधाअंती असें आढळतें की, 'मंत्ररामायण' नावाच्या संस्कृत ग्रंथात 'नीलकंठ गोविंद चतुर्धर' (महाभारताचा टीकाकार काय?) यानें रामरक्षास्तोत्रावर 'मंत्ररहस्यप्रकाशिका' या नावाची टीका लिहिली आहे. या ग्रंथाचे अंती पुढील भाग आहे—

**'श्रीरामरक्षाव्याख्यानं मंत्ररामायणाभिधम् ।**
**व्याख्यातं, राघवस्तेन प्रीयतां करुणानिधिः ॥'**

इतिश्रीचतुर्धरवंशावतंसगोविंदसूरिसूनोः श्रीनीलकंठस्य कृतिः स्वोद्धृतमंत्ररामायणव्याख्या मंत्ररहस्यप्रकाशिकाख्या समाप्तिमगमत् ।

(२) या ग्रंथाचे आरंभी—

**'रामायणद्रुमं नौमि रामरक्षानवाङ्कुरम् ।**
**गायत्रीबीजमाम्नायमूलं मोक्षमहाफलम् ॥'**

असा श्लोक असून पुढें खालील भाग आहे—"अत्र रामरक्षायाः रामायणद्रुमांकुरत्वं स्पष्टमवगम्यते । तत्स्थानां राघवादिपदानां क्रमेण रामायणार्थसूचकत्वात्" इत्यादि.

(३) (अ) यावरून रामरक्षामंत्रात विशेषणाचा क्रमानें अर्थ केल्यास, त्यात सर्व रामायणाचा सारांश वर्णिला आहे, या माझ्या 'रामरक्षाप्रभाव' या पुस्तकातील विधानास पुष्टि येते.

(आ) त्याचप्रमाणें, लोकपाठात असलेलें "ऊरू रघूत्तमः पातु रक्षःकुलविनाशकृत्" हें श्लोकार्धही या ग्रंथात उपलब्ध होत नाही, या गोष्टीनें, मी हें अर्ध गाळिलें आहे तें योग्यच होय—अशाविषयी प्रमाणांतराचा लाभ होतो.

(इ) शिवाय या टीकाकारानेंही विशेषणाचा संबंध अवयवाशी जोडण्याचा प्रयत्न केला आहे. उदाहरणार्थ "सक्थिनी हनुमत्प्रभुः" याचे व्याख्यानात 'प्रेमानें हनुमतास मांडीवर बसवून त्याचे हनुवटीस हात लावणारा राम माझ्या मांड्यांचें रक्षण करो?' असा अभिप्राय टीकाकारानें काढिला आहे भोळा बिचारा! त्याला कल्पनाही नाही की, पुढें विसाव्या शतकात (केसरी...१४) अशा प्रकारच्या विशेषणाचे साभिप्रायत्व सिद्ध करण्याच्या प्रयत्नास लोक हास्यास्पद म्हणतील।' असो मी या विशेषणाचा संबंध निराळ्या रीतीनें म्हणजे 'पुष्ट मांड्यांच्या मारुतीचा स्वामी माझ्या मांड्यांचें रक्षण करो।' असा लाविला आहे- ज्यास जो रुचेल तो त्यानें घ्यावा मुद्दा म्हणून एवढाच की "स्तोत्रमंत्रातील विशेषणें साभिप्राय लावण्याचा" पूर्वापर संप्रदायच मी आपल्या 'रामरक्षा-प्रभाव' या पुस्तकात अनुसरला आहे

---

# ४ न्यू पूना कॉलेज्-चें नामांतर,—श्री परशुरामभाऊ कॉलेज्.

१ **नामांतर**—न्यू पूना कॉलेजास लवकरच 'सर परशुरामभाऊ कॉलेज' असें नाव मिळणार म्हणून ऐकतों हें नामांतर ऐकताक्षणीच वीरवर परशुराम-भाऊ पटवर्धन (पहिले) यांचें स्मरण होते, परंतु दुसऱ्या क्षणी नामातील Sir हें पद लक्ष्यात आलें म्हणजे थोडासा विषाद वाटतो कॉलेजास पूर्ववीरपुरुषाचें नाव देण्यात स्वाभिमान वाटतो, तर त्याचे बरोबरीची उपाधी आंग्लप्रभूचें वर्चस्व सुच-विते, यानें खेद होतो एखाद्या साहेबाचें नाव न देता आपल्या पूर्वजाचे नाव देण्यानें साधणारा स्वाभिमान, वरील इंग्रजी शब्दाचे साहचर्यानें फिका पडतो ज्या परशुरामभाऊंनी श्रीरंगपट्टणाचे स्वारीत इंग्रजास (दोस्त या नात्यानें का होईना) आपल्या सेनानीत्वाचे पाणी दाखावेले, त्याचे नावामागे इंग्रजवर्चस्व-द्योतक 'सर' हें पद लागलेलें पाहणें त्यास कितपत रुचेल? आपल्या वंशा-जानी कालमानानुसार इंग्रजानी दिलेली पदवी वापरावी हें कदाचित् त्यासही सह्य वाटेल, पण ते भूषणभूत खास वाटणार नाही नाइलाज असेल तेथें sir हा जोड योजा, पण जेथें तादृश जरूरी नाही तेथें हें शेंपूट कशाला? असेंच त्यास वाटणार करिता आद्य परशुरामभाऊंच्या दृष्टीनें, व वर्तमान व भविष्यत् आपल्या पिढ्यातील लोकाना सर्-चे अभावी होणाऱ्या अदूषित, पूर्वजवीर-

मृतीचे दृष्टीनेंही, sir हा शब्द योजिलेल्या संज्ञेंतून गाळावा असें मी अत्यंत नम्रपणें सुचवितों—नव्हे-विनवितों.

Sir व श्री—Sir-चे स्थानीं श्री हें पद योजावें. सर् या पदानें उदित होणारी भावना वैभवाची द्योतक आहे, तर श्री साक्षात् वैभवपर्याय आहे. तेव्हां अर्थतः या दोन्ही पदांत सवाद आहे. Sir यांतील अंतिमवर्णद्वयाचा विपर्यय केल्यानें, श्री-चाच लाभ होतो आहे, तेव्हां वर्णतःही दोन्ही शब्द विरोधी नाहींत. वडिलांचें नांव चिरंतन करावें ही वर्तमान श्रीमंतांची इच्छाही सुचविलेल्या फरकानें प्रतिहत होत नाहीं वडिलांस आजोबांनी प्रेमानें ठेविलेलें परशुरामभाऊ हें नांव चिरंतन करण्यानें आजोबांचाही मान राखिला जाणार परशुरामभाऊ या नांवांत ज्यानें वीरश्रीची जादू भरली त्या वीरसिंहाचे ऋणही Sir-नें अदूषित अशीच संज्ञा योजण्यानें अंशतः तरी फिटणार 'Sir परशुरामभाऊ' ही संज्ञा आद्यवीराचे स्मृतीस दूषक होणार, तर 'श्रीपरशुराम-भाऊ' ही संज्ञा आद्यवीर व (तत्समनामक) श्रीमंतांचे वडील व आजोबा या तिघांविषयीं आदरपोषक होणार.

३. अभिनंदनीय धोरण—कॉलेजचें नांव एकाद्या व्यक्तीचे नांवाशी पूर्वी निगडित केलें नाहीं, यांत व्यवस्थापकांचें मोठें चातुर्य दिसून येतें तसें नांव निगडित झालें असतें तर व्यक्तित्वाचा विचार नामांतर करण्याचे मार्गांत आड आला असता हल्लीं 'पूना' या शब्दास खो मिळणार, पण तद्बोधित वस्तु, नांव बदलल्यास, व्यक्तित्वाचे अभावानें पुढें येणार नाहीं शिवाय तिन्हा-इतानें विचार केला तरी असेंच ठरणार कीं, पुणें नगरास आपले जागीं 'परशुरामभाऊ' हें पद आलें तरी वाईट वाटण्याचें कारण नाहीं परशुरामभा-ऊनी पुण्यास पुष्कळ उपकृत करून ठेवलेंच आहे. तेव्हां कॉलेज-व्यवस्थाप-कांनी प्रथम नांव दिलें, तें चल असेंच दिलें, यांत त्यांची दूरदर्शिताच दिसून येते कदाचित् त्यांना प्रस्तुत प्रकारासारखें काहींसें भविष्य आरंभींही स्फुरित झालें असेल 'पूना' हा शब्द पूर्वजाभिमानाचा द्योतक असला तरी तद्बोधित वस्तू एक प्रकारें जड आहे परशुरामभाऊनें द्योतित वस्तु व्यक्ति असल्यानें, अभिमानपोषक असूनही सचेतन वस्तू आहे, अर्थात् पूना-चे वर तिचा दर्जा आहे. तेव्हां नांव बदलण्यांत स्वाभिमान-पोषणच वृद्धिंगत होत असल्यानें प्रस्तुतचेंही कॉलेज-अधिकाऱ्यांचें धोरण प्रशस्यच ठरतें.

४ **श्रीमंतांचें व्यावहारौचित्य**—' एक पंथ दो काज ' या न्यायानें विद्यादान, व पूर्वजवीरस्मरण ह्या दोन्ही गोष्टी, प्रस्तुत कॉलेजास मदत देऊन, श्रीमंत साधीत आहेत. ( जनकाची ) आपल्या वडिलाची स्मृति शाश्वत करणें हा हेतुही 'श्री परशुरामभाऊ' या बदलानें सिद्ध होतच आहे. दोघेही परशुरामभाऊ व दोघेही वडील। करिता 'श्रीपरशुरामभाऊ' असा फरक करून, आद्य परशुराम-भाऊ व जनक परशुरामभाऊ या दोघांच्या स्मृतीचें दृढ प्रतिष्ठापन श्रीमंतानी साधावें, यात विद्यादान व जनानृण्य याबरोबरच त्यास पूर्वजाचें व एकप्रकारें अखिल महाराष्ट्र देशाचेही आनृण्य साधेल फार तर इंग्रजी संज्ञेंत sir शब्द ठेवावा, पण त्याचें मराठी रूपांतरांत, sir चें भाषांतर,—वाटल्यास रूपांतरही म्हणा—श्री शब्दानें करावे, जसें-Honourable-चें नामदार अशा ठिकाणी आपण भाषांतर करितोंच. शेवटी कॉलेजचें नामांतर ' श्री परशुरामभाऊ कॉलेज् ' असें करावं अशी श्रीमंतास, व कॉलेजचे चालकास व जनतेस साग्रह विनंति करितों

---

## ५ समाजाचे बालपणचे अनुभव [ पर्यायपरीक्षण ]

' जें पिंडी तें ब्रम्हांडी ' या म्हणीत ग्रथित केलेल्या तत्वाप्रमाणे, ' यन्मनुजे तत्समाजे ' हें तत्वही खरें आहे, असें दिसून येईल मुलास लहानपणी अग्नि भाजतो, पाणी बुडवितें, चाकू कापितो, मांजर चावतें इ असंख्य गोष्टींची माहिती मिळवावयाची असते यापैकी कांही थोड्याशा गोष्टी मात्र तो अनु-भवानें जाणतो, बाकीच्या गोष्टींत तो आप्तवाक्य प्रमाण मानतो. 'अग्नि जाळतो' ही गोष्ट बहुधा प्रत्येकाला अनुभूत असते, पण 'विष मारतें' ही गोष्ट परप्रत्यया-नेंच गृहीत धरिली जाते.

या सृष्टींत विधात्यानें अनेक वस्तू उत्पन्न केल्या आहेत, व त्यांचे ठिकाणी असंख्य गुणधर्म ठेविले आहेत या गुणधर्मांचें पुष्कळसें ज्ञान जरी मनुष्यास ऋषितुल्य महात्म्यानी रचिलेल्या ग्रंथावरून, हल्ली सहज होत असलें, तरी हें ज्ञान मिळविण्यास त्या महात्म्यास प्रभूत श्रम व कालव्यय करावा लागला असेल.

' ग्रेटब्रिटन ' हें बेट आहे,—ही गोष्ट मराठी पांचवे यत्तेंतीलही मुलास साम्प्रत ज्ञात असते; परंतु ती ठरविण्यास रोमन लोकास पूर्वी प्रत्यक्ष जलपर्यटनच

करावें लागलें. त्यानी एकवार सिद्ध केलेली ही गोष्ट हल्ली गृहीत धरितात; तिचे सिद्धीकरिता फिरून श्रम न करिता मनुष्ये आपल्या कालाचा उपयोग दुसरें ज्ञान मिळविण्याकडे करितात. अशा रीतीनें एक पिढी पुढील पिढीची उपकर्त्री होते अशाच पूर्व पिढीनें केलेल्या उपकारास ऋषि–ऋण असें नाव आहे या ऋणाची फेड करणे म्हणजे पूर्वजानी मिळवून ठेविलेल्या ज्ञानात स्वतः भर टाकून, तें पुढील पिढीचे हवाली करणे हें होय. अशा रीतीने उत्तरोत्तर या जगात ज्ञानवृद्धि होत जाते

या ज्ञानापैकी ईश्वरनिर्मित वस्तूचें व त्याच्या प्रकट धर्माचें ज्ञान हें समाजानें बाल्यावस्थेंत, म्हणजे पहिल्या पिढीतच पैदा केले या ज्ञानाची नोंद भाषेनें आपल्या शब्दात करून ठेविली आहे आता, प्रकृति–प्रत्यय–विभाग व त्याच्या अर्थाचे निरूपण संस्कृताप्रमाणें इतर भाषात बाहुल्यानें आढळत नाही तेव्हा, वरील ज्ञानसंग्रह पाहणे हे संस्कृत शब्दात विशेष सोईचें आहे उदाहरणार्थ–पाण्याचे धर्म तद्वाचक संस्कृत शब्दात काय आहेत ते पाहू

( १ ) मराठी शाळेंत दुसरे यत्तेंत शिकविल्या जाणाऱ्या नदीच्या व्याख्येत 'उतरत्या जमिनीवरून वहात जाऊन' वगैरे मजकूर आहे याची नोंद ( नि–नीचैः, ईर्ते–गच्छति = ) **नीर** या शब्दात केली आहे

( २ ) उन्हात कासावीस झालेला मनुष्य थंड पदार्थाची, विशेषतः पाण्याची इच्छा करितो हा पाण्याचा शीतत्वधर्म 'डलयोरभेदः' या न्यायानें ( थंड म्ह० जड= ) **जल** या शब्दात ग्रथित आहे

( ३ , धान्याची रास करिता येते, सामान्यतः घन पदार्थ ठेवल्या जागेत राहतो, तशी पाण्याची स्थिति नाही, तें वाहतें म्हणून त्यास ( सरति-तन् ) **सलिल** असें नाव पडले आहे

( ४ ) एखादें ओढाळ गुरू एकाच दिशेने, म्हणजे तोंड पुढें करून, पळत सुटतें, पाणी हे चारी दिशानी धावतें इमारतीकरिता मातीचा गारा तयार करिताना, तीत पाणी घालून, ती कालवितात, त्या वेळी या पाण्याच्या धर्माचा प्रत्यय येतो द्रवबहुल अशा कढीची पाळ फुटते त्यास कारण तरी हाच धर्म होय. या धर्मास अनुलक्षून पाण्यास '**सर्वतोमुख**' असें म्हटलें आहे

(५) 'नीर' या संज्ञेंत दिसून येणारा ( अव + अञ्च् + त्व ) अवाक्त्व हा **धर्म** पाण्यात आहेच याच धर्माचें रूपांतर कधी-कधी उदक्त्व या धर्मामध्यें होतें, असें चर्मचक्षूस दिसतें. Artesian well, म्ह. उद्ग्जलकूप, याच्या शक्यतेच्या मुळाशी पाण्याचा अवाचीनत्व हा धर्म, किंवा जलाशयाचे स्थानाचे अज्ञानानें भासणारा उदीचीनत्व हा आरोपित धर्म, आहे. हा पाण्याचा भासमान धर्म पूर्वजांनी उदक ( उद्-अञ्चति तत् ) या संज्ञेंत संगृहीत करून ठेविला आहे. येथें सांगितलेले उद्ग्जलकूप मारवाडात पूर्वी असावे असें पुढील 'चारित्रवर्धन' याचे टीकेवरून दिसते—

**'मरुपृष्ठान्युदम्भांसि नाव्याः सुप्रतरा नदीः-इत्यादि-रघुवंश ४-११**

**अर्थ**—मारवाडातील सपाट प्रदेश पाण्याने डबडबलेले व ज्यात तारवें चालतात अशा नद्या ( पूल इत्यादि साधनांनी ) ओलांडण्यास सोप्या

**येथें 'उदम्भांसि-अतिखननव्यापारेण (खोल खणून)'-चारित्रवर्धन**

( ६ ) पिकें व हरएक वनस्पती उत्पन्न होण्यास पाण्याची जरूर असल्यानें, त्यास ( भवत्यस्मात् वस्तुजात ) तत् '**भुवनं**' असेंही अभिधान आहे

( ७ ) मनुष्य बासुंदी झोंकील, लिंबाचें सरबत ढोंशिल, दही मटकावील, ताक पिईल, तरी स्वानुभवावरून आपणा सर्वांस ज्ञात आहे की पाण्याशिवाय खरें समाधान नाही, खरा पिण्याचा पदार्थ पाणीच होय, हेंच सत्य ( पातुं योग्य ) **पानीय** या शब्दांत निगूढ आहे आपल्या पूर्वजांनी अनेक शतकां-पूर्वी जें सत्य सिद्ध केले, तेंच आज पश्चिमखंडातील लोक नव्याने सिद्ध करीत आहेत, व मद्य वर्ज्य ठरवून, त्याचे ऐवजी पाण्याचा उपयोग प्रशस्त मानू लागले आहेत

( ८ ) मनुष्यास प्रसंगी अनेक कारणांनी मूर्च्छा येते या वेळी कदाचित् त्याची स्थिति मृतासारखीही होते तो या स्थितीतून पाण्याचे मदतीनें शुद्धीवर येतो, व पूर्वीप्रमाणें जीवनशक्तीनें युक्त होतो, म्हणून त्यास ( जीवत्यनेन, जीवयति तत् वा ) **जीवन** असे नाव साजतें. बेशुद्ध पडलेल्या मनुष्यास शुद्धीवर आणण्याकडे पाण्याचा उपयोग आज पुष्कळास ठाऊक आहे तो पूर्वजास बऱ्याच प्रयोगांनी व कालावधीनें कळून आला असला पाहिजे. या महत्त्वाचे शोधाची नोंदच त्यांनी जीवन या शब्दांत करून ठेविली नाही काय!

( ९ ) अतिमात्र उष्णतेनें किंवा श्रमानें एखादा मनुष्य आसन्नमरण होतो. अशा वेळी त्याचें मृत किंवा मरण केवळ पाण्यानेंही टळणें शक्य असतें, व तें पाणी मिळालें म्हणजे मनुष्य मृताचा अमृत बनतो. हा अनुभव पूर्वजाना मिळण्यापूर्वी काही प्राणहानि झाली असेल, अशी हानि पुढें न व्हावी म्हणून त्यानी पाण्याची ही अद्भुत शक्ति '**अमृत**' ( अविद्यमान–परिहृत मृतं–मरणं यस्मात् तत् ) या शब्दानें गाइली आहे.

अशा रीतीनें ईश्वरनिर्मित वस्तूत आढळणारे–विशेषेंकरून शास्त्रीय उपकरणावाचून प्रतीत होणारे–धर्म संस्कृत शब्दात प्राचुर्यानें उपलब्ध होतात. तसे ते इतर भाषात नाहीत. यावरून असें दिसतें की, दिव्याचे ज्योतीनें बोट भाजतें–हा दिव्याचा धर्म मुलास ज्या वयात अनुभवानें कळतो, त्या वयात आपली मानवजाति होती तेव्हा ही संस्कृत भाषा प्रचारात असावी, व त्या वेळच्या लोकानी प्रथमच निदर्शनास आलेल्या एकेका–पूर्वपरिचित नसल्यामुळे कौतुकावह भासणाऱ्या–धर्माचा संग्रह तीत केला असावा.

एखादे वस्तूचा धर्म प्रथमच कळतो त्या वेळी त्याकडे आपलें लक्ष्य वेधतें. पुढें-पुढें 'अतिपरिचयादवज्ञा' या न्यायानें आपणास त्याचें काही विशेष वाटत नाही कुत्रे भोकताना आपण ऐकतो, तसेच ते Polynesia–मधील मूळच्या रहिवाशानीही ऐकले तेथे कुत्रे युरोपियन लोकानी आणिले. त्यापूर्वी चतुष्पाद प्राणी केवळ डुकर हाच त्यास परिचित होता या डुकराशी नतनागत पशूचे पायाचे सख्येंत साधर्म्य दिसले, पण भोकण्यात विस्मयकारक वैधर्म्य आढळले, व या वैधर्म्यास अनुलक्षून कुत्र्यास 'Barking pigs' अशा अर्थाचें नाव तेथील रहिवाश्यानी दिलें आहे

**सारांश**—वस्तूच्या अगदी सामान्य धर्माचा तिचे नावामध्यें समावेश–हा समाजाची बाल्यावस्था दर्शवितो, व परंपरेनें असेंही म्हणता येईल की, एखाद्या भाषेंत वस्तूचे संज्ञेमध्यें जसजसा या धर्माचा समावेश अधिकाधिक, तसतशी ती भाषा जुनी असावी. यावरूनही संस्कृत भाषेचें प्राचीनत्व, इतर भाषातील शब्दसंग्रहाशी तुलना केल्यास, दिसून येण्याचा संभव आहे.

अशा रीतीनें भाषेंतील शब्दाचें निरीक्षण करीत गेल्यानें, अनेकविध ज्ञान प्राप्त होऊन मनोरंजनही होतें; तरी विद्यार्थ्यांनीं अशी संवय लावून घ्यावी अशी इच्छा करून हा लेख संपवितों.

# ६ स्कन्द ब्रह्मचारी कीं गृहस्थ ?
## म्हणजेच
## स्कन्दपत्नी देवसेना वास्तविक कीं लाक्षणिक ?

**१. शंकास्वरूप**—विदर्भ देशच्या राजाची बहीण हिला अज पति मिळाला असता देवसेना जशी स्कंदासह शोभली तशी ती शोभली. इत्यादि वर्णन रघुवंशात आहे तेथें शका अशी की, देवसेना ही व्यक्तिदृष्ट्या स्त्री मानावी तर स्कन्दाचे ब्रह्मचारित्वास बाध येतो, न मानावी तर उपमा सम्यक् उपपन्न होत नाही या शंकेचें समाधान पुढीलप्रमाणें—

**२. मूर्तामूर्तोपमा**—

मार्ग मनुष्येश्वरधर्मपत्नी श्रुतेरिवार्थ स्मृतिरन्वगच्छत्। २।२
तदन्तरे सा विरराज धेनुर्दिनक्षपामध्यगतेव सध्या। २।२०
धातोः स्थान इवादेशं सुग्रीव सन्यवेशयत्। १२।५८
तमर्थमिव भारत्या सुतया योक्तुमर्हसि (कु. स.) ६।७९
गता नाशं तारा उपकृतमसाधाविव जने (मृच्छकटिक)

इत्यादि अनेक ठिकाणी मूर्त वस्तूचे वर्णनार्थ अमूर्त उपमानें योजिली आहेत. तेव्हा इंदुमती मूर्त असून तिला उपमान म्हणून देवाची सेना योजण्यात काहीच दोष दिसत नाही. उलट—अशा मूर्तामूर्तोपमेमुळें चमत्कृति उत्पन्न होऊन उपमा सरसच ठरते.

येथें घेतलेली **शंका**-देवाचें सैन्य मूर्त आहे, करिता येथील उपमान मूर्तच असावें **समाधान**-देवाचें सैन्य, सैन्य या दृष्टीनें मूर्त आहे; पण तें पत्नी या दृष्टीनें अमूर्तच मानिलें पाहिजे पत्नीत्व संहतत्वावर आश्रित आहे, व हें संहतत्व अमूर्तच असणार. म्हणजे येथें उपमान तत्त्वदृष्ट्या देवसेनेचें संहतत्व आहे व तें अमूर्तच आहे. मूर्तसाम्य सामान्य जनासही दिसेल तेंच केवळ वर्णिल्यास कवीचें वैशिष्ट्य तें काय? 'कि न पश्यन्ति कवयः?' या वचनात कवीचें प्रतिभाक्षेत्र अमर्याद म्हणून वर्णिलें आहेच. नाही तेथें साम्य वर्णून मनाच्या भावना जागरित करून, त्यामुळें वाचकाचे मनास सात्विक आनंद देणें हा एक कवित्वाचा विलास आहे. हाच विलास

येथील अमूर्ताच्या उपमेंत प्रत्ययास येतो. पुढील उपमा तर अशाच कारणानें मनास एक प्रकारचा चटकाच लाविते. ती उपमा अशी—

कपयश्चेरुरार्तस्य रामस्येव मनोरथाः । १२।५९.

येथील उपमा,-जीत रामाचे हुरहुरणारे मनातील चंचल विचार व राजा सुग्रीवाचे आज्ञेवरून सैरावैरा सर्व दिशास धावणारी चपल वानरें याचें साम्य वर्णिलें आहे ती उपमा-वास्तव चक्षूस दृश्य नसली तरी कल्पनाचक्षूस अत्यंत समर्पक वाटून कोणत्या वाचकाचे मनास आनद देणार नाही ? साराश-मूर्तास अमूर्ताचे उपमान हें कवित्वपोषकच ठरतें

३. **देवसेनेचें लाक्षणिकत्व**—( क ) देवसेना ही भिन्नभिन्न अशा तीन पुरुषाची कन्या सागितली आहे. ती जर खरोखरीचीच मुलगी असती तर तिचें पितृत्व असें विविध वर्णिलें नसते यावरूनच सूचित होते की, ती मानीव होती, ज्यामुळें अर्थात्-ज्याला ज्याचें पितृत्व योग्य वाटलें त्यानें त्याला देवसेनेचा पिता म्हणून वर्णिलें आहे **आधार**-

देवसेना ही प्रजापति,इन्द्र किंवा मृत्यु **यांची** कन्या आहे (ज्ञा प्र. २३-१०-३१)

( ख ) स्कन्द सपुत्र म्हणूनही वर्णिला आहे, पण हें सपुत्रत्व कोणत्या स्त्रीमुळे ? पुत्रोत्पत्ति कशी झाली ? **वज्रप्रहारामुळें** स्कदास मुलगे झाले (स्त्री-सभोगामुळें नव्हे ) **आधार**—

**वज्रप्रहारात्** स्कन्दस्य जज्ञुस्तत्र कुमारकाः । ( २३-१० ).

( ग ) मुलगे व मुली यानी स्कन्दास कसा पिता मानिलें ? जनक कीं कृतक ? केवळ कृतक म्हणजे मानीव पिता मानिलें **आधार**—

कुमारास्ते विशाख च पितृत्वे **समकल्पयन्** ।

( घ ) वराचें वय वधूपेक्षा अधिक असावें व असतें, पण येथें वधूचें—देवसेनेचें-वय स्कन्दापेक्षा अधिक सागितलें आहे अर्थात् देवसेना ही नेहमीच्या विवाहातील वधू नसून मानीव विवाहातील मानिली पाहिजे **आधार**-

**अजाते त्वयि** निर्दिष्टा तव पत्नी स्वयभुवा । ( १६-१० )

येथें विद्यमान वधूचा पती म्हणून पुढें जन्मणारा वीर अगाऊच वर योजण्यात आला आहे, आणि हें योग्यच आहे देवाचें सैन्य तयार होतेंच केवळ त्यास योग्य नेता पाहिजे होता त्यासाठी शंकराची प्रार्थना करून देवानी तो मिळविला, इत्यादि गोष्टी प्रसिद्धच आहेत ' जयाय सेनान्यमुशन्ति देवाः '

इत्यादि. यावरून 'देवसेना ही कोणी जन्मतः स्त्री होती' एतत्सिद्ध्यर्थ उपन्यस्त केलेल्या पुराव्यावरूनच देवसेना म्हणजे **देवांचें सैन्य**, ही गोष्ट स्पष्ट होते

४. **एक शंका**-देवसेनापनिस्त्वेव देवसेनाभिरावृतः (२३-१०) इत्यादि ठिकाणी-देवसेनापति देवाच्या सैन्याकडून वेष्टिला गेला, असें वर्णन आहे यावरून देवसेना निराळी, वेष्टणारी सैन्यें निराळी, असें अनुमान असंदिग्धपणे निघतेंच असे नाही प्रथम, अभिषेक झाला तेव्हा, सेनापतित्व सिद्ध झालें नंतर प्रत्यक्ष सेना त्याचे भोंवती जमल्या ही गोष्ट केवळ साहजिकच आहे येथें देवसेना म्हणजे देवचमूच ठरते एक देवसेना कन्या व दुसऱ्या देवसेना देवचमू असें ठरविण्याकरिता दिलेली वचनें तितकीशी निश्चयात्मक दिसत नाहीत

५ **कवीचें मत**—'स्कन्देन **साक्षादिव** देवसेनाम्।' या पद्यात, विचार केल्यास असे दिसतें की, अलंकार उत्प्रेक्षा नसून उपमा आहे येथें उपमान '**साक्षात्** देवसेना' असें आहे कोणी स्त्री जर उपमान म्हणून कालिदासास विवक्षित असती तर त्यानें साक्षात् हें पद योजिलें नसतें. अमूर्त वस्तूंस मूर्त कल्पिताना साक्षात् हे पद योजिलेलें आढळतें प्रत्यक्ष असलेल्या वस्तूस प्रत्यक्षार्थक विशेषण लावण्याचे प्रयोजनच नाही. तेव्हा कवीचे मते सुद्धा उपमानभूत देवसेना ही देवाचे सैन्यापासून अभिन्नच ठरते.

६ **निगमन**—(१) मूर्तामूर्तोपमा सदोष नसून कविकौशलमूलक असल्यानें हृद्यच ठरते (२) वधूचें वय अधिक, सतती वज्रप्रहारापासून उत्पन्न झालेली, स्कन्द हा पिता केवळ कृतक, असें वर्णन मिळतें (३) ऐतिहासिक व्यक्तीचा एकच पिता असणार, पण देवसेनेचे पिते तीन सांगितले आहेत हें विविधत्व काल्पनिक व्यक्तीचेच ठिकाणी संभवणार (४) कालिदासाचे मते देवसेना अमूर्तच दिसते अशा रीतीनें देवसेना ही लाक्षणिक पत्नी ठरते, ज्यावरून स्कंदाचें अविवाहित्व अबाधितच राहते.

---

## ७. हरिहरांचें ऐक्य.

१ आपल्या पुराणातून शिव व विष्णू हे दोघे मुख्य देव म्हणून वर्णिले आहेत त्यामध्यें भेद नसून, ते एकरूपच आहेत, असेंही मानण्यात येतें हें एकत्व सिद्ध करण्याचे प्रयत्न अनेक रीतीनी करितात. भाषेची

सरणी सुद्धा हें ऐक्यपोषणाचें काम करिते, असें दिसतें. हें पुढील विवेचनावरून दिसून येईल

२. एखाद्या मुलाचें नाव हरी असें ठेवण्यात येतें मोठेपणी तो गृहस्थ बनल्यास त्यास हरिपंत म्हणतात. पण तोच जर भिक्षुक झाला, तर त्यास हरभट असें म्हणतात यावरून **हरी तोच हर** हें सिद्ध होतें शिवाय यात उदरवृत्तीचे गुणानुरूपच हा नावातील फरक घडतो, असें दिसतें विष्णूची राहणी गृहस्थी बाण्याची, तर शंकराची राहणी भिक्षुकी बाण्याची हे सर्वसमत आहेच

३ वरील ऐक्य हरी व हर या दोन नावापुरतेच मर्यादित न राहता, तें महादेव व माधव यातही दिसून येतें. महादेव गृहस्थ झाल्यास त्यास माधवराव, उलट माधव भिक्षुक झाल्यास त्यास महादेवभट असें म्हणतात यावरून महादेवाचा माधव, व माधवाचा महादेव बनताना आढळतो अर्थात् असा फरक मुळातील ऐक्यावरच प्रतिष्ठित असणार

यावरून हरिहराचे ऐक्य आपल्या भाषेच्या सरणीनेंही सिद्ध होतें करिता आपण मराठी भाषा बोलणारानी शैव व वैष्णव या भेदास थारा देता कामा नये, हें उघडच आहे



# १ सूची ( सामान्य ).

## ज्ञातव्य—येथील आंकडे पानांचे दर्शक आहेत

**विषय.** — **पृष्ठ**



**विषय.** — **पृष्ठ.**

## २ सूची ( सहविचार्य गोष्टींची )

---

## सूची ३ ( व्युत्पत्तीसंबंधी )